# हिंदूंचें समाजरचनाशास्त्र



लेखक :

गोविंद महादेव जोशी
[ समाजशास्त्रज्ञ ]

आषाढ १८५६
किंमत ५ रुपये

प्रकाशक : पंडित विश्वनाथ महादेव जोशी,
१७ कॅनॉट रोड, पुणें (कँप)



पहिली आवृत्ति





मुद्रक : लक्ष्मण नारायण चापेकर,
'आर्यसंस्कृति मुद्रणालय,'
१९८(१७) सदाशिव पेठ, टिळकरस्ता, पुणें २.

# प्रस्तावना



सन १९०८ साली शाळेंत शिकत असतां डॉ. केलॉग या ग्रंथकाराचा 'मॅन दी मास्टरपीस' नांवाचा ग्रंथ वाचनांत आला. तेव्हांपासून भौतिक शास्त्रांच्या अभ्यासाचें वेड लागल्यासारखें झालें. हळूंहळूं पाश्चात्य ज्ञान-भांडारांतून पदार्थविज्ञान, रसायन, प्राणिशास्त्र—तदंतर्गत आनुवंश पद्धति, मानसशास्त्र—तदंतर्गत मनोविश्लेषणशास्त्र, अर्थशास्त्र—तदंतर्गत द्रव्याचें उत्पादन, वांटणी वगैरे विभाग, राज्यशास्त्र आणि तत्त्वज्ञान वगैरे शास्त्रांची मूलतत्त्वें आपलीशीं करून घेतलीं. नंतर समाजशास्त्र पहावयास सुरवात केली, तेव्हां असें दिसून आलें कीं, कोणत्याही दृष्टीनें विचार केला तरी हिंदूंची समाजरचना आणि आचारपद्धति मानवप्राण्याला जितकी निर्दोष करणें शक्य आहे तितपत निर्दोष आहे.

त्याबरोबरच हळूंहळूं हिंदूंचे तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ, आचारात्मक ग्रंथ, इतिहास वगैरेंचाही कांहीं गुरुमुखानें, कांहीं स्वतःच अशा तऱ्हेनें अभ्यास करीत होतों. तेव्हां असें दिसून आलें कीं, हिंदूंचें तत्त्वज्ञान इतर कोणत्याही तत्त्वज्ञाना-पेक्षां सरस आहे. अशा रीतीनें एका तऱ्हेनें मनाची तयारी होत असतां, बाहेर पडल्याबरोबर ज्या गोष्टी ऐकाव्या लागत, त्या ऐकून मनाची स्थिति चमत्कारिक होऊन जाई. बाहेर पहावें तों हिंदूंची जातिसंस्था, विवाहसंस्था, प्रार्थना-पद्धति, चालीरीति वगैरे एकूणएक गोष्टींबद्दल प्रत्येकजण निंदा करतांना दिसून येई. याचें कारण कळेना. हिंदूंनीं जें जें म्हणून श्रेष्ठ नैतिक मूल्य मानलेलें असेल, तें तें दूषणीय आहे असें जो म्हणेल तो तो पुढारी, हिंदु-समाजाचा हितचिंतक, प्रागतिक अशा तऱ्हेचें समीकरण झालेलें दिसलें. म्हणून शास्त्रांच्या पद्धतींनीं अभ्यास करून हिंदूंच्या चालीरीति आणि समाजपद्धति कशी काय दिसते, हें दाखविण्याच्या दृष्टीनें हा ग्रंथ लिहून परमेश्वराच्या चरणीं अर्पण करीत आहें.

आम्हीं पाश्चात्यांचे आधार घेतले आहेत. तरीही पाश्चात्य ग्रंथकारांबद्दल आम्हांला काय वाटतें, त्यांच्याशीं आमचा मतभेद कोठें येतो या गोष्टींची चर्चा आम्हीं आमच्या ग्रंथाच्या पान ३५७ वर केली आहे.

ग्रंथ लिहून झाला तरी अर्थहीन ग्रंथकारानें काय करावें ? लक्ष्मी आणि सरस्वती एका ठिकाणीं कशा येणार ! परंतु तीही काळजी श्रीकृपेंकरून नागपूर तहशिलांतील मुक्काम अष्टें येथील मालगुजार श्रीमंत तात्यासाहेब देशपांडे यांच्या हस्तें नाहींशी झाली. ग्रंथाला सुरवात केल्यापासून तों तहत ग्रंथ प्रकाशित होईपर्यंत श्रीमंतांच्याकडून जी अमोलिक मदत झाली— ती झाली नसती, तर—श्रीमंतांनीं आमच्यासारख्या निर्धनाला उदार अंतःकरणानें सहाय्य केलें नसतें, तर—आमच्या हातून या ग्रंथाचें प्रकाशन कधींच झालें नसतें. श्रीमंतांचें या बाबतींतील ऋण आमचे हातून फिटणें शक्य नाहीं.

ग्रंथांत मुद्रणदोष बरेच राहिले आहेत, याची ग्रंथकर्त्याला पूर्ण जाणीव आहे. त्याबद्दल वाचकांची सपशेल माफी मागणें हेंच आम्हांला श्रेयस्कर वाटतें. परंतु शुद्धिपत्र जोडलें नाहीं कारण कीं, सुबुद्ध वाचक या दोषाकडे कानाडोळा करतील अशी आशा आहे.

मुद्रणाचें काम "आर्यसंस्कृति मुद्रणालया" चे चालक रा. लक्ष्मण नारायण चापेकर, यांनीं त्रास सोसून करून दिलें याबद्दल त्यांचा आभारी आहें. प्रुफें तपासण्याचें काम माझे बंधु पंडित वि. म. जोशी, यांनीं अतिशय काळजीपूर्वक केलें. याशिवाय रा. भय्यासाहेब देशपांडे, राजाराम विनायक पाटसकर, वकील ( पुणें ), वामनराव मुंजे, बापुसाहेब धारप वगैरे ज्या मित्रमंडळींनीं सर्वतऱ्हेची मदत केली, त्या सर्वांचा मी पूर्ण आभारी आहें.

गो. म. जोशी.

# श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य मठ संकेश्वर यांचा आशीर्वाद

॥ श्रीशंकर ॥

श्रीगुरुभक्तिपरायण मठाभिमानी प्रिय शिष्य रा. गो. म. जोशी, मुक्काम पुणें यांसीः—

नमस्ते कल्याण इच्छित श्री निकट असो. तुमचेकडून “ हिंदूंचें समाजरचनाशास्त्र ” हा ग्रंथ मठाकडे अवलोकनार्थ आला त्याचें यथावकाश आपाततः अवलोकन झालें.

आमच्या हिंदुसंस्कृतीचा संबंध पाश्चात्य संस्कृतीशीं सुमारें पन्नास साठ वर्षांपूर्वी आला. तेव्हांपासून पाश्चात्यांचें अनुकरण करण्याची प्रवृत्ति आपल्या समाजामध्यें उत्पन्न झाल्यामुळें आमच्या चालीरीतींत हळूंहळूं फरक पडूं लागला. तो फरक क्रमशः जातिभेद, विवाहसंस्था, अस्पृश्यता वगैरे आपल्या समाजाच्या मूलतत्त्वांतही प्रवेश करूं लागला. शब्दप्रामाण्य सोडून अनुभवप्रामाण्य घ्यावा अशी चोहोंकडून आरोळी येऊं लागली. परंतु हा ग्रंथ वाचून पाहिल्या, तेव्हां अनुभवावर उभारलेल्या प्रत्यक्ष शास्त्रांचा उपयोग योग्यप्रकारें करून उत्तरें काढल्यास तीं उत्तरें आमच्या परंपरेला अनुसरून येणाऱ्या उत्तरांहून फारशी कांहीं भिन्न नाहींत असें दिसून आलें.

प्रस्तुत ग्रंथांत वैदिक धर्मीय मन्वादिस्मृतिशास्त्रकारांनीं वर्णाश्रमाचेद्वारा जी समाजघटना निर्माण केली ती निसर्गाला धरून असल्यानें कशी लोककल्याणकारक आहे, याचें उपपादन सोपपत्तिक व सयुक्तिक केलें आहे. हें सर्व विवेचन आधुनिक पाश्चात्य भौतिकशास्त्राला अनुसरून केलें असल्यानें, त्यायोगें नवशिक्षितांना वैदिक धर्माविषयींचा भ्रमनिरास करण्यास व सश्रद्ध धर्माभिमानी जनतेची निष्ठा दृढ करण्यास अत्यंत उपकारक होईल असा श्रीसंस्थानदेवतेस परम विश्वास वाटत आहे.

या कार्यांत आर्थिक मदत मुख्यतः श्रीमंत रा. तात्यासाहेब देशपांडे—मुक्काम अष्टा ( जि. नागपूर ) यांनीं केली. त्यांनांही सहपरिवार श्रीकडून अनेकपूर्ण आशीर्वाद आहेत.

प्रस्तुत ग्रंथप्रकाशनाचे द्वारां त्यांनीं उत्तमप्रकारची धर्मसेवा केली आहे, याबद्दल श्रीसंस्थानदेवतेस अत्यंत समाधान होत आहे.

अशीच धर्मसेवा तुमचे हातून निरंतर घडावी व सहपरिवार तुमचे कल्याण व्हावें यासाठीं श्रीशारदांबाचंद्रमौलीश्वराराधन-समयीं प्रार्थना होत आहे.

मु. कऱ्हाड,<br>
मिति आषाढ वद्य ४<br>
शके १८५६,<br>
वार सोमवार.

महानुशासनंवरीवर्ति.



## १९३४ च्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

### श्री. ना. गो. चापेकर यांचें मत :—

साहरा वाळवंटांत चालणाऱ्या प्रवाशाला मृगजलदर्शनानेसुद्धा आनंद होतो म्हणतात. त्याप्रमाणे ह्या कादंबऱ्यांच्या युगांत अत्यंत महत्त्वाच्या विषयावर शास्त्रीय ग्रंथ निर्माण झालेला पाहून कोणाहि विद्वानाला आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं. हिंदुसमाजाची रचना शाश्वत अशा शास्त्रीय पायावर केलेली आहे, हें सांगणारा आपणांस उपहासास पात्र करून घेईल, अशी हल्लीची स्थिति असतां श्री. गो. म. जोशी ह्यांनी हिंदुधर्मशास्त्रांतील तत्त्वें, पाश्चात्य विद्वानांच्या तत्त्वज्ञानाच्या कसोटीला लाऊन तीं बावनकशी आहेत, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न ह्या ग्रंथांत केला आहे. तो अभिनंदनीय नाहीं असें कोण म्हणेल ! सर्व प्राचीन समाजांत हिंदुसमाजच कायतो आजपर्यंत जीव धरून राहिला आहे, ह्याचें महत्त्व कित्येकांना वाटत नाहीं. परंतु नुसत्या जगण्या-सहि जीवनशक्ति लागते ही गोष्ट विसरून चालणार नाही. जीव अमर आहे तो देहाबरोबर नष्ट होत नाही, ह्या सिद्धांतावर मानवी कर्तव्या( धर्मा )चीं तत्त्वें निश्चित करून त्यांवर हिंदुसमाजाची उभारणी झाली असल्यामुळें, निव्वळ ऐहिक कल्पनांवर उभारलेल्या समाजापेक्षां त्यांत जीवनशक्ति अधिक आली आहे, असें ह्या मननीय ग्रंथांत सप्रमाण दाखविण्यांत आलें आहे. तसेंच ह्याच कल्पनेवर नैतिक मूल्यें अगर सदाचारविषयक समजुती निश्चित केल्या आहेत, म्हणून त्यांत फेरबदल करतांना नुसत्या ऐहिक सुखाचा विचार करून भागणार नाहीं, कारण सुख अथवा विजय हा वंशाच्या श्रेष्ठत्वाचा पुरावा होऊं शकत नाहीं. इत्यादि प्रमेयें हिंदुजनते-पुढे ठेऊन श्री. जोशी ह्यांनीं निरानिराळ्या मतांच्या लोकांना विचार करा-वयास लाविलें आहे. हिंदूंचे सद्यःकालीन सर्वच आचार श्री. जोशी ह्यांची

कसोटी मान्य करूनहि समर्थनीय होतील की नाही, ह्या विषयी मतभेद होणें स्वाभाविक आहे. तथापि त्यांचा मुख्य सिद्धांत "नवमतवाद्यां" ना त्यांनी पटविला तर मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत श्री. जोशी ह्यांचें स्थान दृढमूल होईल यांत शंका नाही.

(सही) ना. गो. चापेकर.



कै. सौ. **माईसाहेब देशमूख** ( रावेरकर )

जन्म : २३ मे १९०७ ] [ निधन : २० जुलै १९३२

# अर्पणपत्रिका

कै० सौ. माईसाहेब देशमूख यांच्या चिरंतन स्मृतीचें हें स्मारक करून ठेवित असतांना, त्यांच्या जीवितांतील सुख-दुःखांनीं रंगलेल्या एका एका घटनेचें स्मरण होऊन, हृदयोर्मी उचंबळून येतात! या जगांतील आपल्या केवळ सव्वीस वर्षांच्या वास्तव्यांत, त्यांनीं आपल्या आचरणांतील प्रत्येक गोष्टींत, सनातन धर्मविषयक नियमांना अनुषंगीक असेंच वर्तन ठेविलें होतें;—इतकेंच काय, पण अगदीं लहानपणापासून त्यांच्या मनावर झालेले धार्मिक संस्कार, त्यांच्या हृदयावर इतक्या उत्कटतेनें कोरिले गेले होते कीं, अखेरच्या वेळीं इतर आप्तेष्ट मंडळी त्यांच्यासाठीं शोक करीत असतांनादेखील, त्यांनीं स्वतःच त्या सर्वांना शोक न करण्याविषयीं सांगून, ईश्वराचें चिंतन करीत असतांनाच आपल्या कष्टमय जीविताचा शेवटला निरोप घेतला! संसारशकटांत वेळोवेळीं उद्‌भवणारीं अनेक दुःखें सहन करूनही त्यांनीं आपल्या पतिदेवाच्या प्रेमांत आणि सेवेंत तिळमात्रही अंतर पडूं दिलें नाहीं! सनातन धर्माविषयीं अढळ श्रद्धा, पतिप्रेम आणि सदाचार या त्रयींच्या संयोगानें आपल्या जीविताचा तेजस्वी नंदादीप, इतर सांसारिक लोकांना आणि विशेषतः स्त्रियांना आपली जीवितनौका या संसार-सागरांतून अबाधितपणें हांकारितां येण्यास मार्गदर्शक व्हावा या हेतूनें तेवत ठेऊन, कायेनें अदृष्य झालेल्या परंतु कीर्तीनें अमर राहिलेल्या कै० सौ० माईसाहेबांना हा ग्रंथ अत्यंत आदरपूर्वक अर्पण करण्यांत येत आहे.

**ग्रंथकर्ता**

# विषयानुक्रमणिका



रक्तांत फार प्राचीन काळापासून असावी असें दिसतें. रा. वि. का. राजवाडे म्हणतात,[१] ' वर्णभिन्नत्वास्तव व भिन्नयूथत्वास्तव ब्रह्मांत व क्षत्रांत बेटीव्यवहार अत्यंत प्राचीन कालीं होत नसे, आणि पुढें यद्यपि अल्पस्वल्प होऊं लागला, तथापि बेटीव्यवहारापासून अलिप्त रहाण्याचा ब्राह्मणांचा कटाक्ष तेव्हांही सध्यांप्रमाणेंच जाज्वल्य होता. ' म्हणजे वर्ण शुद्ध राखण्याची बुद्धि ब्राह्मणांत फार प्राचीन काळापासून उपजत असलेली दिसते. '

अशा तऱ्हेनें असें दिसतें कीं, हिंदूंची समाजरचना संघोपसंघ, जाति, उपजाति अगर वर्ण आणि आंतरजाति यांनीं निगडीत झालेली आहे. इतर मानवसंघांकडे दृष्टि फिरविल्यास काय नजरेस येतें ? अगदीं वरवर पाहिलें तरी प्रामुख्यानें एक गोष्ट नजरेस येईल कीं, एकटीच एक मानवव्यक्ति संघबाह्य स्थितींत रहातांना आढळून येत नाहीं. कोणत्याही काळीं अगर स्थळीं रहाणारी व्यक्ति असो, अथवा व्यक्ति आपणाला कोणत्याही संस्कृतीची म्हणवून घेवो, व्यक्ति ही कोणत्या ना कोणत्या तरी संघाची घटक ही असतेच. मानव या सृष्टींत अवतीर्ण झाला, त्याच्या ज्ञात इतिहासाच्या जुन्यांत जुना जो काळ, (Paleolithic age) त्या काळापासून आजपर्यंत पृथ्वीवरील कोणताही भूमिखंड घेतला तरी त्यामध्यें आणि नीअँडरटाल मनुष्यापासून आम्हीच काय ते सुसंस्कृत, आमचीच काय ती संस्कृति, अशा तोऱ्यानें सर्व जगाला तुच्छ मानणाऱ्या श्वेतवर्णीयांपर्यंत कोणताही मानवसमूह घेतला, तरी कोणत्याही काळांत अगर कोणत्याही संस्कृतीमध्यें संघबाह्य मनुष्यव्यक्ति दिसून येणारच नाहीं. एकाचे दोन झाले, मी आणि तूं असें प्रथमपुरुषीं आणि द्वितीय पुरुषीं शब्दप्रयोग होऊं लागले, म्हणजे त्या ' मी ' च्या आणि ' तूं ' च्या परस्परांशीं होणाऱ्या वर्तनाला निर्बंध घालण्याकरितां केलेल्या नियमावली दिसून येतात. मी आणि तूं झाल्याबरोबर त्या दोघांचेंही अनिर्बंध स्वातंत्र्य नष्ट झालें; हें स्वातंत्र्य अशा तऱ्हेनें नियंत्रित होणें हाच सर्व संस्कृतींचा मूळ पाया आहे. अशा तऱ्हेनें संघ आणि व्यक्ति या समव्यास झालेल्या दिसतात. ' यत्र यत्र मनुष्यः तत्र तत्र संघः ' अशा तऱ्हेचा सिद्धांत कोणीं मांडल्यास, तो अगदींच चूक ठरेल असें खास ह्मणतां येणार नाहीं.

१ राधामाधव विलास चंपू, प्रस्तावना पान-१४०

पुढें जरा जास्त लक्षपूर्वक अवलोकन केल्यास असें दिसून येईल कीं, वरवर पाहिलें असतां जो संघ आपणाला एकरूप दिसतो तो कांहीं सर्वथा एकरूप नसतो. त्या संघामध्यें वेगवेगळ्या नियमांनीं आणि नियंत्रणांनीं बांधले गेलेले बारीक बारीक गट अस्तित्वांत असतात. यामुळें ज्यांना मानवशास्त्रज्ञ, ( anthropologist ) 'वंश' मानतात, त्या वंशांच्या अंतर्गतही विभिन्न कारणांस्तव अनंत भेद असतात; आणि त्यांचे अनंत गट पडतात, इतकेंच नव्हे तर मूळ एका वंशांतच, अंतर्गत अनेक उपवंश पडण्याची प्रक्रिया सृष्टींतच चालू असते. गेटस म्हणतो,[1] 'जर एकाच मानववंशांतून कांहीं व्यक्ति विभिन्न करून त्यांच्या त्यांच्यांतच विवाह होऊं दिले तर त्या मानववंशांतच अनेक विभिन्न मानववंश उत्पन्न होतात.' उदाहरणानें बोलावयाचें तर ज्यांना आपण श्वेतवर्णीय युरोपियन या नांवानें संबोधतों, ते सर्व लोक कांहीं एकरूप नाहींत. अलीकडील शास्त्रज्ञांच्या मतानें, त्यांच्यामध्यें देखील नार्डिक, मेडिटरेनियन, अल्पाईन या नांवानें ख्यात असलेले तीन मुख्य वंश असून, शिवाय अनेक उपवंश अगर उपजाति आहेत. परंतु हा प्रश्न येथेंच संपत नाहीं. मूळ एकाच वंशाचे असूनही वेगवेगळ्या स्थळीं ते ते लोक, वेगवेगळ्या नांवानें गणले गेलेले आहेत. हीच स्थिति जगांतील एकूणएक संघांची आहे. अर्थात् संघ आणि उपसंघ हे सर्व ठिकाणींच अस्तित्वांत असतात.

आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, प्रथम मोठाले संघ होऊन पुढें त्यांचे उपसंघ बनले ( differentiation ) किंवा प्रथम बारीक बारीक गट पडून पुढें त्यांचें कांहीं एका तत्त्वावर एकीकरण ( Integration ) झालें ? मानवसमाजाचा विचार केला तर असें दिसून येईल कीं, या दोनही प्रक्रिया चालू आहेत. त्यामुळें या प्रश्नाचें सर्वसाधारण उत्तर देणें, हें बीजवृक्ष न्यायाचें उत्तर देण्याइतकेंच अवघड आहे. उत्तर द्यावयाचें तर ज्या संघाबद्दल आपण बोलत असूं त्याच्या एकंदर परिस्थितीचें आणि उत्क्रांतीचें सर्व दृष्ट्या निरीक्षण केल्याशिवाय कांहींच बोलतां येणार नाहीं. समाजाच्या वेगवेगळ्या स्थितींमध्यें आपआपल्या हेतूनुरूप लोक वेगवेगळीं उत्तरें देतात. अर्थशास्त्रज्ञ फ्रेडरिक लिस्ट कांहीं अर्थशास्त्रीय हेतु मनांत

1 Heredity and Eugenics by R. R. Gates, Page 223.

धरून, जर्मनीबाहेर रहाणाऱ्या कित्येक लोकांना जर्मन असें मानतो[१]; तर उलटपक्षीं जर्मनीमध्यें कित्येक शतकें वसती करून राहिलेल्या ज्यू लोकांना, जर्मन चॅन्सेलर हर अडॉल्फ हिटलर हा जर्मन मानीत नाहीं ! म्हणजे या दोघांही पुरुषांना, मानवप्राण्यांची भौगोलिक पद्धतीनें केलेली विभागणी मान्य नाहीं. कालपरवांपर्यंत हिंदुस्थानांत असलेल्या वन्य जाति, अस्पृष्ट लोक, मागसलेले वर्ण यांना हिंदु, सर्वसाधारण दृष्ट्या हिंदु या नांवानें संबोधीत[२], तर आज त्यांपैकीं एका वर्गाचे— म्हणजे अस्पृष्ट वर्गांचे– पुढारी बॅ. भीमराव अंबेडकर, हे अस्पृष्टांना हिंदु मानावयास तयार नाहींत. कलकत्त्यास सायमन कमिशनच्या पोटकमिटीचे एक सभासद या नात्यानें २३ आक्टोबर १९२८ रोजीं भरलेल्या त्या कमिशनच्या संयुक्त परिषदेपुढें दिलेल्या साक्षींत डॉ. अंबेडकर म्हणतात, "अस्पृश्यांचा आणि हिंदूंचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध नाहीं. त्यांचा एक स्वतंत्र निराळा असा अल्पसंख्याक समाज आहे, असें समजून त्यांना तसें वागविण्यांत यावें.[३]" एकोणीसशें एकवीसच्या खानेसुमारीच्या वेळीं ज्यांना ब्राह्मण मानीत नसत, त्यांतील कांहीं वर्ग एकोणीसशें एकतीसच्या खानेसुमारींत ब्राह्मण वर्गांत अंतर्भूत केलेले दिसतात.[४] अशा तऱ्हेनीं ही संघांची जुळवाजुळव आणि मोडतोड, वेगवेगळ्या काळीं आणि वेगवेगळ्या तऱ्हेनें केलेली प्रतीत होते. परंतु या सर्वांमध्यें ज्या सृष्टीचा मनुष्यप्राणी आपणाला श्रेष्ठ, उत्क्रांत असा दुवा समजतो, त्या सृष्टीच्या नियमांचा बरोबर विचार न झाल्यास, सृष्टि कांहीं आपली गय करील असें मला वाटत नाहीं. कोणींही उठावें कांहींही कल्पना बांधावी व आपल्या मनाप्रमाणें वाटेल तशी विभागणी करून घ्यावी, असेंच सध्यां चाललेलें दिसतें !

या सर्व भानगडींचें मुख्य कारण असें आहे कीं, मानव प्राण्यांतील सामान्य वैषम्यें, वरवर पहाणी करून समजण्यासारखीं नाहींत. सर आर्थर

---

१ Doctrines by Gide and Rist.

२ See census report for 1901, 1911, 1921, 1931.

३ 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' वि. रा. शिंदे, पान १४८.

४ Census of India 1931 Vol. I. 431.

तर दुसरा संघ अनुज्ञाप्रधान होईल. पहिल्या संघाची नैसर्गिक प्रवृत्ति राजसत्ताप्रधान समाजरचनेकडे झुकेल, तर दुसऱ्या तऱ्हेच्या संघाची प्रवृत्ति प्रजासत्ताक समाजरचनेकडे झुकेल. नीति ( morals ) आणि पद्धति, ( manners ) यांमध्यें असलेला फरक लक्षांत घेतां, पहिला संघ नीति-प्राधान्याकडे झुकेल तर दुसरा पद्धति–प्राधान्य श्रेष्ठ ठरवील. सृष्टींतील सार्वत्रिक वैषम्य लक्षांत घेतां, पहिल्या पद्धतीनें पहाणारास समाजरचना संघोपसंघयुक्त असावी असें वाटेल, तर दुसऱ्या पद्धतीनें सामाजिक समतेचा आश्रय करून, समाजरचना व्यक्तिप्रधान असावी असें वाटेल. पहिल्या पद्धतीनें सृष्टीच्या स्थिर नियमांना धरून, नीतीचे नियम ठरावयाचे असल्याकारणानें नीतिनियम त्रिकालाबाधित (transcendental values) ठरतील; दुसऱ्या पद्धतीनें पाहिलें तर नीतिनियम हे कल्पनांच्या उदयास्ता-बरोबर उदयास्त पावतील ( Relative values ). पहिल्या पद्धतीनें पाहिलें तर संघ हे सृष्टिप्रणीत म्हणजे ईश्वरप्रणीत असल्याकारणानें संघांचें रक्षण हें साध्य ठरेल[१]. मनु म्हणतो, 'त्या महातेजस्वी ब्रह्मदेवानें, या सर्व सृष्ट जीवजातांचें रक्षण करण्याच्या हेतूनें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचीं कर्में पृथक् कल्पिलीं.' दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें, तर संघ हे कांहीं हेतु मनांत धरून उत्पन्न केले गेले असल्यामुळें तो हेतु जर सिद्ध होत नसेल, तर संघाचें रक्षण करण्याचें कारण रहाणार नाहीं. येथें संघरक्षण हें साधन होईल.अशा तऱ्हेनें समाजाचा विचार करण्याच्या या दोन पद्धति आहेत.

येथें एक गोष्ट नमूद करावीशी वाटते कीं, ही जी वर संघोपसंघाची प्रवृत्ति सांगितली, ती मनुष्यप्राणी समान आहे असें मानून धर्मस्थापना करणारे ख्रिस्ती आणि महंमदी, कामकरीवर्गाच्या अर्थशास्त्राच्या पद्धतीनें समाजरचना केली असतां या जगाचें नंदनवन होऊन जाईल, असें मानणारे मार्क्स, लेनिन, स्टॅलिन यांचे अनुयायी समाजसत्तावादी, लोक-सभेच्या अनुरोधानें राजसत्ता चालावी असें म्हणणारे इंग्रज आणि अमेरिकन तत्त्ववेत्ते, आमच्याकडे सुधारक म्हणून मानला गेलेला वर्ग, अलीकडे पुढें येऊं लागलेले वेदांतवागीश, महामहोपाध्याय, तर्कतीर्थ वगैरे प्राचीन संस्कृतीचे पुरस्कर्ते, सुशिक्षित, अर्धसुशिक्षित, मानलेले सुशिक्षित

१ मनु १–८७.

तऱ्हेच्या प्राणीसंघांमध्यें सर्व तऱ्हेचे संघ सांपडणार नाहींत. मनुष्यप्राण्यांमध्यें मुख्यतः जे कुटुंब वगैरे लहान मोठे संघ आढळून येतात ते संघ मानवाशीं कांहीं तरी बाबतींत अत्यंत सदृश अशा तऱ्हेच्या जीवजातींत सांपडतात किंवा कसें तें पहावयाचें.

संघोत्पादनाच्या दृष्टीनें मनुष्यप्राण्याचा विचार करूं लागलें तर पहिली गोष्ट अशी लक्षांत येईल कीं, मानवाचें अर्भक हे अत्यंत दुर्बल असतें. या[१] नूतन जन्मलेल्या अर्भकापासून तो वयांत येणाऱ्या तरुण व्यक्तीपर्यंत, एकाखालीं एक वाढणारी अशी रोपीटोपी मानवाच्या कुटुंबामध्यें असलेलीं दिसून येतील. हीं सर्व कर्त्या मानवाच्या योग्यतेला पोहोंचावयाचीं तर त्यांचें वयांत येईपर्यंत पालनपोषण व्हावयास पाहिजे आणि म्हणून त्याकरितां दोनही पितरांनीं काळजी घ्यावयास पाहिजे. मानवेतर समाजांत इतर कोठेंही बालकांची अशी दुर्बल स्थिति असल्यास, सृष्टीमध्यें तेथें काय घडतें याची तुलना करून पहावयास पाहिजे. इतर जीवजातींची तुलना करून उपयोग काय ? ज्या जीवजातींमध्यें अर्भक जन्मपावल्याबरोबर आईच्या मागें धावूं शकतें, त्या जीवजातांमध्यें मातेच्या अगर पित्याच्या काळजीची जरूरीच नाहीं. अर्थातच त्या ठिकाणीं कोणत्याही स्थायी व्यवस्थेची जरूरीही नाहीं. मानवी बालकाची अशी स्थिति असल्यामुळें आणि मानव जाति आज आपणापुढें हयात असल्यामुळें, या दुर्बलांचें पोषणसंवर्धन करणारी कांहीं तरी व्यवस्था मानवसृष्टीच्या सुरुवातीपासूनच असावयास पाहिजे. ज्या अर्थीं बालकाच्या पोषणाची व्यवस्था, परमेश्वरानें स्त्रीच्या शरीरांतच करून ठेविली आहे त्या अर्थीं स्त्री ही अनंत काळापासून स्थायिकच असावयास पाहिजे आणि तिचा पोषणकर्ता अगर कर्तेही निश्चित असावयास पाहिजेत. म्हणून असें वाटतें कीं, कुटुंबसंस्था ही मानवाच्या इतकीच जुनी असावयास पाहिजे.

**३ तिर्यक् योनींत समाजदर्शन**

ज्या जीवजातींमध्यें अशाच तऱ्हेनें बालकांची दुर्बल स्थिति, त्यांमध्येंही मानवाप्रमाणें समाज उत्पन्न झालेले दिसत असल्यास, मानवसमाज हा संततीच्या वर्धनपोषणाकरितांच मुख्यतः उत्पन्न झाला, असें म्हणण्याला कांहीं प्रत्यवाय येणार

१ The new evolution by Clarke, page 6.

नाहीं. अशा तऱ्हेची बालकाची स्थिति पृष्ठवंशयुक्त प्राण्यांपैकीं फक्त मानवांतच दिसून येते.[1] अशी स्थिति फक्त कांहीं कीटक ( insects ), कांहीं पक्षी आणि मुंग्या ( Rodents ) यांच्यामध्येंच सांपडते. म्हणून त्याप्राण्यांमध्यें मनुष्यप्राण्याप्रमाणेंच कांहीं तरी समाजरचना होत असल्यास, समाजरचना ही सृष्ट्युत्पन्न आहे असेंच म्हणावें लागेल. तरी आतां तेथें समाजरचनेचें कांहीं स्वरूप सांपडतें किंवा कसें तें पाहूं.

मानवाच्या श्रेष्ठ बुद्धीचीं पुढील चिन्हें म्हणून सांगितलीं जातात.

( १ ) मनुष्यप्राणी कृत्रिम उष्णता वापरतो.

( २ ) तो हत्यारें वापरतो.

( ३ ) तो वस्त्रप्रावरणें परिधान करतो.

( ४ ) मनुष्य समाजांत गुलाम दिसून येतात.

( ५ ) मनुष्य इतर जनावरें माणसाळवून त्यांचा दूधदुभतें मिळविण्याकडे उपयोग करतो.

असें दिसून येईल कीं, या सर्व गुणांच्या त्या कीटकसमाजामध्यें वर सांगितल्याप्रमाणें बालकाची स्थिति असेल, त्या कीटकसमाजांत उपयोगांत आणलेल्या दिसून येतात.

( १ ) कांहीं पक्षी, नक्र वगैरे सरपटणारीं जनावरें, मुंग्या आणि इतर कीटक हे सर्व सडणाऱ्या वनस्पति गोळा करतात. त्या वनस्पतींमध्यें उत्पन्न होणाऱ्या कीटकांपासून उत्पन्न होणाऱ्या कृत्रिम उष्णतेचा हे प्राणी उपयोग करून घेतात.

( २ ) लहान वाळूचे कण अगर वाळलेल्या बीजांत भरून, त्यांनीं आपण मारून टाकलेल्या प्राण्यावरील पूळ काढण्याकडे, एक तऱ्हेच्या गांधीलमाशा उपयोग करतांना दिसून येतात. कृमि आपल्या समाजाचें हल्यापासून कसें रक्षण करतात, तें पहाणें फारच मनोरंजक आहे; परंतु विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं.

( ३ ) पुष्कळसे किडे वस्त्रप्रावरणांचा उपयोग करतात. ते निरनिराळे पदार्थ घेऊन, ते रेशमी धाग्यानें गुंफून, त्याचें तयार झालेलें आच्छादन परिधान करतात. एक कृमि, ( cater piller ) लोकरी कपड्या-

[1] New evolution by Clarke, page 16.

पासून तोडून घेतलेल्या केसांचा अंगरखा अंगाभोंवतीं घालतो. पुष्कळसे तरुण किडे, त्यांनीं खाऊन टाकलेल्या किड्यांचीं रिकामीं पडलेलीं कातडीं अंगाभोंवतीं घालून, त्यांचें प्रावरण तयार करितात. याचें कारण शोधूं गेलें तर असें दिसून येतें कीं, ही गोष्ट मुख्यतः शरीराला शोभा आणण्याकरितां केलेली असते !

( ४ ) मुंग्यांच्या समाजामध्यें, मनुष्य ज्याप्रमाणें गुलामांचा उपयोग करीत असे व अजूनही जसा कित्येक ठिकाणीं करतांना दिसून येतो, त्याप्रमाणें गुलामांचा उपयोग केलेला दिसून येतो.

( ५ ) आपण ज्याप्रमाणें माणसाळलेल्या जनावरांचा उपयोग करतों, त्याप्रमाणेंच अनेक तऱ्हेचे कृमि इतर कृमि माणसाळवून ( दुसरा शब्द तयार केला नाहीं म्हणून वाचकांची क्षमा मागतों ! ) त्या प्राण्यांपासून मिळणाऱ्या मद्यासारख्या गोड आणि रसाळ पदार्थांचा उपयोग करतात. ते पदार्थ त्यांना फारच आवडतात. ते या जनावरांची फार काळजी घेतात आणि त्यांच्याकरितां गोठेही बांधतात. पुष्कळ तऱ्हेचे कृमि झाडूवालेही ठेवतात, परंतु त्यांना अस्पृश्य मानितात किंवा नाहीं, यासंबंधीं कांहींही शोध शास्त्रांना लागलेला नाहीं !

अगदीं थोडक्यांत सांगावयाचें तर मानव समाजामध्यें जी जी प्रक्रिया चाललेली दिसून येईल, ती ती सर्व या कृमि जातींमध्यें चाललेली दिसून येईल. कित्येक मुंग्यांनीं शेतीची सुधारणा केलेली आहे. कृमि कीटक एकमेकांला पुष्कळशी बातमी पोहोंचवितात, परंतु ते काय पद्धतीनें पोहोंचवीत असतील त्याचा कांहीं खुलासा होत नाहीं. मुंग्यांच्या वारूळांमध्यें कांहीं दुर्बळ आणि निरुपयोगी प्राण्यांची निगा राखलेली दिसून येते. ही मानवसमाजांतील अनाथांची व्यवस्था करण्यांतील कल्पना नाहीं काय ? मानव ज्याप्रमाणें बलाढ्य चतुष्पादांचा वाहनाप्रमाणें उपयोग करतो, त्याप्रमाणेंच पुष्कळसे कृमि वाहनांचा उपयोग करतात. थोडक्यांत सांगावयाचें तर मनुष्य समाजांतील एकूण एक महत्त्वाच्या कल्पना सृष्टीमध्यें तिर्यक् योनींत असल्याचेंही दिसून येईल आणि म्हणून सर्व तऱ्हेचे संघ आणि गट तिर्यक् योनींतही अस्तित्वांत असलेले दिसून येतील.

निसर्गस्थितींत गट कसे पडत जातात तें आतां प्रत्यक्ष उदाहरणा

संतति होते, त्या तऱ्हेचे घोडे फक्त निनेवी शहरांतील शिल्पकला आणि पार्थेनानमधील चित्रें ह्यांमध्येंच दिसून येतात. अशा तऱ्हेचे घोडे चीनमधील जुन्या नाण्यांवर दिसून येतात. त्याचप्रमाणें त्यांचें अस्तित्व ट्रॉयच्या वेढ्याच्या काळीं असावें असें वाटतें. या गोष्टींवरून दोन अनुमानें निघतात. पहिलें असें कीं, जीवसृष्टि अनिर्बंध आणि स्वतंत्र स्थितींत वावरूं दिल्यास चारचार हजार वर्षांचे संस्कार शेंदीडशें वर्षांत नष्ट होतात. हीच गोष्ट सुप्रसिद्ध प्राणिशास्त्रज्ञ आगुस्त वेझमान पुढील शब्दांत सांगतो, 'जीवसृष्टि अनिर्बंध स्थितींत राहूं दिल्यास, तिची अधोगामी प्रवृत्ति असते.' हाच सिद्धांत मनूनें पुढीलप्रमाणें सांगितला आहे, 'हळू हळू या क्षत्रिय जाति, संस्कारलोपामुळें आणि संस्कार सांगणारे ब्राह्मण न भेटल्यामुळें शूद्रत्वाला पोहोंचल्या.[१]' दुसरें अनुमान असें कीं, आमच्या इकडील सुधारक जिला रोटीबंद, बेटीबंद, चिरेबंद वगैरे दूषणास्पद नांवांनीं संबोधितात[२], तीच प्रक्रिया सृष्टींत चालत असलेली दिसून येईल. मनुष्यप्राण्याची जी कांहीं प्रगति व्हावयाची, ती सृष्टीचे नियम समजावून घेऊन आणि त्यांचा उपयोग करून; ते मोडून नव्हे ! आतांपर्यंत समाजरचना, संघोपसंघ वगैरे बाबतींत सृष्टीची प्रक्रिया कशी आहे, ती सांगितली. सृष्ट्यंतर्गत मनुष्यप्राण्यांतील संघोपसंघाचें बीज या सृष्टीप्रणीत हेतूंतच असावयास पाहिजे. परंतु घमेंडखोर मनुष्यप्राणी, ही गोष्ट कबूल करावयास सहसा तयार होत नाहीं. अहंकाराचा आश्रय करून, सर्व कांहीं कर्तृत्व माझेंच असें तो सांगूं लागतो. आणि तें तसेंच असलें पाहिजे, हें सिद्ध करण्याकरितां वेगवेगळ्या युक्त्या काढूं लागतो ! हेंच आसुरी संपत्तीचें लक्षण आहे. मनुष्यप्राण्याला झालेल्या अहंकाराचें वर्णन, भगवद्गीताकारांनीं फारच सुंदर तऱ्हेनें केलेलें आहे.[३] 'प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः । न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरं । अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ एतांदृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः । प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहितः ॥ काममाश्रित्य दुष्पूरं

१ मनु १०-४३,४४.

२ दे. भ. बॅरिस्टर सावरकर यांचे केसरी पत्रांतील जातिभेदावरील लेख.

३ भगवद्गीता १६-७ ते २०.

दंभमानमदान्विताः । मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान् प्रवर्ततेऽशुचिव्रताः ।। चिंतामपरिमेयांच प्रलयांतामुपाश्रिताः । कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ।। आशापाशशतैर्बद्धा कामक्रोधपरायणाः । ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ।। इदमद्य मयालब्धमिमं प्राप्स्ये मनोरथं । इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ।। असौ हतो मया शत्रुर्हनिष्ये चापरानपि । ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी ।। आढ्योऽभिजनवानस्मि कोन्योऽस्ति सदृशो मया । यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ।। अनेकचित्तविभ्रान्ताः मोहजालसमन्विताः । प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ।। आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः । यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ।। अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः । मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ।। तानहं द्विषतःक्रूरान् संसारेषु नराधमान् । क्षिपाम्यजस्रं अशुभा आसुरीष्वेव योनिषु ।। आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि । मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिं ।। ' वरील वर्णन अलीकडील पाश्चात्य विकृतीला अक्षरशः लागू पडेल असें मला वाटतें. अलीकडील सुशिक्षित देखील ती गोष्ट कबूल करील ! परंतु पुढें असें सांगेल कीं, वर जें विकृतीचें वर्णन केलें आहे, ' एवंगुणविशिष्ट ' विकृति वाईट नाहीं, तें समाजाचें प्रत्यक्ष स्थितिप्रत ( positive stage ) पोंचल्यानंतरचें रूप आहे आणि तुमचा भगवद्गीताकार ज्या अर्थीं स्वर्ग नरक वगैरेंबद्दल बोलतो, त्या अर्थीं तो आगुस्ट कोंतनें जी सामाजिक प्रगतीची प्रणाली लावली आहे, त्यापैकीं आध्यात्मिक स्थितींत आहे ! ( metaphysical ) त्याला अजून आधिभौतिक स्थितीला यावयाचें आहे ! अशा तऱ्हेनें मनुष्य अगर समाज अहंकारानें नटून गेला म्हणजे, आपणही सृष्टीच्या घडामोडींतील एक दुवा आहों ही गोष्ट विसरून जाऊन, मानव समाजांतील एकून एक हालचाली मनुष्य बुद्धीपुरःसर घडवून आणतो अशी त्याची पूर्ण खात्री होते, आणि मग तो प्रत्येक मानवी कृतीचें कारण शोधून काढूं लागतो. अशाच नियमानें तो संघोपसंघाची प्रवृत्ति देखील आपल्या मनाच्या कर्तृत्वाचेंच फळ आहे, असें मानूं लागतो. एक हिंदु समाज सोडला तर इतर सर्व ठिकाणच्या समाजरचना याच पद्धतीनें केलेल्या दिसतात. त्यांचा कायदा घ्या, त्यांची नीतिपद्धति घ्या, त्यांची राज्यपद्धति घ्या, त्यांच्या कल्पनांत प्रतीत

होणारी समाजविषयक कोणतीही कल्पना घ्या, त्यांच्या मूळांशीं एक कल्पना प्रतिबिंबित झालेली दिसेल, ती म्हणजे मनुष्यानें समाजोत्पत्तीकरितां आपसांत घडवून आणलेला करार ही होय. मनुष्यानें सामाजिक करार ( social contract ) केला, ती कल्पना काय स्वरूपाची आहे याचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों.

**४ सामाजिक करार**

या कल्पनेचे पुढीलप्रमाणें तीन टप्पे[१] पडतात. पहिला टप्पा असा आहे कीं, फार पुरातन काळीं मनुष्यप्राणी समाजविरहित व्यक्तिप्रधान स्थितींत होता. अशा तऱ्हेचें वर्तन त्यानें आजही ठेवावें, असें म्हणणारे तत्त्ववेत्तेही दृष्टीस पडतात. व्यक्तिमूलक आणि व्यक्तिप्रधान समाजरचना सांगणारे अर्थशास्त्रज्ञ[२] जे. ॲडम स्मिथ, रिकार्डो, माल्थूस, जान स्टुअर्ट मिल, बास्टिआ यांच्या मताचा आत्यंतिक परिणाम जर्मन तत्त्ववेत्ता मॅक्स स्टर्नर याच्या मतांत झालेला आढळून येतो. तो मोठ्या आवेशानें सांगतो[३], 'फक्त मी आस्तित्वांत आहें, बाह्य जग मीच आहे आणि माझें ध्येय मीच आहे.' याच तऱ्हेच्या अहंकाराच्या कल्पना आज नीतिशास्त्राला व्यापून राहिल्या आहेत; ही गोष्ट आमच्या इकडील समाजसुधारक देखील कबूल करील. हा समाजरचनेंतील पहिला टप्पा. दुसरा टप्पा म्हणजे असें झालें कीं, सर्व माणसांनीं एके दिवशीं जमून करार केला. त्यांनीं असें ठरविलें कीं, आपणां प्रत्येकास जे कांहीं नैसर्गिक हक्क प्राप्त झालेले आहेत ते थोडे थोडे कमी करून ते सर्व कोणातरी व्यक्तीच्या अगर व्यक्तींच्या स्वाधीन करूं आणि या हक्कदानाचा मोबदला म्हणून, त्यांनीं आपणांस सुसंरक्षण दिलें पाहिजे. परंतु करार केला अशी कल्पना पुढं आल्याबरोबर असा प्रश्न पुढें येतो कीं, त्या वेळीं आधिदैविक, आध्यात्मिक

१ रूसो–सोशल कॉन्ट्रॅक्ट, हॉब्ज-लेविआथन, लॉक-टू ट्रीटायजेस ऑन गव्हर्नमेंट, सर्व साधारण वाचकांकरितां गेटेल, सिज्विक, लास्की, वुइल्सन वगैरेंचे राजकारण शास्त्रावरील ग्रंथ.

२ Types of economic theory by Othmar Spann.

३ Ego sum ego, I am myself, my object is myself and my aim is myself.

कायदा आणि मानवी कायदा अशी प्रत्यक्ष विभागणी होऊन समाज म्हणजे मानवी करार अशी कल्पना अवतीर्ण झाली ! ही कल्पना हिब्रू[१] लोकांत होती. हिचा उल्लेख प्लेटोनें[२] केलेला आहे. रोमन कायदेपंडितांना ती मान्य होती आणि सरदारप्रधान ( Feudal ) राजसत्तेचा तर ती पायाच होती. राजसत्ता आणि धर्मसत्ता यांच्यामध्यें विरोध आल्यास धर्मसत्तेचे कैवारी, राजसत्ता ही लोकांनीं केलेल्या करारांचें फळ आहे असेंच म्हणत. पुढें सर्वच लोकांना ही कराराची कल्पना हितकारक भासूं लागली. ह्या कल्पनेला उचलून धरणारे मुख्यतः तीन तत्ववेत्ते होऊन गेले. ते म्हणजे हॉब्ज, लॉक आणि रूसो. प्रत्यक्षाचा आश्रय सोडून, कल्पनांचा आश्रय करूं लागलें म्हणजे असे मतभेद न झाल्यास तेंच आश्चर्य. हॉब्जला अनियंत्रित राजसत्तेचा कड घ्यावयाचा असल्याकारणानें, त्याचें म्हणणें असें पडलें कीं, करारानें जी सत्ता एकदां राजाच्या स्वाधीन केली तें दान आतां परत कसें घेतां येईल ? आणि करार लोकांनीं आपसांत केला, त्यांत राजा जर भागीदारच नव्हता तर त्याच्यावर करार पाळण्याची जबाबदारी, कोणत्याही दृष्टीनें पडूं शकतच नाहीं.' लॉकला नियंत्रित राजसत्तेचा पुरस्कार करावयाचा असल्यामुळें तो म्हणतो, ' मानवानें करार केला त्यावेळीं राजा देखील करारांत भागीदार होताच. म्हणून त्यालाही कराराचें मूलतत्त्व पाळावयास पाहिजे.' रूसोला राजसत्ता मुळींच नको होती. त्याचें म्हणणें असें पडलें कीं, ' सर्व सत्ता समाजाची आणि समाजानें त्याकरितां कार्यकर्ते नेमावयाचे. त्याच्या ग्रंथाचें पहिलेंच वाक्य, ' मनुष्य निसर्गतः स्वतंत्र आहे परंतु तो जगांत सर्व ठिकाणीं शृंखलांमध्यें अडकलेला दिसतो.[३]'

समाजोत्पत्तीचें सृष्टिप्रणीत आणि करारप्रणीत अशा दोनही तऱ्हांनीं थोडक्यांत दिग्दर्शन केलें. करारपद्धतींतील विचारसरणीचा आतां थोडासा विचार करतों. पहिला टप्पा मनुष्य हा व्यक्तिप्रधान स्थितींत होता. आम्हीं मानवसंततीचा विचार करून पूर्वीं दाखविलेंच आहे कीं, व्यक्तिप्रधान-

---

१ Samuel, V. 3.

२ प्लेटो-रिपब्लिक.

३ रुसो-सोशल कॉंट्रॅक्ट.

झाली असावी अशा कल्पना पसरूं लागल्या. त्याच ओघामध्यें राजसत्ता ही उत्क्रांत होत असते, असें मत पुढें येऊं लागलें. त्याप्रमाणेंच नैतिक कल्पनांची उत्क्रांति(Evolution of moral ideas),परमेश्वराविषयक कल्पनांची उत्क्रांति, भांडवलाची उत्क्रांति, विवाहविषयक कल्पनांची उत्क्रांति वगैरे झाडून साऱ्या गोष्टींची उत्क्रांति होऊं लागली. जंगी तत्त्ववेत्ता हर्बर्ट स्पेन्सर याच्या मतानें, समाजांचा ओघ हा उत्क्रांतीच्या नियमानें नेहमीं बऱ्याकडेच असल्यानें, आजची संस्था कालच्या संस्थेपेक्षां अर्थातच चांगली असावयास पाहिजे. आजची राजकारणावरील लेखकांची कल्पना अशी आहे कीं, राजसत्ता ही परमेश्वरी देणगीही नव्हे अगर मनुष्यप्राण्यानें आपल्या बुद्धीनें हेतुपुरःसर घडवून आणलेली घटनाही नव्हे, तर ती सृष्टीच्या रेट्यामध्यें बनत गेली. या तत्त्वज्ञानाच्या अनुरोधानें पाहिलें, तर राजसत्ता ही अनंतकाळापर्यंत वाढत जाणारी एक घटना आहे. स्टीफन लीकॉक म्हणतो, ‘राजसत्ता हा कांहीं कोणीं घडवून आणलेला शोध नाहीं तर एक हळूहळू घडत येणारी वाढीची अगर उत्क्रांतीची प्रक्रिया आहे. ती मानवाच्या इतिहासाच्या सुरुवातीपासून सारखी होत चालली आहे[१].’ कुटुंब या आद्यघटकापासून सुरुवात होऊन सत्ता आजच्या राजसत्तेच्या कल्पनेपर्यंत येऊन पोहोंचलेली आहे. पुन्हां आजची जी सत्ता आहे, तिचा मनुष्याच्या आध्यात्मिक जीवनाशीं कांहींही संबंध नाहीं[२]. अशा तऱ्हेनें अध्यात्माशीं संबंध नसलेली संस्था मनुष्याचें नैतिक बाबतींत नियंत्रण कसें करूं शकेल, हें सांगणें बरेंच कठीण आहे. परंतु आजची नीतिच मुळीं अध्यात्मविरहित असल्याकारणानें, राजसत्ता नीतीचें नियंत्रण करते असें मानूं. परंतु अध्यात्मविरहित नीति म्हणजे काय, याचा नीतिप्रकरणीं पुढें विचार करूं. असो. अशा तऱ्हेची सत्तेची कल्पना पाश्चात्यांची आहे खरी. त्या सत्तेच्या कल्पनांत व्यक्तित्वही आहे आणि म्हणूनच त्या व्यक्तीची वाढही होत गेली. येथेंही आम्हीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, पाश्चात्य आणि पौर्वात्य राज्यकर्त्यांच्या समाजाकडे पाहण्याच्या पद्धतीमुळें दोघांच्याही सत्तेसंबंधी कल्पनांत फरक पडला. हिंदूंना मनुष्यप्राण्याचा कोठलाही अनुभव टाकावयाचा नसल्याकार-

१ (Leacock)— Elements of political science, Wilson–state.
२ Willoughby-The nature of state.

याचाही विचार व्हावयास पाहिजे. म्हणजे मोक्षरूप अध्यात्मिक धर्म आणि प्रत्यक्ष स्वरूप आचार धर्म, हे परस्पराला पोषक करतां येऊन, 'यतोऽभ्युदयो निःश्रेयससिद्धिः सधर्मः' अशी धर्माची समर्पक व्याख्या होईल. म्हणून निःसर्गप्रधान शास्त्रें आणि अध्यात्मप्रधान शास्त्रें, यांचा समाजरचनेमध्यें कितपत संबंध येतो, त्याचा विचार करूं. या दृष्टीनें आम्ही शास्त्रांची पुढील प्रमाणें प्रतवारी लावतों :-

**सर्वसाधारण शास्त्रें** :- ( १ ) व्याकरण-मीमांसा, ( २ ) न्यायशास्त्र, ( ३ ) गणितशास्त्र.

**जडसृष्टिविषयक शास्त्रें**:-(१) पदार्थ-विज्ञान-शास्त्र,(२) रसायनशास्त्र.

**जीवविषयक शास्त्रें** :- ( १ ) जीवरसायन, ( २ ) इंद्रियविज्ञान, ( ३ ) मानसशास्त्र—मनोविश्लेषणशास्त्र, ( ४ ) मानवशास्त्र, ( Anthropology ), ( ५ ) इतिहास, ( ६ ) अर्थशास्त्र, ( ७ ) समाजशास्त्र.

या सर्व शास्त्रांना मूळ पाया प्राणिशास्त्र हाच असावयास पाहिजे.

**मोक्षधर्मविषयक शास्त्रें** :- (१) नीतिशास्त्र, (Science of values) (२) तौलनिक धर्मशास्त्र, ( Comparative religions ) (३) धर्मशास्त्र.

ही जी वर शास्त्रांची प्रणावली सांगितली, त्यावरून एक गोष्ट दिसून येईल; शास्त्रांच्या प्रत्येक गटाचें त्याचें असें कार्यक्षेत्र आहे आणि त्यापलीकडे त्याचीं गृहीत कृत्यें ( categories ) लागूं पडत नाहींत. ज्या त्या शास्त्रानें, आपआपल्या अधिकारांत बोलावें, त्याच्यापलीकडे बोलूं नये. शास्त्र हें मानवी जीवितावर दोन तऱ्हेनें परिणाम करूं शकतें. एक म्हणजे मनुष्याच्या कल्पना, भावना, वासना यांचें कोणत्याही तऱ्हेनें नियंत्रण न करतां, त्यांपासून उत्पन्न होणारे जे भोग ते पूर्ण करून घेण्याचें साधन, शास्त्र मनुष्याच्या हातांत देऊं शकेल. दुसरें म्हणजे भोगाच्या मुळाशीं असणारें जें मानवी मन, त्या मनामध्यें कल्पनास्वरूप उत्पन्न करून असा फरक पाडावयाचा कीं, त्यानें सुखाला बाह्य भोगाची जरूरच रहाणार नाहीं. हीच सुखदुःखाची कल्पना हिंदु समाजशास्त्रकार मानतात. मनु म्हणतो, 'सर्वं परवशं दुःखं सर्वं आत्मवशं सुखं। एतद्विधात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः'[१] या दोन दृष्टीनें जी वर शास्त्रांची यादी सांगितली, त्या यादींतील शास्त्रांचा

---

१ मनु ४- १६०

थोडक्यांत विचार करूं. थोडक्यांत ह्मणण्याचें कारण ग्रंथविस्तारभय हेंच आहे.

सर्वसाधारण शास्त्रांपैकीं व्याकरण पदांचा विचार करील, मीमांसा वाक्यांच्या अर्थाचा विचार करील आणि न्यायशास्त्र प्रमाणांच्या शुद्धतेचा विचार करील. व्याकरणामध्येंच तौलनिक भाषाशास्त्राचा अंतर्भाव करावा लागेल. खरोखर आज आपल्या भोंवतीं चाललेल्या वादविवादामध्यें, निव्वळ भाषाप्रधान अशा या वरील शास्त्रांचा जरी बरोबर उपयोग झाला, तरीही बरेच वादविवाद कमी होतील असें वाटतें. तौलनिक भाषाशास्त्राकडे विद्वानांचें लक्ष आहे असें दिसल्यानंतर बरेचसे पंडितम्रुव[१] शब्दसिद्धि विचारपूर्वक करूं लागतील आणि निव्वळ भाषेवर वादविवाद माजविणार नाहींत. पुढें प्रत्येक सिद्धांत, न्यायशास्त्र—पौर्वात्य अगर पाश्चात्य—प्रत्येक पुढें येणाऱ्या सिद्धांताला लावून पाहिल्यास, बरेचसे सिद्धांत आपोआप गळून पडतील. परंतु समाजांतील पुढाऱ्यांना या बाबतींत सत्य शोधून काढण्याची इच्छा आहे, ही गोष्ट आम्ही गृहीत धरीत आहोंत. आजपर्यंतचा अनुभव मात्र या गृहीत कृत्यांशीं अगदीं विरुद्ध आहे !

उरलेलें सर्वसाधारण शास्त्र म्हणजे गणितशास्त्र होय. या शास्त्रापुढें ज्या गोष्टी आणल्या जातील त्यांच्या परिमाणाकडे पाहून त्यांची अपरोत्तर व्यक्ति ठरविणें, एवढेंच त्याचें कार्य आहे. गणित कांहीं कोणत्याही बाबतींत श्रेष्ठकनिष्ठत्वाची कसोटी सांगणार नाहीं. परंतु कसोटी पुढें ठेवल्यास त्या कसोटीच्या दृष्टीनें बरें काय आणि वाईट काय हें अत्यंत काटेतोलपणानें विचार करून सांगेल. म्हणून कोणत्याही स्थितींचे समाजावर होत असलेले परिणाम मोजावयास गणितागतपद्धतीसारखें ( Statistical Method ) साधन नाहीं. अर्थात् येथें मोजावयाचें काय ? मोजावयाचें कसें ? त्याचें परिमाण कोणतें घ्यावयाचें ? या सर्व गोष्टींचा प्रथम निश्चय व्हावयास पाहिजे. नाहीं तर अनेकस्वरूपी समाजांत प्रत्येक कार्य घडून येण्याला अनंत कारणें घडत असतील. परंतु त्यांतील गौण कोणतीं आणि प्रधान कोणतीं यांचा निश्चय होऊन, सर्व एकाच मापानें मोजलीं जाऊं लागून एक तऱ्हेची अनवस्था उत्पन्न होईल. प्रधान कारणें दूर राहून गौणांवर दृष्टि लागून राहील आणि पायाला जखम व कानांत फुंकर अशी स्थिति होईल. आज

१ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न—वि. रा. शिंदे.

आमच्याकडे समाजसुधारणेचा जो सुकाळ झाला आहे, त्यांपैकीं शेंकडा नव्याण्णव बाबतींत आम्हीं वर सांगितल्याप्रमाणें स्थिति आहे, हें आम्हांला दाखवावयाचें आहे.

सर्वसाधारण शास्त्रांच्या पुढें बाह्य उपाधींचें नियंत्रण करणारी म्हणजे मात्रास्पर्श शितोष्णांचें नियंत्रण करणारीं शास्त्रें येतात. ह्या शास्त्रांचें अधिकारक्षेत्र मानवी मनांत असलेल्या वासनांचें पूर्ण समाधान करणें एवढेंच आहे. मानवी वासना ह्या पूर्ण समाधान होण्यासारख्या शक्ति आहेत ही गोष्ट येथें गृहीत धरलेली आहे. त्या तशा नसतील तर या शास्त्रांचा प्रयत्न म्हणजे शशशृंगाचा अगर आकाशपुष्पांचा शोध करण्याइतकेंच हास्यास्पद आहे. परंतु तीं शास्त्रें आज तसा शोध करून राहिलीं आहेत आणि त्यांचा बोलबालाही जगभर झालेलाच आहे. म्हणून त्या शास्त्रांचा प्रस्तुत ग्रंथांत विचार होणें अवश्य आहे. ह्या शास्त्रांच्या वाढीमुळें मनुष्याच्या बाह्य परिस्थितींत पुष्कळच फरक पडलेला आहे. न्यूटननें कांहीं प्रमेयें मांडल्यानंतर जगाचें कोडें आतां उलगडलें, अशी कल्पना होऊन मानवांतील सर्व बुद्धिमान वर्ग सृष्टींत असणाऱ्या जडशक्तींचा[1] आपल्या उपभोगवृद्धीकडे कसा उपयोग करून घेतां येईल, याची विवंचना करूं लागला. त्यामुळें वाहतुकीचीं साधनें झपाट्यानें वाढूं लागलीं. सजीव जनावरांच्या ठिकाणीं जडशक्तीनें प्रेरित अशा मोटारगाड्या व विमानें चहूंकडे फिरतांना दिसूं लागलीं. भूमिगोल तोकडा भासूं लागला आणि वेगवेगळ्या मानवसंघांचें जास्त जास्त संघटन वाढूं लागलें. अशा तऱ्हेनें स्थळकाळावर मनुष्यानें बराच विजय मिळविला. या भौतिकत्वांतूनच सामाजिक आरोग्यशास्त्राची कल्पना उद्‌भूत झाली आणि याचाच परिणाम म्हणजे कार्ल मार्क्सचा समाजसत्तावाद होय. यामुळेंच गुन्हेगारानें दिव्य केलें पाहिजे, ही कल्पना नष्ट होऊन त्याला आपली बाजू मांडण्याचा अधिकार प्राप्त झाला. आज आपणांला उजेड देणारे सर्व तारे हे ज्वलत् गोल आहेत, तरी त्यांचा उजेड पृथ्वीवर अदृश्य किरणांनीं येतो त्याप्रमाणेंच येथेंही आपणाला उजेड उत्पन्न करतां येईल किंवा काय, याचा मनुष्य विचार करूं लागला. रात्रीमुळें मनुष्याच्या कार्याला अडथळा येतो म्हणून रात्रच नाहींशी करण्याकडे विद्युद्दीपांचा उपयोग

१ Non-regulating forces.

होऊं लागला. या शास्त्रांच्या मदतीनें मनुष्याचें कार्य अप्रतिहत चालण्याला जे स्थल, काल, दिवस, रात्री वगैरेंपासून अडथळे उत्पन्न होतात ते बरेचसे कमी झाले. बरेचसे कमी म्हणण्याचें कारण स्थळकाळाचे अडथळे सर्वथा नाहींसे करणें शक्यच नाहीं, कारण हा गतिशास्त्राचा प्रश्न आहे. मनुष्य त्याप्रमाणेंच द्रव्योत्पादनाचीं नवीं नवीं साधनें उत्पन्न करून, मनुष्याला कामाच्या दगदगींतून सोडविण्याचा प्रयत्न करूं लागला व त्यांतही त्यानें बरेंच यश मिळविलें. या शास्त्रांच्या मदतीनें मनुष्य जास्त पैसा मिळवील, जास्त लवकर प्रवास करूं शकेल आणि फार मोठ्या प्रमाणावर संघटण करील. अशा तऱ्हेनें बाह्य सृष्टीचा मनुष्य पूर्वी जो गुलाम होता, तो बऱ्याचशा अंशीं धनी बनला यांत कांहीं शंका नाहीं. हा प्रकार ठीक आहे. यानें मानवप्राण्यांत असलेल्या वासनांचें समाधान जरा जास्त होऊं लागलें, नसलेल्या अनंत वासना उत्पन्न होऊं लागल्या. परंतु या भौतिकत्वानें अमुक वासना सूक्त म्हणून तिच्या संतर्पणाचा विधि आणि अमकी वासना असूक्त म्हणून तिच्या संतर्पणाचा निषेध, असें दर्शविणारें वासनांचें सूक्तासूक्तत्व कसें ठरूं शकेल ? हें सूक्तासूक्तत्व जर निर्णीत झालें नाहीं, तर नैतिक मूल्यें कशीं ठरणार ? आणि नीतिशिवाय समाजाला अस्तित्व असेल काय ? म्हणून मी म्हणतों, समाजशास्त्रांमध्यें या शास्त्रांना अगदीं निल्कृष्ट अधिकार प्राप्त होतील. आतां कांहीं लोक अशी शंका विचारतील कीं, आजचें मानव्य सर्वथा कांहीं या शास्त्राच्या काबूंत गेलें नाहीं. तर त्यांना इतकेंच सांगावयाचें कीं, आपण स्वतःला जडवादी म्हणत नसलों, तरी समाजांतील बुद्धिमान वर्ग चंद्र, सूर्य, गंगा नदी, तारे, एन्फ्लुएन्झा वगैरेंसारख्या अत्यंत विभिन्न पदार्थांची प्रक्रिया जडवादाच्या भाषेंत बोलत असतो यांत कांहीं शंका नाहीं. याप्रमाणें आपल्या पूर्वीच्या पिढ्या बोलत नसत आणि आपल्यापुढें येणाऱ्या पिढ्या बोलतील किंवा नाहीं तें कांहीं सांगतां येत नाहीं. आज शास्त्रांची प्रवृत्ति पाहिली तर बोलणार नाहींत असेंच वाटतें.

रसायनशास्त्राच्या प्रक्रियेनें मानवाचा नाश करण्याचें एक साधन जें युद्ध त्याच्या शास्त्रामध्यें मात्र अपरंपार वाढ झालेली आहे. नवीन युद्धानें कोणतीही लोकसंख्या फारच थोड्या काळांत यमसदनाला पाठविणें शक्य आहे. परंतु तीच लोकसंख्या तितक्या लवकर भरून काढण्याचें सामर्थ्य

मात्र या शास्त्रांत नाहीं. रोजच्या व्यवहाराच्या दृष्टीनें मात्र या शास्त्रानें फारशी क्रांति घडवून आणलेली नाहीं. रसायनशास्त्रदृष्ट्या इष्ट असे पदार्थ पुष्कळ तऱ्हेचे असतात. उदाहरणार्थ, धातु, कांच, लाकडें वगैरे यांचा उपयोग घरें बांधणें, श्रेष्ठ तऱ्हेचीं हत्यारें तयार करणें वगैरे बाबतींत होतो. दुसऱ्या तऱ्हेचे पदार्थ मनुष्याच्या शरिराचें पोषण करणारे घटक म्हणून उपयोगी पडतात. अशा तऱ्हेचे रासायनिक पदार्थ म्हणजे खाद्य, पेय, तंबाखू, औषधी वगैरे. परंतु यांतील बरेचसे पदार्थ रोजच्या व्यवहारांत उपयोगी पडण्यासारखे नाहींत. रोजच्या उपयोगाचें अन्न तरी अजून रसायन-प्रक्रियेनें मोठ्या प्रमाणावर उत्पन्न होऊं लागलेलें नाहीं. पदार्थविज्ञानशास्त्राचा समाजप्रक्रियेंत जो अधिकार, तोच या शास्त्राचा होय.

येथें एक गोष्ट नमूद करून ठेवावीशी वाटते ती अशी कीं, आज शास्त्रीय प्रगति म्हणून जी कांहीं झाली आहे ती येथपर्यंतच्या शास्त्रांतच होय. या क्षेत्रांत देखील सृष्टीचे नियम समजावून घेऊन प्रगति झालेली आहे. मोडून नव्हे ! यापुढील शास्त्रांच्या अधिकाराच्या दृष्टीनें मानवाची जी प्रगति व्हावयाची, ती सृष्टीचे नियम समजावून घेऊन ते पाळण्यानेंच होईल. ते मोडण्यानें नव्हे !

येथून पुढें जीवजातासंबंधीं ( self-regulating forces ) ज्ञानाला सुरुवात होते. मानवी समाजांत दिसून येणाऱ्या प्रत्येक अंगाचा त्यामुळें प्राणिशास्त्राशीं संबंध पोहोंचतो. मानवाची कोणतीही हालचाल घ्या, त्याच्या मुळाशीं प्राणिशास्त्र आणि त्याचें एक अंग मानसशास्त्र हीं आहेत असें दिसून येईल. येथें प्रश्न तरी किती अनंत ? ( १ ) मानवाची प्रगति परिस्थिति मृदु केल्यानें होईल किंवा व्यक्ति जास्त कठोर बनविल्यानें होईल ? ( २ ) मानवामध्यें ज्या सत्प्रवृत्ति अगर कुप्रवृत्ति असतात, त्या आनुवंशानें पिंडांतच उतरतात अगर परिस्थितिभिन्नत्वानें उत्पन्न होतात ? ( ३ ) सृष्टींत प्रगतीचें स्वरूप तरी काय आहे ? ( ४ ) समाजरचना व्यक्तिप्रधान असावी किंवा गटप्रधान असावी ? ( ५ ) गट आनुवंशिक असावे किंवा इतर कांहीं तत्त्वावर असावे ? ( ६ ) मानव हा निसर्गतः समान आहे काय? नसल्यास तो शिक्षणानें समान बनेल काय ? ( ७ ) स्त्रीपुरुषांचे समाजांतील

कार्य कोणतें व त्यामुळें त्यांना अधिकार कसे असावे ? ( ८ ) लोकसंख्ये-च्या वाढीचे आणि नाशाचे नियम कांहीं आहेत काय ? ( ९) बालमृत्यूंचें प्रमाण जास्त असणें हें सुदृढ समाजाचें लक्षण आहे किंवा कमी असणें हें सुदृढ समाजाचें लक्षण आहे ? ( १० ) रोगजंतू हे मानवसमाजाचे शत्रु आहेत किंवा हितकारक मित्र आहेत ? (११) समाजांत कोणत्या लोकांची संख्या वाढावी आणि कोणत्या लोकांची संख्या कमी व्हावी ? इत्यादि अनंत प्रश्न उत्पन्न होतील आणि त्यांच्या शास्त्रीय उत्तरावर समाजांतील नीतीची उभारणी करावी लागेल. त्यामुळें नैतिक मूल्यें ठरवितांनाच फार काळजी घ्यावी लागेल. हे प्रश्न जसजसे उत्पन्न होतील तसतशी त्या त्या शास्त्राच्या दृष्टीनें चर्चा करीन.

सर्वांत श्रेष्ठ मानवी नैतिक मूल्यें ठरविणारें धर्मशास्त्र होय. आम्ही हिंदूंचें धर्मशास्त्र सर्वश्रेष्ठ मानतों आणि तें कां मानतों याचीं कारणें पुढें येतील. येथें एवढेंच सांगावयाचें कीं, धर्मपद्धति कोणतीही असो, ती निव्वळ ऐहिक पद्धतीपेक्षां श्रेष्ठ होय. ती श्रेष्ठ मानण्याचें कारण असें कीं, धार्मिक पद्धतीवर उभारलेल्या समाजांत, निव्वळ ऐहिक कल्पनांवर उभारलेल्या समाजापेक्षां जास्त जीवनशक्ति असते, याचीं चार दोन उदाहरणें इतिहासां-तून घेतों. खिस्ताच्या धर्मस्थापनेचा काल आणि रोमन साम्राज्याचा उदयकाल हे दोन्हीही जवळ जवळ समकालीनच आहेत. एका बाजूला धन, राजसत्ता, सेना, फार काय सांगावें, ऐहिक जगांत ज्या कांहीं लोभनीय वस्तू असतील त्या सर्व, तर दुसऱ्या बाजूला मेसापोटेमियामधून आपल्या कल्पनांचें गाठोडें घेऊन बाहेर पडलेला एक फकीर. या दोघांच्या ज्या दोन प्रणाली उत्पन्न झाल्या, त्यांपैकीं धर्मसत्तेनें जास्त जीवनशक्ति दाखविली हें ऐतिहासिक सत्य आहे. उलटपक्षीं फ्रान्सच्या क्रांतीनें धर्माच्या ठिकाणीं बुद्धिप्रामाण्याचें युग उत्पन्न केलें. तें गिलोटिनबरोबरच नष्ट झालें असें म्हणतात. आज रशिया-मध्यें तोच प्रयोग चालू आहे असें म्हणतात, परंतु त्याचा परिणाम पहाव-यास आपणाला एक दोन पिढ्या थांबावें लागेल !

एवंच जगण्याच्या चिकाटीच्या दृष्टीनें बोलावयाचें तर धार्मिक कल्पने-वर उभारलेले समाज निव्वळ ऐहिक कल्पनेवर उभारलेल्या समाजांपेक्षां

### ६ धार्मिक समाज आणि ऐहिक समाज

जास्त कालपर्यंत राहूं शकतात, हें त्रिकाला-बाधित सत्य आहे. उलटपक्षीं असें दाखवितां येणार नाहीं कीं, कोणत्याही धर्म-पंथाचें सृष्टींतून सर्वथा उच्चाटण झालें! असा कोणताही ऐहिक समाज दाखवितां येणार नाहीं कीं, तो सृष्टीच्या रेट्यांत बराच वेळ टिकाव धरून राहिला! ऐहिक सत्तेचें प्रतीक जी राजसत्ता तिचा तर नाश हाच परिणाम दिसतो. बिल्हण म्हणतो,[१] 'भूपा कियन्तोन बभूवुरुर्व्यां नामाऽपि जानाति न कोऽपि तेषां।' यूरोपच्या नकाशाकडे नजर टाकल्यास काय दिसून येईल? ज्यूलियस सीझर, आगस्टस सीझर, शार्लेमेन, चौदावा लुई, गुस्तावस ॲडॉल्फस यांची सत्ता काय कमी होती? त्यांचा आतां काय पत्ता लागतो? तोच ख्रिस्ताचा धर्म आज दोन हजार वर्षें यूरोप व्यापून राहिला आहे. हिंदुस्थानामध्येंही अगदीं तसाच अनुभव येतो. हिंदुस्थानांत काय साम्राज्यें झालीं नव्हती? जगद्विजयी अलेक्झांडरला ज्याकडे डोळा वांकडा करून पाहण्याची छाती झाली नाहीं तें नंदांचें साम्राज्य, त्याच विख्यात अलेक्झांडरच्या सेनापतीला– सेल्यूकसला –बेदम बडवून बॉक्ट्रियामधून हाकून लावणारा महाराजाधिराज चंद्रगुप्त मौर्य आणि त्याचा अशोक यांचें साम्राज्य, वाहतुकीचीं साधनें फार सुधारलेलीं नसतांना ज्यानें कावेरी नदीपासून ऑक्सस नदीपर्यंत दिग्विजय केला त्या महाराजाधिराज समुद्रगुप्ताचें साम्राज्य, ठाणेश्वराचा हर्ष, अकबर, औरंगजेब आणि शेवटीं नाना–महादजी यांचीं साम्राज्यें हीं सर्व कोठें गेलीं! धर्मसत्ता पहावी तर ती कमी अधिक प्रमाणांत अजून शिल्लक असलेली दिसते. अशा तऱ्हेनें जेथें जेथें धर्मसत्ता तेथें समाजरक्षण असा संबंध आलेला दिसतो. ती संरक्षक धर्मसत्ता नष्ट करावी असा आजचा सामाजिक ओघ दिसतो!

परंतु येथेंही हा प्रश्न संपत नाहीं. जगतीतलावर असा नियम दिसून येतो कीं, ज्या धर्माचा राजा असेल तोच धर्म प्रजेनें स्वीकारावयाचा. महाभारतकारानेंही हा सिद्धांत पुढील शब्दांत सांगितला आहे. 'कालो वा कारणं राज्ञः राजा वा काल कारणं। इति ते संशयो माऽभूत राजा कालस्य कारणम्॥' हिंदुस्थानामध्यें मुसलमानांची संख्या इतकी कशी वाढली असा प्रश्न विचार-

१ बिल्हण–विक्रमांकदेवचरित–१

गारांनीं. ज्या मुसलमानी सत्तेपुढें मध्यआशिया आणि आफ्रिका हीं शंभर वर्षांत मुसलमान झालीं, त्या मुसलमानांची पांचशें वर्षें सत्ता असून हिंदु समाजच शिल्लक कसा राहिला या प्रश्नाचें प्रथम उत्तर द्यावयाला पाहिजे. ज्या ख्रिस्तीधर्माच्या अंमलापुढें सर्व युरोप वाकला त्या ख्रिस्तीधर्माचें बाण हिंदुस्थानावर इतके बोथट काय कारणानें आले तें कळेल तर बरें. ज्या बुद्ध धर्मानें चीन आणि जपान आपल्या अंकित केले त्या बुद्धाला, याच जुनाट हिंदुधर्मानें पळावयास लाविलें. या एकामागून एक घडणाऱ्या चमत्कारांचा खुलासा कोणीही का करीत नाहींत? शास्त्रांच्या नियमानें पाहिलें तर जो राजाचा धर्म तोच प्रजेचा धर्म व्हावयास पाहिजे. कॉन्स्टन्टाईन बादशहानें पुरस्कार केल्यानंतर ख्रिस्ती धर्माची भराभर वाढ होऊं लागली. मूर लोकांनीं स्पेनवर आधिराज्य केलें त्या काळीं स्पेनमध्यें मुसलमानी धर्म पसरला आणि फर्डिनांड व इसाबेला यांनीं मूर लोकांना पिटाळून लावल्यानंतर त्याच स्पेन देशांत पुन्हां ख्रिस्तीधर्माचा उदय झाला. असा कोणताही देश दाखवितां येणार नाहीं कीं, जेथें राजाच्या धर्माविरुद्ध प्रजांचा दुसराच धर्म टिकून राहिला! अशा तऱ्हेचा चमत्कार एक हिंदुस्थानांतच दिसून येतो! राजसत्ता उघड उघड विरुद्ध असून देखील आज हजारों वर्षें हा धर्म आपलें अस्तित्व राखून आहे. या धर्मावर महावीर, गौतमादिक पाखंड्यांचे भयंकर हल्ले झाले. अशोक, औरंगादि सम्राटांनीं याचा पाडाव करण्याचा प्रयत्न केला. परंतु या धर्मानें त्या सर्वांना तोंड देऊन त्यांचेंच या भूमींतून उच्चाटन केलें. ज्या मुसलमानी लोकांनीं शंभर वर्षांच्या अवधींत पूर्व युरोपचा व एशियामायनरचा भाग आणि आफ्रिकेंत शिरून स्पेनपर्यंतचे देश काबीज केले, त्या मुसलमानांना हिंदुस्थानच्या सरहद्दीवर सरासरी तीनशें वर्षें निष्फळ प्रयत्न करावे लागले! मुसलमानी रियासतींत तर हिंदु धर्माचा प्रत्यक्ष छळ झाला. परंतु हजार वर्षांच्या मुसलमानी हल्ल्यांचें स्थळ जो पंजाब प्रांत, त्याच पंजाबांत अजून देखील बरीच प्रजा हिंदूच आहे! हें सर्व कार्य ज्याला इंग्रजींत 'ब्राह्मॉनिझम्' म्हणतात, त्या हिंदु धर्मानेंच घडवून आणलें आहे. हा जगांतील सर्व धर्मांत वयोवृद्ध आहे, ही गोष्ट त्याच्या शत्रूलाही कबूल करावी लागेल! आतां तरी त्याला उतरती कळा लागली आहे किंवा नाहीं हें सांगणें सोपें नाहीं. बरोबरचे कांहीं सुशि-

क्षित विद्वान् सोडून दिल्यास, इतर समाज आपल्या परंपरागत प्रणालीच्या बाहेर वर्तन करतांना दिसून येत नाहीं. कालिदासानें केलेलें दिलिपाच्या राज्याचें वर्णन आज देखील प्रजेला लागू पडेल. 'रेखामात्रमपि क्षुण्णा दामनोर्वत्मनः परम्। न व्यतीयुः प्रजास्तस्य नियंतुर्नेमि वृत्तयः।[१]' पुन्हां या धर्मांत संघानें उपासना नाहीं, देवळांत जाण्याची सक्ति नाहीं आणि कोणत्याही तऱ्हेचा धार्मिक जुलूम नाहीं. परंतु हिंदूंचा प्रत्येक आचार संस्कारानें बांधला गेलेला आहे. हिंदूच्या अन्न खाण्याला संस्कार आहे. पशु ज्याप्रमाणें जेथें भक्ष्य दिसेल तेथें खाऊं लागतो त्याप्रमाणें हिंदूला खातां येणार नाहीं. त्याला त्यावर कांहीं संस्कार करावयास पाहिजेत. त्याच्या पेयग्रहणाला संस्कार आहेत, त्याच्या स्नान करण्यालाही पण संस्कार आहेत. या संस्कारांनीं हिंदुत्वाचें मुख्य गमक जी जातिसंस्था, ती सुस्थितींत ठेवलेली आहे. इंग्रज सम्राटाचा किंवा देशी संस्थानिकाचा कायदा त्याच्या मनावर जितका अधिकार गाजवूं शकतो त्यापेक्षां सहस्रपट धार्मिक कल्पनांचा त्याच्या मनावर ताबा असलेला दिसून येईल. या लोकांवर दहा पांच वेळां परचक्रें येऊन गेलीं परंतु त्यांच्यावरील खरें सरकार जो अव्यक्त धर्म, तो कधींही बदलला नाहीं. त्यामुळें कर घेणारा कोणीही असो, हिंदु समाज आपल्या अव्यक्त राजाची प्रजाच राहिला.

अशा तऱ्हेच्या हिंदुसमाजाचा, एकोणिसाव्या शतकाच्या मध्यास युरोपांतलि विकृतींशीं संबंध आला आणि त्या समाजाच्या नेत्यांच्या मनांत चलबिचल होऊं लागली.

### ७ पाश्चात्य संस्कृतीचें आगमन

खरोखर हिंदुसमाजामध्यें नाहीं अशी एकही चालरीत जगांत सांपडणार नाहीं. परंतु हिंदुसमाजांत ती ती चाल अधिकारभेदानें विवक्षित स्थळीं आहे, सार्वत्रिक नाहीं. अशा तऱ्हेचा समाज असल्याकारणानें आणि सर्व हिंदूंना सर्वसाधारण नियम आध्यात्मिक आहेत, भौतिक नाहींत अशी स्थिति असल्याकारणानें हिंदु जातींचे परंपरागत आचार वेगवेगळे आहेत. त्यामुळें सर्व आचारावर कांहीं हल्ला करतां येईना. म्हणून हिंदूंनीं जेवढे म्हणून श्रेष्ठ आणि अभिजात आचार मानले, त्यांच्यावर हल्ला होऊं लागला. हिंदूंनीं आपली

१ रघुवंश-१

समाजरचना जातीय म्हणजे गटाच्या स्वरूपाची केलेली आहे, त्याप्रमाणे हिंद्वेतर समाजांत कोठेंही दिसेना म्हणून जातिभेदानें हिंदुसमाजाचा नाश झाला, अशी हाकाटी सुरू झाली! श्रेष्ठ आचारामध्यें विधवाविवाहाचा निषेध केलेला दिसला तेव्हां विधवापुनर्विवाहाचा कायदा पास करून घेतला गेला. कनिष्ठ आचारांत काय विधवापुनर्विवाह होत नव्हते? शारीर, मानस आणि समाजशास्त्रदृष्ट्या अत्यंत हितकारक[1] असें जें स्त्रीविवाहाचें उत्तम वय प्राग्ऋतोः तें साहेबाच्या समाजांत दिसेना, म्हणून तीही गोष्ट रानटी भासूं लागली. विवाहित स्त्री अगर कोणतीही श्रेष्ठ स्त्री हिनें जेथें एकांतीं लोकांतीं परपुरुषांशीं संबंध येणारा असें काम करण्याला घराबाहेर जाऊं नये असा हिंदूंचा दंडक दिसला तर स्त्रियांच्या आभासिक[2] हक्कांचा आश्रय करून त्याच्यावर हल्ला केला गेला. अशा तऱ्हेनें ब्राह्मणांचीं नैतिक मूल्यें सर्व ठिकाणीं त्याज्य ठरून, शूद्रांचीं नैतिक मूल्यें प्रधान मानलीं जाऊं लागलीं व त्यांचा हळूहळू प्रसार होऊं लागला. आज स्पर्शास्पर्श, भक्ष्याभक्ष्य, पेयापेय वगैरे एकूनएक बाबतींत शूद्रांचे अनिर्बंध आचार समाजांत प्रधान होऊं पहात आहेत आणि त्यालाच समाजसुधारणा म्हणावें असें समाजसुधारक नांवाचा प्राणिवर्ग आम्हांला सांगत आहे!

अशा तऱ्हेनें आडदांड मुसलमानाला जी गोष्ट सिद्ध झाली नाहीं, ती इंग्रजानें मायेचा हात फिरवून करण्याला सुरुवात केली! इंग्रज धूर्त आहे! त्याला ही गोष्ट माहिती आहे कीं, जोंपर्यंत एकादा समाज आपल्या नीतिशास्त्राला धरून आहे, तोंपर्यंत तो अभेद्य रहातो. म्हणून त्याच्या नैतिक मूल्याबद्दलच शंका उत्पन्न करा. मग हृदय एकदां संशयानें व्याप्त झालें म्हणजे त्या समाजांत कोणताच आचार धड राहूं शकणार नाहीं आणि विघटन आपोआप होईल. तरवारीनें शरीरें जिंकतां येतील, मनें जिंकतां येणार नाहींत. म्हणून मनें अशा तऱ्हेनें जिंकावयाचीं असतात. परंतु इंग्रज झाला तरी काय? त्यांच्याकडे ज्या नीतीच्या कल्पना प्रचलित असतील त्याच घेऊन येणार! यावेळीं यूरोपमध्यें तत्त्ववेत्त्यांच्या डोक्यांमध्यें प्रगतीच्या कल्पनेनें संचार केला होता. तीच प्रगतीची कल्पना त्यांनीं इकडे आणली आणि आमच्या इक-

---

१ हा सिद्धांत आम्हीं भरपूर पुरावे देऊन पुढें सिद्ध करणार आहोंत.

२ Subjugation of Women-J. S. Mill.

डील स्वयंमन्य पुढाऱ्यांनीं—म्हणजे सर्वांत जास्त ओरडा करणारांनीं – ती मान्य केली व अजूनही करीत आहेत ! प्रगति शब्द सर्वांच्याच जिव्हाग्रीं नाचूं लागला व नाचत आहे ! परंतु प्रगति या शब्दापलीकडे कोणींही फारसा विचार केलेला दिसून येत नाहीं. गतिमान् जगतामध्यें गति दिसून येणारच पण ती प्रगति कशावरून याचा खरोखर विचार व्हावयास पाहिजे आणि बरोबर तेवढाच कोणींही केलेला दिसत नाहीं ! प्रगति व्हावयाची ती कोणाची ? ध्येय कोणतें ? का सारखी प्रगतिच होत जावयाची ? त्या प्रगतीला ना दिशा ना ध्येय ! त्या प्रगतीचे मार्ग कोणते ? त्या मार्गानें इष्टसिद्धि होईलच याला प्रमाण काय ? समाजांची सृष्टीकडे पहाण्याची दृष्टि आणि ध्येयें भिन्न असल्याकारणानें, त्यांच्या नीति अनीतीच्या कल्पना, त्यांच्या चालीरीति वगैरे एकूनएक बाबतींत आत्यंतिक फरक दिसूं लागला. जें जें युरोपांतील समाजरचनेच्या पद्धतीवर जाईल, तें तें हितकारक, सुधारलेलें, प्रागतिक, असे शब्द ऐकूं येऊं लागले ! म्हणून प्रगतीच्या कल्पनेचा थोडासा विचार केल्यास तो अस्थानीं होणार नाहीं.आजची तर अशी स्थिति दिसते कीं, जो समाजाच्या लाटेबरोबर वहात जाईल, तो प्रगतिप्रिय ! आणि त्या लाटेशीं जो मतभिन्नता दाखवील तो परागतिक अथवा अलीकडील शिवी वापरावयाची असल्यास त्यास सनातनी असें म्हणावें !

ही प्रगतीची भानगड खरोखरच कळण्यासारखी नाहीं. सर्वसाधारण सृष्टीच्या प्रगतीचा प्रश्न सोडून मानववंशाच्या प्रगतीचा जरी प्रश्न पुढें आणला तरी तोही कळणें फारसें शक्य दिसत नाहीं.

८ प्रगति

मनुष्य सुधारला म्हणजे काय झालें ? तो शारीरिक दृष्ट्या जास्त सुदृढ आणि सुंदर झाला काय ? त्याच्या मेंदूची वाढ झाली आहे काय ? त्याच्या नैतिक कल्पनांची शक्यता जास्त आहे काय ? वगैरे एकूनएक दृष्टीनें मानवाचें परीक्षण व्हावयास पाहिजे. त्याबरोबर तत्त्ववेत्त्यांना तरी ते प्रगति कशाला म्हणतात याची कल्पना होती काय व आहे काय ? हें देखील समजावून घ्यावयास पाहिजे. खरोखर आजच्या समाजांत पाहिलें तर कोणत्याही विषयाचा चार दोन जंगी शब्द वापरण्यापलीकडे फारसा विचार कोणींही केलेला दिसत नाहीं !

निव्वळ शारीरिक दृष्ट्याच पाहिलें तर आजचा मानववंश २०,००० वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या मानववंशापेक्षां जास्त सुदृढ आणि सुंदर आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. भौतिक सुधारणांनीं नटलेल्या मानवाच्या इंद्रियांच्या शक्ति पूर्वीच्या मानववंशाच्या शक्तीपेक्षां हमखास कमी आहेत! बौद्धिक शक्तिसंबंधीं देखील तशीच परिस्थिति दिसून येते. बौद्धिक विषयाची आणि गोळा केलेल्या ज्ञानाची वाढ झालेली दिसते परंतु मूलशक्तीचा विकास कांहीं झालेला दिसत नाहीं. ग्रीस देशांत अल्पकालामध्यें जे पुष्कळ श्रेष्ठवर्गाचे पुरुष होऊन गेले, त्यांच्या तोडीचे तरी बुद्धिमान लोक आजच्या समाजामध्यें असावयास पाहिजेत. कालिदास किंवा शेक्सपिअर यांच्यापेक्षां जॉर्ज बर्नार्ड शॉ किंवा हेन्री इब्सेन वगैरेंच्या मेंदूत जास्त नैसर्गिक शक्ति आहे, असें म्हणतां येईल काय? टॉलेमी, आर्यभट्ट किंवा वराहमिहिर यांच्यापेक्षां सर जेम्स जीन, आर्थर एडिंगटन किंवा आल्बर्ट आइनस्टाईन यांच्या मेंदूची निसर्गशक्ति कांहीं जास्त नाहीं. दोन हजार वर्षें मनुष्याच्या मनावर ताबा चालविणारा आणि मनुष्यसमाजांत उत्पन्न होणाऱ्या सगळ्या नैतिक प्रसंगांचा विचार करणारा ज्ञानकोशतुल्य ग्रंथ जो महाभारत, त्याच्या तोडीचे मानवसमाजाला त्याच्यापासून वरपर्यंत हलवून सोडणारे वाङ्मयग्रंथ आज निर्माण कां होत नाहींत? कां त्यांच्या तोडीला 'अटकेपार' आणि 'सुंठीच्या देव'? आज युरोप, अमेरिकेप्रमाणें हिंदुस्थानातही ज्ञानकोश आला आहे म्हणे! परंतु त्याचा मनुष्याच्या आयुष्यांत कितपत उपयोग होतो? एकंदरीनें पाहिलें तर असेंच दिसून येईल कीं, हजार पांचशें वर्षें मानवीसमाजाला चळण लावून देईल अशा तऱ्हेचा ग्रंथ निर्माण करण्याचें सामर्थ्य आजच्या समाजामध्यें राहिलें नाहीं, ही तर गोष्ट खरी. मग या युगाचा कैवार घेणारे लोक कांहीही म्हणोत!

नीतिकडच्या बाजूं लागलें तरी तोच प्रकार दिसून येईल. मनुष्य केवळ नीतीनें वागत असेल, परंतु मनुष्यस्वभावाला व्यापून राहणारीं तीन पापें जीं अन्नाकरितां म्हणजे द्रव्याकरितां चोरी, स्त्री मिळविण्याकरितां संभोग आणि आपल्या प्रतिस्पर्धी वाटेआड करण्याचें आत्यंतिक स्वरूप तीं, कमी झालीं आहेत काय? अन्नाकरितां चोरी करावी लागते ना? कोणी कसेंही उत्पादन केलेलें द्रव्य असेना, तें समाजाचें आहे असें म्हणूं म्हणजे झालें. पूर्वीच्या

चोराला घर फोडण्याचें तरी काम करावें लागे. आजच्या चोराला मुळींच काम न करणें, हेंच समाजानें उत्पन्न केलेलें द्रव्य अपहरण करण्याचें एक प्रतिष्ठित कारण होऊन बसलें आहे! पूर्वी ज्या प्रवृत्तीचे लोक चोऱ्या करीत असत त्याच प्रवृत्तीचे लोक आज सट्टेवाले बनले आहेत! एकंदरींत दुसऱ्याच्या द्रव्याचा अपहार करण्याची प्रवृत्ति कांहीं कमी झालेली नाहीं.[१] स्त्रीयांचे लंपट लोक पूर्वी ज्या प्रवृत्तीनें स्त्रीवर्गाकडे पहात असत तीच प्रवृत्ति आज स्त्रीसमाज आपल्या नजरेखालीं कसा राहील याचा विचार करीत आहे! बावळट समाजाच्या लेकीसुना आपल्या देखरेखीखालीं आणण्याकरितां येथें कांहींतरी गोंडस हेतु दाखविणें जरूर आहे एवढें खास! सार्वजनिक अघळपघळ गप्पांच्या खालचे हेतू काय स्वरूपाचे असतात, ह्याचा मनोविश्लेषणशास्त्राच्या दृष्टीनें विचार करावयास पाहिजे.[२] मग या बेगडी सुधारणेबद्दल तिटकारा आल्याशिवाय रहाणार नाहीं. जगाच्या सुरुवातीपासून खून हा अत्यंत भयंकर गुन्हा मानला जाऊन, त्याला भयंकर शिक्षा दिल्या गेल्या आहेत म्हणून त्या गुन्ह्याचें प्रमाण कमी झालें आहे काय? मानवी मनांतील गुन्ह्यांच्या ज्या मुख्य प्रवृत्ति त्यांत मुळींच फरक झाला नसून मनुष्यप्राण्याची नैतिक सुधारणा झाली आहे, असें म्हणणें म्हणजे केवळ निर्लज्जपणा आहे! वेगवेगळ्या तत्त्वज्ञानाच्या नांवाखालीं, हे गुन्हेच नव्हेत असें म्हणण्याची प्रवृत्ति मात्र वाढत चाललेली दिसत आहे! गुन्हा हें नांव कोणत्याच क्रियेला दिलें नाहीं म्हणजे मुळींच गुन्हे होणार नाहींत ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे! अशा तऱ्हेनें समाजांत गुन्हे कमी होतात ही गोष्ट मनुष्याला सहज सिद्ध करतां येईल!

सुधारलेला मनुष्य सर्वसाधारण दृष्ट्या पाहिलें तर दयार्द्र अंतःकरणाचा होत चालला आहे असें म्हणतात. ही गोष्ट इतिहासावरून पाहिलें तर सिद्ध होईल काय? सुधारणाच दाखवावयाची असेल तर समान परिस्थिति उत्पन्न झाली असतां मानव कशा तऱ्हेनें वागला याची तुलना करावी लागते. परवांच्या जागतीक युद्धाच्या काळापर्यंत कोणालाही वाटलें असतें

1 Criminal sociology by Enrico Ferri; Criminal man by Lombroso; Mending of the mankind by George Whitehead.

२ Psychology and Morals by Hadfield.

की, सुधारलेला मनुष्य हा जास्त न्यायप्रिय, जास्त परदुःखानें दुःखित होणारा आणि कमी पशुवृत्तीचा बनला आहे. हिंदु मनुष्य हा निसर्गतःच तसा आहे पण तो अर्वाचीन सुधारणेच्या कोष्टकांत बसत नाहीं ! आतां सुधारलेला मनुष्य कालपरवापर्यंत कसा वागला तें पाहूं. ज्यावेळीं जर्मनराष्ट्रानें क्रूर अत्याचार केले अशी हाकाटी केली गेली, त्यावेळीं जर्मनीच्या विरुद्ध क्षोभ उत्पन्न करण्याच्या हेतूनें थोडीशी अतिशयोक्ति होणें अपरिहार्य होतें. परंतु लॉर्ड ब्राईसच्या अध्यक्षतेखालीं त्या बाबतींत चौकशी करण्याकरितां नेमलेल्या कमिशननें अत्यंत विचारपूर्वक मत दिलें आहे कीं, जर्मनीनें फ्रान्स आणि बेल्जममध्यें ज्या तऱ्हेचे अत्याचार केले त्या तऱ्हेचे अत्याचार युरोपियन राष्ट्रांमध्यें तरी निदान तीनशें वर्षांत घडले नसतील ! पेनिन्शुलर युद्धाच्या वेळीं लॉर्ड वेलिंग्टन ज्यावेळीं बॅडेजोज आणि सिउडॉड राड्रिगोमध्यें शिरला, त्यावेळीं इंग्लिश शिपायांनीं जे लुटीचे आणि जबरीसंभोगाचे प्रकार केले, त्यांनीं कोणाही सहृदय माणसाचें मनाला वीट आल्याशिवाय राहणार नाहीं.[1] पूर्वीच्या महायुद्धांत ज्यांनीं पूर्वी कधीं मुंगीहि मारली नसेल अशी कारकुनी पेशा करणारी तरुण मुलें, सक्तीची भरती लागून किती लवकर केवळ शिपाई म्हणजे पगारी मारेकरी बनलीं ही गोष्ट आपल्या समोर ताजीच आहे. तुर्कांनीं आर्मेनियामध्यें ज्या तऱ्हेच्या कत्तली केल्या, त्या तऱ्हेच्या कत्तली चंगीझखानानंतर कोणीहि केल्या नसतील असें वाटतें ! रशियन क्रांतिकारकांनीं हाल करण्याचे जे वेगवेगळे प्रकार संस्कृतीमध्यें पसरविण्याचा सपाटा चालविला होता, ते प्रकार हिंदुस्थानांत तरी अमानुष वाटतात ! सुधारलेल्या अमेरिकेमध्यें गुन्हेगार निग्रोला जाळण्याचे जे प्रयोग चालू आहेत, ते सुधारलेल्या मानवसमाजाच्या अंतःकरणाचें मार्दव त्यास दर्शवीत नाहींत ! बॉक्सर बंडानंतर युरोपियन लोकांनीं चीनमध्यें जे अत्याचार केले, त्यावरून सुधारलेल्या मनुष्यालादेखील त्याची सुधारणा आपणापासून थोडीशी भिन्न असल्यास, युरोपियन लोक सभ्यपणानें वागविणार नाहींत असाच माझा निष्कर्ष निघतो ! या सर्व गोष्टींचा विचार करून अर्वाचीन तत्त्ववेत्ता फ्रेडरिक नित्शे म्हणतो, सर्व हिंस्र पशूंमध्यें सर्वांत क्रूर हिंस्र पशु नर

१ Christian ethics by Dean Inge.

कोणी असेल तर तो 'युरोपियन मनुष्य' हा आहे[१], अशा तऱ्हेचेंच मत रेव्हरंड डीन इंगनें मान्य केलें[२] आहे. एक ग्रंथकार म्हणतो, तिर्यक् योनींना जर धर्मरचना करतां येत असेल, तर त्यांना देवाची कल्पना करतां येईल किंवा नाहीं हें सांगणें कठीण आहे. परंतु त्यांना सैतानाच्या स्वरूपाची कल्पना करावयास सांगितली, तर त्या मोठ्या श्वेतवर्णीय मनुष्याचें रूप दाखवितील ! अशा तऱ्हेनें पाहूं लागलें तर मनुष्याची शारीरिक, मानसिक, आध्यात्मिक, बौद्धिक वगैरे कोणत्याही दृष्टीनें वाढ झाल्याचा पुरावा ऐतिहासिक काळांत म्हणजे मागल्या तीस हजार वर्षांत झालेला आढळून येत नाहीं. सुधारणा झाली वगैरे जो हलकल्लोळ चहूंकडे ऐकूं येत आहे त्याचा अर्थ इतकाच कीं, मानवाचा अंतर्गत वासनांच्या पूर्वीच्या साधनांवर अतोनात ताबा प्राप्त झाला आहे, परंतु त्यानें मानवप्राण्याचा नमुना (human type) बदलला असें सांगणें म्हणजे शुद्ध स्वतःची आणि इतरांची फसवणूक आहे !

मानवी नमुना बदलतो आहे किंवा कसें, याची चर्चा संस्कृतीच्या उदयास्ताच्या कारणांची ज्यावेळीं छाननी करणार आहोंत तेथें करूं. येथें एवढेंच नमूद करून ठेवतों कीं, जेथें जेथें सुधारणा हा शब्द वापरला जात असेल त्या त्या देशांत मानववंशांची आत्यंतिक अधोगती होत चाललेली आहे !

प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, ही सुधारणा आहे तरी काय? वेळीं अवेळीं तो शब्द तोंड भरून वापरणारे लोक तर त्या शब्दानें प्रतीत होणारी वस्तुस्थिति किंवा कल्पना यांच्या मर्यादा जाणतात काय ? युरोपांतील तत्त्वज्ञानानें तर मनुष्याचें मन गोंधळून जातें ! चावी दिलेलें घड्याळ ज्याप्रमाणें दर क्षणाला सांठवून ठेवलेली शक्ति खर्च करतें, त्याप्रमाणें हें जगत् सारखी शक्ति खर्चच करीत आहे असें शास्त्रें सांगतात. परंतु ही सर्व शक्ति मुळांतच कोठून आली असा प्रश्न केल्यास प्रश्न विचारणाराला अज्ञानांत काढतात ! विश्वाची मूळ रचना कशी आहे हें गृहीत धरण्यावर नीतिशास्त्र पुष्कळसें अवलंबून, म्हणून मूळ गृहीत कृत्यें समजावून घेणें हितकारक असलें, तरी तो फार दूरचा प्रश्न म्हणून सोडून देतों. परंतु सर्वसाधारणतः मानववंशाची सुधारणा

१ On the nations and peoples.
२ Outspoken essays by Dean Inge.

कशी प्रगती याची रूपरेषा कळल्याशिवाय सुधारणा करणें शक्य नाहीं. परंतु ती रूपरेषाच तर कळत नाहीं ! ज्या प्रगतीच्या नांवानें एवढा गोंधळ चालला आहे, त्या प्रगतीसंबंधीं युरोपांतील तत्त्ववेत्त्यांना तरी कल्पना आलेली दिसत नाहीं ! परंतु आमच्या इकडे सुशिक्षित वर्गाची तरी अशी स्थिति झाली आहे कीं, एखादा दोष सनातनी आणि पाश्चात्य तत्त्वज्ञानांत समान असेल तर त्यांना सनातनी दोष तावडतोब दिसेल परंतु पाश्चात्यांचा दोष मुळींच दिसणार नाहीं ! उदाहरण घेऊन सांगावयाचें तर प्रगतीची उत्क्रांति सांगताना प्रत्येक तत्त्ववेत्त्याला कोठून तरी सुरवात करावीच लागते. आपण अमुक ठिकाणाहून सुरवात केली असें म्हटल्यानंतर, त्याच्या पूर्वीची मला माहिती नव्हती असें सांगणारा म्हणतात असतो ! परंतु तत्पूर्वी काय होतें असा प्रश्न विचारणाऱ्याचा तोच प्रश्न आपण स्वतःला विचारल्यास प्रश्न विचारणाराला मूर्खपणाचें प्रशस्तिपत्र देऊन, ‘ शेषं कोपेन पूरयेत् ’ या न्यायाचा अवलंब करावयाचा ! धार्मिक मनुष्य म्हणेल कीं, परमेश्वर या जगाचा कर्ता आहे म्हणून त्याची भक्ति करावयाची. परंतु आपण गृहीत धरलेली प्रकृति matter कोठून आली, असा प्रश्न विचारल्यास कोणीच उत्तर द्यावयाचें नाहीं हा सामान्य न्याय आहे !

असो. आमच्या अलीकडील विद्वानांच्या गुरुस्थानीं तरी या प्रगतीच्या कल्पनेची जाणीव कितपत झाली होती व आहे, याचा विचार करूं. हर्बर्ट स्पेन्सर म्हणतो, ‘ उत्क्रांतीचा ओघ असा आहे कीं, आज आपण मानव-समाजांत ज्या गोष्टी कनिष्ठ समजतों त्या हळूहळू नष्ट होत जाऊन, मानव-प्राण्याला पूर्णावस्था नक्की यावयाची आहे.’ असेल बापडी ! परंतु हजारों वर्षांनीं पुढें जी पूर्णावस्था नक्की यावयाची आहे, तिच्याकरतां अपूर्णावस्थेत असतांनाही आचार आणि विधिनिषेध पाळूं नयेत, असें त्यानें कोठें लिहिलेलें माझ्या वाचनांत नाहीं. प्राचीनांच्या कल्पनेकडे पाहिलें तर मनुष्याचें पूर्णत्व दर्शविणारें कृतयुग पूर्वी होऊन गेलें असें ते मानीत. हिंदूंच्या महाभारतादि ग्रंथांतून ज्याप्रमाणें या कल्पनेला आधार सांपडतात, त्याप्रमाणेंच ते यहुदी, ग्रीक वगैरे जुन्या राष्ट्रांच्या वाङ्मयामध्येंही सांपडतात. आजची कल्पना पाहिली तर कृतयुग हें पुढें यावयाचें आहे आणि तें मनुष्याच्या बुद्धीच्या गुणांच्या जोरावर प्राप्त व्हावयाचें आहे. कृतयुग पुढें याव-

याचें आहे म्हणजे पुढें येणारा काल, पूर्वी गेलेल्या कालापेक्षां जास्त चांगला आहे, अशा तऱ्हेच्या कल्पना प्राचीनांमध्येंही थोड्याशा तुरळक तुरळक सांपडतात. इतर ठिकाणीं अशाही कल्पना आढळतात कीं, कृतयुग पुढेंही नाहीं आणि मागेंही नाहीं ! तें अनेक वेळां येऊन जात असतें; यालाच आमच्याकडे युग, मन्वंतरें वगैरे कल्पना लावून दिलेल्या आहेत. प्लेटो हा तीन लक्ष साठ हजार वर्षांचें एक युग समजत असे; आर्य ग्रंथकार एक युग त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षांचें समजतात. अलीकडच्या तत्त्ववेत्या-मध्यें गॅटे आणि नित्शे हे युगकल्पनेला पाठिंबा देतात. पूर्वी मानव हा देवांचा भ्रष्ट झालेला वंशज आहे, असें मानण्याकडे प्रवृत्ति होती. हल्लीं मानव हा माकडाचा उच्च पदवीला पोहोंचलेला वंशज आहे, असें मानण्या-कडे प्रवृत्ति आहे परंतु मानवानें कोणत्याही तऱ्हेनें प्रयत्न न करतां, निव्वळ सृष्टीच्या ओघांत त्याची सारखी प्रगतीच होत चालली आहे, असें म्हणण्याची शक्कल हा एकोणिसाव्या शतकाचा खास हक्क आहे !

ही कल्पना इतर क्षेत्रांत खरी मानावयाची तर कांहीं विलक्षणच कोडीं उत्पन्न होतील. अशा तऱ्हेच्या ओघानें रोमन लोकांच्या अनेकेश्वरी धर्मापेक्षां ख्रिस्ताचा एकेश्वरी धर्म हा श्रेष्ठ ठरूं लागेल. ख्रिस्तीधर्मामध्यें देखील कॅथॉ-लिक पंथापेक्षां प्राटेस्टंट पंथ हा जास्त चांगला. वैदिक धर्मापेक्षां बुद्धधर्म चांगला आणि या आर्यधर्मांच्यापेक्षां आज उत्पन्न झालेलीं आर्यसमाज, देव-समाज, ब्रह्मोसमाज आणि प्रार्थनासमाज हीं पाखंडें सर्वश्रेष्ठ ! महमदच्या इस्लाम धर्मापेक्षां अकबराचा दिन इलाही श्रेष्ठ ! या सर्व गोष्टी सिद्ध करणें आधुनिक प्रगतिवाद्यालादेखील जरा जड पडेल असें मला वाटतें ! नाहीं तर धर्मांच्या बरेवाईटपणाचें कांहीं तरी मापन सांगून, त्या नियमानें वर आम्हीं दाखविलेल्या गोष्टी त्यांनीं सिद्ध कराव्या अशी त्यांना प्रेमाची विनंति आहे.

संस्कृतीचा विचार केला तरी हा प्रगतीचा नियम सिद्ध करतां येईल असें मला वाटत नाहीं. पराभूत संस्कृति ही जेत्या संस्कृतीपेक्षां नेहमींच हलकी असते काय ? डॉ. कार सॉडर्स म्हणतो,[१] जेव्हां आपण कांहीं गटांचा विध्वंस झाला असें म्हणतों, त्यावेळीं त्यांचा पूर्ण नाश झाला असेलच असें

१ War and biology-paper by Carr Saunders.

दुसरे हूण—ज्यांना इतिहासज्ञ श्वेतहूण म्हणतात, त्या लोकांनीं महाराजाधिराज समुद्रगुप्ताचा नातू स्कंदगुप्त हा उत्तर हिंदुस्थानांत राज्य करीत असतांना, हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. स्कंदगुप्तानें किंचित्काल ही लाट आवरून धरली. परंतु त्याच्या मृत्यूनंतर त्या लोकांनीं गुप्त साम्राज्याचा नाश केला[१]! समुद्रगुप्ताची संस्कृति आणि हूणांची संस्कृति या दोहोंमध्यें कोणती श्रेष्ठ होती, ही गोष्ट एकादें शाळेंतील पोर देखील सांगूं शकेल! पुढें काऱूरच्या लढाईंत पराजय झाल्यामुळें हूण लोक काश्मीरांत रेटले गेले. या युद्धाचें कारण तरी असें झालें कीं, हूणांनीं आपल्या प्रजेच्या ज्या कत्तली केल्या, त्या कत्तलींमुळें आर्यावर्त खडबडून जागा झाला आणि बालादित्य आणि यशोधर्मा यांनीं हूणांना या पुण्यभूमींतून हांकून लावलें[२]. ही पृथ्वीवर पसरलेली रानटी लोकांची पहिली लाट होय. दुसरी लाट म्हणजे अरब लोकांनीं आपलें अरण्यांतील घरदार सोडल्यापासून शंभर दीडशें वर्षांचे आंत पूर्वेकडील रोमन साम्राज्याचा नाश केला, आफ्रिकेमध्यें असलेला नार्डिकवंश वॅंडाल उधळून लाविला, स्पेनवर अधिराज्य केलें, फ्रान्सवर स्वारी केली आणि आपल्या पडत्या काळांत देखील युरोपांतील सर्व राजांना पिटाळून लावलें, आशियामध्यें इराणी साम्राज्याचा नाश केला, अफगाणिस्थान, बलुचिस्थान तुडवून ते सिंधप्रांताच्या किनाऱ्यापर्यंत येऊन पोहोंचले. तिसरी लाट म्हणजे तार्तार लोकांनीं हिंदुस्थान व चीन देशांत आपलीं अधिराज्यें स्थापन केलीं, रशियामध्यें अधिराज्य गाजाविलें आणि सतराव्या शतकापर्यंत व्हिएन्नापर्यंत मुलूख पादाक्रांत केले!

आजच्या प्रगतीच्या विषयानुसार पुढें आलेली हूण संस्कृति पूर्वीं होऊन गेलेल्या गुप्त आणि रोमन संस्कृतींपेक्षां श्रेष्ठ असावयास पाहिजे. परंतु इतिहास तरी तसें सांगत नाहीं. पण खरोखरच प्रगति ही काय भानगड आहे आणि ती कशाची होत असते, ही गोष्ट आजच्या प्रगतिवाद्यांनीं आम्हांसारख्या प्राकृत जनांकरितां स्पष्ट करून सांगावयास नको काय? परंतु एकदां प्रगतीची कल्पना डोक्यांत खिळून बसली म्हणजे जो आजच्या ओघाबरोबर

१ Early history of India by Vincent Smith; Aryan rule in India by Havell.

२ Aryan rule in India by Havell.

वहात जाईल तो प्रागतिक ! आणि जो आजच्या ओघाबरोबर वहात जावयास तयार नाहीं तो परागतिक असें समीकरण होऊन बसलें ! या समीकरणाच्या दृष्टीनें इतिहासाचा अर्थ लावूं लागल्यास, बऱ्याच मौजा प्रतीत होऊं लागतात. मोंगली साम्राज्याचा चहूंकडे अंमल पसरूं लागल्यानंतर आणि सर्व रजपूत राजांनीं त्या तुफान लाटेपुढें मान लवविल्यानंतर, अशा तुफानाला छातीचा कोट करून तोंड देणारा एकच एक वीर शिसोदियाकुलावतंस महाराणा प्रतापसिंग हा परागतिक ! तर अकबर बादशाहाला मदत करणारा देशद्रोही आणि धर्मद्रोही अंबरचा मानसिंह हा प्रागतिक ! हिंदूंच्या शुद्धीकरतां झटणाऱ्या वाप्पारावळाच्या वंशजांनो ! तुम्ही अमेरिकेंत जाऊन उदार मतें कां शिकला नाहींत ? प्रॉटेस्टंट धर्म मातबर झाल्यानंतर त्याला तोंड देणारे कॅथॉलिक अगर कॅथॉलिक धर्म उच्च असतांना त्याला विरोध करणारे प्रॉटेस्टंट हे परागतिक ! आपल्या आठवर्णांत जन्मापासून मृत्यूपर्यंतची सर्व नैतिक मूल्यें सुसंगत पद्धतीवर नेलीं पाहिजेत, अशा तऱ्हेचें मत प्रचलित करणारे महात्मे हे प्रागतिक आणि आतियुक्त हिंदुसमाजाच्या घटनेशीं विसंगत असलेले असा वाटेरीत आम्ही मुळींच उचलणार नाहीं, असें म्हणणारे जुन्या पद्धतीनें चालणारे लोक परागतिक अगर अलीकडे प्रचलित झालेली शिवी वापरावयाची तर त्यांनाच सनातनी म्हणावें ! गौतम बुद्ध, अशोक, मौर्य वगैरे लोक प्रागतिक आणि त्या लाटेला तोंड देणारे कुमारिलभट्ट, शंकराचार्य वगैरे सगळे परागतिक ! त्याबरोबरच हरविलास सारड्यांच्या विवाहविषयक बिलाला विरोध करणारे सनातनी व मुसलमान हे परागतिक ! काय सुंदर जोडी जमली ! प्रार्थनासमाज, ब्राह्मोसमाज वगैरे सर्व प्रागतिक आणि स्मृतीवरील निबंधग्रंथ लिहिणारे टीकाकार परागतीक ! सारें सांगावयाचें तर प्रागतिक आणि परागतिक हे दोन्ही शब्द अर्थशून्य आहेत ! सेनेका म्हणतो, ज्याला आपण प्रगति म्हणतो ती परागतिही पण असूं शकेल ! मानवाच्या इतिहासामध्यें प्रगतीसारखी भ्रामक कल्पना इतकी कशी प्रबल होते, हें कोडें मानसशास्त्रज्ञांनीं सोडवावयासारखें आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं, सृष्टीचे नियम प्रगतीही सांगत नाहींत आणि परागतीलाही उचलून धरीत नाहींत ! मानवी प्रगति काय आहे हेंच सृष्टीला कळत नाहीं! ते—सृष्टीचे नियम—इकडेही नाहीत आणि तिकडेही नाहींत. खरी गोष्ट अशी

आहे कीं, कोणत्याही जातीची नैसर्गिक स्थिति गति ही आहे, प्रगति नव्हे. भोंवतालच्या परिस्थितींत टिकाव धरून राहण्याची लायकी येईपर्यंत, त्या जातींत थोडे किरकोळ बारीक सारीक फरक पडलेले दिसतील; परंतु जातीचें स्वरूप स्थिर झाल्यानंतर त्या जातींत स्थायिभावच उत्पन्न झाला पाहिजे. मनुष्यजातीचा आहे ह्या स्वरूपांत उत्क्रांतीजन्य फरक झाल्याचें कांहीं आमच्या वाचनांत नाहीं ! जातिभेदावरील आमच्या लेखमालेमध्यें आम्हीं दाखविलेंच आहे कीं, चार लक्ष वर्षांमध्यें मुंग्यांच्या आकारांत कोणत्याही तऱ्हेचा फरक पडलेला नाहीं !

असें दिसतें कीं, लोकभ्रमाचा सर्व मानववंशावर पगडा बसवावयाचा असेल तर त्यानें कोणतें ना कोणतें तरी तत्त्वज्ञान काबीज करावयास पाहिजे.

**९ प्रगति आणि तत्त्ववेत्ते**

या प्रगतिरूपी दंतकथेनें त्यावेळीं युरोपांतील कांहीं तत्त्ववेत्त्यांवर आपला पगडा बसविला होता. हे तत्त्ववेत्ते म्हणजे हेगेल, कॉंट आणि स्पेन्सर हे होत. त्याचप्रमाणें डार्विन ह्या तत्त्ववेत्त्यालाही या कल्पनेची बाधा झालेली होती. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, या तत्त्वज्ञान्यांचा लेखांतून प्रगतीचें तत्त्व मुळींच सिद्ध होत नाहीं !

उत्क्रांतितत्त्व हें जागतिक जीवनाचें प्रधानतत्त्व असें धरून चालल्यास, जगामध्यें नैतिक मूल्य, बरें-वाईट, सत्-असत्; सुजन आणि दुर्जन या जोड्यांत प्रतीत होणाऱ्या कल्पनांना काडीचाही अर्थ रहाणार नाहीं. जें कांहीं घडत आहे तें, मानवाला आवरून धरण्याला अशक्य अशा उत्क्रांतीच्या लाटेंत घडून येत आहे. मग 'सुखं दुःखं भवो भावो भयं चाभय मेव च । अहिंसा समता तुष्टिस्तपोदानं यशोऽयशः । भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः[१] ॥ ' अशी स्थिति होऊन कर्ता आपल्या कर्माबद्दल जबाबदार रहाणार नाहीं. मग जगांतील प्रगति–परागतीची भाषा म्हणजे एक अर्थशून्य बडबड ठरेल[२] ! मनुष्य हा काल होऊन गेलेला, पुढें होणारा यांचा बेजबाबदार दुवा बनतो. मग सर्वसाधारण चाल अगर प्रगति हे शब्द अर्थशून्य

---

१ भगवद्गीता.

२ H. F. Bardley quoted by Dean Inge in his outspoken essays.

स्पर्ध्यांना अनेक लुच्चेगिरीच्या युक्त्या करून फसवून आपण श्रेष्ठपणा मिळवा-वयाचा ! त्यांपैकीं पहिली तऱ्हा जरी दिसावयाला फार उदात्त दिसली, तरी त्या मार्गानें जाणाऱ्या प्राणिवर्गांचा नेहमींच नाश होतो. सृष्टीमध्यें पाहिलें तर व्याघ्रसिंहादि जाती आणि मनुष्यांतील लढाऊ वर्ग यांचा नाशच झालेला दिसून येईल ! दुसऱ्या मार्गाचा अवलंब करणाऱ्या जाती, ह्या सृष्टींत चिरंजीव झालेल्या दिसून येतील. तिसऱ्या वर्गानें जाणारा जो मानववर्ग त्या मानवानें आपल्या बुद्धीच्या जोरावर, आपल्यापेक्षां बलाढ्य प्राणिवर्गांवर सृष्टीमध्यें आज तरी जय मिळविलेला दिसत आहे खरा ! मेचनिकॉफसारखे इंद्रियविज्ञानवेत्ते मानवाला जें काम करावयाचें आहे त्या दृष्टीनें मानवाचें शरीर किती गैरसोयीचें आहे हें दाखवून देतात. इति-हासाकडे पाहिलें तरी स्पेन्सरच्या सिद्धांताला पाठिंबा मिळत नाहीं ! इति-हासामध्यें तरी जेथें जेथें मानीव प्रगति, तेथें तेथें नाश असा त्रिकाला-बाधित सिद्धांत दिसून येतो ! प्रगति म्हटली कीं नाश ठेवलेलाच. मग नाश हाही प्रगतींतील दुवा आहे असें म्हणावयाचें असल्यास नकळे ! हिंदु आणि चिनी लोकांनीं किंचित्कालपर्यंत प्रगति केली व ते तेथें थांबले, ते समाज आज पृथ्वीच्या पाठीवर जिवंत आहेत. ग्रीक आणि रोमन लोक सारखे प्रगति करीत गेले, ते विनाश पावले ! कारण आम्ही मागें सांगित-ल्याप्रमाणें प्रगति हा सृष्टीचा नियम नसून, तें हर्बर्ट स्पेन्सरचें एक मत आहे. परंतु हर्बर्ट स्पेन्सर आणि सृष्टि हे कांहीं समानार्थक शब्द नाहींत. आज पाहिलें तरी एकाच समाजाचे जे कांहीं थर पडतात त्यांपैकीं आपल्या दृष्टीनें सर्वांत श्रेष्ठ मानले गेलेले थर हळूहळू कमी होत चालले आहेत आणि त्याला कारण या लोकांची पिंडगत अधोगति असेल, असें मेजर डार्विन आपल्या सुप्रजाशास्त्रावरील ग्रंथांत म्हणतो. आपल्या आंग्ल-प्रभूच्या समाजाबद्दल डॉ. फिशर म्हणतो, उदाहरणार्थ ग्रेटब्रिटनच्या लोक-संख्येची एकोणीसशें अकरापासून एकोणीसशें एकवीस पर्यंतच्या काळांत केव्हांतरी पिंडगत अधोगति सुरू झाली, तरी देखील एकोणिसशें एक-वीसच्या खानेसुमारींत लोकसंख्येमध्यें वाढच झालेली दिसली आणि एको-णीसशें एकतीसच्या खानेसुमारींतही प्रजोत्पादनाला योग्य अशा व्यक्तींचें एकंदर संख्येशीं प्रमाण वाढलें असल्याकारणानें थोडीशी आभासिक वाढ

झालेली दिसेल. डॉ. कुझिन्स्की म्हणतो, 'उत्तर आणि पश्चिम युरोपांतील लोकसंख्या नष्ट होणार, ही गोष्ट टळण्यासारखी नाहीं.'[2] हेंच मत प्रोफेसर एस. जे. होम्स यानें कबूल केलें आहे.[3] आजचीं राष्ट्रें अजून थोडीशी जीवशक्ति दाखवितात याचें कारण, प्रगतीच्या रोगाची त्याला उशिरा बाधा झाली असून तो अजून त्यांच्या हाडींमासीं खिळला नाहीं. नाहींतर सृष्टीचे परिणाम कांहीं टळणार नाहींत !

प्रगतिवादी तत्त्ववेत्ता हेगेल याची प्रगतीची कल्पना, सृष्टि अगर इतिहास यांच्या बाबतींत निरर्थक आहे. तो म्हणतो, 'प्रगति म्हणजे आध्यात्मिक स्वातंत्र्य. आधिभौतिक जगामध्यें, सृष्टीचे अनंत परिणाम शरीर आणि मन यावर होत असून, आध्यात्मिक स्वातंत्र्यानें हें काम बंद आहे व तें काम तेथून त्यक्त केलें गेलें, ह्या दोनही गोष्टी कळणें बरेंच कठीण ! सर्व आधिभौतिक शक्तींचा परिणाम ज्या आत्मतत्त्वावर व्हावयाचा तें आत्मतत्त्वच स्वतंत्र मानल्यानंतर. या तत्त्वज्ञानाचा हिंदु तत्त्वज्ञानांशीं फरक काय आहे तेंच कळत नाहीं ! हेगेल साहेबांनी आध्यात्मिक स्वातंत्र्य म्हणजे प्रगति, हें जरी मान्य केलें तरी ऐतिहासिकदृष्ट्या ती प्रगति कशी सिद्ध करावयाची ? हेगेलची वादप्रतिवादी पद्धति जगाच्या इतिहासामध्यें दिसून येईल असें मला वाटत नाहीं. इतकेंही करून पुनः केव्हां प्रगति झाली असेल ती असो. परंतु एकोणिसाव्या शतकांत जी राज्यसत्तेची पद्धति प्रतिष्ठित झाली, तीच सर्वांत श्रेष्ठ होय. त्यामध्यें सुधारणा होणें शक्य नाहीं, असेंही हेगेल साहेबांचें मत होतें. मला असें वाटतें कीं, तें बरोबरही होतें. प्रगतीसारख्या अर्थशून्य कल्पनेच्या मागें लागून, समाज अस्थिर करणें हें मानवाच्या हिताच्या दृष्टीनें चांगलें नाहीं. मग त्यासंबंधीं नवमतवादी कांहीं गप्पा झोंकोत ! अशा तऱ्हेनें पाहिलें तर, हेगेलची प्रगतीही इतिहास निरर्थक असल्यामुळें, आमच्याकडे हल्लीं प्रगति शब्दाचा जो अर्थ होतो त्या अर्थानें त्यांनाही मान्य नसावी असें वाटतें.

आणखी एक प्रगतिवादी तत्त्ववेत्ता म्हणजे आधिभौतिक तत्त्वज्ञानी आगस्त

१ Genetical theory of selection by R. A. Fisher.

२ Balance of births and deaths by Kuzcinski.

३ Journal of heredity.

कोंत हा होय. याच्याही मताची तीच स्थिति आहे. त्यानें जे प्रगतीचे टप्पे लावले आहेत, त्यांनीं तरी एकामागून दुसरा जास्त सुधारलेला असें सिद्ध करणें शक्य आहे काय? आपले प्रगतीचे टप्पे सिद्ध करतांना, ख्रिस्ताचा एकेश्वरवाद हा जुन्या रोमन लोकांच्या अनेकेश्वरवादापेक्षां श्रेष्ठ आहे असें गृहीत धरावें लागलें आहे! दुसरे आधिदैविक स्थितींत आहेत म्हणणारा कोंत हा स्वतःच आधिदैविक स्थितींत आहे! ह्यालाही धर्म शब्दानें ज्या तऱ्हेची सत्ता प्रतीत होते त्या तऱ्हेची सत्ता पाहिजे होती; फक्त मागें प्रत्यक्ष हा शब्द त्याला लावावयाचा होता!

इतिहास आणि राज्यसत्ता यांच्या क्षेत्रांतदेखील या प्रगतीनें बेसुमार धुमाकूळ घातलेला दिसतो! कोणतेंही राष्ट्र अगर संस्कृति नष्ट झाल्यास, तें राष्ट्र व संस्कृति नष्ट होण्यालाच कशी लायक होते, तें इतिहासकार दाखवितांना दिसून येतील. राष्ट्र विजयी असलें कीं, तें श्रेष्ठ गुणांनीं युक्त असलेंच पाहिजे! त्या हिशेबानें रोमन साम्राज्य हें त्या साम्राज्याचा नाश करणाऱ्या रानटी जर्मनांच्यापेक्षां हिणकस असलें पाहिजे! जर एकादें राष्ट्र, एकादा धर्म, एकादी कला, एकादी कल्पना, एकादें तत्त्वज्ञान, एकादी पद्धति सृष्टींतून नष्ट झाली तर ती जगण्यास नालायक कशी होते हें दाखविणें, एवढेंच इतिहासकार आपलें कार्य समजतात. त्यामुळें शतक आणि विसावें शतक यांमध्यें झालेले इतिहास मानवी समाजाचें तात्पर्य लावण्याचे दृष्टीनें चूक आहेत. मोठा स्वाभिमानी इतिहासकार असला तर तो, पोकळ अशा प्रगतितत्त्वाच्या तडाक्यांत सांपडला कीं, चुकीचीं विधानें करूं लागतो! सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक राजवाडे म्हणतो[१], 'थोडक्यांत आगस्त कोंत याच्या भाषेंत सांगावयाचें तर, महाराष्ट्र त्याकालीं Metaphysical अवस्थेंत होता आणि positive अवस्थेंत यावयाला त्याला अद्यापि पांचशें वर्षें अवकाश होता. म्हणजे शक २००० च्या सुमारास महाराष्ट्र positive बनणार होतें.' हें वाक्य प्रधान धरून जीं कांहीं पानें चर्चा केली आहे, ती मानवी संस्कृतीचें कोडें समजण्याच्या दृष्टीनें निरुपयोगीच नव्हे तर घातुक देखील आहे! मुळांत आगस्ट कोंतनें कल्पिलेल्या अवस्थाच असमर्थनीय आहेत! पुन्हां अध्यात्मिक अवस्थेंतून positive अवस्थेंत जाण्याला पांचशें

१ राधामाधवविलासचंपू, प्रस्तावना १०७-१०८.

वर्षें लागतात हें गणित राजश्री राजवाडे कशाच्या आधारें करतात ? असो. राजवाड्यांसारखा स्वाभिमानी इतिहासकार हत्यारें करतां येत नव्हतीं म्हणून महाराष्ट्र मागासलेला होता असें विधान करतो, तर आम्हीं पूर्वीं दाखविल्याप्रमाणें प्रो. कार सांडर्स श्रेष्ठ आयुधें असणें हें वंशाच्या श्रेष्ठत्वाचें लक्षण नव्हे असें स्पष्ट मत देतो ! याचें कारण राजवाडे हा आभासिक अशा प्रगतितत्त्वांच्या खालीं चिरडून गेला आहे आणि कार सांडर्स हा शास्त्रीय मापनें लावून मग सिद्धांत बनवीत आहे. राजसत्तेचेही हे लोक एकापुढें एक असे टप्पे लावतात. परंतु एकराजसत्तेपेक्षां प्रजासत्ताक पद्धति श्रेष्ठ कां, त्यांचें श्रेष्ठकनिष्ठत्व काय परिमाण लावून मोजावयाचें, यांसंबंधीं कल्पना व शाब्दिक कोट्या यापलीकडे कोठेंही कांहीं खुलासा सांपडणार नाहीं ! एक एम. ए., पीएच्. डी. एकदां असें बोलतांना ऐकूं आलें कीं, ' फ्रान्सच्या क्रांतीनें मनुष्यप्राण्यांमध्यें स्वत्वाचा अभिमान उत्पन्न करून दिला. ' या विद्वानांना ही साधी गोष्ट माहीत नाहीं कीं, स्वत्वाचा अभिमान प्रत्येक व्यक्तीच्या ठायीं पाहिजे त्याहून फारच जास्त प्रमाणांत असतो ! तो कांहीं तरी युक्तीनें कमी करावा लागतो. गुन्हेगारीशास्त्रावरील श्रेष्ठ ग्रंथकार डॉ. सीझर लोंब्रोसो आपल्या क्रिमिनल मॅन ग्रंथांत म्हणतो[१], 'स्वत्वाचा अभिमान हा खऱ्या लायकीशीं व्यस्त प्रमाणांत असतो.' चॅटरटन हिल म्हणतो,[२] ' स्वत्वाचा अभिमान ( Individualism ) हा आमच्या संस्कृतीचा फारच मोठा शत्रु आहे. ' परंतु स्वत्वाचा अभिमान या शब्दसमुच्चयाचा उच्चार करण्यापलीकडे या गृहस्थांना कांहीं बोध झाला असेल, असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं.

यាप्रमाणें सर्व अंगांनीं आणि उपांगांनीं प्रगति नांवाच्या लोकभ्रमाचा अगर दंतकथेचा विचार करतां सारखी होत जाणारी प्रगति नांवाचें तत्त्व, सृष्टीच्या नियमावरून होत असल्याचा कोठेंही पुरावा सांपडत नाहीं. सृष्टीचे नियम प्रगति आणि परागति या दोनही बाबतींत कांहींच बोलत नाहींत. कारण प्रगति आणि परागति हे शब्द मूल्य उत्पन्न झाल्या-

**१० मानवी ध्येय.**

१ Vanity varies inversely as the real worth.

२ Heredity and selection in sociology.

वर उपयोगांत आणणें शक्य असतें. एकंदर सार्वत्रिक प्रगति होत नसली तरी एकादें क्षेत्र निवडून घेऊन तेवढ्या क्षेत्रामध्यें मानवसमाज कांहीं विवक्षित स्थितींत ठेवणें शक्य असतें. त्याकरितां आपणाला सृष्टीचे नियम समजावून घ्यावयास पाहिजेत. परंतु या सर्व गोष्टीला आपले हेतु स्थीर व्हावयास पाहिजेत. आपले हेतु स्थीर रहात नाहींत, पावलोंपावलीं आलेल्या नव्या कल्पनांच्या वाऱ्याच्या झुळकेबरोबर आपण चंचल होतों आणि यशाच्या बाबतींत आपली निराशा होते. 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' हा मनुष्यप्राण्याच्या जीविताचे बाबतींत दिसून येणारा नियम संस्थांनाही लागू पडतो, असें ज्यावेळीं आपण म्हणतों त्यावेळीं आपण आपलीं साध्यें अस्थिर ठेविलीं आहेत, या गोष्टीला कबुलीजबाब देत असतों! आपलें ध्येय न हलणारें असें निश्चित असावयास पाहिजे. म्हणजे आपण काय करूं इच्छितों व आपणाला कोठें जावयाचें आहे, या गोष्टी निश्चित झाल्या पाहिजेत. ध्येयें नेहमींच सापेक्ष असतात हें या प्रश्नाचें उत्तर नव्हे. सृष्टींत ज्यांचा पाया आहे, अशीं ध्येयें सापेक्ष नसतात. आध्यात्मिक प्रगति म्हणून जी कांहीं व्हावयाची असते, तीही सत्य सृष्टीला धरून व्हावी लागते. आपलीं ध्येयें आपणांपुढें जास्त जास्त स्पष्ट होत जावयास पाहिजेत. ध्येयें स्पष्ट असलीं म्हणजे मग मार्गाची विवंचना येते. येथें ध्येय आणि मार्ग यांच्या भेदानें चार पर्याय उत्पन्न होतात.

ध्येयें स्पष्ट परंतु मार्ग चुकीचा,
ध्येयाचा पत्ता नाहीं परंतु मार्ग परंपरेनें बरोबर चालत आलेला,
ध्येयही चूक आणि मार्गही चूक,
ध्येयही बरोबर आणि मार्गही बरोबर.

पुढें, ध्येय स्पष्ट असलें तरी शुद्ध असावयास पाहिजे आणि मार्ग बिनचूक असला तरी नीतियुक्त असावयास पाहिजे. म्हणून ध्येयांची शुद्धाशुद्धता आणि मार्गांची नीतिअनीति यांना धरून पुन्हां पर्याय उत्पन्न होतील. आश्चर्याची गोष्ट ही कीं, हे सर्व पर्याय कोठें ना कोठें तरी मनुष्यप्राण्यानें अवलंबिलेले दिसतात! ज्याप्रमाणें व्यक्ति अस्तित्वांत आहे, त्याप्रमाणें जगत् हेंही पण अस्तित्वांत आहे. कोणी पहिल्याचा आश्रय करून स्वात्मवादी (egoist) बनेल तर कोणी दुसऱ्याचा आश्रय करून परात्मवादी

बनेल. दोघांचीही गृहीत कृत्यें खरीं मानल्यास त्यांना खोडून काढणें शक्य नाहीं; मग दोन्ही अत्यंत परस्परविरुद्ध ध्येयें सृष्टिनियमांनीं प्रतीत होतात असें म्हणावयाचें काय ? सृष्टीमध्यें परस्पर विनिमय चाललेला आहे, ही गोष्ट सहज सिद्ध करतां येईल आणि त्यामुळें परात्मवादित्व (Altruism) हें खोटें नाहीं असें म्हणतां येईल असें मला वाटत नाहीं. अशा तऱ्हेच्या सृष्टीकडे पहाण्याच्या दृष्टिकोनाचा, 'एते सत्पुरुषाः परार्थ घटकाः स्वार्थात् परित्यज्य ये।' अशा तऱ्हेचें तत्त्वज्ञान हा एक परिणाम आहे. उलट सृष्टी-मध्यें जीवनार्थ कलह चालू आहे, हीही गोष्ट सृष्टीवरूनच सिद्ध करतां येईल ! मग जें आहे तें बरोबर आहे हा हेगेलचा सिद्धांत, जीवनार्थ कलह चालू आहे हा डार्विनचा सिद्धांत, हे दोन सिद्धांत घेऊन तिसरा सिद्धांत काढावयाचा तर, 'तस्मात् सर्वेषु—कालेषु मामनुस्मर युध्यच।' म्हणून सर्व कालीं माझी आठवण ठेवून लढ, अशा तऱ्हेच्या हत्यारांच्या खणखणाटाचा सिद्धांत प्रतीत होऊं लागतो. हान निट्शे, ट्रीश्के, बर्नहार्डी यांनीं काढलेला सिद्धांत खरा मानल्यास, मोठमोठालीं सैन्यें व शेकडों हत्यारें गोळा करून नेहमींच लढाईला सज्ज रहावयाचें, एवढेंच ध्येय राष्ट्रापुढें शिल्लक रहातें ! असल्या तत्त्वज्ञानाचा परिणाम जें १९१४ सालीं झालेलें जागतिक युद्ध, त्यामध्यें झालेला द्रव्य-नाश आणि मनुष्यसंहार आणि त्यानंतर जगावर ओढविलेलें आर्थिक संकट या गोष्टींचा विचार केल्यास अशा तऱ्हेचें तत्त्वज्ञान जगाला हितावह होईल असें वाटत नाहीं. अशा तऱ्हेचें सर्वथा स्वार्थवादी तत्त्वज्ञान एकांगी तर, सर्वथा परात्मवादी तत्त्वज्ञानही तसेंच ! त्याप्रमाणें आणखी तिसरा वर्ग उठून सांगूं लागला कीं, सजीव सेंद्रियप्राण्याची निसर्गतः प्रवृत्ति सुखप्रवण असते. 'दुःखादुद्विजते सर्वः सर्वस्य सुखमीप्सितं।' किंवा 'सुखार्थाः सर्व भूतानां मताः सर्वाः प्रवृत्तयः।' किंवा 'मनुष्य हा सुखदुःख या द्वंद्वाच्या अंकित आहे'. सुखवृद्धि हें समाजाचें ध्येय असावें. या तत्त्वज्ञानाचा परिपाक म्हणजे पुष्कळांचें पुष्कळ सुख'. आर्यांच्याआर्यांमध्येंदेखील ही कल्पना सांपडते पण तेथें पुष्कळांचें पुष्कळ सुख नाहीं. तर पुष्कळांचें पुष्कळ हित आहे.

१ महाभारत.

२ Jereny Benthain.

३ Utilitarianism by J. S. Mill.

' सर्वेषां यःसुहृन्नित्यं सर्वेषांच हिते रताः । कर्मणा मनसा वाचा स धर्मवेद जाजले ॥[१]'' अथवा ' यद्भूत हितमत्यन्तं तत्सत्यमिति धारणात् ।' अशा तऱ्हेनें आत्यंतिक हित हें ध्येय सांगितलेलें आहे. परंतु बेंथम आणि मिल्ल यांना पुष्कळांचें पुष्कळ सुख पाहिजे, एवढाच फरक आहे. सध्यां तरी या तत्त्वज्ञानाचा परिणाम पुष्कळांचें पुष्कळ सुख म्हणजे पुष्कळांचा पुष्कळ आळशीपणा असा अर्थ झालेला आहे ! जिकडे तिकडे कामाचे तास कमी आणि करमणुकीचीं साधनें जास्ती अशी मागणी चाललेली आहे. यावरून सुधारलेल्या युरोपमध्यें ' सुख ' हा शब्द आळस या शब्दाचा पर्याय होतो असें मला वाटतें ! तर कोणतेंही राष्ट्र किंवा व्यक्ति यांची प्रगति कष्टाच्या मार्गानेंच होत असते, म्हणून मात्रास्पर्श शितोष्णसहत्व हेंच उत्क्रांतीचें कारण आहे, म्हणून तेंच समाजांचें ध्येय असावें असें फ्रेडरिक नित्शेसारखे तत्त्वज्ञानी सांगतात. अशा तऱ्हेनें पाहिलें तर सृष्टींत दिसून येणाऱ्या असंख्य अशा दुय्यम ध्येयांपैकीं, कोणतें तरी एक घेऊन त्यावर वरून गोड दिसणारी तत्त्वज्ञानाची पद्धति उभारणें शक्य आहे, परंतु ती कांहीं समाजांना मार्गदर्शक होऊं शकणार नाहीं ! नित्शे म्हणत असे, वे. शा. सं. मालथस भटजी म्हणजे कांहीं सृष्टि नव्हे, तें बरोबर आहे. एका गोष्टीची अशीं अनंत कारणें यालाच न्यायशास्त्रामध्यें पुष्कळ कारणरुपी हेत्वाभास म्हणतात. परंतु शास्त्रीयदृष्ट्या हीं सर्वच कारणें प्रधान असूं शकणार नाहींत. ' यामुळेंच श्रीकृष्णासारखा सांगणारा गुरु भेटला असूनदेखील अर्जुनाला मार्ग बरोबर उलगडेना, उलट मनाचा गोंधळ होऊन, ' ज्यायसी चेत्कर्मणः ते मता बुद्धिर्जनार्दन । तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ व्यामिश्रेणैव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे । तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ ' असें अगर ' यच्छ्रेयः स्यान्निचितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नं ॥' अशा तऱ्हेचे उद्गार काढावे लागले ! भगद्गीताकारालाही तशीच अडचण पडली. त्यांनाही असें म्हणावें लागलें कीं, ' किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः । '

हीं सर्व ध्येयें किंवा आज युरोपमध्यें नीतिशास्त्र म्हणून जी कांहीं गोष्ट चर्चिली जाते, ती दोन्ही प्रत्यक्ष आचार लावून देण्याच्या दृष्टीनें निरुपयोगी

१ महाभारत.

आहेत. नीतीचे नियम कोणत्या तरी तत्त्वज्ञानाशीं निगडित नसल्यास पांगळे पडतात ! मनुष्यानें नीतीनें वागावें हें सांगणें जितकें सोपें आहे, तितकेंच त्यानें नीतियुक्त कां रहावें हें सांगणें कठीण आहे. आज आपल्याकडे पहावें तर धर्म आणि नीति यांची फारकत करण्याकडे प्रवृत्ति वाढत चालली आहे. परंतु या दोन्ही तत्त्वांचीं कार्यें पूरक आहेत. धर्माचें कार्य नैतिक मूल्यें उत्पन्न करणें हें आहे, तर नीतीचें कार्य त्यांची प्रत्यक्ष अंमलबजावणी हें आहे. हेतू-शिवाय कार्याला महत्त्व नाहीं, त्याप्रमाणेंच प्रत्यक्ष आचाराशिवाय हेतूलाही फारशी किंमत नाहीं. आचारांतून इंद्रियांना नीतिप्रवण करण्याचें सामर्थ्य उत्पन्न होतें, तसें नुसत्या हेतूंवरून होत नाहीं. म्हणूनच समाजांत तरी प्रत्यक्ष दिसून येणारा आचार हाच प्रधान मानावयास पाहिजे. ती आचारांची नियमावली ठरविण्याचें कार्य नीतिशास्त्रावरील कोणत्या तरी ग्रंथांत केलेलें आढळतें काय ?

**११ नीति**

नीति शब्दाचा बरोबर अर्थ काय होतो हें पाहिल्यास, नीतिशास्त्र या नांवाखालीं जो एक पसारा आज युरोपमध्यें पसरला आहे, तो सगळा मुळाला सोडून वाढला आहे, ही गोष्ट तात्काळ लक्षांत येईल[1]. आमच्या मतानें नीति शब्दाचा अर्थ 'व्यक्तीनें आपल्याबाहेरील कोणत्या तरी शक्तीचें अंकित असावयाचें' असा आहे. व्यक्तीनें आपल्या कल्पना, वासना, भावना या सर्व आपणाबाहेरील दुसरी एखादी कोणती शक्ति असेल तिच्या दृष्टीनें गौण मानावयास पाहिजेत. परंतु निव्वळ बुद्धिप्रामाण्य— आज जें सर्व नीतिशास्त्राचा पाया होऊं पहात आहे —तें धरून बोलावयाचें तर कोणाही व्यक्तीनें बाहेरील शक्तीच्या अनुरोधानें आपल्या वर्तनाला नियंत्रण कां घालावें, याचें कारण सांगणें सोपें नाहीं असें मला वाटतें. कारणें सांगतां न आलीं म्हणजे त्या व्यक्तीच्या नैतिक प्रवृत्तीलाच शेवटीं कौल लावावा लागेल ! कोणाही व्यक्तीमध्यें नैतिक प्रवृत्तीची जर थोडीही वाढ झाली असेल तर त्या व्यक्तीपुढें बाहेरून नीतीचे पोवाडे गाण्याची जरूरीच पडणार नाहीं, आणि जर वाढ झालेली नसेल तर सर्व नैतिक कल्पनांची थट्टा आणि तिरस्कार हाच त्यांच्याकडून केला जाईल आणि अशा लोकांना तुम्ही चूक

१ See Mackenzie, Sedgwick, Green, Rashdall, Moore and Others.

आहांत हेंही दाखविणें शक्य नाहीं! नीतिप्रवर्तक,मानवी प्रवृत्तींचा आश्रय करून आपली बाजू मांडील, तर नीतिध्वंसकही त्याच मानवाच्या तद्विरुद्ध प्रवृत्तींचा आश्रय करील ! मग राग–द्वेष, क्षमा–सूड, स्वार्थ–स्वार्थत्याग इत्यादि ज्या परस्परविरूद्ध भावना एकाच व्यक्तीचे ठायीं स्थानभेदानें प्रतीत होतात, त्यांपैकीं अमकीचाच आश्रय कां करावा आणि तद्विरुद्ध प्रवृत्तीचा आश्रय कां करूं नये ? सर्व मानवीच प्रवृत्ती आहेत. समाजांच्या इतिहासाकडे पाहिलें तर, सत्प्रवृत्तींनींच समाजावर उपकार केलेले आहेत असें नव्हे. 'श्यामीकृत्याननेन्दूनरियुवतिदिशां संततैः शोकधूमैः । कामं मंत्रिद्रुमेभ्योनयपवनहृतं मोहभस्म प्रकीर्य । दग्धा संभ्रांत पौरद्विज गणसहितान् नंदवंश प्ररोहान् । दाह्याभावान्नखेदाज्ज्वलन इव वने शाम्यति क्रोध वन्हिः ॥' अथवा 'ते पश्यंतु तथैव संप्रति जना नंन्दं मया सान्वयं। सिंहेनेव गजेन्द्रमद्रिशिखरात् सिंहासनात्पातितं[१] ॥' अशा तऱ्हेच्या तीव्र द्वेषामुळेंच जगाला अर्थशास्त्रासारखा ग्रंथ प्राप्त झाला. कैकेयीनें केलेल्या सापत्नभावामुळेंच जगाला रामरावणयुद्ध आणि त्यामुळें रामायणकाव्य प्राप्त झालें[२]. इंग्लंडचा बादशाहा आठवा हेन्री आणि जर्मनींतील पाद्री मार्टिन ल्यूथर या दोघांचेंही स्त्रियांवर प्रेम बसल्यामुळेंच इंग्लंडला आणि युरोपला प्रॉटेस्टंट धर्म प्राप्त झाला. आम्ही अशीं वाटेल तितकीं उदाहरणें दाखवून देऊं कीं, जिला नीतिशास्त्रामध्यें वाईट प्रवृत्ति म्हणतां येईल– अशाच प्रवृत्तीनें जगावर अनंत उपकार केलेले आहेत. मग त्या प्रवृत्तींनाच अनिष्ट कां म्हणावें ? इतिहासाकडे पाहिलें तर ज्यांना सत्प्रवृत्ति म्हणतात, त्यांच्यामुळें व्यक्तीचें किंवा समाजाचें हित झालेलें आहे आणि होत राहील असें नक्की कोणी सांगू शकेल काय ? रजपूत राजांनीं मुसलमानांशीं केलेलें वर्तन आणि उलट मुसलमानांनीं त्यांच्याशीं केलेला दंगेखोरपणा[३], यांपैकीं नैतिकदृष्ट्या श्रेष्ठ कोणतें वर्तन ठरेल ही गोष्ट एकादें अज्ञान पोर देखील सांगेल ! असें पाहतां तुम्ही ज्यांना सत्प्रवृत्ति म्हणतां त्यांचें वैयक्तिक अगर सामाजिक फळ मिळेलच असें नाहीं; आणि ज्यांना कुप्रवृत्ति म्हणतां त्यांचें वैयक्तिक अगर सामाजिक फळ

१ मुद्राराक्षस-विशाखदत्त.
२ जानकीहरण-कुमारदास.
३ Annals and antiquities of Rajasthan by Col James Todd.

व्यक्तित्व आणि आपलें जीवित यांचा देखील होम करावा लागेल ! ‘ राष्ट्राकरितां मरावयास तयार व्हा ’ अशा तऱ्हेची आज ऐकूं येणारी आरोळी आणि ‘ न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेत् जीवितस्यापि हेतोः ।’ —‘ धर्माकरितां मरा ’—अशी पूर्वीं ऐकूं येणारी आरोळी यांच्यामध्यें नैतिक तत्त्व या दृष्टीनें पाहिलें तर काय फरक आहे ? देशाकरितां मरा म्हणून सांगणारे व धर्माकरितां मरा म्हणून सांगणारे, या दोघांनींही नैतिक तत्त्व एकच मानलें असल्याकारणानें त्यांची अधरोत्तर व्यक्ति त्यांच्या ध्येयाच्या स्वरूपावरूनच व्हावयाची ! मग राष्ट्र हें ध्येय, धर्म या ध्येयापेक्षां श्रेष्ठ ठरूं लागेल; पण ती गोष्ट शास्त्रीय पद्धतीनें विचार करणाराला ठरविणें अशक्य आहे, एवढेंच बजावून ठेवतों !

मानवी प्रवृत्तींचें नियमन करणारी ही जी बाह्य शक्ति ती बुद्धिगम्य असावी किंवा मीमांसकांनीं सांगितल्याप्रमाणें अतिमानुष (supra-rational) अलौकिक असावी हा प्रश्न उत्पन्न होतो. मनुष्यानें आपल्या बुद्धीचेच हुकूम पाळावयाचे असा नियम ठरल्यानंतर, त्यानें आपल्या वासना असंतुष्ट कां ठेवाव्या हें कोडें बुद्धि कांहीं त्याला उलगडून सांगूं शकत नाहीं ! पुन्हां बुद्धीचेही एकमेकांवर थर पडत गेले असल्यावर एकाच्या बुद्धीला जें गम्य तें दुसऱ्याच्या बुद्धीला अगम्य, अशीही पण भानगड उपस्थित होईल ! जीव निसर्गतः सुप्रवृत्त आहे आणि त्यामुळें बुद्धिमंताचें वर्तन नेहमीं हितकारकच होईल, ही गोष्ट जीवशास्त्र आणि इतिहास, या दोनही दृष्टींनीं असिद्ध ठरलेली आहे. जीवाची नैसर्गिक प्रवृत्ति, समाज वगैरे कांहीं न जाणतां स्वतःच्या वासनांची पूर्ती करणें एवढीच आहे आणि तिला बाहेरून आळा न घातल्यास ती वाढतच जाणार ! [१] न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ।’ हें मानसशास्त्रीय सत्य आहे आणि त्याची आधुनिक मानसशास्त्राच्या दृष्टीनें पुढें आम्ही चर्चा करणार आहोंत. आज चहूंकडे शास्त्रांची वाढ, प्रगति वगैरे ज्या शब्दांचा फार गवगवा होत चाललेला आहे, त्या शास्त्रांमध्यें आणि त्या प्रगतीमध्यें मानवाच्या वासनांचें नियमन करण्याचें सामर्थ्य नाहीं, असें आमचें निश्चित मत आहे ! आम्हांला तर सर्व तऱ्हेच्या वासनांची चहूंकडे

१ विष्णुपुराण, मनुस्मृती.

नाव आलेली स्थिति आहे आणि तीच 'सुधारणा' असें 'अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ।'[1] अशा स्थितींत असलेला मनुष्यप्राणी कंठरवानें सांगत आहे!' याच स्थितीला भगवद्गीताकारांनीं 'अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता । सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥' असें म्हटलेलें आहे.[2]

कांहीं लोक असें म्हणतात कीं, समाजरक्षण हा नैतिक तत्त्वांना पाया होऊं शकेल. आमच्यांतील सुप्रबुद्ध माणसें असे प्रश्न कसे उपस्थित करतात, याचें कारण आकळत नाहीं! समाजरक्षण हा देखील मनुष्याच्या अभि-रुचीचाच भाग होणार, त्याच्या अभिरुचीच्या नियंत्रणाचा मार्ग नव्हे ! या जगामध्ये कीर्तीच्या हेतूनें जिवाचें रान करणारे कांहीं लोक असू शक-तील ! मिल्टन म्हणतो,[3] 'शुद्ध अंतःकरणाला मोह पाडणारी एकच एक गोष्ट म्हणजे कीर्ति. ती उदात्त पुरुषांना सुख झुगारून देऊन दुःखमय जीवि-ताचा आश्रय करणें ही गोष्ट करावयास लावते.' बर्क म्हणतो,[4] 'कीर्ति ही अशी आहे कीं, तिच्याकरितां मनुष्य हा स्वतःचें देखील बलिदान करा-वयास तयार होईल.' रामदास म्हणतो.[5] 'मरावें परी कीर्तिरूपें उरावें' कोठें उरावें आणि कशाकरितां उरावें ? मनुष्य हा जर नश्वर आहे तर त्याची कीर्ति तरी सनातन आहे काय ? वेदांत्यांना कितीही हंसलें तरी त्यांनीं, काळाच्या कराल दाढांमध्यें सांपडलेलें स्वरूप किती अस्थिर आहे हें त्यांनीं मानवाला सांगावें हें बरें. किंचित्काल तरी काळाच्या अनंत अव-काशांत जगून रहाणें हें समष्टीला शक्य आहे, व्यष्टीला नव्हे ! हें जें वर कीर्तितत्त्व म्हणून सांगितलें, तें सर्वांना सुलभ नाहीं. ज्यांना आयुष्यामध्यें फारसें सुख अगर संपत्ति प्राप्त होत नाहीं, अशा कष्टजीवि व्यक्तीला जर भावी पिढ्यांकरितां, समाजाच्या हिताकरितां, तूं आपल्या आजच्या सुखा-कडे न पहातां कायाकष्ट करीत रहा, असा पोक्त उपदेश कोणी

१ भगवद्गीता.
२ भगवद्गीता.
३ Lycidas-Milton.
४ Reflections on the revolution in France, Burke.
५ मनाचे श्लोक.

पोक्त महात्मा करूं लागेल; तर मला तुमच्या पुढच्या पिढ्या, समाजहित वगैरे गोष्टी कांहीं कळत नाहींत आणि त्याकरितां मी आपलें आजचें सुख सोडावयास तयार नाहीं, असें सरळ उत्तर तो देईल ! 'भावी हिताकरतां आजचें सुख सोडा,' असें व्यक्तींना सांगून त्यांच्याकडून तें तत्त्व आचारांत उतरवून घ्यावयाचें असल्यास त्या व्यक्तीला असेंच कांहीं तत्त्व सांगावयास पाहिजे कीं, जें वादविवादाच्या आटोक्यांत येऊं शकत नाहीं ! तत्त्व सर्व-साधारण व्यक्तीला बुद्धिगम्य झाल्याबरोबर नैतिक मूल्यांना अस्थिरता प्राप्त होणार, ही गोष्ट निश्चित जाणावी. या नैतिक मूल्यांच्या अस्थिरतेचे परिणाम युरोपांत आर्थिकदृष्ट्या देखील जाणवूं लागले आहेत, असें कोठें कोठें वाचण्यांत आलें आहे ! म्हणून नैतिक तत्त्व जर वादविवादाच्या आटो-क्याच्या बाहेरचें नसेल आणि व्यक्तीचें तात्कालिक सुख आणि समाजाचें भावी हित यांमध्यें एक तऱ्हेचा झगडा उत्पन्न होईल तर, सर्वसाधारण व्यक्ति आपल्या सुखाकडेच लक्ष देईल ! समाजाच्या हिताकडे देणार नाहीं, ही गोष्ट नक्की जाणावी. त्याची खात्री पटवावयाची असल्यास त्याला अति-मानुष, अलौकिक, अचल आणि मनाचें समाधान करील असेंच फळ द्यावयास पाहिजे. तें फळ सत्य आहे किंवा असत्य आहे, हा प्रश्नच येथें उत्पन्न होत नाहीं. तें त्याच्या मनाचें समाधान करून त्याला हितकारक कर्म करावयास भाग पाडतें, एवढीच गोष्ट महत्वाची आहे. अलीकडे जो 'सत्य' हा शब्द चहूंकडे ऐकिवांत येतो तो उच्चारणाऱ्यांची त्याचें स्वरूप काढण्याची तयारी आहे किंवा नाहीं या बाबतींत आम्हांला जबर संशय आहे !

वरील कल्पना श्रमविभागाच्या तत्त्वाच्या दृष्टीनें पाहिल्यास जरा जास्त विशद होईल. समाजाचा गाडा हांकावयाचा तर समाजामध्यें अनंत खातीं असतात. या सर्व खात्यांचा कमीअधिक प्रमाणांत भौतिक सृष्टीशीं संबंध येतो. आजच्या सर्व सुधारणेचा मुख्य हेतु पाहिला तर या भौतिक शक्तींशी शक्य तेवढ्या रीतीनें प्रत्यक्ष संबंध टाळणें एवढाच असलेला दिसतो. पूर्वी ज्या गोष्टी मनुष्य हस्तादिकांनीं करीत असे, त्या सर्व तो आतां यंत्रांच्या सहाय्यानें करूं लागला आहे. याचा अर्थ एवढाच कीं, त्याच्या हस्तपा-दांचा प्रत्यक्ष संबंध सृष्ट पदार्थांशीं न येतां तो यंत्रांशीं येऊं लागला !

त्यास, त्यानें या सर्व गोष्टींची विवंचना कशी करावी ?

या तत्त्वज्ञानाला अगर समाजशास्त्रज्ञाला अगर कवीला रोजचीं उपजीविकेचीं साधनें मिळवून देण्याकरितां कांहीं माणसांनीं तरी त्याच्याकरितां काम करणें जरूर आहे. अशा तऱ्हेनें विचार केला तर, अशा तऱ्हेनें नियत असा वर्ग असणें हें हितकारक आणि निसर्गसृष्टींत दिसून[१] येणारें आहे. परंतु निसर्गसृष्टींशीं इतर बाबतींत आम्हीं वर सांगितल्याप्रमाणें जशी फारकत, तशी या बाबतींतही करून निव्वळ कल्पनांच्या जोरावर मनुष्यप्राणी समाजरचना करूं इच्छितो आणि अशा तऱ्हेचा कामकरी वर्ग असणें हें समाजाच्या उत्कर्षाचें लक्षण आहे, अपकर्षाचें नव्हे ही गोष्ट त्याच्या नजरेसमोरून दुरावूं लागते ! आज अशा तऱ्हेच्या वर्गवारीचा नाश करून, जी द्रव्योत्पादनाची आणि अर्थविभागणीची पद्धति[२] यापुढें सर्व तऱ्हेच्या समाजांनीं अवलंबावी म्हणून पुढें केलेली आहे, तीमध्यें आध्यात्मिक, बौद्धिक, तात्त्विक आणि नैतिक अशा तऱ्हेच्या शोधांना पोषक अशी स्थिति प्राप्त झाली आहे असें आमच्यानें म्हणवत नाहीं. या सर्व सुधारणांमध्यें हेतु असा आहे कीं, हीं जीं मनुष्याचें ध्यान, वेळ आणि शक्ति हीं तीन राखून ठेविलीं गेलीं, त्यांचा उपयोग विचार आणि मूल्य हें ठरविण्याकडे म्हणजे आत्मानात्म विचाराकडे केला जावा. प्रत्यक्ष जगाबद्दल मानवाला पुष्कळच ज्ञान झालेलें आहे, परंतु नैतिक[३] जगाचे ( work of value ) बाबतींत मनुष्य हा पूर्ण अज्ञानी आहे आणि कोणी जर ह्या नैतिक मूल्यांची भौतिक प्रक्रियेंत मांडणी करील त्या वेळीं आपणाला त्याचा बोध होतो ! म्हणून वस्तुगत सृष्टींतून खेंचून काढून मनुष्याचें मन नीतिगत सृष्टीकडे लावणें हाच सर्व सुधारणेचा हेतु असाययास पाहिजे तसा तो होत नाहीं. कारण, मानव हा बुद्धीच्या अनेक गुणांचे बाबतींत अजूनही अपूर्ण आहे आणि तो तसाच अपूर्ण रहाणार; त्या मानवाला नैतिक तत्त्वांची ओळख भौतिक प्रक्रियेंत करून देण्याचें कार्य तत्त्वज्ञानी, अगर शास्त्रज्ञ अगर महाकवि यांना करावयाचें

---

१ New evolution by Clarke.
२ Types of economic theory by Othmar Spann.
३ Meaning of life by C. E. M. Joad.

मान्य असेल आणि जें हिंदुस्थानांतील आर्यसंस्कृतीचें ध्येय आहे, त्यांना वर जो श्रेष्ठांचा वर्ग सांगितला त्या वर्गाचें समाजानें बिनतक्रार पोषण करावें हें मत मान्य होईल, असेंच प्राचीनांचें मत होतें. अर्वाचीनांचें मत ह्याच्या उलट आहे. अर्वाचीनांच्या मतानें "जे कोणी स्वप्रयत्नानें स्वतःचें पोषण करण्यास नालायक असतील ते समाज, कोणत्याही तऱ्हेचें कार्य करीत असोत अगर नसोत, त्यांना कांहींही भौतिक अगर नैतिक कार्य करण्याची लायकी असो अगर नसो, ते सामाजिक महत्त्वांत अगदींच खालच्या थरांत आहेत एवढ्याच फक्त कारणास्तव अशा द्विपादांस समाजानें पोसावयास पाहिजे." असें मत असणारे लोक महात्मे म्हणून मानले जातील. कारण समाजामध्यें आर्तांचाच जास्त भरणा असतो. परंतु अशा तत्त्वज्ञानाचे समाजावर आणि मानव वंशावर काय परिणाम होतात हें दररोज भेटणाऱ्या परमेश्वराकडून समजावून घेण्याचा कांहीं महात्मे प्रयत्न करीत नाहींत ! कर्त्या प्रजेनें उत्पन्न केलेलें द्रव्य आणि अर्थसामुग्री कराच्या रूपानें, वारसावरील करानें किंवा इतर कोणत्याही दृष्टीनें काढून घेऊन मानवी ऐक्य (solidarity of human race) वगैरे अर्थशून्य शब्दांच्या जोरावर, नाकर्त्या प्रजेमध्यें वाटल्यास त्याचें समाजावर अत्यंत घातुक परिणाम होतात. स्वतः नाकर्ती प्रजादेखील काय स्वरूपाची बनते, त्याचें वर्णन इंग्लंडमधील दाखला घेऊन व्हाईटहेड[१] यानें केलें आहे तें जिज्ञासूंनीं जरूर वाचावें. ती प्रजा तर बिघडतेच परंतु एक सामाजिक घटक या दृष्टीनें पहातांही त्याचे परिणाम चांगले होत नाहींत ! कर्त्या प्रजेपासून द्रव्य काढून घेतलें म्हणजे जीवनार्थ कलहांत त्याची जगण्याची शक्ति कमी होते आणि तोच पैसा नाकर्त्या प्रजेच्या हातांत पडून त्या प्रजेला आपली प्रजा वाढवितां येते ! आधुनिक काळीं ज्याला सुधारणा म्हणतात ती सुधारणा घडून येते खास ! अशा तऱ्हेनें ज्या राष्ट्रांत नाकर्त्या प्रजेची सारखी वाढ होत जाईल आणि कर्त्या प्रजेच्या संख्येला ओहोटी लागेल, तें राष्ट्र त्यामध्यें महात्मे निर्माण झाले तरीही काळाच्या उदरांत गडप होऊन जाईल ! नाकर्त्या प्रजेंतून कर्ती प्रजा निपजेल, अशा तऱ्हेची कल्पना मुसळाला अंकुर फुटण्याइतकीच शक्य आहे ! परंतु ती चर्चा पुढें करूं. सांगण्याच्या

१ Mending of Mankind by George Whitehead.

आणि तीं समजावून घेण्याची इच्छाही नाहीं. अतएव समाजरक्षण हें नीतिशास्त्राचा पाया होऊं शकत नाहीं.

जगांतील राजकीय, सामाजिक, धार्मिक कोणत्याही क्रांत्यांचा इतिहास पाहिला तरी हा मत्सरच त्यांच्या मुळाशीं असतो असें दिसून येईल. क्रांत्या

१२ क्रांत्यांचें स्वरूप

समाज कधींच करीत नसतो. त्या कांहीं थोड्याशा मत्सरानें ग्रासलेल्या व्यक्तींच्या हातून होत असतात. या दृष्टीनें ग्रंथ जाळून न टाकतां ग्रंथकारच जाळून टाकावे, असें मत एका सुप्रसिद्ध फ्रेंच लेखकानें दिलें आहे[१]. समाजांतून स्थानभ्रष्ट झालेल्या आणि मत्सरानें प्रेरित झालेल्या कांहीं व्यक्ति आपल्याला स्थान मिळेल अशा तऱ्हेचीं त्या समाजाचीं नैतिक मूल्यें बनविण्याची खटपट करतात. अर्थातच खटपटीमध्यें आपण कांहीं तरी हित करीत आहोंत म्हणून समाजाला सांगण्याकरितां कांहीं तरी एक तत्त्व पुढें करावें लागतें. बहुशः ज्याच्या जवळ कांहींच नसेल अगर ज्याला कांहीं मिळवावयाचें असेल, अशा मानव वर्गालाच ह्या गोष्टी पटतात आणि हा वर्ग बहुसंख्याक असल्याकारणानें, असंतुष्टाला या वर्गाचें पुढारीपण सहज मिळवितां येतें. यूरोपांत मुख्यतः भेद, सत्ता आणि अधिकार या बाबतींत असल्याकारणानें युरोपमध्यें सत्तेच्या मत्सरानें सत्तावानाला धुळीस मिळविण्याचा प्रयत्न केला गेला. या प्रयत्नांपासून ऐहिक अगर पारलौकिक फायदा असो अगर नसो, पुष्कळ वेळां असे प्रयत्न निव्वळ मोडतोड करण्याच्या मानवी इच्छेनेंच फक्त प्रेरित झालेले असतात. पारलौकिक फायदा प्रत्यक्ष मरणांतीं सिद्ध करणें कोणालाच शक्य नसल्यानें, कोणत्याही समाजाचा नाश करूं इच्छिणारी व्यक्ति नेहमीं धर्माची सुधारणा करण्याची घोषणा करते. म्हणून धर्मसुधारकांइतका समाजाचा भयंकर शत्रु दुसरा कोणीच नाहीं.

पूर्वीच्या पेगन धर्माला अनुसरणारे लोक नरकांत जात होते आणि त्यानंतर आलेले खिस्ताचे अनुयायी स्वर्गालाच जातात, अशापैकीं भाग थोडाच आहे ! परंतु श्रेष्ठांचें ऐश्वर्य नष्ट करून त्यांना हतप्रभ करण्याचे प्रयत्न खिस्तानें केले. त्याच्याशीं देव बोलत असे, इतकेंच नव्हे तर तो देवाचा

---

१ Ninety-three by Victor Hugo.

पुत्र होता असें म्हणत. या देवाचा पुत्र जर सर्वांचें तारण करण्याकरितां या पृथ्वीवर अवतीर्ण झाला होता तर, समाजांतील कोणत्याही एका वर्गाबद्दल तो मत्सरानें कां बोलला[१]? माझ्यावर विश्वास ठेवणाऱ्या लीनांचा (little ones) जो कोणी अपराध करील, त्यांच्या गळ्याभोंवतीं दगड बांधून त्यांना समुद्रांत बुडविणेंच बरें. काय सुंदर गोष्ट! याच्याहून जास्त मत्सराचीं उदाहरणें जगांत फारच थोडीं सांपडतील! जें पूर्वी ख्रिस्तानें केलें तेंच पुढें मार्टिन ल्यूथर आणि आठवा हेन्री यांनीं केलें! जुन्या धर्मांत राहून दोघांनाही चालका करावयाच्या होत्या. एकाला तो भटजी असल्यामुळें लग्न करतां येत नव्हतें आणि दुसऱ्याला जुन्या धर्मांत राहून घटस्फोट मिळत नव्हता. दोघांनीही तावडतोब परमेश्वराकडे वशिला लावून हजार पंधराशें वर्षें ज्या कॅथॉलिक धर्मानें युरोपियन समाजाचें रक्षण केलें, जो अजूनही प्रबळ आहे, ज्याच्या कर्तबगारीबद्दलची साक्ष सर्व धर्मांचा कट्टा शत्रु जो अगुस्त कोंत यानें देऊन ठेविली आहे, तो धर्म चूक आहे असें तावडतोब ठरवून टाकलें, आणि अशा तऱ्हेनें ख्रिस्ती धर्माच्या पोटांत अंतःकलहाचें बीज पेरलें! परंतु रोमन कॅथॉलिकांपेक्षां प्रॉटेस्टंट लोक स्वर्गाला जास्त प्रमाणांत जातात ही गोष्ट रे. डीन इंगप्रभृति प्रॉटेस्टंट धर्मानुयायी सिद्ध करूं शकतील काय? खरी गोष्ट अशी आहे कीं, स्वर्गाची लालूच आणि नरकाची भीति दाखविली म्हणजे समाज आपणाकडे सहज वळवितां येतो ही गोष्ट या धुरीणांना नक्की ठाऊक असते! जगांतील कोठल्या धर्माबद्दल पाहिलें तर त्याची सुरुवात अशीच झालेली दिसेल. शाक्य गौतमानें आपली नवीन धर्मस्थापना ब्राह्मणजातीच्या वर्चस्वाच्या मत्सरानें केली, ही गोष्ट आतां निःपक्षपाती इतिहासकार नाकबूल करीत नाहींत[२]! प्रत्येक ठिकाणीं जिला क्रांति म्हणून म्हणतात, तेथें हेंच तत्त्व असलेलें दिसून येईल. पूर्वीच्या स्थितीचे कैवारी ज्याप्रमाणें त्या स्थितीला पोषक असें तत्त्वज्ञान सांगत असतात, त्याप्रमाणें नवीन तत्त्ववेत्ते नवीन स्थितीला पोषक असें तत्त्वज्ञान सांगूं लागतात! परंतु या तुलनेकरितां घेतलेल्या दोन अवस्थांपैकीं अमकीच श्रेष्ठ का, हें त्या त्या पंथाच्या विशिष्ट असें तत्त्वज्ञान गृहीत धरल्या-

१ Mark 9. 42.

२ Aryan rule in India by E. Havell.

शिवाय सांगणें शक्य नाहीं. असो. धार्मिक क्षेत्रांत आम्हांला हवें तेवढें लिहितां येईल परंतु हिंदुस्थान देशांत तसें लिहिणें हितकारक होणार नाहीं!

राजकीय क्षेत्रांत पाहिलें तर, इंग्लंड देशाचा सर्व इतिहासच या मत्सराचा एक अतिशय ठळक दाखला आहे! प्रथमतः त्या बेटामध्यें एकराट् सत्ता होती. त्या राजाच्या खालोखाल असलेला जो सरदारवर्ग त्या सरदारवर्गाचे मनांत राजाच्या सत्तेबद्दल मत्सर उत्पन्न होऊन त्यानें राजाला थोडीशी सत्ता आपणाकडे देणें सैन्याच्या जोरावर भाग पाडलें. या सरदारांच्या मनांत राजसत्तेबद्दल मत्सर आणि समाजरक्षणाची कळकळ यांपैकीं मुख्यतः कोणती गोष्ट वसत होती, हें ठरविण्याला कांहीं तत्त्वज्ञानाचा आश्रय करावयास नको. पुढें हळूहळू तशीच अधोगती होत होत आज सत्तेचा गुरुत्वमध्य हलक्या लोकांमध्यें येऊन राहिला आहे! यांपैकीं प्रत्येक स्थितीचें समर्थन करणारे अर्थशास्त्रज्ञ, कायदेपंडित, तत्त्ववेत्ते वगैरे होऊन गेले आहेत. या प्रत्येकाच्या म्हणण्यांत कांहीं तरी सत्यांश सांपडणारच! एकराट्–सत्तेचें समर्थन करणारे तत्त्ववेत्ते होऊन गेले, त्याचप्रमाणें आज प्रजासत्ताक राज्यपद्धति, समाजसत्तावाद वगैरे वेगवेगळ्या खुळांचें समर्थन करणारेही अर्थशास्त्रज्ञ आणि तत्त्ववेत्ते आहेतच. परंतु या वेगवेगळ्या स्थितीची अधरोत्तर व्यक्ति कांहीं प्रत्यक्ष पुरावा देऊन दाखविणें शक्य नाहीं!

फ्रान्समध्यें झालेली क्रांति अखिल मानवांचें कल्याण करण्याकरितां आणि प्रत्येक व्यक्तीला हक्क मिळवून देण्याकरितां होऊन गेली असें म्हणतात; त्याप्रमाणेंच आज रशियांत चाललेले प्रकार सर्व मानवांच्या हिताचे आहेत, असें भासविलें जातें. परंतु या सर्वांच्या मुळाशीं केवढा जबरदस्त मत्सर आहे, ही गोष्ट कोणाच्याही फारशी लक्षांत येत नाहीं. द्रव्य हाच देव, द्रव्य मिळविणें हीच नीति, द्रव्यांत जगांतील सर्व कांहीं गोष्टी येतात अशा तऱ्हेची नीति समाजांत पसरूं लागल्यास तिला विरोध करणारे दोनच वर्ग समाजांत असतात. पैकीं एक परलोकाला मोठेपणा देऊन इहलोकींच्या आर्थिक स्पर्धेनें होणाऱ्या वाईट परिणामाला आळा घालणारा धर्माध्यक्षांचा वर्ग; त्यांच्या नैतिक मूल्यांमध्यें द्रव्यसाधनाला बरीच खालची जागा दिलेली असते. कारण, त्यांच्या मतें द्रव्यार्जनाची प्रवृत्ति मनुष्यप्राण्यांत निसर्गतःच आहे आणि तेंच ध्येय सर्वथा ठेवल्यास मनाची जी अधोगति होईल, तीपासून मान-

सिद्धांतामध्यें इतक्या पुष्कळ गोष्टी गृहीत धरलेल्या आहेत कीं, या कल्पनेचा सांगोपांग परामर्ष घ्यावयाचा म्हणजे तत्त्वज्ञानावर एक ग्रंथच लिहावा लागेल ! पहिलें गृहीत कृत्य असें आहे कीं, आज शास्त्र या नांवानें जो ज्ञानसमुच्चय ओळखला जातो, त्याला या सृष्टीचा बोध झाला; त्यानें या सृष्टीचें काढलेलें चित्र यथातथ्य आहे म्हणून त्याला या सृष्टींतील यच्चयावत स्थितींना हितकर वळण लावून देण्याचा अधिकार आहे. तो आहे किंवा नाहीं हें पहावयाचें तर, ज्ञानाचा विषय तरी काय असतो हें थोडक्यांत पहावयास पाहिजे.

आपण ज्यावेळीं 'जाणणें' हा शब्द उच्चारतों त्यावेळीं जाणणारी शक्ति आणि जाणण्याची वस्तु हीं एकमेकांपासून भिन्न आहेत असेंच मानीत असतों.

**१३ विचार-कर्तृक जगत्**

जोंपर्यंत आपण इंद्रियार्थी बोलत असूं, तोंपर्यंत ही गोष्ट सहज लक्षांत येऊं शकेल. पहाणारा डोळा आणि पुढें असलेली वस्तु हीं दोन भिन्न आहेत; ऐकणारे कान आणि ऐकलेलें गाणें हीं भिन्न आहेत. ह्या गोष्टी सर्वसाधारणतः पटण्यासारख्या आहेत. परंतु ज्यावेळीं आपण विचार करण्याच्या प्रक्रियेचा विचार करूं लागतों त्यावेळीं ही गोष्ट तितकीशी स्पष्ट होत नाहीं. समजा कीं, सर्व इंद्रियविषयांपासून मन परावृत्त करून डोळे मिटून आपण विचार करावयास बसलों; समजा, आपण शिवाजीमहाराज अगर गौतमबुद्ध यांच्याबद्दल विचार करीत आहों. येथें आपण कशाचा विचार करीत आहों ? हे दोघेही कांहीं प्रत्यक्ष वस्तु नाहींत ! कारण या दोघांचाही भौतिक देह या जगांतून केव्हांच नष्ट होऊन गेलेला आहे! ज्या परिमाणूंचे ते पिंड झालेले होते ते परिमाणु अर्थातच सृष्टीमध्यें परिमाणुरूपानें असतील, परंतु या परिमाणूंबद्दल कांहीं आपण विचार करीत नाहीं ! शिवाजीमहाराजांच्या अगर गौतमबुद्धाच्याबद्दलचा विचार म्हणजे कशा तरी बद्दलचा विचार खास असला पाहिजे, ही गोष्ट सत्य आहे. कारण जें कांहींच नाहीं, त्याबद्दल विचारच करतां येणार नाहीं ! शिवाजीमहाराजांच्याबद्दलचा विचार अर्थातच औरंगझेबाबद्दलच्या विचारापासून भिन्न असावयास पाहिजे आणि गौतमाबद्दलचा विचार हा शंकराबद्दलच्या विचाराहून भिन्न असणारच ! म्हणून या व्यक्तींबद्दलच्या विचारांत

केलीं असतात. ही प्रणाली मुख्यतः बर्कलेच्या तत्त्वज्ञानानुसारी आहे. न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणादि तत्त्वज्ञानानें या प्रणालीला फारच जोराची पुष्टि मिळाली आहे. परंतु आम्हीं वर दाखविल्याप्रमाणें मनुष्याच्या विचारसृष्टींतील जगत् या तीन मापनांच्या क्षेत्रांत मुळींच येऊं शकत नाहीं, ही गोष्ट आईनस्टाईनसारख्या तत्त्ववेत्त्यांना देखील मान्य आहे. शास्त्रानें —म्हणजे भौतिक शास्त्रानें— मनुष्यप्राण्यावर जे उपकार केलेले आहेत, त्याची चर्चा आम्हीं पूर्वी केलेलीच आहे आणि ते उपकार आम्हांला सर्वथा मान्य आहेत. परंतु आपलें वस्तुविचाराचें क्षेत्र टाकून देऊन विचारसृष्टीच्या क्षेत्रांत त्यांनीं लुडबूड कां करावी तें आम्हाला कळत नाहीं! नीति ही वस्तुविचारक्षेत्रांतील नसून विचारप्रणीत जगतांतील आहे. म्हणून शास्त्रें जेव्हां नैतिक बाबतींतही बोलण्याचा आव घालूं लागतात त्यावेळीं, त्यांच्या अधिकाराबद्दल जास्त खोल पहाणें जरूर होऊन बसतें. दुसरी गोष्ट अशी कीं, शास्त्रांना कोणत्याही गोष्टीचें कारण कळत नाहीं आणि शास्त्रें तें कारण शोधून काढण्याची भानगडही करीत नाहींत. शास्त्राचें मुख्य मूलतत्त्व म्हणजे अनुभवाचें त्रिकालाबाधित यौगपद्य ( co-existence ) सिद्ध करावयाचें इतकेंच. म्हणजे असुक एक गोष्ट आपल्या नजरेस आल्यास, त्या स्थितीचा अमूक एक परिणाम होईल इतकेंच. तो परिणाम असाच कां व्हावा हें सांगण्याला शास्त्रें समर्थ नाहींत आणि तें त्यांचें कामही नाहीं !

परंतु शास्त्रेंही अतिशय धूर्त असतात ! आपणांला कळत नाहींत अशा गोष्टी जगांत आहेत अशा तऱ्हेचा कबुलीजबाब सर्वसाधारण मनुष्यप्राण्यापुढें देणें ही गोष्ट त्यांना कमीपणाची वाटते ! तरी देखील आपण निव्वळ सत्याच्या प्रेमानें प्रेरित झालों आहोंत, ही गोष्ट तीं पुनः पुनः बजावून सांगतच असतात ! आपलें अज्ञान तीं वेगवेगळ्या शक्तींना वेगवेगळीं नांवें देऊन झांकण्याचा प्रयत्न करतात ! नांव दिल्यानें एकाद्या शक्तीचें वास्तव स्वरूप आपणांला समजलें असाही पण आपला भोळा समज करून घेतात. उदाहरणार्थ, सर्व वस्तू पृथ्वीकडे ओढल्या गेल्यासारख्या दिसतात याचें कारण काय असा प्रश्न विचारल्याबरोबर, शाळा कॉलेजांतून सर्वज्ञ ठरणाऱ्या पोटभरू शिक्षकांपासून तों तहत सर ऑलिव्हर लॉज, आईनस्टाईन पर्यंत सर्व लोक उत्तर देतील कीं, गुरुत्वाकर्षणाचा नियम ! किती समा-

घानकारक उत्तर हें ! अरे सद्गृहस्था ! गुरुत्वाकर्षणाचा नियम म्हणजे तरी काय ? तूं सांगितलेंस तें त्या शक्तीचें कार्य झालें, त्या शक्तीचें स्वरूप नव्हे ! कार्यकारणभाव याला म्हणत नाहींत. कारणापासून कार्य व्हावयाचें म्हणजे त्यामध्यें कांहीं तरी निश्चित फरक व्हावा लागतो. जें पूर्वी होतें तेंच स्पष्ट करून सांगणें म्हणजे कार्यकारणभाव सांगणें नव्हे ! सृष्टींतील कार्यकारणभावासंबंधींच जेथें संशयास्पद[१] स्थिति उत्पन्न झाली आहे, तेथें कार्यकारणभाव तरी कसा सांपडणार ? अशा तऱ्हेनें शास्त्रें हीं दिक्कालांनीं बांधलीं असल्यामुळें व सृष्टीची व्यवस्था दिक्कालाद्यनवच्छिन्न असल्यामुळें, असलेली स्थिति विशद करण्यापलीकडे जाऊन सृष्टीचें कारणस्वरूप सांगण्याची शास्त्रांची हिंमत नाहीं, ही गोष्ट शास्त्राच्या अभिमान्यांनीं विसरूं नये. जे कोणते समाज निव्वळ विचारकृत जगताच्या नियमांवर समाजांची उभारणी करतील अथवा जे कोणते समाज निव्वळ शास्त्रानें जाणलेल्या जगतावर समाजाची उभारणी करतील, ते दोन्हीही विनाशीच होणार ! म्हणून शास्त्रीय जगत् आणि आध्यात्मिक जगत् या दोन्हींच्या समप्रमाणांतच समाजरचना उत्पन्न झाली पाहिजे. आम्हीही शास्त्रांचे अभिमानी आहोंत. परंतु शास्त्रें देखील आपल्याच अधिकाराचा अतिक्रम करूं लागल्यास त्यांचा मुलाजा ठेवतां कामा नये ! शास्त्रें सहसा आपल्या अधिकाराचा अतिक्रम करीत नाहींत, परंतु शास्त्रज्ञ मात्र त्यांच्या आधारावर वाटेल तीं असिद्ध अनुमानें काढतात !

शास्त्रें म्हणतात कीं, मनुष्याच्या नैतिक, बौद्धिक, आध्यात्मिक वगैरे सर्व तऱ्हेच्या हालचालींना नियंत्रण लावण्याचा आणि त्यांचें समाधान करण्याचा अधिकार आमचा आहे. त्यांपैकीं वासनांचें समाधान करण्याला शास्त्रें किती प्रमाणापर्यंत समर्थ होऊं शकतात, याचें दिग्दर्शन आम्हीं पूर्वीं केलेलेंच आहे. तें येथें थोड्या विस्तारानें दाखवूं. आमचें म्हणणें असें आहे कीं, समाजावर नियंत्रणरूप अधिकार गाजविणारी जी शक्ति असेल त्या शक्तीचा समाजांतील बहुसंख्य लोकांच्या तरी मनावर तावा असावयास पाहिजे तर तेथें संघशक्ति उत्पन्न होईल. फक्त व्यावहारिक नव्हे, तर बौद्धिक आणि तद्द्वारां मानसिक आणि आध्यात्मिक क्षेत्रांत देखील मानवी

१ Mysterious universe by Sir James Jeans.

मनाचें कांहीं मर्यादेपर्यंत समाधान करण्याचें सामर्थ्य शास्त्रांमध्यें आहे, यांत कांहीं शंका नाहीं. मनुष्याच्या अंतःकरणांत ज्या अनंत खळबळी चाललेल्या असतात, त्यामुळें मनुष्यमनुष्यांमध्यें मतैक्याचे ठिकाणीं मतभिन्नता उत्पन्न होते. एकाच वस्तूबद्दल दोन मतें प्रतीत होऊं लागलीं म्हणजे मनुष्य कार्यकारणपरंपरा शोधून काढण्याच्या उद्योगाला लागतो! ज्या गोष्टी पूर्वीं गूढ होत्या त्या आतां हळूहळू त्याच्या डोळ्यांपुढें विशद होऊं लागतात. या प्रयत्नाचा परिणाम म्हणजे सृष्टींतील नवीं नवीं रहस्यें उलगडूं लागतात. अशा तऱ्हेनें मानवी बुद्धीला काम लावून देण्याचें आणि मानवी मनाचें समाधान करण्याचें सामर्थ्य शास्त्रांमध्यें आहे असें दिसतें. परंतु जसजशीं जास्त रहस्यें उमगूं लागतात, तसतसें सृष्टीचें रहस्य उलगडणें हेंच त्याचें ध्येय होऊन बसतें! मग कांहीं लोक ह्या जगाचें कोडें सुटण्याच्या मार्गावर आहे, कांहीं तें आपणांला सुटलें आहे, अशाही गोष्टी सांगण्यास सुरुवात करतात[१]! (१) जसजसा शास्त्रज्ञ सृष्टीच्या नियमांचें रहस्य उकलून घेण्याचे बाबतींत जास्ती प्रगति करतो, तसतशी त्याच्या स्वतःच्या अंतःकरणांतील बौद्धिक पूर्वपरंपरा नष्ट होऊं लागते! मग अंतःकरणामध्यें आणि सृष्टीमध्यें कार्यकारणभाव ( law of causation )आहे अशी जी काल भावना होती ती आज नष्ट होते! परंतु कार्यकारणभाव बाह्य जगांत आहे किंवा नाहीं, हें सिद्ध किंवा असिद्ध करण्याचें साधन आपणांजवळ मुळींच नाहीं[२]! (२) एकाच मनुष्याच्या अंतःकरणांत असें द्वैविध्य उत्पन्न झाल्यास, त्या अंतःकरणाची काय स्थिति होणार? धर्म, भाषा, शास्त्रज्ञानाची प्रगति या बाबतींत तर श्रद्धेशिवाय एक पाऊल पुढें टाकणें शक्य नाहीं; शास्त्राचे बाबतींत श्रद्धेची काय जरूरी? असें कांहीं लोक विचारतात. तर आम्हांस कांहीं तें सांगतां येणार नाहीं. परंतु पदार्थविज्ञानशास्त्राचा एक अत्यंत मोठा अधिकारी मनुष्य मॅक्स प्लँक हा, 'श्रद्धा पाहिजे' असें म्हणतो एवढी गोष्ट येथें नमूद करतों. ज्ञानाचा आणि श्रद्धेचा हा संबंध पूर्वीच्या तत्त्वज्ञान्यांना देखील माहीत होता. भगवद्गीता म्हणते, 'श्रद्धावान् लभते ज्ञानं' श्रद्धेनें युक्त असा मनुष्य विचार करूं

---

१ Riddle of the universe by Ernest Haeckel.

२ Where is science going by Max Plank.

लागला म्हणजे अर्थातच बौद्धिक वाढ आणि त्याबरोबर भावना आणि वासना यांचीही वाढ होते. म्हणून शास्त्रें बुद्धीची आणि भावनांची वाढ करूं शकतात, ही गोष्ट सहज सिद्ध होण्यासारखी आहे. परंतु त्यामुळें मानवी भावना आणि वासना यांचें नियंत्रण करण्याचा भौतिक शास्त्रांचा हक्क मुळींच सिद्ध होत नाहीं !

याचें पहिलें कारण, मानवी वासनांचा अतृप्त रहाणें हाच तर मुख्य गुणधर्म आहे ! ही गोष्ट प्राचीनांना आणि अर्वाचीनांना मान्य आहे. विष्णुपुराणामध्यें ययाति राजा म्हणतो, 'न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्णवर्त्मे व भूय एवाभिवर्धते ' मानवाच्या प्रधान वासनांचें स्वरूप 'अतृप्त रहाणें' हेंच आहे, ही गोष्ट कोणत्याही शास्त्राच्या अनुरोधानें सहज सिद्ध होण्यासारखी आहे ! पुत्रेषणा, दारैषणा, वित्तेषणा या तीहींच्या तडाक्यांतून सुटलेला प्राणी विरळाच आणि आधुनिक युरोपच्या संस्कृतींत तर नाहींच नाहीं ! कामवासना दुष्पूर आहे, ही गोष्ट ए. ए. रॉबक[१] यानें कबूल केली आहे आणि त्याच्या ह्या मताला डॉ. सिग्मंड फ्राईड याचा दुजोरा आहे !

शास्त्र मानवी वासनांची कांहीं प्रमाणापर्यंत तृप्ती करूं शकेल. परंतु एका वासनेच्या उपभोगाची पूर्ती ही पुढील वासनेचा पाया होत असल्या-कारणानें, आम्ही गणितशास्त्रांत म्हणतों त्याप्रमाणें ही प्रवृत्ति अनंताकडे जाऊं लागते ( tends to infinity ). याचें द्रव्येषणेचे बाबतींत एका सुभाषितकारानें फार सुंदर वर्णन केलेलें आहे. 'निःस्वो वष्टि शतं शती दशशतं लक्षं सहस्राधिपः । लक्षेशः क्षितिपालतां क्षितिपतिः चक्रेशतां वांछति चक्रेशः पुनरिंद्रतां सुरपतिर्ब्राह्मं पदं वांछति । ब्रह्मा शैवपदं शिवो हरिपदं आशावधिं को गतः ॥ ' शास्त्रानें वासनांच्या पूर्तीचीं साधनें ज्या प्रमाणांत वाढत जातील, त्याच्यापेक्षां फारच जास्त प्रमाणांत वासनांची वाढ होईल. ( मनोरथानां अगतिर्न विद्यते । ) सर्व वासनांचा उपभोग घेऊन देखील अंतःकरणाची स्थिति अतृप्त राहील आणि जग दुःखमय आहे असें मानण्या-कडे प्रवृत्ति होईल (Pessimistic conclusion). अशा तऱ्हेचा असंतोष-वाद उत्पन्न झाला म्हणजे नैतिकदृष्ट्या आपण जेथून निघालों त्याच

१ Sex in civilization, Page 257.

ठिकाणीं पुन्हां आहेंत, ही गोष्ट त्याच्या नजरेस आल्याशिवाय राहणार नाहीं. मग या सर्व जीविताचा, सर्व खटाटोपाचा हेतु तरी काय हें कळणें बरेंच कठीण पडेल. अशा तऱ्हेचा प्रश्न प्रत्येक विचारी मनुष्यापुढें केव्हां तरी आल्याशिवाय राहणार नाहीं. शेले कवीनें[१] म्हटल्याप्रमाणें, ‘What are we and whence are we, of what scene, the actors or spectators’ आपण कोण आहों ? कोठून आलों ? आपण या जगत्-रुपी चित्रपटावर स्वतः काम करणारे नट आहोंत कीं, नाटक पाहणारे प्रेक्षक आहोंत ? तोच प्रश्न भगवान् श्रीशंकराचार्यांनीं अगदीं याच शब्दांत पुढें मांडलेला आहे, ‘का तव कांता कस्ते पुत्रः संसारोऽयमतीव विचित्रः । कस्य त्वं वा कुत आयातः तत्त्वं चिन्तय तदिदं भ्रातः[२]’ (२) भगवद्गीताकारदेखील ‘अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत । अव्यक्त निधनान्येव तत्र का परिदेवना ।’ या शब्दांनीं हा बिकट प्रश्न अर्धाच सोडतात ! सर ऑलिव्हर लॉज म्हणतो, ‘जीवसृष्टीचें कोडें आजच्या स्थितींत शास्त्रांना सोडविणें शक्य नाहीं.’ शास्त्रज्ञ या प्रश्नांना उत्तर देतांना दिसत नाहींत. अर्थात् शास्त्रांच्या पूर्वपरंपरागत पद्धतीला धरून शास्त्रज्ञ औद्धत्यानें उत्तर देईल कीं, व्यक्तीला ज्या शंका येतात त्या शंकाच नव्हेत ! कारण, शास्त्रांत नसलेली गोष्ट अस्तित्वांत असणें शक्यच नाहीं ! व्यक्तीनें जीविताच्या मागचा हेतु शोधण्याचें कारणच नाहीं ! आमचें म्हणणें असें कीं, हें उत्तर ‘शेषं कोपेन पूरयेत्’ अशा स्वरूपाचें आहे. अशा उत्तरानें ऐकणारा फार तर गप्प बसेल, परंतु हें त्याच्या मनाचें समाधान नव्हे ! परमेश्वरानें सृष्टि उत्पन्न केली असें पूर्वी लोक सांगत, परंतु त्यांच्या ठिकाणीं शास्त्र आतां उत्क्रांतिवाद सांगूं लागलें. परंतु उत्क्रांति म्हटल्यानें आयुष्याचें कोडें सुटतें काय ? सर्व जगाचा नियंता परमेश्वर आहे असें म्हणणाराला, परमेश्वराचें आराधन हें ध्येय होऊं शकतें ! परंतु उत्क्रांति मानणाराला स्वतःशिवाय कांहीं ध्येय राहूं शकतच नाहीं ! या जीवाचा अंतिम हेतु तरी काय ? त्यानें सुखदुःखें कां सोसावीं ? त्यानें कार्याकार्यांचा विचार कां करावा ? सर्वच उत्क्रांति असल्या-मुळें पुण्य आणि पाप या शब्दांना अर्थ तरी काय ? पुण्यकृत्याला शुभ

---

१ Adonais by Shelley.

२ मोहमुद्गर.

खरी, तर, ती कबूल करून त्याच्यापुढें श्रद्धेचें क्षेत्र आहे ही गोष्ट कबूल करणें बरें असें आम्हांला वाटतें. 'अचिंत्याः खलु ये भावाः न तान् तर्केण चिंतयेत् ।' असें प्राचीनांचें मत आहे. परंतु प्राचीनांचें मत नवीनांना रुचणार नाहीं. म्हणून आधुनिकांपैकीं दोघां शास्त्रज्ञाग्रणींचीं मतें पुढें देतों. प्रत्यक्ष शास्त्रांचें मूलतत्व असें आहे कीं, बाह्य जगाच्या ज्ञानाला पंचेंद्रियांना होणाऱ्या संवेदना यांपेक्षां दुसरा मार्ग नाहीं, या मतांतून दोन सिद्धांत प्रतीत होतात. १ आपण जाणो अगर न जाणो आपल्या ज्ञानाच्या बाबतींत निरपेक्ष असें बाह्य जगत् सत्य आहे. २ बाह्य जगत् हें स्वरूपतः समजण्यासारखें अगर जाणण्यासारखें नाहीं. या दोन सिद्धांतांत थोडासा विरोध आहे. त्यामुळें मनुष्याच्या इतर शास्त्रांतील ज्ञानाप्रमाणें भौतिक शास्त्राच्या ज्ञानालाही आध्यात्मिकत्वाचा थोडासा दर्प येतो ! सृष्टी-मध्यें असणाऱ्या वस्तूंचें पूर्ण ज्ञान मनुष्याला कोणत्याही शास्त्राचे मदतीनें होणें शक्य नाहीं. याचा अर्थ असा कीं, जीं सृष्टीचीं रहस्यें उल-गडणें हें शास्त्रांचें कर्तव्य आहे तीं रहस्यें, भौतिक शास्त्रांना कधींही पूर्ण-त्वानें उलगडतां येणार नाहींत ! आधुनिक भौतिक शास्त्रांच्या वाढीकडे पाहिलें तर एका रहस्याचें उत्तर हें दुसऱ्या रहस्याची सुरवात होऊन बसतें! एका टेकडीवर आरोहण केल्यावरोबर पुढें दुसरें शिखर प्रतीत होऊं लागतें ! पंचेंद्रियांपासून होणाऱ्या ज्ञानाचें वर्णन करणें हेंच भौतिक शास्त्राचें ध्येय आहे असें सांगून, आपणांला हा मुद्दा उडवून देतां येणार नाहीं. शास्त्रांचें ध्येय यापेक्षां वरेंच उच्च आहे. तें ध्येय घेऊन शास्त्रें त्याच्या मागें धांवत आहेत, परंतु ध्येयसिद्धि होणें शक्य दिसत नाहीं. म्हणून आम्ही म्हणतों कीं, तें ध्येय कांहीं तरी आध्यात्मिक आहे आणि तें मानवाला प्राप्त होणें, म्हणजे शास्त्रांच्या मदतीनें प्राप्त होणें शक्य नाहीं.[१] हें मत जगांत जे चारदोन मोठे पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ते आहेत त्यांपैकीं एकाचें मत सांगितलें. आतां डार्विनच्या काळानंतर होऊन गेलेला एक मोठा प्राणीशास्त्रज्ञ आगुस्त वेझमान याचें मत सांगतों, 'जर आपण सत्याचा निर्भयपणें शोध करावयास निघालों तर मानवी बुद्धीच्या घटनेच्या दुबळेपणानें आपणांला आज काय किंवा पुढें काय मानवी ज्ञान अमर्याद नाहीं याच सिद्धांताला यावें लागेल !'

---

१ Where is science going by Max Plank.

ही ज्ञानाची मर्यादा पोहोंचली म्हणजे पुढील क्षेत्र श्रद्धेचें आहे. ही श्रद्धा ज्या स्वरूपाची असेल, ती तऱ्हा समाजांत प्रतिबिंबित झालेली दिसेल. या संबंधीं गटेनें फॉस्टमध्यें सृष्टीच्या तोंडांत पुढील शब्द घातलेले आहेत, 'तूं ज्या तऱ्हेची कल्पना करशील तशी मी तुला दिसेन.' मनुष्यानें या वाक्याचा जप करीत बसावें ! तरी देखील कोणता तरी धर्म, कोणती तरी नैतिक पद्धति या दोन गोष्टींची समाजाला आवश्यकता रहाणारच. हें सर्व भगवद्गीताकारांनीं, 'श्रद्धामयोऽयं पुरुषः यो यच्छ्रद्धः स एव सः।' या एकाच वाक्यांत घातलें आहे. पुढें तोच ग्रंथकार म्हणतो, 'नीतीचे नियम बदलावयाचे म्हटल्यास जागतिक नियमांच्या कार्यकारणभावाची आपणांस खरोखर माहिती झाली आहे असें सिद्ध करावयास पाहिजे.' हे आम्हीं वर दिलेले दोन शास्त्रज्ञाग्रणींचे शब्द, आमच्या इकडील जहाल सुधारकांनीं जरूर लक्षांत ठेवावे, अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे. रसायन अगर पदार्थविज्ञान यांसारख्या समाजरचनेच्या दृष्टीनें अगदीं खालच्या स्थितींत असलेल्या शास्त्रांचें अध्ययन करून कोंवळ्या मुलांच्या मनावर नाहीं नाहीं ते संस्कार करणारे प्रोफेसर, शिक्षक, वर्तमानपत्रकर्ते वगैरे लोक समाजाचे शत्रू आहेत असें आमचें स्पष्ट मत आहे.

म्हणून आम्ही म्हणतों, मानवनिरपेक्ष म्हणजे अनाध्यात्मिक अशा शास्त्रांचा नीतिनियमांचे बाबतींत बोलण्याचा हक्क नाहीं आणि त्यांनीं या बाबतींत लुडबुड करूं नये. वस्तुमय बाह्य जग ( thing ) आणि विचारप्रणीत आंतर जग या दोहोंचाही समाजाची नीति ठरवितांना विचार व्हावयास पाहिजे[1]. वस्तुमय जगाचे परिणाम मनुष्याच्या बाह्य प्रक्रियेंत म्हणजे आचारांत दिसून येणार. परंतु बाह्य जग हें मोजमाप करतां येण्यासारखें आहे म्हणून त्याचे परिणामही मोजतां येतील. तेव्हां मनुष्याच्या बाह्य आचाराला या शास्त्रांच्या अनुरोधानें नियंत्रण पाहिजे. परंतु तादितर क्षेत्रांत लुडबुड करण्याचें त्यांना कारण नाहीं.

धर्म हा कांहीं शास्त्रांचा शत्रु नाहीं. शास्त्रांनीं उत्पन्न केलेल्या अनेकविध भावनांच्या जंजाळाची पूर्ती होण्याचें ठिकाण या दृष्टीनें, धर्म हा

१ Prolegomena to ethics by T. H. Green.

**१४ धर्म आणि शास्त्रें एकमेकांचे पूरक**

शास्त्रांचा पूरकच आहे. धर्म हा शास्त्रांच्या टप्यापलीकडील गोष्टींची विवंचना करीत असतो, म्हणून शास्त्रांनीं धर्म–सिद्धातांना मदत करावी आणि धर्मानेंही प्रत्यक्ष प्रमाणांमध्यें शास्त्रांचें साहचर्य राखावें. तशा तऱ्हेनें तें साहचर्य फक्त हिंदुधर्मांत राखलें गेलें आहे असें आमचें म्हणणें आहे. मनुष्याला भासमान होणाऱ्या प्रगतीला युद्ध, दुःख वगैरे गोष्टींची काय जरूर आहे ? ही गोष्ट जर शास्त्रांना कळत नसेल तर, त्या बाबतींत मानवी मनाचें समाधान करण्याचें कार्य धर्मावरच सोंपवून देणें बरें असें आम्हांला वाटतें. आतां कोणी असें म्हणतील कीं, शास्त्रांनीं हीं कोडीं सोडविलीं नसतील ! परंतु शास्त्रें हीं रहस्यें कधीं तरी उलगडणार नाहींत, असें म्हणण्याला कांहींच आधार दिसत नाहीं ! आम्हीं वर दोन पाश्चात्य पंडितांचीं मतें दिलेलींच आहेत. परंतु असें समजूं कीं, केव्हां तरी भौतिक शास्त्राला हीं कोडीं उलगडतील. परंतु त्यावर उत्तर इतकेंच आहे कीं, ज्यावेळीं शास्त्रें सृष्टीचें कोडें सोडवतील त्यावेळीं धर्मशास्त्राची जरूर राहणार नाहीं; परंतु ती वेळ आज प्राप्त झालेली नाहीं ! येईल तेव्हां पाहतां येईल! वरील चर्चेवरून पाहिलें तर असें दिसून येईल कीं, भौतिक शास्त्रांची वाढ अथवा निरीश्वरवादाची प्रवृत्ति हिनें मनुष्याच्या मनांत अनंत वासना उत्पन्न करून त्यांची पूर्ती न करणें, श्रद्धेनें उत्पन्न होणारें समाधान नष्ट करून त्याच्या जागीं दुसऱ्या कोणत्या तऱ्हेचें समाधान मानवी मनापुढें न ठेवणें, आणि अशा तऱ्हेनें 'जगत् हें निराशामय आहे ' एवढाच मंत्र मनुष्याचे मनावर ठसविणें, एवढे परिणाम मात्र झालेले दिसतात. थोडक्यांत सांगावयाचें तर, आशा नांवाच्या ज्या गुणावर मानवी मनांपैकीं शेंकडा ९९ मनें काल कंठतात, एका मोठ्या धर्मानें जो परमेश्वरी सद्गुण मानला आहे, त्या गुणाचा नाश होतो ! आशा नसलेला मानव अर्थातच आजचा दिवस हेंच आपल्या आयुष्याचें ध्येय समजणार ! हे वर सांगितलेले परिणाम घडत असतील तर शास्त्रें हीं मानवांची शत्रू आहेत, हा सिद्धांत कबूल करावा लागेल. मग ज्ञानवृक्षाचें फळ इवेनें खाल्ल्यामुळें मानवप्राण्याचें स्वर्गांत असलेल्या एडन बागेंतून उच्चाटन झालें, ही ख्रिस्त्यांच्या बायबलांतील दंतकथाही खरी मानावी लागेल !

आम्ही ती खोटी मानतों असा त्याचा अर्थ नाहीं आणि ज्ञानाच्या प्रत्येक प्रगतीनें मनुष्याचा कांहींना कांहीं तरी स्वर्ग नष्ट केला आहे यांत कांहीं तिळमात्र शंका नाहीं. आपणांपुढें दानदाता सैतान आणि अज्ञानांत ठेवणारा परमेश्वर, यांपैकीं कोणाची उपासना करावी असा प्रश्न दत्त म्हणून उभा राहील. म्हणून धर्म अगर नीति यांसंबंधीं बोलतांना शास्त्रांत प्रतीत होणाऱ्या सिद्धांतांना आध्यात्मिक सिद्धांताची जोड द्यावयास पाहिजे. एवंच, शास्त्रांचा समाजरक्षणाचें सर्वाधिकारित्व मागण्याचा हक्क मुळींच सिद्ध होत नाहीं !

तिसरें, असें म्हणतात कीं, शास्त्रांत प्रतीत होणारें ज्ञान सर्वांना प्राप्त झाल्यास प्रत्येकाची क्रिया अर्थातच नीतिकारक म्हणून समाजाला हितकारक अशीच होईल. या शास्त्रांनीं मानवांकरतां काय केलें, याचा आढावा कांहीं फारसा आशाजनक आहे असें आम्हांला वाटत नाहीं. आम्हांला तरी असें वाटतें कीं, भौतिक शास्त्रांची वाढ मानवाला हितकारक आहे कीं त्याचा नाश करणार आहे हें आज तरी ठरवितां येणें शक्य नाहीं ! आज तरी चैनीची वाढ, लोकसंख्यांची वृद्धि ( त्याही पण आतां हळूहळू घटूं लागल्या आहेत ही गोष्ट आम्हीं मागें नमूद केलीच आहे. ) आणि उरल्यासुरल्या वेळांत राष्ट्रांनीं आपसांतील यादवीकरितां जय्यत तयारी ठेवणें, एवढेच भौतिक शास्त्रांचे परिणाम झालेले दिसतात. शास्त्रें ज्याच्या हातांत असतील त्याचें ध्येय प्राप्त करून देण्याला त्याला मदत करतील. त्याचें ध्येय गर्ह्य असल्यास त्याची लवकर प्राप्ती करून देतील ! त्याचें ध्येय साधु असल्यास त्याची सिद्धि लवकर होईल ! परंतु ध्येय गर्ह्य असावें किंवा साधु असावें, (कोणतें ध्येय गर्ह्य आणि कोणतें ध्येय साधु, याचा निर्णय करण्याच्या बाबतींत भौतिक शास्त्रें हीं लंगडीं आहेत. ज्ञान हें कांहीं सद्गुणाची जागा भरून काढणार नाहीं.)[१] ज्ञान झालें म्हणून इंग्लंड देशांतील लॉर्ड कर्झनचे भाईबंद हिंदु लोकांच्या न्याय्य मागण्या पूर्ण करणार नाहींत; साऊथ आफ्रिकेंतील जनरल स्मट्सचे भाऊबंद तद्देशीय लोकांना चांगले वागविणार नाहींत; अमेरिकन सरकार एलिस आयलंडमध्यें असलेल्या कैद्यांना सवलती देणार नाहीं; युरोपियन राष्ट्रें इतर संस्कृती आपल्या

१ The future of science by Bertrand Russel.

संस्कृतीच्या बरोबरीच्या— नव्हे कांकणभर सरस आहेत —ही गोष्ट कबूल करणार नाहींत आणि हिंदुस्थानांतील समाजसुधारक सुधारणा आणि शास्त्र या उदात्त नांवांखालीं सुरू केलेले आपले वेडगळ चाळेही बंद करणार नाहींत! एवंच ज्ञान हें नैसर्गिक सद्‌गुणाची उणीव कधींही भरून काढूं शकणार नाहीं. शास्त्रज्ञानानें मनुष्यसमाजांतील तामसी वृत्ती कमीही झाल्या नाहींत, अगर सात्त्विक वृत्तींची वाढही झाली नाहीं! शास्त्रांत ज्ञान मिळेल परंतु भावनांचें आणि वासनांचें नियंत्रण होणार नाहीं, आणि अशा तऱ्हेनें सर्व नीतिशास्त्रांचा मूळ पाया जो 'मानवांवर कांहींतरी बाह्य शक्तीचें नियंत्रण,' हाच मुळीं भौतिक शास्त्रांवर उभारलेल्या समाजांमध्यें आणि संस्कृतीमध्यें सिद्ध होऊं शकत नाहीं! म्हणून म्हणतों कीं, भौतिक शास्त्रें हा नीतिनियमांचा पाया केव्हांही होऊं शकत नाहीं.

येथपर्यंत धर्मशास्त्रविरोधी नवीनांकडून समाजाला आधारभूत म्हणून जीं तत्त्वें— म्हणजे समाजरक्षण आणि भौतिक शास्त्रें —पुढें आणलीं त्यांची चर्चा करून ती समाजरचनेला आणि समाजधारणेला किती अपुरीं पडतात त्याचें दिग्दर्शन केलें. येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, मानवाच्या भावनांवर सत्ता गाजविणारी जी बाह्य शक्ति ती बुद्धिगम्य असावी किंवा मानवीबुद्धीच्या पलीकडील ( Supra-rational ) असावी? प्राचीनांच्या मतानें नीतिशास्त्राचा पाया अलौकिक अशा कांहीं तरी तत्त्वांवर अधिष्ठित असावयास पाहिजे. मग तो शब्द असो, आज्ञा असो अगर इतर कोणतेंही तत्त्व असो. तें तत्त्व अमीमांस्य होय. तेथें हेतुशास्त्र उपयोगांत आणावयाचें नाहीं. जैमिनि म्हणतो, 'वेदांच्या शब्दांनीं सूचित होणारें इष्ट ध्येय अथवा परिणाम हा धर्म होय', 'चोदनालक्षणोऽर्थो धर्मः[१] । अथातो धर्मव्याख्यास्यामः । श्रुति प्रमाणको धर्मः[२] ।' प्राचीनांचीं कितीही मतें गोळा केलीं तरी, धर्मनिर्णयाला केवळ बुद्धिप्रामाण्य कोठेंही अवलंबिलेलें नाहीं, ही गोष्ट कोणाच्याही सहज लक्षांत येण्यासारखी आहे.

परंतु आमच्या सुशिक्षितांना प्राचीन मतें कशीं पटावीं? कारण, तीं पूर्वीं आणि संस्कृतांत लिहिलेलीं! म्हणून अलीकडे आणि इंग्रजींत

१ पूर्वमीमांसा – जैमिनि.
२ कुल्लुकभट्ट on मनु 2·1.

लिहिलेल्या कांहीं तत्त्वांचा विचार करतों. मन्स्टरबर्ग म्हणतो, 'अलौकिक नैतिक मूल्यांबद्दलचा संशय (transcendental values) हा स्वतः तत्त्वतोच नष्ट होतो; संशय या दृष्टीनें पाहिलें तर त्यानें त्याचें स्वतःचेंच अस्तित्व नष्ट होतें; विचार या दृष्टीनें तो परस्परविरोधी ठरतो, आणि श्रद्धा या दृष्टीनें तो निराशावादच आहे.' कोणताही विचार सापेक्ष आहे म्हणून सांगणें याचा अर्थ, तो विचारच नाहीं असें कबूल करण्यासारखें आहे. रे. डीन इंग म्हणतो, 'म्हणून आपणास असें मानणें भाग आहे कीं, अलौकिक मूल्यांनीं प्रदर्शित केलेलें जग हेंच नैतिक वास्तवांत सत्य आहे आणि शास्त्रांनीं वर्णिलेलें जग हें त्यांतून उत्पन्न केलेला एक प्रांत आहे आणि त्या कार्यापुरतेंच त्याला अस्तित्व आहे.'[2] दिक्कालव्यापनावच्छिन्न, शास्त्राच्या प्रगतीवर अगर परागतीवर अवलंबून नसलेलें, त्या सर्वांना अतीत असें, 'नैतिक मूल्यांचें जगत आहे' असें मानण्याकडे समकालीन तत्त्ववेत्त्यांची प्रवृत्ति होत चालली आहे.

परंतु आज सर्वसाधारण मनुष्यप्राण्याची फार विलक्षण स्थिति होत चाललेली आहे. भूतकाळाशीं संबंध सोडून टाकण्याचा त्यानें चंग बांधला आहे. त्यामुळें जुनें शहाणपण त्याला नको असतें. परंतु त्याच्या जागीं कोणताही नवीन मूर्खपणा त्याला सहज मानवतो. हल्लीं शास्त्राच्या नांवाखालीं कोणताही मूर्खपणा पुढें मांडल्यास तो नवा असल्यास त्याला कोठें ना कोठें तरी चेले आणि अनुयायी मिळतात.[3] या आधुनिक मनःप्रवृत्तीनें प्रथमतः धर्मपंथावर हल्ला केला, नंतर तिनें कला आणि वाङ्मय या क्षेत्रांत स्वारी केली आणि आतां तीच प्रवृत्ति शास्त्रीय क्षेत्रांतही प्रवेश करूं लागली आहे, ही गोष्ट शास्त्रांचा इतिहास सूक्ष्मपणें अवलोकन केल्यास सहज लक्षांत येईल. ही आज जवळ जवळ सोळा आणे दिसून येणारी मानवाची प्रवृत्ति घातक आहे असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे.[4]

१ Christian ethics and Modern world problems p. 198

२ The same, page 195.

३ Where is science going by Max plank.

४ Education a Panacea in 'Progress of education' by G. M. Joshi.

अशा तऱ्हेनें विचार करूं लागलें म्हणजे नैतिक मूल्यें हीं स्थिर आणि गृहीत धरलेलीं ( a priori ) असतात आणि तीं उदाहरणें घेऊन ठरविलेलीं ( a posteriori ) नसतात ! येथेंच पुष्कळांचा घोंटाळा होतो ! कारण, शास्त्रांचें बाह्य जगत् आणि विचारानें उत्पन्न केलेलें जगत् यांचे बरोबर प्रांत त्यांच्या लक्षांत येत नाहींत ! मनुष्यानें तासभर श्वास कोंडून रहावें असें सांगणें, हें उच्च अगर नीच कोणतीच नीति दाखवीत नाहीं ! कारण यांत मानवी मन अगर विचार यांवर कांहींच अवलंबून नाहीं. 'परंतु मुलानें पंचवीस वर्षांपर्यंत ब्रह्मचारी रहावें' ही उच्च नीति होऊं शकते. कारण, ही गोष्ट अंशतः मनावर अवलंबून आहे. त्यालाच जर बाह्य नैतिक मूल्यांचा पाठिंबा मिळेल तर, ती कर्मप्रवृत्ति सहजच दृढ होईल. म्हणून प्रत्यक्ष सृष्टीशीं अविरोधी—म्हणजे अंशतः मनावर अवलंबून असणारीं—अशीं नैतिक मूल्यें धरल्यास तीं समाजांत खात्रीपूर्वक पसरतात. ही स्थिति कोणत्याही समाजांतील नीतीचा इतिहास पाहिल्यास सहज लक्षांत[१] येईल. यासंबंधीं सर्वसाधारण सिद्धांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल.

१५ फल हें अलौकिक

( जी जी स्थिति अंशतः अगर पूर्णत्वानें मनुष्याच्या मनावर अवलंबून असेल आणि जीवर समाजानें अभिजातत्वाचा छाप मारला असेल) ( ती ती स्थिति समाजांत सार्वत्रिक होण्याची प्रवृत्ति असते. ) ( ए )

एकपतिकत्व हें तसें आहे. ( ए )

एकपतिकत्व हें समाजांत सार्वत्रिक होण्याची प्रवृत्ति होईल. ( ए )

यावरून लक्षांत येण्यासारखें आहे कीं, विचारप्रणीत—जगताची मांडणी त्या विचारांनाच वळण लावून आपणांला पाहिजे तशी करून घेतां येते. आम्हीं मागें दिलेलें शिवाजी महाराजांचें उदाहरणच घेऊं. पूर्वइतिहास म्हणजे प्रत्यक्ष भौतिक सृष्टींतील प्रक्रिया एकच घडली असूनदेखील, त्याच व्यक्तीला देव आणि सैतान या दोन्ही स्वरूपांत मानणारें, विचारानें उत्पन्न केलेलें जगत् असूं शकतें. समाजाला नीतितत्त्वें सांगितल्यास तीं समाजाला झेंपणार नाहींत, हें म्हणणें बहुतेक अज्ञानमूलक असतें. नैतिक मूल्यें ठरवितांना

---

१ History of European Morals by Lecky, Evolution of moral ideas by Westermarck.

आणि त्यावर आपला शिक्कामोर्तब करतांनाच समाजानें पूर्ण विचार करावयास पाहिजे. त्यांनीं मनुष्याची सहज असलेली उपभोगाची प्रवृत्ति अनियंत्रित अशी वाढेल असा कोणाताही उपदेश न करणें बरें ! वासनांचें दुष्पूरत्व लक्षांत घेऊन ज्यानें वासनांचें कांहीं तरी नियंत्रण होईल, असेंच नैतिक मूल्य ठरवावयास पाहिजे. प्रथमतः वाटेल तें नैतिक मूल्य घेऊन तें पसरूं दिल्यास, मागून दुःख करून उपयोग नाहीं. म्हणूनच जर्मन तत्त्ववेत्ता फ्रेडरिक नित्शे म्हणतो, 'जशीं नैतिक मूल्यें असतील त्या तऱ्हेचा समाज उत्पन्न होईल.' Men will become the image of their values[१]

हीं नैतिक मूल्यें ठरवितांना अनेक पद्धतीनें विचार करावा लागतो. मनुष्य हा सेंद्रिय जीवसृष्टींत अंतर्भूत झाला असल्याकारणानें, त्याच्यामध्यें ज्या पाशवी प्रवृत्ति आहेत त्यांच्या दृष्टीनें त्याचा विचार व्हावा लागतो. फ्रेंच शास्त्रज्ञ आणि तत्त्ववेत्ता ब्लेस पास्कल म्हणत असे, 'अर्धे तत्त्वज्ञानी मनुष्यांतील दैवी अंश विसरतात आणि उरलेले अर्धे त्याची पशुवृत्ति लक्षांत घेत नाहींत ! ' याशिवाय विचारप्रणीत जगांत उत्पन्न होणारीं जीं भौतिक, नैतिक, आध्यात्मिक अंगें त्यांचाही विचार व्हावयास पाहिजे. तो कितीही सुधारला तरी त्याला मात्रास्पर्श-शितोष्णाचे नियम आहेतच ! त्याप्रमाणेंच त्याचें विचारप्रणीत जगत् वेगळें असल्यामुळें, विषयेंद्रिय हें त्याला सारख्या प्रमाणांत हलवूं शकेल असें नाहीं. येथें एवढीच सूचना देऊन ठेवावयाची आहे कीं, यापुढील सर्व चर्चा गणितागत पद्धतीनें (Statistical method) व्हावयास पाहिजे. सर्वसाधारण मनुष्यप्राण्याचा अभ्यास करणें हें प्रत्येक व्यक्तीच्या प्रवृत्तींचा अभ्यास करण्यापेक्षां जास्त सोपें आहे[२] आणि हितकारकही आहे. आणि याच तत्त्वावर अर्थशास्त्रादि शास्त्रांचीही पण उभारणी झालेली आहे. कोणत्याही शास्त्रांत प्रत्येक वेगवेगळ्या व्यक्तीचा विचार केला, तरी देखील शेवटीं सार्वत्रिक नियम असा काढण्याकरतांच विचार करावा लागतो ही गोष्ट कोणींही विसरून चालणार नाहीं. जसे त्याला शितोष्णाचे नियम आहेत, त्याप्रमाणेंच संस्कृतीच्या उदयास्तांचे सृष्टींत दिसून आलेले नियम हेही पण

१ An introduction to the philosophy of Nietzsche by Anthony Ludovici.

२ Theory of legislation by Jeremy Bentham.

त्यानें मोडून चालणार नाहीं ! पूर्वींच्या जाति, उपजाति अगर संस्कृति ह्या ज्या कारणाकरितां जगतीतलावरून नष्ट झाल्या, तींच कारणें पुन्हां कोणतीही जाति, उपजाति अगर संस्कृति यांमध्यें उत्पन्न झाल्यास, त्यांचाही नाश झाल्याशिवाय रहाणार नाहीं ! भौतिक अंगानें विचार केल्यास सृष्टींतील यच्च-यावत् प्राणी जीवनाकरितां अन्न, वंशरक्षणाकरितां स्त्री आणि आपल्या समकालीनांमध्यें विजयी होण्याकरितां स्पर्धा; या तीन गुणांनीं कार्यप्रवण होत असतो. विचारप्रणीत जगामध्यें या तीन प्रक्रियांनाच नैतिक कारणांकरितां सात्विक, राजस आणि तामस अशा तीन तऱ्हेनें मानल्या जातील. भगवद्गीताकार आध्यात्मिक दृष्टीनें अशीच त्रिविध विभागणी करितात. ‘ न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः । सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यास्त्रिभिर्गुणैः । ’

अन्न सर्वच प्राणी खातात. परंतु शरीररक्षणाकरितां अन्न खाणारा आणि निव्वळ आहे म्हणून रुचीचा गुलाम होऊन अन्न खाणारा, हे दोघेही अन्न खातात या एकट्या साधर्म्यानें समान होत नाहींत ! मनुष्य सृष्टींत—मनुष्य सर्व जीवजातींत—समान असलेल्या गुणांना एका हितकारक अशा विवक्षित दिशेनें तो कार्य कसें करावयास लावतो हेंच कौशल्याचें आहे. आज सुधारणेच्या जाहिराती घेऊन चारी खंडांत वांटीत सुटणारा पाश्चात्य हा, तामसिक पशु-स्थितींतून फारसा वर आलेला नाहीं ! त्याची प्रत्येक विवंचना मानवाचें अगदीं हलकें—म्हणजे पशुसृष्टीशीं समान—ध्येय जें अन्न मिळविणें तेवढेंच आहे ! त्याच्या सर्व शोधांची प्रवृत्तीही त्याच दिशेनें आहे. त्याची प्रत्येक विवंचना आपणाला कच्चा माल कोठें मिळेल, त्याकरितां किती लढाया लढाव्या लागतील आणि मग आपणांला जगाचा कितवा हिस्सा काबीज करतां येईल, या बाबतींत असलेली दिसून येईल ! परंतु नेहमीं पोटापाण्याच्या प्रश्नावर मनाचें एकीकरण करणें, हें कांहीं मानवाला वैयक्तिक अगर सामाजिक कोणत्याही दृष्टीनें हितकारक नाहीं. ‘ यो मे गर्भगतस्यापि वृत्तिंकल्पितवान् प्रभुः । शेषवृत्तिविधानाय सवै सुतोऽथवा मृतः ॥ ’ ही परमेश्वरावरील श्रद्धा जरी ठेविली नाहीं तरी, आयुष्याची सर्व भाषा रुपये, आणे, पैंत बोलणें श्रद्धेच्या स्थितीपेक्षां जास्त तिरस्करणीय आहे.

या तीन प्रवृत्तींच्या नियंत्रणाकरितां तीन शास्त्रें निर्माण झालीं आणि

तेच हिंदुसमाजांमध्यें तीन पुरुषार्थ मानले गेले. हिंदुधर्मामध्यें धर्म, अर्थ, काम हे ऐहिक पुरुषार्थ मानतात. धर्मानें स्पर्धेचें नियंत्रण करावयाचें, कामानें स्त्री-विषयक गोष्टींचें नियंत्रण करावयाचें आणि अर्थानें क्षुधाविषयक सर्व हालचालींचें नियंत्रण करावयाचें. आणि या सर्वांचे वर सर्वांना व्यापून राहिलेला मोक्ष हा पुरुषार्थ होय. हा मोक्षच हिंदुधर्माचें अलौकिक नैतिक मूल्य ( transcendental value ) होय आणि हिंदूची प्रत्येक हालचाल याच दृष्टीनें व्हावयाची असते. क्षुधेंतूनच प्रत्येक व्यापारविषयक, शेतकीविषयक, औद्योगिक प्रगतीसंबंधीं घडामोडी उत्पन्न होतात. कांहीं राष्ट्रें निव्वळ औद्योगिक प्रगतीकडे लक्ष देतात, याचा अर्थ त्यांच्या मनाची प्रधानप्राक्रिया 'क्षुधा' या अगदीं सर्वसाधारण गुणाच्या पलीकडे फारशी गेलेली नाहीं! अन्न म्हणजे अर्थ हा जरूर आहे, परंतु तो मानवी जीविताचें प्रधान अंग होऊं शकत नाहीं. त्यामुळें निव्वळ द्रव्यावर लक्ष देणाऱ्या वर्गाला समाजांत कोणीही बरें मानीत नाहीं. दुसरी म्हणजे आपणाला वंशरक्षण करण्याला स्त्री कशी मिळेल ही विवंचना असते. म्हणून कामशास्त्रादींची प्रवृत्ति होऊन समाजांत विवाहसंस्कार शिरले. हल्लीं ते सोडून त्यांचे ठिकाणीं अनियंत्रित प्रेम ( Free love ) सुरू करावें असें सिद्धांत सुरू झाले आहेत! त्यांच्या हिताहितत्वाची चर्चा यथावकाश होईलच. तें हितकारक ठरल्यास खुशाल सुरू करावें. परंतु अर्थशास्त्र काय किंवा कामशास्त्र काय, हीं दोनही धर्मशास्त्राच्या मानानें गौणच आहेत! कारण, धर्मशास्त्रांमध्यें नैतिक मूल्यें अलौकिक आहेत तशीं अर्थशास्त्र आणि कामशास्त्र या शास्त्रांमध्यें नाहींत आणि त्यामुळें या शास्त्रांना गौण मानावें लागतें. बुद्धिप्रामाण्यवादी लोक उगीचच आपला गैरसमज करून घेऊन स्वतः घोटाळ्यांत पडतात आणि दुसऱ्यांना घोटाळ्यांत पाडतात. कौटिल्य अर्थशास्त्रांत म्हणतो, 'अर्थायत्तौ धर्मकामौ' म्हणजे धर्म आणि काम यांची प्राप्ति आणि पूर्ति अर्थशास्त्रानेंच म्हणजे राजकारणशास्त्रानें होत असते. परंतु समाजाची जास्त माहिती असलेलें शास्त्र जें धर्मशास्त्र त्यानें मात्र हडसून खडसून सांगितलें आहे कीं, राजकारणापेक्षां धर्मशास्त्र हें जास्त बलवान

**१६ मानवाची विविध प्रवृत्ति** (margin heading)

मानावें. 'स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान् व्यवहारतः। अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः[१] ॥'

मनुष्य समाजांतर्गत आहे असें मानलें म्हणजे, मनुष्य म्हणजे कोण, समाज म्हणजे काय, त्या दोघांचे परस्पर संबंध कसे असावेत हे प्रश्न उत्पन्न होतात. समाजांतर्गत मनुष्य हा पूर्ण स्वतंत्र आहे किंवा पूर्ण अस्वतंत्र आहे किंवा कांहीं बाबतींत स्वतंत्र आणि कांहीं बाबतींत अस्वतंत्र आहे? कांहीं बाबतींत स्वतंत्र असल्यास कोणत्या बाबतींत स्वतंत्र आणि कोणत्या बाबतींत अस्वतंत्र? व्यक्तीचें हित आणि समाजाचें हित यांपैकीं कोणतें प्रधान मानावें आणि कोणतें गौण मानावें? इत्यादि प्रश्नांचा समाजरचनेशीं फारच निकटचा संबंध आहे. यांचें उत्तर जसें कल्पिलें जाईल त्याप्रमाणें समाजरचना ठरेल. व्यक्तीला प्राधान्य देणाऱ्या समाजांत समाजरचना व्यक्तिप्रधान होईल. तदितर समाजरचना गटप्रधान म्हणजे जातिप्रधान होईल. आधीं समाजरचनेचें हिताहितत्व ठरविल्याशिवाय राजसत्ता, नीति, हक्क वगैरे बद्दलचे निर्णय देणें आम्हांस तरी शक्य वाटत नाहीं. जातिहीन समाज असावा असें म्हणणारे लेखक, बहुशः प्रत्यक्ष शास्त्रें आणि इतिहास याशीं परिचित नसतात, असा त्यांचे ग्रंथ वाचून पाहिल्यास अनुभव येईल!

हिंदुस्थानमध्यें हल्लीं समाजशास्त्र अगर धर्मशास्त्र यांवर जें ग्रंथ प्रसिद्ध होत आहेत, त्यांमध्यें जागतिक उत्क्रांतिमध्यें मानवाचा दर्जा, मानवी हालचालींमध्यें धर्म आणि संस्कृति यांचा उदय, धर्म आणि संस्कृति हीं परस्परांशीं किती निगडित आहेत हा प्रश्न, धर्मविरहित संस्कृतीचें स्वरूप, संस्कृतिविरहित धर्माचें स्वरूप, एकमेकांची एकमेकांबद्दल अपेक्षा, या एकूनएक प्रश्नांचा कोठेंही विचार केलेला दिसत नाहीं[२]. मूळ स्वरूपच निर्णीत नसल्यामुळें, कोठला तरी एखादा प्रांत उचलून घ्यावा आणि त्यावर गौण-प्रधानत्व कार्यकारणभाव ठरविल्याशिवाय कांहीं तरी हालचाली करून त्याला 'सुधारणा' म्हणावें आणि ती गोष्ट परंपरेनें चालणाऱ्या समाजानें मान्य न केल्यास समाजाला शिव्या हांसडाव्या! समाजाला सारख्या शिव्या हांस-

१ याज्ञवल्क्य.

२ नवयुगधर्म-फडके; धर्मतत्वनिर्णय-तर्कतीर्थ कोकजे, महादेवशास्त्री दिवेकर आगरकरादि समाजसुधारकांचे लेख वगैरे.

ळीत रहाणें हें कांहीं त्या समाजाला सुधारणेचें साधन नव्हे ! कोणत्याही समाजाला सुधारणा करावयास लावावयाची असल्यास, त्या समाजामध्यें कांहीं तरी अभिमानाचें स्थान उत्पन्न करावें लागतें ! 'मागल्या शंभर वर्षांत मानवी बुद्धि चुकीचा मार्ग आक्रमण करीत आहे[१];' 'समाजांतील वाईट गोष्टींकडे नेहमीं नेहमीं लक्ष देणें हें सर्वसाधारण मनुष्याच्या दृष्टीनें बरें नव्हे. जेव्हां जी पद्धति सुधारावयाची असेल तीवर हल्ले करीत रहाणें एवढाच सुधारणेचा मार्ग ठरतो, त्यावेळीं व्यक्तींच्या मनाला जी एक तऱ्हेची प्रणाली लागून रहाते त्या प्रणालीनें एकंदर समाजाची जीवनशक्ति कमी होऊन जेथें समाजाला धैर्यादि गुणांची जरूर लागते तेथेंच फक्त ते उपयोगी पडत नाहींत ! एकंदर समाजाची मनोवृत्ति अंबलेली, चिडखोर, भांडखोर आणि निराशामय अशी होऊन बसते. निराशामय वातावरण पसरविणारें आणि पावलोंपावलीं समाजाच्या पदरांत गुन्हे घालणारें जें प्रचंड वाङ्मय आज तयार होत आहे त्याच्याकडे पाहिलें म्हणजे, समाजाचा स्वाभिमान नष्ट करण्याचा कट विद्वान लोकांत आणि पुढाऱ्यांत झालेला आहे, असें वाटल्याशिवाय रहाणार नाहीं !' 'एके वेळीं मानवीस्वभाव फार दीन आहे असें कांहीं धर्मपंथ मोठ्या जोराजोरानें सांगत असत. आज सर्व समाजपद्धतीच अनीतिमान आहेत असें सांगण्याचे जे प्रयत्न चाललेले आहेत त्यांचा तितकाच वाईट परिणाम होतो आहे.[२]' आमचें म्हणणें इतकेंच कीं, सुधारणा करावयास पाहिजे असेल तर जरूर केली पाहिजे. परंतु आजचें चुकत आहे असें जें आपण म्हणतां, त्यांचें कारण काय असावें आणि आपण सांगतां ती पद्धति चांगली कशावरून, एवढी गोष्ट आमच्या सुधारक बंधूंनीं विशद करून सांगावी, एवढीच त्यांना विनंति आहे.

आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे कीं, समाजरचना दोन तत्त्वांवर म्हणजे व्यक्तिप्रधान आणि जातिप्रधान या तत्त्वावर होऊं शकते. त्यांची तुलनेनें हिताहितत्वाची चर्चा पुढें करूं. येथें असें पहावयाचें कीं, जशा समाजाच्या दोन पद्धति असतात, त्याप्रमाणेंच नीतिशास्त्राच्याही दोन

२७ नीतीच्या दोन पद्धति

१ 'Education a panacea' in Progress of Education by G. M. Joshi.
२ Dr. L. P. Jacks in Hibbert Journal for 1924, 1925.

पद्धति या जगतीतलावर असलेल्या दिसून येतील. त्यामुळें एका नैतिक पद्धतीचे आधार दुसऱ्या नैतिक पद्धतीनें तोलून पाहिल्यास अर्थातच अनीतियुक्त दिसतील ! म्हणून कोणत्याही नीतिविषयक पद्धतींची तुलना करावयाची तर ती साकल्यानें करावयास पाहिजे, त्यांतील एक एक भाग घेऊन नव्हे. त्या पद्धतींची साकल्यानें तुलना केल्यानंतर, जिचा वरेपणा सृष्टि उचलून धरील त्या पद्धतीलाच आपणाला मान देणें भाग पडेल.

व्यक्तिप्रधान समाज असेल म्हणजे व्यक्ति हाच समाजाचा आद्य घटक म्हणून मानला गेला असेल, तर व्यक्तीलाच आपण ज्या स्थितीला सद्गुणी-स्थिति म्हणूं, त्या स्थितीला नेऊन पोहोंचविण्यासारखे नीतिनियम लावून द्यावे लागतील. या पद्धतीमध्यें 'मातृदेवो भव' 'पितृदेवो भव' 'सत्यात् मा प्रमदितव्यं' किंवा 'प्राणाघातान्निवृत्तिः परधनहरणे संयमः सत्यवाक्यं । काले शक्त्या प्रदानं युवति जनकथामूकभावः परेषाम् ।' अशांसारखे सर्व-साधारण नियम व्यक्तींना सांगणें पुरे. येथें मनुष्य हा सर्व मानवसमाजाचा घटक असतो. म्हणजे कुटुंब, जाति अथवा वर्ग, राष्ट्र, धर्म, पंथ हीं सर्व निष्ठास्थानें त्याच्या बाबतींत गौण मानावीं लागतात. त्याला मानव्य आणि सद्गुण हीं दोन तत्त्वें दिसूं लागतात आणि मग त्या तत्त्वांतून साबरमती आश्रमासारखे आश्रम उत्पन्न होऊं लागतात. परंतु हें नीतिशास्त्र खरोखरच हितकारक आहे, असें आम्हांला वाटत नाहीं. आणि त्या नीतिशास्त्राचे अनु-यायी त्यांतील तत्त्वांना पूर्णत्वानें अनुसरतात असें त्यांनाही म्हणतां येणार नाहीं ! ही गोष्ट डोळ्यांपुढें असल्यामुळें, 'खरा ख्रिस्ती एकच होऊन गेला आणि त्याचा नाश क्रुसावर झाला' असें नित्शे म्हणतो. समजा, यांतील पहिला नियम जो प्राणाघातान्निवृत्तिः तो इंग्लंड सारख्या देशानें अंगिकारिला आणि मग जर्मनीनें इंग्लंडवर स्वारी केली तर अर्थातच इंग्लंडनें हत्या टाळण्याकरितां जर्मनीला आपल्या राष्ट्रावर स्वारी करूं द्यावी ! कारण, 'महापुरें झाडें जाती तेथें लव्हाळे वांचती' आणि बायबलमध्येंही सांगितलें आहे कीं, 'नम्र असतील त्यांना जगाचें राज्य मिळेल' 'राजाचा भाग राजाला देऊन टाका' हा उपदेश सत्य होईल असें इतिहासाकडे

१ Anti-christ by Fredrich Nietzsche.

२ Ethics and Modern world problems by Mc Dougall.

पाहिलें तर खरें वाटत नाहीं ! पुढें तसें—म्हणजे प्राणाघातान्निवृत्तिः हा नियम पूर्णत्वानें पाळणारें समाजच श्रेष्ठ पदवीला पोहोंचणें ही गोष्ट—घडून येईल असें सांगितलें जातें. त्यावर उत्तर इतकेंच, ज्यावेळीं तसें घडून येईल त्यावेळीं इतिहास ती गोष्ट नमूद करून ठेवील ! दुसरा, ' चोरी न करणें ' हा नियम तीन शब्दांत सांगतां आला, परंतु तो असलांत कोठें तरी आलेला दिसतो काय ? एलिझाबेथ राणीच्या कारकिर्दींत सर फ्रन्सिस ड्रेक, हॉकिन्स, फ्रॉबिशर वगैरे इंग्लंड देशाचे प्रसिद्ध दर्यावर्दी समुद्रावर सोन्याच्या मालाची लूटमार करीत असत, ती चोरी होते किंवा नाहीं हें कसें ठरवावयाचें ? ख्रिस्ती धर्मांत ज्या दहा आज्ञा आहेत त्यांमध्यें ' तूं चोरी करूं नकोस ' अशीही पण आज्ञा आहे. सर फ्रॅन्सिस ड्रेक यानें रोज [illegible] प्रार्थना म्हणविण्याकरितां एक भिक्षुकही आपल्या जहाजावर घेतला होता ! परंतु सर फ्रॅन्सिस ड्रेक आणि इंग्लंडचें राष्ट्र या दोघांनाही चाललेला प्रकार चोरी आहे असें वाटलें नाहीं[2] ! मग काय कालपरत्वें आणि स्थलपरत्वें चोरीची व्याख्या बदलत असते असें मानावयाचें ? वॉरन हेस्टिंग्ज[3] वगैरेंनीं हिंदुस्थानांतून जो बेसुमार पैसा नेला त्याचा अर्थ कसा लावावयाचा ? ' चोरी करूं नये ' हा नियम एकनिष्ठेनें पाळणें श्रेष्ठ, का राष्ट्रनिष्ठा श्रेष्ठ ?

सत्य भाषण बोलणें हें खरें. परंतु असत्यानें जर कुटुंबाचें रक्षण होत असेल, तर व्यक्तीनें सत्यनिष्ठा पुढें करून कुटुंबाचा नाश करणें हित-कारक होणार नाहीं, असें आमचें वैयक्तिक मत आहे. ज्या महाभारतामध्यें ' हजार अश्वमेध यज्ञांपेक्षां सत्याची मातबरी जास्त आहे ' असें सांगितलें, त्याच महाभारतांत द्रोणाचार्यांच्या प्रबल प्रतापापुढें ज्यावेळीं पांडव सेनेची दैना उडाली त्यावेळीं, सर्व नीतिशास्त्रज्ञांचा अग्रणी जो योगेश्वर कृष्ण यानें धर्मराजासारख्या सत्यनिष्ठ राजाला असत्य बोलण्याचा उपदेश केला असेंही सांगितलेलें आहे ! महाभारतांतील हें एकच उदाहरण इतकें मोठें

---

[1] De Harbe's catechism.

[2] My neighbour the universe by Dr. L. P. Jacks.

[3] Social statics by Herbert Spencer; Trial of Warren Hastings by Edmunde Burke.

आहे कीं, याच्या आधारावर कोणीही व्यक्ति केव्हांही खोटें बोलण्याचें समर्थन सहज करूं शकेल ! यावरून दिसून येईल कीं, सत्य वाक्य हें कशाचें तरी ( काय तें पुढें पाहूं. ) साधन आहे, स्वतः साध्य नव्हे. म्हणूनच आर्यतत्त्वज्ञान्यांनीं सत्यकथनाला ' न नर्मयुक्तं वचनं हिनस्ति न स्त्रीषु राजन् न विवाह काले। प्राणात्यये सर्वधनापहारे पंचानृतान्याहुरपातकानि ॥ ' अशीं अपवादस्थळें सांगितलेलीं आहेत.

थोडक्यांत सांगावयाचें तर, या नीतिशास्त्राचें श्रेष्ठांचा विनाश एवढेंच फळ आहे. कारण असें नीतिशास्त्र श्रेष्ठ लोकच पाळणार, इतर कांहीं तिकडे लक्ष देणार नाहींत. भारतीय वीर कर्ण हा मोठा दाता म्हणूनच त्याचीं कवचकुंडलें जाऊन त्याचा नाश झाला ! या बाबतींत हिंदुस्थानांतील नीतिभीरू लोकांना किती त्रास सोसावा लागला आहे त्याची साक्ष इतिहास देऊन राहिलाच आहे[1] ! याचें मुख्य कारण असें आहे कीं, या तत्त्वज्ञानांत गृहीत धरलेली संघनिरपेक्ष व्यक्ति ही चीज पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही अस्तित्वांत नाहीं. पुन्हां आपण स्वतः, कुटुंब, जाति अगर गट, प्रांत, राष्ट्र, मानव्य वगैरे जे एकावर एक असे निष्ठेचे प्रकार सांगितले जातात, ते एकमेकांहून नैतिक दृष्ट्या श्रेष्ठच आहेत हें ठरविण्याला कांहींही साधन आहे असें आम्हांला वाटत नाहीं. सर्वसाधारण मनुष्यापुढें मानव्य वगैरे कल्पना ठेविल्यास, तो कार्यप्रवण होईल असें आम्हांला वाटत नाहीं.

पूर्वीं अशा तऱ्हेची नीतिरचना मुख्यतः गौतमबुद्ध, येशू ख्रिस्त वगैरे तत्त्वज्ञान्यांनीं मनुष्यप्राण्याला अंतीं हितकारक म्हणून सांगितली. आधुनिक कालामध्यें अशा तऱ्हेची नैतिकपद्धति थोरो, टॉलस्टॉय, गांधी वगैरे सांगत आहेत. अशा तऱ्हेच्या नीतिरचनेचीं निष्ठास्थानें भाववाचक अगर गुणवाचक (Abstract) असल्याकारणानें, प्रत्यक्ष म्हणजे वस्तुवाचक (Concrete) निष्ठास्थान या पद्धतीमध्यें उत्पन्नच होऊं शकत नाहीं ! गुण हे अव्यक्त असल्याकारणानें त्यांच्यावर निष्ठा असो अगर नसो ते कांहीं आपल्या जागेवरून ढळत नाहींत आणि म्हणून या निष्ठावंताचे कृतीचा परिणाम प्रत्यक्ष

---

१ Annals and antiquities of Rajasthan by Col Jamas Todd; Rise of the christian power, story of Satara and other works by B. D. Basu.

भौतिक जगांतच पहावयाचा असतो. परंतु या नीतिशास्त्राला तर तत्त्वापुढें सर्व भौतिक जग तुच्छ आहे! मग अशी व्यक्ति आपल्या म्हणण्याच्या सिद्ध्यर्थ अतिभौतिक शक्तीचा आश्रय करूं लागते. पूर्वी ख्रिस्तानें हेंच केलें आणि या युगांत रा. गांधी तंतोतंत तीच गोष्ट करीत आहेत. समाज असा निष्ठाहीन बनला म्हणजे मानवी स्वभावांची हळूहळू अधोगति होऊं [1]. तत्त्ववेत्ता फ्रेडरिक नित्शे म्हणतो, 'ख्रिस्ती धर्म हा चांडाळांना याग्य असा धर्म आहे.' अशा तऱ्हेचे सर्वसाधारण धर्म सांगणाराची स्वतःची तरी काय स्थिति झाली? साक्रेतिसाला समाजाला लागलेली कीड असें समजून समाजानें त्याला देहांत प्रायश्चित दिलें, येशू ख्रिस्ताला त्याच्या राष्ट्रांतील लोकांनीं क्रुसावर ठोकून ठार मारलें आणि लियो टॉलस्टॉय हे गृहस्थ आपल्या समाजांतून जवळ जवळ बहिष्कृतच होते!

उलट ज्या समाजरचनेमध्यें जाति किंवा गट हे जेथें समाजाचा पाया मानला जातील तेथें नीतिशास्त्रही त्या गटपद्धतीला अनुसारी असेंच उत्पन्न व्हावयास पाहिजे. याला आपण जातीय अगर राष्ट्रीय पद्धति असें म्हणूं. तेथें व्यक्तीला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. येथें Man is the function of society, पहिल्या पद्धतींत society is the function of man. व्यक्ति ज्या संघांत जन्मास आली, त्या संघाचे सर्व हक्क व्यक्तीला सहजच प्राप्त होतात. परंतु त्या व्यक्तीला आपल्या सर्व वासना, भावना, कल्पना वगैरे त्या वर्गाचे हक्क, त्या वर्गाचीं सुखदुःखें, त्या वर्गाला घालून दिलेल्या मर्यादा, यांनीं नियंत्रित करावयास पाहिजेत. अशा तऱ्हेचें नीतिशास्त्र ख्रिस्त-पूर्व रोमन राष्ट्रांचा धर्म, जुना यहुदी धर्म आणि हिंदुधर्म या संस्थांमध्यें प्रतीत झालेलें दिसून येईल. यांत प्रत्येक गटाला स्वतःच्या अशा देवदेवता आहेत, स्वतःचीं अशीं नैतिक मूल्यें आहेत, स्वतःचीं अशीं इतरांत न सांपडणारीं निष्ठास्थानें आहेत. येथें निष्ठास्थानें प्रत्यक्ष असल्याकारणानें आणि निष्ठास्थानें अढळ आणि निश्चित असल्याकारणानें त्या नैतिक मूल्यांचा प्रत्येक व्यक्तीच्या मनावर पूर्ण ताबा आहे. असे समाज पूर्ण संघटित स्थितींत असतात. ग्रीक व रोमन लोकांत पूर्वी अशाच तऱ्हेची नीतिपद्धति होती. ग्रीसच्या बाबतींत सांगावयाचें तर, तत्त्ववेत्त्यांनीं आपलीं

---

१ **Anti-christ.**

तत्त्वें नैतिक प्रश्नांत घुसडून ग्रीसचा नाश केला ! रोमन लोकांच्या बाबतींत असें घडून आलें कीं, ख्रिस्ती धर्मानें जातीय नीतीच्या ठिकाणीं व्यक्तिप्रधान नीति उत्पन्न करून रोमन साम्राज्याचा नाश केला ! त्याप्रमाणें धाडसी मुसलमानी संस्कृतीची तीच स्थिति झाली. ती व्यक्तीप्रधान असल्यामुळें तिची प्रथम झपाट्यानें वाढ झाली आणि तितकाच लवकर त्याचा उपसंहारही झाला. अशा तऱ्हेनें नीतिशास्त्राच्या दोन पद्धति आहेत आणि त्या दोन तऱ्हेच्या समाजरचनेला धरून आहेत.

एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, समाजरचना ज्या मूलतत्त्वावर झालेली असेल, त्याच तत्त्वावर त्या समाजांतील नैतिक मूल्यांची उभारणी व्हावयास पाहिजे. हिंदुसमाज जातीय पद्धतीवर उभारला असल्यामुळें येथें व्यक्तिप्रधान नैतिक मूल्यांना मुळींच स्थान नाहीं. आणि हीच गोष्ट आमच्या इकडील जहाल सुधारकांना अजून कळावयाची आहे ! समाज नाशाच्या मार्गाला लागल्यावर म्हणजे सुधारल्यावर न कळो, इतकीच परमेश्वराजवळ प्रार्थना आहे ! आमचे आधुनिक महात्मे येशू ख्रिस्ताचा अवतार असल्यामुळें येशू ख्रिस्तानें व्यक्तिप्रधान नैतिक मूल्यें पसरवून ज्याप्रमाणें रोमन साम्राज्याचा नाश केला, त्याप्रमाणेंच आधुनिक जुन्यांतील जुना शिल्लक राहिलेला जो हिंदुधर्म त्यामध्यें ही सांथ पसरवतील आणि त्यांनाही आपण महात्मेच म्हणूं ! शांति चांगली खरी पण तिला देखील कांहीं तरी मर्यादा पाहिजे. नीतिपद्धति, समाजरचनेच्या मूलतत्त्वांशीं विरोधी असतां कामा नयेत. समाजरचना जातिप्रधान आणि नीतिपद्धति व्यक्तिप्रधान, ही कल्पनाच हास्यास्पद आहे! परंतु हिंदुसमाजांत हल्लीं तिलाच समाजसुधारणा असें म्हणतात ! पुन्हां मनुष्याला जर खरोखरीच आपल्यांतील सद्गुणांची वाढ करून घ्यावयाची असेल तर, त्याला स्वतःचें असें निष्ठास्थान असावयास पाहिजे. सत्य, दया वगैरे अस्थिर, अव्यक्त आणि अर्थशून्य अशा निष्ठास्थानांनीं प्रत्यक्ष निष्ठास्थानाची जागा भरून निघत नाहीं. प्रश्न असा उत्पन्न केला जाईल कीं, या दोन तऱ्हेच्या नीतिपद्धतींमध्यें कांहीं तडजोड, देवाणघेवाण घडवून आणावयास नको काय ? आपण संकुचित् असें जातीय निष्ठास्थान नष्ट करून, संबंध हिंदु तेवढा एक अशा तऱ्हेची मनःप्रवृत्ति उत्पन्न केली तर जास्त बरें, असें कांहींचें म्हणणें आहे त्याचा विचार करूं. जातीच्या ठिकाणीं समाज हें निष्ठास्थान

झालें म्हणजे अर्थातच जातीय अभिमान नष्ट होणार. परंतु अभिमान नेहमींच वाईट परिणाम करतो, हा शोध समाजसुधारकांना कसा लागला तेंच कळणें कठीण आहे! जातीय अभिमान नष्ट झाला म्हणजे जातीनें सर्व समाजकारणांत आपली म्हणून जी कांहीं विशिष्ट संस्कृति समाजाला द्यावयाची तीही त्या अभिमानाबरोबर नष्ट होईल. हिंदुस्थानच्या इतिहासांत प्रत्येक जातीनें आपलें म्हणून केलेलें विशिष्ट कार्य दाखवितां येईल असें आम्हांला वाटतें. जातीय अभिमान, सर्वच तऱ्हेचा अभिमान—पोकळ गर्व नव्हे—हा अत्यंत उपयुक्त गुण आहे, ही गोष्ट थोडासा विचार करून पाहिल्यास सहज कळून येण्यासारखी आहे.

असो. समाजरचना दोन पद्धतीनें होऊं शकते असें मागें सांगितलें. पहिल्या पद्धतीमध्यें प्रत्येक घटक असा वेगळा धरून, समाजांतील प्रत्येक व्यक्तीमध्यें स्वतःची अशी कांहीं प्रवृत्ति पिंडांतच असते असें समजून, सर्व व्यक्तींना सर्व तऱ्हेचें शिक्षण, सर्व तऱ्हेचे धंदे मोकळे ठेवून समाजाची वाढ करून घ्यावयाची, हें तत्त्व असतें. येथें नैसर्गिक निवडीनें अगर नैसर्गिक निवडीचे नियम जाणूनबुजून लावून समाजामध्यें विवक्षित तऱ्हेचींच माणसें अमक्याच लोकसंख्येंत उत्पन्न होतील अशा तऱ्हेचा प्रयत्न नसतो. या पद्धतीमध्यें जन्मकाळीं कोणीही हलका मानावयाचा नसतो. मग पुढें त्याचे गुण पाहून तो श्रेष्ठ अगर कनिष्ठ ठरेल तसा तो समाजांत राहील. येथें श्रेष्ठ गुण सहज कोठेंही म्हणजे समाजाच्या कोणत्याही थरांत सारख्याच प्रमाणांत उत्पन्न होतील असा जो मुद्दा गृहीत धरलेला आहे, तो प्राणिशास्त्राच्या सिद्धांतांना विरोधी आहे, आणि तशा पद्धतीचें हितकारित्व अजून सिद्ध व्हावयाचें आहे. सर्वसाधारण मानवापेक्षां ज्यांच्यामध्यें थोडेसे तरी हितकारक गुण जास्त असतील त्यांची संख्या वाढवीत जाणें आणि सर्वसाधारण व्यक्तिगुणांपेक्षां ज्यांचे गुण हलके असतील त्यांची संख्या कमी करीत जाणें, अशा तऱ्हेनें या पद्धतींत सुधारणा झाली पाहिजे असें युरोपांतील समाजसुधारक देखील आतां म्हणूं लागले आहेत[१]. सर्व सारखे असून त्यांच्या गुणांवरून स्थान ठरवावयाचें असें सांगणारांनीं खरोखर समाजांतील जननसंख्येला मुळींच बंधन घालतां कामा नये. ज्यांची लायकी असेल ते जगतील, फक्त सर्वांना

१ **Eugenic Reform by Leonard Darwin 162.**

संधि दिली म्हणजे झालें. परंतु या लेखकांना समाजशास्त्राचा नसला तरी आनुवंश पद्धतीचा थोडासा बोध झाला असल्याकारणानें, त्यांनाही जास्त हितकारक आणि कमी लायक असे समाजाचे वर्ग करावे लागले !

दुसऱ्या पद्धतीमध्यें कांहीं कुटुंबाचे गट म्हणजे जाति ही आद्यघटक मानून त्या गटांनीं आपले गुण सिद्ध करावे, असें तत्त्व गृहीत धरलें जातें. येथें उन्नति व्हावयाची ती गटाची आणि अवनति व्हावयाची तीही पण गटाची. पहिल्या तऱ्हेची पद्धति जिला पाश्चात्य संस्कृति या नांवानें आज संबोधितात त्या संस्कृतीमध्यें अवलंबिलेली दिसते तर दुसरी पद्धति ही हिंदुसमाजपद्धतीचा पाया आहे. या दोहोंतील श्रेष्ठकनिष्ठभाव कांहीं तरी निश्चित ध्येयाच्या अनुरोधानें ठरवून घेऊन मग आपला नीतिशास्त्राचा निर्णय करावा लागेल. तोंपर्यंत अमक्या चालीरीतीला कलंक म्हणावें आणि अमक्या चालीरीतीला हितकारक म्हणावें, या दोन्ही गोष्टी ठरवितां येणें अशक्य आहे. परंतु त्या अशक्य गोष्टीच हिंदुसमाजांत आज चाललेल्या आहेत !

### १८ मानवी जीवितावर निसर्गाचे परिणाम

संस्कृतीचा प्रश्न, हा मानवानें प्रत्येक क्रिया निसर्गतः अशीच करावी कीं, नतीला विरोधी होणार नाहीं, असा त्याचा स्वाभाव बनवून टाकणें हाच आहे. या बाबतींत म्हणजे ध्येय ठरविण्याचे बाबतींत साबरमतीच्या आश्रमांतील महात्म्यांचें मत बरोबर आहे. परंतु त्याचें साधन मात्र ते महात्मे मानतात तसें व्यक्तिस्वातंत्र्य हें नव्हे ! सर्व दिवाणी आणि फौजदारी कायद्याचा प्रधान पाया जो व्यक्तीचें स्वतंत्र्य कर्तृत्व आणि म्हणून त्याची कोणत्याही कृत्याबद्दल जबाबदारी हा मानवशास्त्रांचा विचार केल्यास सिद्ध ठरत नाहीं. म्हणून समाजांचें आणि संस्कृतीचें रक्षण अनुवंशाच्या मदतीनें जाति—नीतियुक्त करून करावयाचें असतें. बाह्य कायद्याचे पोंचट टेंकू देऊन नव्हे ! म्हणून मानवी वर्तनाला नियम लावून देण्याची महत्वाकांक्षा धरणाराला प्रत्येक गोष्टीचा अत्यंत खोल विचार करावा लागतो. मानवी क्रिया, अंतःकरणांतील प्रवृत्ति, सामाजिक नैतिक मूल्यें, भौतिक परिस्थिति, हवामान, ऋतुमान इत्यादि जगांत दिसून येणाऱ्या तत्त्वांनीं नियंत्रित झालेली

असते[1]. त्याची क्रिया त्याच्या भोंवतालीं उत्पन्न होणाऱ्या वनस्पति, तेथें असणारीं धान्यें आणि त्याच्याजवळ असलेलीं माणसाळलेलीं जनावरें; यांवर देखील अवलंबून आहे. या सर्व गोष्टी मनुष्यबाह्य असल्यामुळें आणि त्यांवर सर्वथा ताबा मिळविणें मनुष्याला सर्वथा शक्य नसल्यामुळें, येथेंही या बाबतींतील नियम समाजावून घेऊन त्याप्रमाणें आचारभेद करावयास पाहिजे. येथें आधुनिक स्वातंत्र्यवादी पंडित विचारील कीं, कार्यामध्यें हवामानाचा काय संबंध दाखवितां येईल ? तर त्यांना इतकेंच विचारावयाचें कीं, उन्हाळ्यांत सरकारी दरबारी पंखे कशाकरितां लावतात ? कांहीं एक उष्णतामान होऊन गेल्यानंतर पुढें मनुष्याच्या हातून कार्य चांगल्या तऱ्हेनें घडूं शकत नाहीं, ही गोष्ट येथें कबूल केलेली आहे आणि तें बरोबरही आहे. हिंदुस्थानासारख्या उष्ण कटिबंधांतील देशांत कोटलेंही कामकाज दिवसाच्या पूर्वार्धांत केल्यास तें उत्तरार्धांत केलेल्या कामापेक्षां पुष्कळच जास्त होऊन सार्वजनिक पैशाचा अपव्यय वांचेल. परंतु येथें सर्व कामकाज दुपारीं करण्याची पद्धति पडून गेलेली आहे आणि तीच आपणास नैसर्गिक वाटते. इंग्लंडमध्यें जेथें नैसर्गिक उष्णतामान फारसें वाढत नाहीं, तेथें अर्थातच दुपारीं काम करण्याची पद्धति फारशी हानिकारक ठरणार नाहीं. हिंदुशास्त्रज्ञांनीं या बाबतींत लावून दिलेले नियम अत्यंत हितकारक आहेत. परंतु साहेबाचें सुशिक्षित राज्यच वेगळें ! काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत सर्व तऱ्हेच्या कटिबंधांतून कामकाजाची एक वेळ, यालाच म्हणतात सुधारणा !

ज्याप्रमाणें दिवसाच्या वेगवेगळ्या भागाचे मानवप्राण्यावर म्हणजे त्याच्या हातून घडणाऱ्या क्रियेवर वेगवेगळे परिणाम झालेले प्रत्यक्ष दिसून येतात, त्याप्रमाणेंच वर्षाच्या वेगवेगळ्या ऋतूंचेही परिणाम मानवसमाजावर झालेले दिसून येतात. म्हणून मानवी आचारांचें नियंत्रण करूं इच्छिणाऱ्यांना या सर्व गोष्टींचाही विचार करावयास पाहिजे आणि तो दीर्घदृष्टि हिंदुसमाजशास्त्रज्ञांनीं केलेलाही पण आहे. युरोपमध्यें जमा केलेल्या आंकडेशास्त्रावरून असें दिसून आलें आहे[2] कीं, आत्महत्या, वेड लागणें, दारुबाजीचा

१ Criminal sociology by Ferri. modern theories of Criminality by Bernardo Dequiros Criminal man-Lombroso.

२ Heredity and selection in sociology by George Chattertoin Hill.

वेडांत परिणाम होणें, सर्वसाधारण अर्धांगवायूचें प्रमाण वगैरे रोगांचें प्रमाण जानेवारी महिन्यापासून जून महिन्यापर्यंत वाढत जातें आणि जून महिन्यापासून जानेवारी महिन्यापर्यंत पुन्हां कमी होत जातें. याचा अर्थ असा होतो कीं, जानेवारी ते जूनपर्यंतच्या काळांत असा कांहीं तरी फरक होत चालला आहे कीं, तो मानवी जीवाला हितकारक नसावा. असें कां होतें त्याचीं कारणें जरी सांगतां आलीं नाहींत तरी ही गोष्ट नमूद करावयास पाहिजे, हें कोणीही नाकबूल करील असें मला वाटत नाहीं. पुढें आणखी तपशीलवार विचार केला तर, कोणत्याही बाबतींत होणाऱ्या चढउतारांच्या सारखेपणामुळें ( symmetry of curve ) मानवी जीविताच्या बाबतींत जानेवारी आणि डिसेंबर, फेब्रुवारी आणि नोव्हेंबर, मार्च आणि आक्टोबर अशा जोड्यांचा अधिकार सारखा असलेला दिसून येईल. सर्वांत जास्त वाईट परिणाम मे, जून, जुलई, आगस्ट या महिन्यांत होत असलेला दिसून येईल. या पद्धतीनें विचार करून वर्षाची विभागणी आणि त्याशीं अविरोधी असे व्यक्तीनें पाळावयाचे नियम सुधारलेल्या यूरोप आणि अमेरिकेंतील पद्धतींत मला वाचावयास मिळाले नाहींत. परंतु हिंदुसमाजशास्त्रज्ञांनीं मात्र मानवी जीवावरील परिणाम लक्षांत घेऊन ते परिणाम कमजोर करण्याच्या दृष्टीनें वेगवेगळ्या काळाला वेगवेगळे आचार लावून दिले आहेत. प्रथमतः हिंदूंनीं वर्षाचे दोन भाग केले. ते म्हणजे उत्तरायण आणि दक्षिणायन. ते भाग बरोबर परिणामाच्या दृष्टीनें जे भाग पडूं शकतात त्या भागांशीं संवादी आहेत. पुढें ऋतुचर्येमध्यें हिंदुसमाजशास्त्रज्ञांनीं जे अधिकार लावून दिले आहेत, तेही पण परिणामाच्या दृष्टीनें बरोबर जमतात. त्यांनीं मनुष्याला कामोपभोगाच्या दृष्टीनें कोणते महिने हितकारक आणि कोणते महिने अहितकारक हें सांगतानाही बरोबर तेच नियम अनुसरलेले दिसतात. अशा तऱ्हेनें अगदीं जागतिक स्थितीचा-देखील पद्धतशीर विचार करणाऱ्या लेखकांना कोणाही आय्. एम्. एस्. मधील अधिकाऱ्यांनीं नांवें ठेवावींत आणि त्या मूर्खांची री आमच्या इकडील बावळटांनीं ओढावी हा काळाचा महिमा आहे ! वैद्यक[१] ग्रंथ वर्षांतील ऋतूंना पुढील अधिकार देतात. ‘ सेवेत कामतः कामं तृप्तो वाजीकृतो

१ अष्टांगहृदय-सूत्रस्थान.

हिमे। त्र्यहाद्वसंतशरदोः पक्षात् वर्षानिदाघयोः ॥' येथें वर्षा आणि निदाघ, वसंत आणि शरद्, हेमंत आणि शिशिर या जोड्यांना जीवसृष्टीचे दृष्टीनें सारखे अधिकार दिलेले आहेत. हिम शब्दानें हेमंत आणि शिशिर असा अर्थ घ्यावयास पाहिजे. कारण वैदिक वाङ्मयांमध्यें वर्षाची तशीच विभागणी केलेली दिसते. 'द्वादशमासाः पंच ऋतवः हेमंतशिशिरयोः समासेन[१]।' आतां या दिलेल्या ऋतूंच्या जोड्या आणि पूर्वी आलेल्या महिन्यांचें साधर्म्य हीं ताबडतोब लक्षांत येऊन आर्यांच्या ज्ञानाबद्दल आश्चर्य वाटल्याशिवाय रहाणार नाहीं! 'मीनमेषयोर्वसंतः' या आर्य नियमाप्रमाणें नोव्हेंबर, डिसेंबर, जानेवारी आणि फेब्रुवारी या चार महिन्यांत हेमंत आणि शिशिर ऋतु येतो त्यावेळीं जीवाला भोग सांगितलेला आहे. म्हणजे त्यावेळीं वर्षाची स्थिति जिवाला फार कमी अपायकारक आहे.

ज्याप्रमाणें ऋतुमानाचा समाजावर परिणाम होतो, त्याप्रमाणें वारा, वनस्पति, खाल्लेलें अन्न यांचाही परिणाम होतो आणि त्याचाही हिंदुसमाजशास्त्रकारांनीं विचार केलेला दिसतो. वारा, पाऊस यांचा मानवी नीतीशीं संबंध वर पहाणाराला दिसत नाहीं म्हणून त्या बाबतींत साशंक रहाणें शहाणपणाचेंच लक्षण आहे. परंतु त्याबद्दल कांहीं समजावून न घेतां निश्चित मत सांगणें हें धाडसच आहे असें आम्हांला वाटतें. उदाहरणच घेऊन सांगावयाचें तर असें दिसून आलें आहे कीं, अमेरिकेमध्यें पंपा नांवाची जीं गवताळ कुरणें आहेत त्या कुरणांवरून वहात आलेला वारा, ज्या ज्या गांवांवरून अगर शहरांवरून जातो त्या त्या गांवीं अगर शहरीं त्यावेळीं तेथील वस्तीमध्यें भांडखोरपणा, खून करण्याची प्रवृत्ति वगैरे घातुक प्रवृत्तींची वाढ झालेली दिसते[२]! येथें भौतिक स्वातंत्र्याच्या दृष्टीनें प्रश्न करावयाचा म्हणजे इतकाच कीं, परमेश्वराचेंदेखील अस्तित्व नाकबूल करणाऱ्या मानवप्राण्याची नैतिक स्वतंत्रता अशी वाऱ्याच्या झुळकेबरोबर कशी पार नष्ट झाली? खरी गोष्ट अशी आहे कीं, वैयक्तिक नीति अगर अनीति आणि सबंध संघांतच अनैतिक वातावरण उत्पन्न होणें, या दोन स्थितींतील फरक आमच्या इकडील समाजसुधारकांना अजून बरोबर

१ ऐतरेय ब्राह्मण.

२ Criminal sociology by Enrico Ferri.

कळला नाहीं आणि याचाच अर्थ असा कीं, नैतिक मूल्यें ही काय वस्तु आहे याचा त्यांना बोध झालेला दिसत नाहीं! अशा तऱ्हेचे वायूचे परिणाम आर्य-वाङ्मयांमध्यें सांगितलेले सांपडतात. परंतु ते पडताळून पहाण्याचे ऐवजीं त्यांची थट्टा केलेली मात्र आढळून येईल! पदार्थविज्ञान शास्त्रातील शोध करण्याला आणि ज्ञान मिळविण्याला मात्र अगदीं काटेकोर आणि नाजूक प्रयोग केले पाहिजेत. फक्त मानवाबद्दल मात्र कोणत्याही तऱ्हेचा सूक्ष्म अभ्यास करण्याचें कांहींच कारण नाहीं, असें त्यांचें मत असावें असें वाटतें. क्रायकरचा कॅथोड रे, रोएन्टजेनचा एक्स रे, प्लँकची क्वांटम पद्धति, आइन्स्टाईनची रिलेटिव्हिटी यांचा अभ्यास मात्र अगदीं नाजुकांत नाजूक प्रयोग करूनच झाला पाहिजे. परंतु मानवाचा अभ्यास मात्र, 'मला असें वाटतें कीं,' या वाक्यांनीं पूर्ण होतो! वाऱ्यांचे परिणाम मुळींच होत नाहींत, अशासारखीं प्रयोग न करतां केलेलीं विधानें ऐकिल्याबरोबर, तुमचे एक्स रे वगैरे सर्व एक लुच्चेगिरीचें थोतांड आहे असें खुशाल उत्तर द्यावें! भौतिक हालचाली जर बरोबर मोजमाप केल्याशिवाय कळत नाहींत तर, मानवी हालचालींचें तरी तशा प्रयोगांशिवाय ज्ञान कसें होऊं शकतें, ही गोष्ट आमचे सुधारलेले बंधुच जाणोत! आमच्या संस्कृत वाङ्मयांशीं ज्यांचा परिचय आहे त्यांना ही गोष्ट माहीत आहे कीं, मलय पर्वतावरून वहात आलेल्या वाऱ्यामुळें कामविकाराची वृद्धि होते, अशी लेखकांची कल्पना होती. परंतु तशा तऱ्हेचा शोध आंकडेवारीनें कोणीं करून पाहिला आहे असें आम्हांला वाटत नाहीं. अर्थात् या बाह्य परिस्थितीनें तो तो गुण वाढत असला, तरी तो तो प्रत्यक्ष गुन्हा मानवाच्या अंतर्गत प्रवृत्तीवरच अवलंबून राहील. परंतु एकंदर समाजांत त्या त्या विकाराची वाढ होईल खास. हा परिणाम कमजोर करण्याकरितां कांहीं युक्ति योजावयास पाहिजे किंवा नको आणि तशा तऱ्हेचे नियम समाजशास्त्रज्ञानें लावून द्यावे किंवा नाहीं हा अत्यंत विचाराचा प्रश्न आहे. हल्लीं समाजांत असलेली पद्धतीच मोठी विचित्र आहे! आधीं गुन्हे, मारामाऱ्या, मग त्यांचें कारण शोधून काढण्याकरितां चौकशी, कमेट्या आणि शेवटीं त्या कमिट्यांचा रिपोर्ट आणि पुनः शेवटीं व्यक्तिस्वातंत्र्य! गुन्हेगारीवरील ग्रंथांतून अशीं अनंत उदाहरणें काढून दाखवितां येतील.

जसा वरील दोन तत्त्वांचा विचार झाला त्याप्रमाणेंच, देशविषयक गुणांचा देखील विचार व्हावयास पाहिजे. देशांचे गुण असे असतात कीं, जे वंश देशाच्या ज्या भूमीभागांत प्रथम उत्पन्न झाले असतील, त्याच देशविभागांत ते जगूं शकतात ! या विषयासंबंधीं फारसा अभ्यास झालेला नाहीं, जो झालेला आहे त्यावरून असें अनुमान निश्चित[१] निघतें. हें आज शास्त्रज्ञांमध्यें पुढें येत असलेलें मत धर्मशास्त्रकार मनूला नक्की माहिती होतें. धर्मशास्त्राचा म्हणजे मानवसमाजाचा अभ्यास करावयाचा तर, मूलभूत गोष्टी धराव्या लागतात. त्याचा मनूनें पूर्ण विचार केलेला आहे. 'देशधर्मांन्[२] जातिधर्मान् कुलधर्मांश्च शाश्वतान् । पाषंडगण धर्मांश्च शास्त्रेऽस्मिनुक्तवान् मनुः' या श्लोकामध्यें शाश्वत या पदांचा अर्थ काय होईल ? शाश्वत म्हणजे न बदलणारे देशधर्म, जातिधर्म, कुलधर्म कोणते ? धर्म ते शब्दानें आचार हा अर्थ जर प्रदर्शित होत असेल तर, इतिहासांत आचार बदलत गेले असें एखाद्यानें दाखविल्यास, त्यापासून कोणतीच अर्थनिष्पत्ति होत नाहीं. बदलत गेले असतील तर, तो बदलणारांचा दोष धर्मशास्त्रज्ञांना ते बदलूं नयेत असें वाटत होतें असेंच ठरेल. पुन्हा धर्म शब्दाचा आचार असा अर्थ मानल्यास प्रतिज्ञा करणाऱ्या ग्रंथकारानें अशा तऱ्हेचे वेगवेगळ्या देशांचे, वेगवेगळ्या जातींचे अगर वेगवेगळ्या कुलांचे आचार त्यानें आपल्या ग्रंथांत कोठें तरी द्यावयास पाहिजे होते. परंतु तसें कोठेंही केलेलें आढळत नाहीं. म्हणून येथें धर्म शब्दाचा अर्थ नैसर्गिक गुण असा घ्यावयास पाहिजे. पुन्हां निसर्गदेखील समाजशास्त्राकरितांच पहावयाचा असल्याकारणानें, कोणता कोणत्या जातीच्या जीवनाला योग्य आहे त्याची विवेचना करणें हाच देशधर्म या पदाचा अर्थ घ्यावयाला पाहिजे आणि आमच्या या म्हणण्याला प्रत्यंतर पुरावा मनुस्मृतीमध्येंच आहे. देशांची विभागणी करतांना मनु म्हणतो,[३]—

---

१ Passing of a great race by Madison Grant, Racial realities in Europe b Lothorp Stoddard.

२ मनु १–११८.

३ मनु २–२१–२४.

" हिमवद्विन्ध्ययोर्मध्यं यत्प्राग्विनशनादपि ।
प्रत्यगेव प्रयागाच्चमध्यदेशः प्रकीर्तितः ॥
आसमुद्रात्तुवैपूर्वात् आसमुद्रात्तुपश्चिमात् ।
तयोरेवांतरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः ॥
कृष्णसारस्तुचरति मृगो यत्रस्वभावतः ।
स ज्ञेयो यज्ञियो देशः म्लेच्छदेशस्त्वतःपरं ॥
एतान्द्विजातयो देशान् संश्रयेरन् प्रयत्नतः ।
शूद्रस्तु यस्मिन् कस्मिन् वा निवसेत् वृत्तिकर्षितः ॥ "

येथें मनु द्विजातींना वृत्तिकर्षित झाले तरी देखील हे देश सोडून जाऊं नये, असा उपदेश करीत आहे. अर्थातच त्याला औद्योगिक प्रगतीचें तत्त्व कळलेलें नव्हतें असें दिसतें. औद्योगिक क्रांतीनें काय चमत्कार[१] होतात आणि देशाची प्रगति कशी होते ही गोष्ट, त्यानें अलीकडील पदवीच्या परिक्षेला बसण्याइतकें अर्थशास्त्र जरी पाहिलें असतें तरी त्याला सहज कळून आली असती ! परंतु जुनाट लेखक ! त्याला इतक्या गोष्टी कोठून कळणार ? परंतु त्याला जातीच्या पोटाचा विचार मुख्यतः करावयाचा नसून, तें पोट ज्या जातीचें ती जातिच कोठें आणि कशी जगेल हा प्रश्न होता ! मुख्यतः पोटापाण्याच्या प्रश्नानें नव्हे, तर इतर कारणांनीं वंश नष्ट होतात असें त्याचें मत होतें आणि त्या इतर कारणांपैकीं वसतिस्थान ( Habitat ) हें एक प्रबल कारण म्हणून त्यानें प्रथमच दिलें आहे. म्हणून त्यानें द्विजातींना ( त्याच्या काळीं असलेल्या ) वसतिस्थाना-संबंधीं नियम घालून दिले आहेत. देशांतर करूं नये, समुद्रपर्यटन करून इतर देशाला जाऊं नये वगैरे जे शास्त्रशुद्ध नियम प्राचीन धर्मग्रंथकारांनीं लावून दिलेले आहेत, त्यांवर अलीकडील पंडितांनीं केलेलीं भाष्यें पोर-कटपणाचीं आणि अज्ञानमूलक आहेत !

बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे आनंदशंकर बापुभाई ध्रुव— रा. गांधी यांच्या डाव्या उजव्या हातांपैकीं एक उजवे हात—यांनीं आपल्या अस्पृशता-निवारणासंबंधीं लिहिलेल्या संस्कृत चोपड्यांत—

१ Industrial revolution by Toynbee.

सिंधुसौवीर सौराष्ट्रान् तथा प्रत्यंतवासिनः ।
अंगवंगकलिंगांश्च गत्वा संस्कारमर्हति ॥

या श्लोकावर भाष्य करतांना लिहिलें आहे कीं, त्या काळीं त्या त्या देशांत म्लेंच्छ राज्यें मातबर झालीं होतीं म्हणून हा श्लोक आला असेल ! नाहीं तर भगवान् श्रीकृष्ण सौराष्ट्राला जाऊन पुनः हस्तिनापुराला गेल्यावर त्यांची पुन्हां मुंज करावी लागली असती, अशी पोरकट कोटीही पण केली आहे ! परंतु त्यांच्या खुलाशानें या ग्रंथाचा अर्थ लागत नाहीं, ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आलेली दिसत नाहीं. मातबर राज्यें म्लेंच्छ करूं लागले म्हणून बाहेरील हिंदूंनीं तेथें जाऊं नये हें खरें. परंतु तेथेंच जे हिंदू होते त्यांना काय हिंदुसमाजशास्त्रज्ञांनीं म्लेंच्छ राजाच्या स्वाधीनच केले होते काय ? यवनाक्रांत सिंधुदेशामध्यें देवलस्मृति लिहिली गेली असें म्हणतात. तो देवल तरी निदान तेथें हिंदु होता ना ? आज देखील या सर्व देशांतून हिंदु वसति सांपडते. त्यावरून हिंदुसमाजरचनाकार सर्व देशांच्याकडे लक्ष देत होते असें वाटतें. अशा तऱ्हेनें यवनांच्या आगमनाचा घेतलेला आधार इतर उल्लेखांना उपयोगी पडत नाहीं ! मनूच्या काळीं अशा तऱ्हेचीं कांहीं यवन राज्यें प्रयागाच्या पूर्वेस असल्याचें इतिहास सांगत नाहीं. परंतु मनु त्या देशासंबंधीं द्विजातींनीं रहाण्याचे दृष्टीनें नापसंती दर्शवितो. त्याचें कारण प्रो. ध्रुव यांनीं सांगावयास पाहिजे. परंतु ते या गोष्टीकडे लक्षच द्यावयास तयार नाहींत !

तीच गोष्ट नागपुरचे पंडित के. ल. दप्तरी यांच्या लेखांची असलेली दिसून येईल. दप्तरी[१] म्हणतात त्यावरून वंग देशांत राहूं नये, किंवा जाऊं नये किंवा समुद्र ओलांडून जाऊं नये असा अर्थ निघत नाहीं. 'पुष्कळ आर्य, म्लेंच्छ देशांत एकदम जाऊन राहिले व तेथें त्यांनीं धर्माचरणाच्या बाबतींत एकमेकांस मदत केली तर गौतमस्मृतीस बाध येत नाहीं व इतिहासही असेंच सांगतो कीं, कृष्णादि यादवांनीं द्वारका वसविली आणि अगस्ति यांनीं आपल्या शिष्यांसह दक्षिण देश वसविला.' रा. दप्तरी यांच्या या वाक्याचा अर्थ इतकाच, राजश्री दप्तरी यांना दंतकथा ( Mythology ) आणि इतिहास यांतील फरक समजत नाहीं,

१ धर्मरहस्य २।१ दप्तरी, पान ४६.

आणि दंतकथांवरून इतिहास लावण्याची पद्धति माहिती नाहीं! 'अगस्त्यानें दक्षिण देश वसविला' असें ज्या इतिहासांत लिहिलें त्याच इतिहासांत तोच अगस्त्य समुद्र प्याला असें लिहिलें आहे. समुद्र पिणें लाक्षणिक अर्थानेंच शक्य आहे. म्हणून लाक्षणिक अर्थानें समुद्र पिणें आणि दक्षिणेकडे असणें हे दोनही ज्यामध्यें जास्त चांगल्या तऱ्हेनें लागत असतील तो या दंतकथेचा अर्थ लावावयास पाहिजे. त्याबरोबरच अगस्त्य हा कुंभसंभव आहे ही गोष्ट विसरून चालणार[1] नाहीं, तसाच अगस्त्य हा आकाशांत[2] रहातो : अगस्त्यो दक्षिणामाशामाश्रित्य नभसि स्थितः। वरुणस्यात्मजो योगी विन्ध्यवातापिमर्दनः। या सर्व कल्पनांचा अर्थ अगस्त्यानें दक्षिण देश वसविला असा लागत नसून, त्याचा अगस्त्य ताऱ्याच्या उदयाचा नैसर्गिकदृष्ट्या समुद्राच्या शांत होण्याशीं संबंध आहे. पं. दप्तरी ज्योतिषी आहेत त्यामुळें, अगस्त्योदय झाल्यावर समुद्राच्या वादळी लाटा शांत होऊन नावा हाकारण्यासारखें त्याचें पाणी शांत होतें हा अर्थ आम्हीं त्यांस सांगावयास पाहिजे असें नाहीं. हा अर्थ परंपरेनें बहुत आर्यांना माहीत होता. कालिदास म्हणतो, 'प्रससादोदयारंभः कुंभयोनेर्महौजसः[3]।' अगदीं कालपरवांपर्यंत हा अर्थ माहीत असावा असें दिसतें. एक कवि म्हणतो, 'यदा वर्षर्तुचे दिवस सखया जाति निघुनी। अगस्तीचा तारा चमकत पुन्हां नील गगनीं.' असो. मुख्यतः रा. दप्तरी यांचा देशविषयक अर्थ कसा काय लागतो एवढेंच बघावयाचें आहे. त्यांचें म्हणणें असें, एखादा वंशाचा वंशच जर एका वसतिस्थानांतून उठून दुसऱ्या वसतिस्थानांत जाईल तर त्याला काय हरकत असणार?

येथें प्रश्न असा आहे कीं, एका वसतींतून अत्यंत विभिन्न अशा वसतिस्थानाकडे जाणारा वंश तद्देशीय संकर केल्याशिवाय म्हणजे शुद्ध स्थितींत जिवंत राहूं शकतो काय? या प्रश्नाचें उत्तर जर नकारार्थी येईल तर, अशा वंशापुढें दोन तऱ्हेच्या शक्यता उभ्या राहतात. एक तर त्यानें शुद्ध वंश राखून मरून जावें अथवा तद्देशियांशीं संकर करून मिसळून जावें.

---

१ अमरकोश.

२ मल्लिनाथ and MacDonnel.

३ रघुवंश ४.

म्हणजे संकर प्रजेचाही प्रश्न येथें दत्त म्हणून पुढें उभा राहतो. म्हणजे संकरप्रजा कितपत स्थिर संस्कृति उत्पन्न करूं शकते, हाही प्रश्न प्रामुख्यानें पुढें येईल. त्याचा विचार पुढें करूं. येथें शुद्ध वंशाची स्थिति कशी होईल, याचा विचार करतों. अशा तऱ्हेनें एकच एक वंश घेऊन त्याचा विचार झालेला आहे, तो म्हणजे बाल्टिक समुद्राच्या भोंवतीं उत्पन्न होणारा नार्डिक वंश होय[१]. या वंशाचे इतिहासाचें येथें थोडक्यांत पर्यालोचन करूं. हा वंश प्रथमतः बाल्टिक समुद्राच्या भोंवतालच्या प्रदेशांत उत्पन्न झाल्यासारखा दिसतो. तेथून दक्षिणेकडे युरोपभर अनेक स्वाऱ्या करून त्या वंशाचे लोक युरोपांत पसरत चालले. तो चांगला लढवय्या असल्याकारणानें जगांतील अनेक देश जिंकून त्या त्या देशांमध्यें उच्च वर्ग होऊन राहिला. सर्वसाधारणतः या वर्गांतील लोकांचा बांधा उंच असतो. केंस भोरे आणि डोळे घारे असतात. हा निसर्गतः अस्थिर प्रवृत्तीचा भटक्या वर्ग आहे. या वंशाचें वर्णन पुष्कळ ग्रंथकारांनीं केलें आहे[२]. या वंशाचा वंशाभिमानानें उत्तर अमेरिकेंत नाश होत चालला आहे. इंग्लंडमध्यें देखील समुद्रकिनारीं त्याची चलती दिसत असली, तरीही एकंदर इतर सर्व ठिकाणीं उद्योगधंद्यांतून त्याची हकालपट्टी होत चालली आहे. त्याप्रमाणेंच पूर्वेतिहास पाहिला तरी तसाच परिणाम झालेला दिसतो. एचिअन्स या नार्डिक वंशाच्या शाखेचा ग्रीसमध्यें नाश झाला. लॉंबर्ड या शाखेचा उत्तर इटलींत निःपात झाला. स्पेन देशांत आणि आफ्रिका खंडांत व्हँडाल ही शाखा नामशेष झाली. हिंदुस्थान, ब्रह्मदेश, अमेरिकेचा उष्ण कटिबंधांतील भाग आणि आफ्रिका इत्यादि ठिकाणीं या लोकांची वसाहत होऊं शकत नाहीं. हिंदुस्थान देशांत दीडशें वर्षें राहात असूनदेखील शुद्ध इंग्रजरक्ताची तिसरी पिढी येथें पहावयास सांपडत नाहीं! मार्टिनिक आणि गुडालोपमध्यें शुद्धवंशीय फ्रेंच लोकांची भरभराट होत नाहीं, आणि तीच स्थिति डच लोकांची जावा

---

१ Passing of a great race by Madison Grant; Racial realities in Europe by Stoddard, Rising Tide of colours by Stoddard; Heredity and Eugenics by Gates.

२ Introduction to the study of heredity by McBride; The influence of race on history by Mrs. and Mr. Whetham.

बेटांत होते; उष्णकटिबंधांत हे नार्डिकवंश टिकाव धरूं शकत नाहींत. फिलिफाईन बेटांत असें दिसून आलें कीं, अमेरिकेनें जे सैनिक तेथें नेले होते त्यांपैकीं भुऱ्या केंसाचेच लोक तेथील रोगांना फार झपाट्यानें बळी पडत असत! क्वीन्सलँडमध्यें इंग्रजापेक्षां इटालियन जास्त टिकाव धरूं शकतो. नाताळ, ट्रान्सवाल आणि थोड्या प्रमाणांत अमेरिका याही देशांमध्यें इंग्रज वंशावर असाच परिणाम झालेला दिसून येतो. लक्षाधीश अगर भिक्षापति कोणीही कां असेना, इंग्रज वंशाचा मनुष्य अमेरिकेमध्यें नाशाकडेच चाललेला आहे. याच्या उलट अफ्रिकेंतून जे असंख्य निग्रो युरोपमध्यें नेले होते त्यांचा वंशज आज औषधाला देखील सांपडत नाहीं! असे अनंत पुरावे सृष्टींत सांपडत असून एका ठिकाणच्या वंशांनीं दुसरीकडे जाऊन वसति करावी असें म्हणणारे मुत्सद्दी, तत्त्ववेत्ते वगैरे पुढारीवर्ग त्या त्या समाजाचे हितकर्ते आहेत असें आम्हांला तरी म्हणतां येणार नाहीं. कारण भावनांनीं काढलेलें व वरवर पहाणीनें ठरविलेलें उत्तर, शास्त्रपद्धतीनें बरोबर जमत नाहीं! आपलें वसतिस्थान सोडून दुसरीकडे वसाहत करूं नका असें सांगणारे, 'अब्धौ द्विजस्य नौयातुः शोधितस्याप्यसंग्रहः।' धर्मशास्त्रकार चुकले होते असें म्हणण्याचें धाडस आधुनिक सुशिक्षितांनीं करावें; आम्हांला कांहीं तसें म्हणतां येणार नाहीं! कोणत्याही वंशांनीं तद्देशीय वंशांशीं जर रक्तसंकर किंवा जातिसंकर केला तर, असे परदेशी वंश दुसऱ्या वसतिस्थानांत जगूं शकतात, परंतु संकर-प्रजा उत्पन्न झाल्यास त्या गोष्टीचे अंतिम परिणाम काय होतात, भूतकालांत संकरप्रजा ज्या ज्या समाजांत उत्पन्न झाली, त्या त्या समाजांचें पुढें काय झालें, आज संकर प्रजा कोठें होत आहेत, त्याचेही परिणाम काय होत आहेत, संकर प्रजेंत उत्पन्न होणारी संस्कृति कितपत उच्च अगर टिकाऊ असते, या सर्व मुद्यांचा विचार जातिप्रकरणीं करूं. येथें इतकेंच सांगावयाचें, धर्मग्रंथांत जेथें धर्म शब्द येईल तेथें त्याचा अर्थ आचार असा नाहीं. एकंदर ग्रंथावरून ग्रंथ लावण्याचें आज जें खूळ माजलें, त्या नियमानें तर धर्म शब्दाचा आचार असा अर्थ घेतां येणारच नाहीं. विद्वज्जनांपुढें एवढीच विनंति आहे कीं, समाजाच्या जीवितासंबंधीं जे असे कांहीं प्रश्न असतात, त्या बाबतींत पक्षाभिनिवेश सोडून कठोर सत्य यावच्छक्य

शुद्ध शास्त्रीय पद्धतीनें शोधून काढण्याचा प्रयत्न व्हावयास पाहिजे.

### १९ लोकमत

लोकमत नांवाचें जें अजाण लेंकरूं असतें, त्या लेंकराचें मत शहाणेसुर्ते लोक घेतात हें पाहून काळाचा महिमा म्हणून स्वस्थ बसणें, याशिवाय दुसरा मार्गीच रहात नाहीं. या लोकमत नांवाच्या बालकानें आजपर्यंत वैदिक ज्ञानाच्या बाबतींत काय चमत्कार केलेले आहेत ते ज्यांना अवगत आहेत, त्या लोकांनीं तरी लोकमत आमच्या बाजूनें आहे असा आधार सांगत बसूं नये. आमच्या हिंदुसमाजानें बाबतींत वैदिक विचार करणाऱ्या मागील साठ-सत्तर वर्षांचा लोकमताचा इतिहास पाहून विचार करण्या-सारखा आहे. तेंच का लोकमत आमचे समाजसुधारक बंधू आपल्या चळ-वळींचा शास्त्रीय आधार समजतात; असा प्रश्न कोणीही ऐकल्यासमोर उभा राहिल्याशिवाय राहणार नाहीं. जें लोकमत साठ वर्षांपूर्वी ऋतुप्राप्तीनंतर विवाह करणें म्हणजे अधर्म मानीत असे, तेंच लोकमत आतां ऋतुपूर्वी विवाह करणें त्याज्य मानूं लागलें आहे. ज्या लोकमताला साठ वर्षांपूर्वी अस्पृश्यस्पर्शानंतर स्नानाची आवश्यकता वाटत असे, त्याच लोकमताला आतां अस्पृश्याला स्पर्श न करणें हा हिंदुधर्मावरील डाग आहे, असें वाटूं लागलें आहे! ज्या लोकमतामुळें साठ वर्षांपूर्वी मिशनऱ्यांच्या घरीं चहा घेतल्याबद्दल रा. ब. महादेव गोविंद रानडे आणि लोकमान्य टिळक अशा-देखील व्यक्तींवर बहिष्कार पडत असे, त्याच लोकमताला आतां मद्यपान, सहभोजन, हीं सुधारणेचीं अंगें वाटूं लागलेलीं आहेत! ज्या लोकमताला उच्चवर्गातील स्त्री पुरुषप्रधान धंद्यांमध्यें गेल्यास ती गोष्ट खपत नसे, त्याच लोकमताला ती गोष्ट आतां फारशी बोचत नाहीं. ज्या लोकमतामुळें तीस वर्षांपूर्वी ब्राह्मणांमध्यें शेंडी नसलेली आणि केस वाढविलेली व्यक्ति क्वचि-तच आढळली असती, त्याच लोकमतामुळें आज त्याच ब्राह्मण सुशिक्षि-तांत शेंडी ठेवलेली व्यक्ति क्वचितच आढळेल! 'यज्ञो दानं तपश्चैव पाव-नानि मनीषिणाम्।'[1] या नियमाला अनुसरून ज्या लोकमतानुसार ब्राह्मणादि वर्ण पंचमहायज्ञ, देवपूजा, त्रिसुपर्ण म्हणणें वगैरे क्रिया करीत होता, तेंच लोकमत आपल्या क्रिया करूं नका असेंच सांगत आहे! ज्या लोकमताच्या प्रमा-

१ भगवद्गीता.

वानें साठ वर्षांपूर्वी ब्राह्मणादिवर्ग शरीरशुद्धीकरितां स्नान, मनःशुद्धीकरितां संध्या—म्हणजे आसन, प्राणायाम, अघमर्षणादि विधि, शरीरशक्तीकरितां सूर्यनमस्कार ( आदित्यस्य नमस्कारं ये कुर्वंति दिने दिने । जन्मांतर सहस्रेऽपि दारिद्र्यं नोपजायते ।) इत्यादि आचार पाळीत असत, त्याच लोकमतानें आतां हितकारक गोष्टींना बहिष्कृत केलें आहे ! बुद्धिप्रामाण्याच्या अघळपघळ गप्पा मारणारा आणि अमेरिका युरोपमधल्या शरीरशक्ति कमावण्याबद्दल चाललेल्या प्रयत्नांचें स्तुतिस्तोत्र गाणारा वर्ग, वरील तीनही आचार समाजांतून कोणीं नष्ट केलें ही गोष्ट निःपक्षपातीपणें सांगण्यास तयार आहे काय ? किंवा असेंही असण्याचा संभव आहे कीं, सूर्यनमस्कारानें शरीरशक्तीच कमाविली जाते, आधुनिक व्यायामांनीं शरीरशक्तीच कमाविली जाते; परंतु आधुनिक व्यायामानें कमावलेली शरीरशक्ति ही बुद्धिप्रामाण्याच्या दृष्टीनें श्रेष्ठ ठरत असेल ! बुद्धिप्रामाण्य आणि नवमतवादित्व यांना काय काय बोध होईल तें कोणीही सांगूं शकणार नाहीं. संध्यावंदनाचे जे नियम आहेत, ते पाळल्यानें मनावर ताबा येतो यांत शंका नाहीं. तशा तऱ्हेचे नियम बुद्धिप्रामाण्यवादी पाश्चात्यदेखील आज पुढें मांडूं लागले आहेत[१] ! शीतोष्णसह पिंड बनविण्याच्या दृष्टीनें नियमित शीतस्नान करावयाचें, त्याच्या जागीं शीतसह पिंड करण्याकरितां आज पुलओव्हर, स्वेटर, मफलर इत्यादि वस्तू आल्या आहेत ! पुरुष या वस्तू वापरतात म्हणून निसर्गतःच ज्यांच्या अंगावरील चरबीमुळें ज्यास्त शीतसहत्व त्या स्त्रियाही पण आतां त्याच वस्तु उपयोगांत आणीत आहेत आणि हें सर्व लोकमतच चालू आहे !

धार्मिक आचारामुळें ज्या गोष्टी सहज घडून येत असत त्यामध्यें विकल्प उत्पन्न झाल्यामुळें त्या आतां सर्व ठिकाणीं घडून येत नाहींत असें दिसत आहे. जो व्यायाम आणि मनाचें एकीकरण शास्त्रीय दृष्टीनें विनामूल्य घरोघर आपोआप घडून येत असे, त्याकरितांच आतां क्रीडामंडळें स्थापन होऊन त्यावर उगीचच्या उगीच खर्च वाढूं लागला आहे ! परंतु लोकमत काय— त्यालाच आतां मदत करूं लागले आहे ! अशा तऱ्हेनें बालक-

---

१ Meditation and Art of Living by Arthur Havell.

बालिकांची घरामध्यें शांतपणें काम करण्याची आणि शितोष्ण सहन करण्याची शक्ति नष्ट झाल्यानंतर त्यांच्या हातून देशकार्य घडवून आणावयाचें आहे ! अमेरिकेमध्यें धार्मिकपणा वाढविण्याकरितां देवळाशेजारीं व्यायामगृहें आणि स्नानगृहें बांधलीं जातात असें सांगितलें जातें[१]. हिंदुस्थानांत तालमीजवळ मारुतीचें देऊळ आणि देवळाजवळ पाणवठा या गोष्टींचें असलेलें साहचर्य नष्ट करण्याचा प्रयत्न चालू आहे ! पोहोण्याचा व्यायाम फार उत्तम म्हणतात, तें पोहणें आरोग्यशास्त्राच्या नांवाखालीं बंद होत चाललें आहे ! अशा तऱ्हेनें सुधारणा चालू आहे ! अगदींच बारीकसारीक आचारापासून तों विवाहासारख्या सर्व आचारांच्या बाबतींत हाच खेळखंडोबा चाललेला आहे ! शीतस्नानानें शरीरांतील आद्यपिंडांची शक्ति वाढते, असा शोध अमेरिकेंतील लोक सांगतात[२]; तेंच शीतस्नान आपल्या चालीरीतींतून जात चाललें आहे ! वर्षाभरांतून कांहीं दिवस पोहणें म्हणजे नियमित शीतस्नान नव्हे.

आज लोकमताला पुष्कळ गोष्टी नावडत्या झाल्या आहेत. बालविधवांचे अश्रु अंतःकरणाला पीळ पाडतात, स्त्रियांवरील जुलूम अंगावर रोमांच उत्पन्न करतात, अस्पृश्यांची हीन दीन स्थिति अनुकंपा उत्पन्न करते, जातिजातींतील उच्चनीच कल्पना अगदीं भंडावून सोडतात; चांभार, लोहार, शेतकरी या वर्गांतून इतर देशांत मुसोलिनी, लेनिन अथवा स्टॅन्लेमार्क उत्पन्न होतात तर हिंदुसमाजांतून तसें कां न उत्पन्न व्हावेत ? मोठे होण्याचा मक्ता हा कांहीं विशिष्ट जातींनाच दिलेला नाहीं. जन्मजात उच्चनीचता व जन्मसिद्ध अस्पृश्यता ही येथेंच कां असावी ? अस्पृश्यतेचे आणि जन्माचे प्रतिबंध येथेंच कां असावेत[३] ? वरीलप्रमाणें लोकमताला काय पाहिजे आहे, त्याची एक त्रोटक जंत्री शास्त्रीबुवांनीं काव्यमय भाषेंत सांगितली आहे. याच्याशिवाय देखील लोकमताला काय पाहिजे आहे याची आणखी एक जंत्री देणें शक्य आहे ! स्त्रियांना समान हक्क असावे, स्त्रीशिक्षण वाढावें, सार्वत्रिक शिक्षण पसरावें, विधवांना विवाहाचा हक्क

१ डॉ. खेर यांचे सकाळ पत्रांतील लेख.
२ आरोग्यविषयक सकाळ पत्रांतील लेख.
३ धर्मशास्त्रमंथन-श्री. महादेवशास्त्री दिवेकर.

असावा आणि सधवांना काडीमोडीचा हक्क असावा, कुमारींना मुळींच विवाह न करण्यास परवानगी असावी, तरुण मुलांच्या दृष्टीनें विवाहबंधन नसून सहवासोत्तर विवाह असावा, अर्थशास्त्राच्या दृष्टीनें संततीनियमन सुरू करावें आणि हें सर्व स्वराज्य मिळविण्याकरितांच होय! त्यानें हिंदु-समाज समर्थ होईल, त्यानें देशाची प्रगति होईल, त्यानें स्वराज्य मिळेल, त्यानें देशांत सुबत्ता वाढेल, फार काय सांगावें त्यानेंच प्राचीन हस्तिनापूर नगरीप्रमाणें हिंदुस्थान[1] देश हा इंद्राच्या अमरावतीला देखील लाजवील!!

एवंगुणविशेषणविशिष्ट असें जें लोकमत, ज्याला कोणीही समंजस मनुष्य कधींही शास्त्रीय विषयांत बोलूं देणार नाहीं, त्या लोकमताचें समर्थन आणि समाराधन करण्याकरितां हल्लीं श्रुति, स्मृति, पुराणांची उलथा-पालथ चाललेली आहे! ह्या उलथापालथींचा या सर्व मुद्यांचें सत्यासत्यत्व अगर हिताहितत्व पहाणें हा हेतु नसून त्यांचें सर्व दृष्टीनें समर्थनासमर्थ-नीयत्व पहाणें एवढाच आहे! मग जर कां हे ग्रंथ अनधिकारि लेखकाच्या तडाक्यांत सांपडले तर काय काय चमत्कार दिसून येतील तें सांगणेंच कठीण आहे. एक उदाहरण देतों: 'वात्स्यायनानें स्वभार्येशीं कसें वागावें, हें ज्याप्रमाणें सांगितलेलें आहे, त्याप्रमाणें परस्त्रीशीं संबंध कसा जोडावा हें 'पारदारिकम्' या प्रकरणांत सांगितलेलें आहे. धडधडीत व्यभिचारास मदत करणारें हें प्रकरण वात्स्यायनांनीं कां लिहिलें? असले अधर्म्य उपाय शास्त्रांत गोंवणारा समाजघातक नव्हे काय[2]?' वरील उतारा वांचून हसावें कीं रडावें त्याचाच आम्हांला उलगडा होईना! लेखक तर संस्कृतज्ञ दिसतो आणि तो लोणावळ्याच्या कैवल्यधामामध्यें दर्शनाध्यापक आहे. मग हा वरील उतारा लिहिण्यांत लेखकाचा काय हेतु असेल याचा मनाला कांहीं बोध होईना. कारण कीं, त्याच 'पारदारिकम्' प्रकरणाच्या शेवटीं पुढील श्लोक सांपडतात.—

"संदृश्य शास्त्रतो योगान् पारदारिकलक्षितान्।
न यातिच्छलनां कश्चित् स्वदारान् प्रति शास्त्रवित्॥

---

१ हसितसुरपुरश्रीरस्तिसा हास्तिनाख्या। रिपुजनदुरवापा राजधानी कुरुणाम्॥ चंपू भारत.

२ धर्मस्वरूप निर्णय—तर्कतीर्थ कोकजे.

सांशयिकत्वात्प्रयोगाणां अपायानांच दर्शनात् ।
धर्मार्थयोश्च वैलोम्यान्नाचरेत्पारदारिकम् ॥
तदेतद्दाररक्षार्थमारब्धं श्रेयसे नृणाम् ।
प्रजानां दूषणायैव न विज्ञेयोऽस्य संविधिः ॥

टीकेमध्यें यशोधर म्हणतो, 'तर्हि किमर्थं तदधिकरणमुच्यते इतिचेदाह— तदेतदिति । नहि तदर्थं मुख्यं विधानमित्यर्थः । इति दाररक्षितकमेकोन पंचाशत्तमं प्रकरणं'[1] । येथें तर वात्स्यायनानें स्वतः आणि टीकाकार यशोधरानें हें सर्व शास्त्रांवरून समजून घेऊन समाजकंटकांपासून आपल्या स्त्रियांचें रक्षण करून, श्रेयस प्राप्त करून घ्यावें याकरितां हें पारदारिक प्रकरण लिहिलें असें स्पष्ट सांगितलेलें आहे ! असें असून देखील तर्कतीर्थांनीं वरील दोन प्रश्नार्थक वाक्यें विचारावीं हें महदाश्चर्य आहे ! यामध्यें दोन पक्ष संभवतात. एक तर या लेखकानें वात्स्यायनाचा ग्रंथ वाचलेला नसावा आणि कांहीं तरी कोणाच्या तरी माहितीवर विधान करून दिलें असावें. तसें असेल तर अशा गृहस्थांनीं कामसूत्राच्या स्वरूपाचा निर्णय करण्याच्या भानगडींत पडूं नये. दुसरें असें कीं, लेखकानें ग्रंथ वाचला असून त्याला आम्हीं लिहिलेले श्लोक माहीत होते; तसें असून जर त्यानें वरील विधानें केलीं असतील, तर हा लेखक सत्याचा अपलाप करणारा आहे. म्हणून आप्त म्हणजे यथार्थ वक्ता नाहीं. असो. अशा तऱ्हेच्या अनेक मौजा सुधारणा करूं इच्छिणाऱ्या पंडितांच्या ग्रंथांत दाखवूं, परंतु स्थलाभावास्तव दाखवितां येत नाहीं. या पंडितांनीं समर्थनीयत्वाचे दृष्टीनें पाहिलें असल्यामुळें त्यांनीं प्रमाण-प्रमेयवादाची फारशी चर्चा केलीच नाहीं ! परंतु जी कांहीं केली आहे त्याचें परीक्षण पुढें यथावकाश येईलच.

येथपर्यंत देशधर्म या शब्दासंबंधीं चर्चा झाली. दुसरा शब्द मनूनें जातिधर्म हा घेतला आहे. येथें धर्म शब्दाचा अर्थ काय करावयाचा आणि जाति शब्दाचा अर्थ कसा समजावयाचा ? मनूच्या मतानें हे सर्व शाश्वतधर्म आहेत. धर्म शब्दाचा आचार अर्थ केल्यास तो शाश्वत कसा होणार ? आमचे श्री. महादेव-

[1] कामसूत्र—वात्स्यायन, पान २०४-२०५.

शास्त्री दिवेकर[1], तर्कतीर्थ कोकजे[2], महामहोपाध्याय गुरुवर्य श्रीधरशास्त्री[3] पाठक हे तर आपणाला रोज सांगत आहेत कीं, आचार परिवर्तनीय आहेत. मनु तर म्हणतो कीं, 'जातिधर्म शाश्वत आहेत.' आम्ही अज्ञ लोकांनीं सर्व गोंधळाचा अर्थ कसा लावावा ? आम्हांला असें वाटतें कीं, धर्म म्हणजे त्या त्या जातिमध्यें दिसून येणारे नैसर्गिक गुणधर्म आणि जाति म्हणजे जन्मानें मनुष्याला प्राप्त होते ती. म्हणजे इंग्रजीमध्यें species. एवढें खरें कीं, मनु वर्णांचे आचार सांगतो तसे जातींचे आचार सांगत नाहीं ! कांहीं ठिकाणीं जातींचे धंदे सांगतो परंतु धंदे म्हणजे कांहीं आचार नव्हेत ! अल्पांशानें सर्वच परंतु मुख्यतः जातींचे पिंडगत गुण सांगावयाचे आहेत असें वाटतें. जेथें मनु धंदा सांगतो तेथें त्यानें तो जातीची लायकी धरून सांगितलेला आहे. प्रत्यंतर पुराव्यानें हें दाखविण्याकरितां आपण कांहीं प्रत्यक्ष श्लोक घेऊन त्यांचा जातिशास्त्रानें अर्थ कसा काय लागतो तें पाहूं. उदाहरणार्थ, —

क्षत्रियांच्छूद्रकन्यायांक्रूराचार विहारवान् ।
क्षत्रशूद्रवपुर्जन्तुरुग्रोनाम प्रजायते[4] ॥

आयुधजीवि क्षत्रियांपासून शूद्रकन्येच्या ठायीं म्हणजे वांशिकदृष्ट्या हीन स्त्रीयेच्या ठायीं उग्र नांवाचा पुत्र उत्पन्न होतो आणि त्याचे आचार-विहार हे क्रौर्यप्रधान असतात. या तत्त्वाची आपणांला जागतिक इतिहासांत काय माहिती सांपडते, त्याचा विचार करूं. डार्विन म्हणतो, प्रत्येक प्रवाशाच्या लक्षांत ही गोष्ट येऊन चुकलीच आहे कीं, संकरजाति अत्यंत क्रूर असतात[5]. लिव्हिंगस्टनचें मत देऊन तो असें सांगतो कीं, झांबेझी नदीच्या आसपासच्या प्रदेशांत पोर्तुगीज आणि तद्देशीय लोक यांच्या संकरानें जीं प्रजा उत्पन्न झाली ती दोन्ही मूळ जातिपेक्षां जास्त क्रूर कां होते, याचें कारण

१ धर्ममंथन.

२ धर्मस्वरूप निर्णय.

३ वरील ग्रंथांच्या प्रस्तावना आणि पुष्कळ लेख.

४ मनु ९-२९९.

५ **Variation of plants and animals under domestication by Darwin.**

जरी कोणालाही सांगतां येत नसलें, तरी ती गोष्ट निश्चित आहे. या बाबतींत कोणालाही शंका घेण्याचें कारण नाहीं. तेथल्याच एका रहिवाशानें लिव्हिंगस्टनला पुढीलप्रमाणें कारण सांगितलें, 'श्वेतवर्णीय मनुष्य हा परमेश्वरानें उत्पन्न केला, त्याप्रमाणेंच कृष्णवर्ण मनुष्यही परमेश्वरानेंच उत्पन्न केला, परंतु संकर प्रजा ही सैतानानें उत्पन्न केली असावी!' त्याप्रमाणेंच तांबडे इंडियन आणि निग्रो यांचेही संकर अत्यंत क्रूर होतात, असेंही मत हंबोल्टनें दिलेलें आहे, असें डार्विन सांगतो. ही माहिती मनूच्या श्लोकांशीं ताडून पाहिल्यास मनु वाटेल तें कांहीं तरी लिहिणारा ग्रंथकार नाहीं, एवढी गोष्ट तरी लक्षांत येईल. आतां त्यानें उग्र असेंच कां नांव दिलें तर त्याला ह्या लोकांतील क्रौर्यादि गुण उग्र नांवाच्या जातीच्या लोकांशीं समान दिसले. आज देखील उग्र आणि फिनिशियन (पणी) या लोकांच्या संकरापासून जे[१] लोक उत्पन्न झाले व आज पृथ्वीवर नांदत आहेत, ते किती क्रूर आहेत याची इतिहास साक्ष देऊन राहिला आहे! दोन्ही ठिकाणची परिस्थिति वेगळी असून, परिणाम मात्र तंतोतंत एक झाले याचा समाजशास्त्रज्ञांनीं विचार करावयास पाहिजे असें मला वाटतें. दुसरा एक धंदे सांगणारा श्लोक विचाराकरितां घेऊं.

'सूतांना अश्वसारथ्यं अम्बष्ठांना चिकित्सनम् ।
वैदेहकानां स्त्रीकार्यं मागधानां वणिक्पथः[२] ॥

ह्या चारही संकरजाति आहेत आणि त्यांच्या मातापित्यांचा उल्लेख मनूनं केलेला आहे. मनूनें येथें त्यांना धंदे लावून दिले आहेत. सूतानें अश्वसारथ्य करावें, त्याचप्रमाणें सूत हे वक्ते आणि कविही पण आहेत आणि म्हणूनच ते महाभारत सांगावयास बसलेले आहेत. अम्बष्ठ या संकर जातिनें वैद्याचा धंदा करावा. वैदेहक जातिनें स्त्रीकार्य म्हणजे कलाकौशल्यांत प्राविण्य मिळविणें, ही गोष्ट करावी. मागधांनीं व्यापार करावा. युरोपियनांची काटेतोल जातिविभागणी झाली नसली तरी त्यांना संकर या शब्दाचा अर्थ बरोबर कळतो आणि त्यांनीं या संकर जातींत निसर्गतः काय गुण निर्माण होतात ते नमूद करून ठेवलेले आहेत. त्याची मनुवाक्यांशीं तुलना करूं.

१ Lost Dominion—A. L. Carthill.

२ मनु.

युरोपियन हा जिज्ञासू असल्याकारणानें तो त्याची जंती करून ठेवतो. इतका गुण जरी हिंदुस्थानांतील समाजसुधारकांत अवतीर्ण झाला तरी, पुष्कळच फायदा झाला असें म्हणावयास आम्हांला कांहींही हरकत नाहीं ! वैदेहकानां स्त्रीकार्यें करा असें मनु सांगतो. प्रो. बुगलें[1] म्हणतो, 'ब्राझील देशांतील सर्व चित्रकार आणि वजवय्ये हे संकर प्रजा आहेत.' अम्बष्ठ या संकर जातीनें वैद्यकी करावी. तोच ग्रंथकार म्हणतो, 'त्याच देशांतील जवळ जवळ सर्वच वैद्य हेही पण संकर प्रजाच आहेत.' सूत हे रथकार, त्याचप्रमाणें कवि आणि वक्ते होतात. तोच ग्रंथकार म्हणतो, 'वेनेझुएला देशांत मुलॅटो–म्हणजे निग्रो आई आणि श्वेतवर्णीय बाप यांच्या संकरापासून झालेली प्रजा–कवि आणि वक्ते या नात्यानें प्रसिद्धी पावलेली आहे.' ब्रेझिल आणि वेनेजुएला या देशांत तरी मनुसारखे पक्षांध दुष्ट[2] लेखक आणि जातिसंस्थेसारखी विनाशक[3] संस्था नाहीं ना ? मग तेथें निसर्गानेंही त्या संकरजातीला त्या त्या धंद्यांतच जास्त कौशल्य कां दिलें ? त्यांचीं कारणें पक्षांतीत असलेले आजचे सुधारक किंवा त्यांचे अनुयायी यांनीं आम्हांस समजावून सांगावी अशी त्यांना अत्यंत विनयानें आणि नम्रभावानें विनंति आहे, तिचा त्यांनीं अव्हेर करूं नये. मनूनें दिलेल्या संकर जातींच्या धंद्यांची तुलना तिकडील म्हणजे सुधारलेल्या पाश्चात्य देशांतील लेखकांनीं लिहून ठेवलेल्या संकर जातींच्या धंद्यांशीं केल्यास मनु फारसा कांहीं चुकला नाहीं असें दिसून येईल. युरोपांतील पंडितांना आनुवंश, संकर वगैरे प्रश्न नुकतेच म्हणजे या पांचपन्नास वर्षांत कळूं लागले आहेत. ते जसा जसा त्यांचा जास्त अभ्यास करतील, तसा तसा त्यांना जातिभेद हा नैसर्गिक म्हणून रक्षणीय आहे हें तत्त्व कळूं लागेल[4] ! येथें जातिधर्म या शब्दाचा अर्थ जात्याचार असा घेतां येणार नाहीं, इतकी गोष्ट जरी विशद झाली तरी पुष्कळ, एवढीच आशा करतों.

तिसरें पद कुलधर्म असें घेतलेलें आहे आणि ते कुलधर्म शाश्वत आहेत.

---

१ De Democratie devant La science by E. Bougle.

२ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न–शिंदे.

३ Ancient law by H. S. Maine.

४ Anti-christ by Nietzsche.

येथेंही कुलधर्म या पदाचा कुलाचार असा अर्थ करतां येणार नाहीं;तर त्या कुलां-मध्यें दिसून येणारे नैसर्गिक गुणधर्म असा अर्थ केला पाहिजे. मनूनें कुलाचार कोठेंही सांगितले नाहींत. परंतु कुलधर्म मात्र विवाहप्रकरणीं सांगितले आहेत. श्री. महादेवशास्त्री दिवेकर म्हणतात, 'मोठें होण्याचा मक्ता कोणाही जातीला दिलेला नाहीं.' परंतु त्यांना आम्हीं येथें इतकेंच बजावतों, मोठें होण्याचा मक्ता कुलवानांना दिलेला आहे.' या विधानाची सांगोपांग चर्चा 'समाजरचनेमध्यें विवाहाचें स्थान' या विषयाच्या चर्चेंत करूं. परंतु कुलधर्म म्हणजे कुलांत दिसून येणारे नैसर्गिक गुणधर्म, हाच अर्थ प्रस्थापित होईल असें मला वाटतें.

**२० समाजरचनेचीं तत्त्वें**

समाजरचना करणाराला आणि नैतिक मूल्यें ठरविणाराला किती गोष्टींचा विचार करावा लागतो,याचें वर दिग्दर्शन केलें. आतां समाजरचनेच्या तत्त्वाकडे वळूं. मनुष्यप्राणी हा आपणाला जीवजातिमधील श्रेष्ठ जाति असें समजतो. परंतु तो आपणाला सृष्टीच्या बाहेरील कांहीं समजत नाहीं, त्यामुळें मनुष्याच्या समाजाची किंवा त्याची उत्क्रांति हा प्रश्न मुख्यतः सर्वसाधारण उत्क्रांति या कल्पनेचें एक अंग ठरेल. सर्वसाधारण उत्क्रांतीमध्यें जीवजातीची उत्क्रांति हें एक अंग आणि त्या विभागामध्यें मानवाची उत्क्रांति हें एक दालन. याचा अर्थ असा कीं, सर्वसाधारण उत्क्रांतीचे नियम हे जीवजातीच्या उत्क्रांतीला लागू आणि जीवजातींच्या उत्क्रांति अपक्रांतीचे नियम मानवसमाजाला लागू, अशी स्थिति आहे. या दोघांचेही स्वतःचे असे कांहीं नियम असतील, परंतु त्यामुळें त्यांची उत्क्रांतीच्या सर्वसाधारण नियमापासून कांहीं सुटका होत नाहीं. म्हणून कोणाही समाजशास्त्रज्ञानें आपल्या मताप्रमाणें सृष्ट्युत्क्रांतीचे नियम सांगून मग समाजशास्त्र सांगितलें पाहिजे. मनूनें बरोबर हीच गोष्ट केलेली आहे. त्यानें सृष्ट्युत्पत्तीबद्दल सांगितलेल्या कल्पनेचें शास्त्रीयाशास्त्रीयत्व ठरविण्याचें हें स्थळ नव्हे,

१ Eugenics by Dean Inge; Hereditary genius by Galtan; Future of life by Hurst; National life by Karl Pearson.

२ मनु १-१५७.

परंतु त्यानें सुरवात बरोबर केली आहे एवढीच गोष्ट येथें निदर्शनास आणावयाची आहे !

सृष्टीची प्रक्रियाच पाहूं लागलों तर असें दिसून येईल कीं, सृष्टीमध्यें एक एक अशा सुट्या व्यक्ती उत्पन्न होतात आणि मग सृष्टि त्यांचे गट तयार करते. आपणाला पहावें लागेल तें असें कीं, ही सृष्टीची गट करण्याची पद्धति आपण हिंदुसमाजांत जाति या शब्दानें जी कल्पना समजतों, त्या कल्पनेशीं कितपत जुळती आहे. अशा व्यक्तींपैकीं कांहीं आपणाला ताबडतोब कोणत्या तरी गटांत घालतां येतात. परंतु सर्वांबद्दल आपणांला कांहीं तसें म्हणतां येणार नाहीं. म्हणून शुद्ध जाति आणि संकर जाति यांच्या संबंधींचा प्रश्न म्हणजे रसायनशास्त्रांतील शुद्ध धातु आणि खनिज धातु यांच्या प्रश्नासारखा आहे. तो प्रश्न सोडवावयाचा तर रसायनशास्त्रांतील प्रश्नांप्रमाणेंच प्रयोगशाळेंत सोडवावयास पाहिजे. व्यक्तींचे गट बनून त्यांची जाति तयार होते. त्या गटाच्या अंतर्भूत कुटुंब नांवाचा एक गट असतो. यांपैकीं कुटुंब हा गट कोणता समजावा हा प्रश्न जरी पूर्ण निर्विवाद नसला तरी बऱ्याच अंशानें निर्विवाद आहे. परंतु जाति या गटाची कल्पना कांहीं तितकी निर्विवाद नाहीं. मग जातीची व्याख्या करण्याचे वेगवेगळ्या लोकांकडून वेगवेगळ्या तऱ्हेनें प्रयत्न केले जातात. कोणी बाह्य शारीर आकारानें ( Somatic traits ) मोजमाप ठरवून त्यावरून गटाची व्याप्ति निश्चित करूं पाहतात. दुसरे भाषाशास्त्राचा (Philology) अभ्यास करून त्याच्या आधारें गटांचें साधर्म्य सांगूं लागतात. तिसरे गटांतील कांहीं चालीरीति प्रधान मानून त्यांच्या तुलनेनें गट निश्चित करण्याचा प्रयत्न करतात. परंतु हीं सर्व बाह्य चिन्हें अदलाबदल होण्यासारखीं असल्यानें त्यांपासून प्राणिशास्त्रीय जाति (breeding unit) निश्चित होऊं शकत नाहीं. आम्ही प्राणिशास्त्रीय जाति कशाला म्हणतों, त्याची सांगोपांग चर्चा 'जातिव्यवस्था' प्रकरणीं करूं. येथें इतकेंच दाखवावयाचें आहे कीं, जातिनिश्चिति करणें हें आमच्या इकडच्या सुधारकांना वाटतें तितकें सोपें नाहीं ! पूर्वीं वर्ण होते आणि पुढें त्यांतून जाति उत्पन्न झाल्या असें जे लोक म्हणतात, त्यांना हा प्रश्नच कळला नाहीं असें म्हणणें भाग आहे ! युरोपमध्येंदेखील पहिले अभ्यासक

१ Evolution by means of Hybridization by J. P. Lotsy.

ज्याप्रमाणें मोठा वर्ग (genus) घेऊन त्याला एकरूप लहान वर्ग (Species) समजत त्याप्रमाणेंच आपल्या इकडे हिंदुस्थानांत स्थिति झाली. प्रथम मोठा वर्ग गृहीत धरला आणि त्यामध्यें नांशिकदृष्ट्या गट पडूं लागले तर ते पाडूं नयेत, असें मात्र कोणत्याही युरोपांतील शास्त्रज्ञानें म्हटलेलें माझ्या वाचनांत नाहीं. जातीची नुसती शाब्दिक व्याख्या करणें किती अवघड आहे ही गोष्ट पाश्चात्य, शास्त्रज्ञ असल्याकारणानें आणि त्यांना नुसत्या शाब्दिक कोट्या आणि शब्दार्थांवर कसरत करावयाची नसल्यानें पूर्ण माहिती आहे. डार्विन म्हणतो, ' जाति या शब्दाच्या ज्या अनंत व्याख्या दिल्या गेल्या आहेत त्यांचीही पण मी येथें चर्चा करीत नाहीं. कोणतीहि एक व्याख्या प्राणिशास्त्रज्ञांना मान्य झालेली नाहीं. परंतु प्रत्येक प्राणिशास्त्रज्ञाला सर्वसाधारणतः जाति कशाला म्हणावें याची सर्वसाधारण कल्पना असते.'[1] युरोपांतील कार्टेकोर शास्त्रांची भक्ति गाणारांनीं डार्विनचे वरील शब्द जरूर लक्षांत ठेवावे. हिंदुसमाजांतील प्रत्येक व्यक्तीलादेखील, जाति म्हणजे काय या गोष्टीची सर्वसाधारण कल्पना असते. ती जाति नाहीं असें म्हणणाऱ्या नवीनांनीं जातीचें शुद्ध लक्षण सांगून त्याप्रमाणें हल्लीं हिंदुस्थानांत असलेल्या जाति या प्राणिशास्त्रीय जाति नव्हेत, असें दाखवून द्यावें अशी त्यांना विनंति आहे. असें त्यांनीं दाखविल्यास वादाचा धुरळा कमी होईल असें मानण्यास पुष्कळच जागा आहे. अशाच तऱ्हेचें म्हणजे, जातीची व्याख्या करण्याच्या कठीणतेबद्दलचें मत अर्नेस्ट हेकेलनें मॉर्फालजीमध्यें दिलेलें आहे.

सर्वसाधारण सृष्टीमध्यें जीवजातींच्या उत्क्रांति अपक्रांतीचे काय नियम आहेत आणि ते मनुष्याला कितपत लागूं पडतात, त्याचा आतां विचार करूं. जीवसृष्टीमध्यें देखील कांहीं जीवजाति तगून राहतात आणि कांहीं नष्ट होतात. ही प्रत्यक्ष स्थिति पाहिली म्हणजे सृष्टींत उत्क्रांति आणि अपक्रांति या दोनही प्रक्रिया चाललेल्या आहेत, ही गोष्ट सहजच नजरेस येईल. त्या दोनही प्रक्रियांचे नियम आपणांस समजावून घेतले पाहिजेत. तरच आपला सृष्टींत तगाव लागेल. सृष्टीला कोणाचाही मुलाजा वाटत नाहीं, ही गोष्टही विसरतां कामा नये !

१ Origin of species by Darwin.

मानवसमाजाकडे वरवर पाहणाराला सारखा फरक पडत आहे, असें वाटतें. म्हणून तो सृष्टीच्या मागें प्रगतीच्या कल्पनांचें लोढणें अडकावून देतो. उलटपक्षीं डोंगर, नद्या वगैरे स्थावराकडे पाहणाराला सृष्टि मुळींच हालत नाहीं असा भास होतो! शिवाजीमहाराज अगर नाना फडणीस जर पुन्हां त्याच नामरूपांत अवतीर्ण झाले तर, त्यांना हल्लींच्या सुधारलेल्या पुढाऱ्यांच्या चालीरीतींची ओळख पटेल कीं नाहीं, हें सांगणें बरेंच कठीण आहे. परंतु डोंगर नद्यादि स्थावरांची मात्र तावडतोब ओळख पटेल! मग सृष्टि स्थिर आहे कीं, तिची प्रगति होत आहे? जीवसृष्टींत हालचाली चाललेल्याच आहेत, परंतु त्यांतील उत्क्रांतींतील कोणत्या आणि अपक्रांतीतील कोणत्या त्यांची विवेचना आपणांस करावयाची आहे.

जीवसृष्टीकडे पाहिलें तर एक तऱ्हेची निश्चित प्रणाली असलेली दिसून येते. त्या प्रणालीला शास्त्रीय भाषेंत नैसर्गिक निवड असें म्हणतात. जातीं संख्या व गुण या दृष्टीनें जर कार्यक्षम व्हावयाची असेल तर, तोच नियम सर्व ठिकाणीं लागू असलेला दिसून येईल. अशा तऱ्हेचें नैसर्गिक निवडीचें तत्त्व उपयोगांत यावयाचें तर त्यामध्यें पुढील चार तत्त्वांचा अंतर्भाव व्हावा लागतो. ( १ ) प्रजेचें अतिशय मोठ्या प्रमाणावर उत्पादन ( excessive Fecundity ), ( २ ) आनुवंश ( heredity ), (३) अनंत गुणांचें एकाच ठिकाणीं अस्तित्व आणि त्यांचीच वेगवेगळी मांडणी होण्याची प्रक्रिया ( Variation ) आणि ( ४ ) सृष्टीनें केलेली निवड. या चारांपैकीं एकही तत्त्व जर कमी झालें, तर मग तो समाज सुशिक्षित असो अगर अशिक्षित असो, सृष्टींतून नष्ट होणार!

२१ नैसर्गिक निवड

या एक एक गुणांचा विचार करूं. पहिला प्रश्न असा येईल कीं, अतोनात प्रजावृद्धीची काय जरूरी आहे? आज तर जगभर प्रजा कमी करण्यांत यावयास पाहिजे, असें मत प्रचलित झालें आहे. त्याची झळ हिंदुस्थानालाही लागण्याचा संभव दिसत आहे. अशा तऱ्हेचीं मतें सरकारी अधिकाऱ्यांनीं १९३१ सालच्या खानेसुमारीच्या अहवालांत दिलेलीं आहेत. आज 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' ह्या जुन्या आशीर्वादाच्या जागीं 'एकपुत्रा मोटारवतीभव' असा पर्याय येऊं लागला आहे. ही सुशिक्षितांची प्रवृत्ति

त्याच्या [illegible] दृष्टीनें योग्य आहे किंवा नाहीं, याचाही विचार करितां येईल. [illegible] या विषयाचा पूर्ण विचार पुढें करीन. सृष्टि अशी कार्यें [illegible] सृष्टीचा असा हेतु दिसून येतो कीं, अनंत जीव निर्माण करून त्यांतील जे कोणते परिस्थितीशीं टिकाव धरून रहाण्याला लायक नसतील, त्यांना नाश करून टाकावयाचा. म्हणजे जे आपल्या [illegible] टिकून राहिले ते, [illegible] झालेल्या जीवपिंडापेक्षां कोणत्यातरी गुणानें [illegible] असणार. या प्रक्रियेमध्यें दोन गोष्टी गृहीत धरलेल्या आहेत. पहिली म्हणजे, जितक्या जीवांचें भरणपोषण करण्याइतकें अन्नाच्छादन मिळत असेल त्यांपेक्षां जास्त जीव उत्पन्न झाले पाहिजेत. मग त्यांच्यामध्यें जीवनार्थ कलह होऊन त्यांपैकीं सबल व्यक्तींची निवड व्हावयास पाहिजे. म्हणजे सबल [illegible] शिल्लक राहतील. अलीकडे समाज उत्तम स्थितींत [illegible] नैसर्गिक पद्धति [illegible] नावडती होत चालली आहे ! आधुनिकांचें म्हणणें असें कीं, जितक्या जीवांचें पालनपोषण करणें शक्य आहे, तितकीच प्रजा उत्पन्न [illegible] त्या प्रजेची चांगल्या तऱ्हेनें काळजी घेतां येईल आणि मग सृष्टीच्या पद्धतीमध्यें जी अनावश्यक जीवहानि फुकट जाते, ती फुकट जाणार नाहीं आणि मनुष्यप्राण्यानें [illegible] कशी होईल. [illegible] शक्य नसून मनुष्यानें नाश टाळण्याचा प्रयत्न आहे ! या दोन्ही पद्धतींची तुलना करण्यापूर्वी प्रथमतः दोनही पद्धतींचा स्वरूपतः विचार करूं. म्हणजे तुलना करण्यास बरें पडेल.

सृष्टीच्या पद्धतीचें मूलतत्त्व असें आहे कीं, जेवढे पिंड पोसण्याइतकें अन्नाच्छादन असेल, त्यांपेक्षा जास्त पिंड निर्माण व्हावयास पाहिजेत. मग त्यांतून निवडक आणि लायक असे पिंड शिल्लक उरावयाचे. सर्वच एका तऱ्हेचे पिंड असले म्हणजे आधुनिक सुधारलेल्या भाषेंत बोलावयाचें तर सर्वच समान असले तर निवड कशी करावयाची ? निवड हा शब्द [illegible] होईल ! आज तर शास्त्रज्ञ नैसर्गिक भिन्नतेचें [illegible] सांगत आहेत आणि सुधारक, समाजाचे पुढारी वगैरे सर्व लोक मानवी समानतेची घोषणा करीत आहेत ! शास्त्रज्ञांची घोषणा खरी असल्यास आधुनिक समाजाचे पुढारी समाजांना कळत अगर न कळत नाशाच्या मार्गाकडे नेत आहेत असेंच ठरेल. म्हणून शास्त्रज्ञांच्या प्रणालीला

धरून विचार करावयाचा तर, जे पिंड निर्माण झाले त्यांच्यामध्यें फरक असावयास पाहिजे. हा फरक तर कोठून येतो? एकाच आईबापांची वेगवेगळी संतति असते, त्यांच्यामध्यें असा फरक असतो काय? तसा नसेल तर सर्वच सारखी जगावयास पाहिजे. तसें तर घडत नाहीं, त्याअर्थी त्यांच्यामध्यें फरक असलाच पाहिजे. हा फरक कसा असतो तें पहावयास पाहिजे. कारण या फरकाचें यथार्थ ज्ञान नसल्याकारणानें, हिंदुस्थानांतील कांहीं पंडित जात्यंतर, वर्णान्तर वगैरे सिद्धांत उचलून धरूं लागले आहेत. फरक पडणें या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. त्यांपैकीं कोणता अर्थ या पंडितांना मान्य आहे, तें त्यांनीं विशद करावयास पाहिजे.

( १ ) बाह्यगुणांत दिसून येणारे थोडे थोडे फरक हेच फरक हळूहळू जमत जाऊन अनेक पिढ्यांनीं त्याचा परिमाण भासूं लागणें. जसें जिराफाची मान उपयोगानें लांब वाढत चालली. ती आतांही पुढें कां वाढत जात नाहीं कोण जाणे !

( २ ) एकदम गुणामध्यें फरक—अकारण फरक पडून तो आनुवंशिक होत जाणें. यालाच शास्त्रीय भाषेंत अकारण फरक (mutation) असें म्हणतात.

यापैकीं पहिल्याचा फारसा विचार करण्याचें कारण नाहीं, कारण त्यामध्यें तत्त्वज्ञान आणि प्रत्यक्ष प्रयोग या दोनही दृष्टीनें अतिशयच दोष आहेत. या तत्त्वाचे अनेक अर्थ सांगतां येतील[1]. जीवजातामध्यें जें जन म्हणून आहे त्याच्यामध्यें अशा तऱ्हेचे फरक घडवून आणण्याचें सामर्थ्य असेल. यामध्यें पुढील दोन तत्त्वें गृहीत धरावीं लागतात. पिंडामध्यें कांहीं तरी अशी व्यवस्था ( mechanism ) आहे कीं, त्यामुळें होणारे फरक आधींच ठरून ते प्रत्यक्ष सृष्टींत अवतीर्ण होतात. दुसरें, प्रत्येक प्राण्याची वासना अशीच असते कीं, ज्यामुळें त्याच्या सर्व शरीरांत आणि शरीराच्या प्रत्येक इंद्रियांत हितकारक असेच फरक पडावेत. उपयोग अगर अनुपयोग यांनीं इंद्रिय सबल अगर दुर्बल होत जाणें या दोनही तत्त्वांनीं सेंद्रिय प्राण्यांतील प्रागतिक फरक, सेंद्रिय प्राण्याचें सृष्टींतील स्थान आणि प्रत्येक

---

१ Genetical theory of natural selection by R. A. Fisher.

असतील, त्यांना धारण करणाऱ्या जीवनगोलकांची वेगवेगळ्या तऱ्हेनं मांडणी होणें.[१] म्हणजे येथें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, कोणताही नसलेला नवा गुण उत्पन्न होत नाहीं. परंतु असलेल्या गुणांच्याच वेगवेगळ्या मांडणीनें व्यक्तीव्यक्तींत फरक उत्पन्न होतो आणि म्हणूनच एका मातापित्यांचीं अपत्यें सर्वसाधारण दृष्ट्या समान असलीं तरी स्वरूपतः एक नसतात! ह्यालाच आम्ही फरक असें नांव देतों, आणि ह्यामध्येंच नैसर्गिक निवड व्हावयाची असते. म्हणून जितक्या वेगवेगळ्या तऱ्हेच्या मांडण्या निसर्गापुढें येतील, तितके त्यामध्यें जास्त सुदृढ पिंड सांपडण्याचा संभव. या दृष्टीनें जास्त संतति होणें हें हितकारक आहे, अहितकारक नव्हे! जो पिंड या जागतिक कलहांतून बाहेर पडला, म्हणजे जो कलहामध्यें पडत नाहीं, तो कलहाच्या रेट्यामध्यें त्याला जी स्थिति प्राप्त झाली असेल, त्या स्थितीपासून च्युत होऊं लागतो. आज सामाजिक प्रवृत्ति पिंडाची सर्व व्यवस्था करून हा कलहच नष्ट करण्याकडे होत चाललेली आहे! तसा तो च्युत होऊं लागला म्हणजे त्याचा नाश ठरलेलाच. सौरियन काळांत ज्या प्रचंड जीवजाति होत्या, त्या नष्ट झाल्या आहेत आणि डोळ्यालाही न दिसणारे जीवजंतु मात्र आपलें जीवित धरून आहेत. ही गोष्ट निव्वळ शारीरशक्ति—सरासरी उंची आणि वजन या दृष्टीनें अगदीं युक्त स्थितींत असली तरी—सृष्टींत टिकाव धरूं शकत नाहीं, असेंच दाखवितें. ही जी व्यक्तींची स्थिति सांगितली तीच एका जातींतील उपजातींना लागू आहे. म्हणजे एकाच जातींत अनेक उपजाति उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असतें आणि तशा त्या होतातही. एकच कुत्रा ही जाति घेतल्यास त्यामध्यें बुद्धि या गुणाचे बाबतींत वेगळ्या असणाऱ्या ग्रेहाउंड आणि हाउंड या जाति उत्पन्न झाल्या. त्या दोन्ही जातीपेक्षां कॉली ही जाति बुद्धिगुणाचे बाबतींत वेगळी आणि या तीनहीपेक्षां बुलडॉग निराळेच! आणखीही कुत्र्याच्या अनंत उपजाति सांगतां येतील, परंतु या सर्व जातीचें संघटण आणि एकीकरण करण्याची चळवळ त्या जातींतील पंडितांनीं सुरू केली आहे किंवा

१ Prof J. Arthur, Thomson in "outlines of science."

२ Heredity and Eugenics by Gates.

३ New evolution by Clarke.

नाहीं ते कांहीं कळत नाहीं ! खरोखर पाहिलें तर, कुत्रा ही जाति अत्यंत सुधारलेली आहे आणि आमचे सुधारक बंधू मागें-त्याच्या फारच मागें-आहेत ! कुत्रा जातींत स्त्रियांना समान हक्क आहेत, स्त्रीला नारदस्मृतींत सांगितल्याप्रमाणें पुनर्विवाहाचा हक्क आहे. स्त्रियांना डॉ. हरिसिंग गौर यांनीं कायदेमंडळांत बिल आणण्याचे पूर्वींच घटस्फोटाचा हक्क मिळालेला आहे ! या जातीवरूनच सुधारलेल्या अमेरिकनांनीं अनिर्बंधसंयोगाचें (free union) तत्त्व उचललेलें असावें असें त्यांतील कांहीं कुत्र्यांचें म्हणणें आहे. या समाजामध्यें भांडवलवाल्याला थारा नाहीं ! कार्ल मार्क्स आपलें अर्थशास्त्र देवशुनी जी सरमा तिच्या पुत्राजवळ शिकला असा प्रवाद ऐकिवांत आहे, सर्वदृष्ट्या इतकी सुधारलेली जाति असून देखील, या जातींत संततिरक्षणाचा भार स्त्रीजातीवरच पडतो, म्हणून त्यांतील महिला-परिषदेंत संतति-नियमनाचा ठराव नुकताच पास झाल्याचें ऐकिलें आहे ! या जातींत प्रियाराधनाची चाल असल्यामुळें, प्रीतीविवाह सर्रास चालू आहेत ! एकंदरींत पाहिलें तर, कुत्रा ही जाति अत्यंत सुधारलेली आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नसावी असें आम्हांला वाटतें ! असो. कुत्र्यामध्यें इतरही अनेक समंजस आणि सुधारलेल्या चालीरीति आहेत. परंतु स्थलाभावास्तव जास्त चर्चा करीत नाहीं.

एका जातीत पुष्कळ उपजाति उत्पन्न होतात आणि त्यांपैकीं फारच थोड्या शिल्लक राहतात, अशी सृष्टीची प्रक्रिया आहे. ज्या जाति टिकाव धरूं शकतात, त्या कोणतें ना कोणतें तरी श्रेष्ठत्व अंगीं असल्यामुळें शिल्लक राहतात. हें श्रेष्ठत्व तरी नैसर्गिक फरकाच्या रेट्यांतच उत्पन्न झालेलें असतें. जो कोणताही फरक ( वर आम्हीं फरकाची चर्चा केलीच आहे. ) या जीवनार्थ कलहांत त्या जातीला उपयुक्त होईल, तो त्या जातींत शिल्लक राहतो. ही सर्व साधारणतः नैसर्गिक निवडीची तात्त्विक चर्चा झाली. त्यामध्यें नैसर्गिक निवडीच्या प्रक्रियेचा आपण बोध करून घेतला. पुढें आपला हिंदू-समाज आजच्या स्थितींत आहे तसा शास्त्रीय दृष्ट्या योग्य आहे किंवा अयोग्य आहे, याचा विचार करावयाचा आहे. आमच्या मतानें हिंदूंची समाज-रचना पाश्चात्य पद्धतींत वाढलेल्या सुशिक्षितांनीं केलेले कांहीं सुशिक्षित धांटाळे सोडून दिल्यास, अत्यंत मार्मिक आणि खोल अशा सुंदर तत्त्वांवर

१ History of Dharmashastra by P. V. Kane.

उभारलेली आहे. आणि त्या मताचें उद्घाटण करण्याकरितांच या ग्रंथाची प्रवृत्ति आहे.

आपण मानवसमाजाबद्दल बोलूं लागलों म्हणजे हा प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचा होऊन बसतो. इतर जीवजातींच्या प्रश्नांपेक्षां तो थोडासा भिन्न आहे. इतर जीवजातींत प्राधान्येंकरून त्या जातीच्या पिंडगत प्रगतीचाच ( Eugenic or biological ) विचार करावयाचा असतो.

**२२ मानवी निवड**

मानवजातींमध्यें पिंडप्रगतीचा विचार करून शिवाय सामाजिक म्हणजे सांस्कारिक ( psycho-social or traditional ) प्रगतीचाही विचार करावा लागतो[१]. तिर्यक् योनींना सांस्कारिक प्रगति नसते, हें मत आम्हांला मान्य नाहीं. परंतु त्या मुद्याचें सांगोपांग उद्घाटण करण्याचें हें स्थळ नव्हे. येथें एवढेंच नजरेस आणून ठेवावयाचें कीं, मनुष्यप्राणी बुद्धि ( intelligence ) आणि निसर्गप्रवृत्ति ( instinct ) या गुणांच्या व्याख्या त्याला स्वतःला पचतील, अशाच करून घेतो ! पुन्हां सामाजिक प्रगतीचीही पण आज पाहिजे तशी व्याख्या केली जाते ! नुसती बौद्धिक लायकी म्हणजे सामाजिक प्रगतीचें लक्षण नव्हे. येथें अध्यात्मिक, सामाजिक, नैतिक वगैरे एकूण एक गुणांचा विचार व्हावयास पाहिजे असतो. समाजांच्या उत्कर्षापकर्षांचे नियम, या सर्वांचा विचार केल्यावर निश्चित करावयाचे असतात. जगांत इतिहासांत कोणत्याही एका गुणाला मान दिलेला दिसत नाहीं. अमेरिकेंतील तांबडा इंडियन, हा त्याचा प्रतिस्पर्धी जो युरोपांतील श्वेतवर्णीय त्याच्यापेक्षां शरीरबलानें मुळींच कमी नव्हता, तर उलट थोडासा जास्त सुदृढच होता. परंतु आपल्या सामाजिक गुणांमुळें युरोपियन हा त्याला पादाक्रांत करून, नव्हे, नष्ट करून विजयी होऊं शकला. श्वेतवर्णीय युरोपियन हा जेथें जेथें गेला तेथें तेथें त्यानें तद्देशीय जातींचा नाश केला ! नष्ट झालेल्या जातींची यादी डार्विन आणि रॅटझेल यांनीं दिलेली आहे. अशा तऱ्हेच्या नाशांतून हिंदुसमाज शिल्लक राहिला

---

१ Social decay and regeneration by R. Austin Freeman, Heredity and selection in sociology- Chatterton-Hill.

त्याचें कारण ते येथें मायाळूपणानें वागले[१] असें नाहीं तर आपल्या समाजरचनेपुढें आणि संस्कृतीपुढें त्यांना हात टेकावे लागले! मानवसमाजाचा विचार करतांना पिंडप्रगति आणि सांस्कारिक प्रगति या दोहोंचाही विचार करून, प्राधान्यानें कोणती प्रगति हितकारक आहे, त्याचा विचार करावयाचा असतो. कारण, मानवाला तत्त्वज्ञान आहे, त्याला इतिहास आहे, त्याला धर्म आहे, त्याला कला आहे, त्याला संततिनियमन आहे, त्याला बोल्शेव्हिझम् आहे. अशा अनंत गोष्टींनीं तो नटून गेलेला आहे. आम्हीं वर सांगितलेंच आहे कीं, सर्वसाधारण जीवोत्क्रांतीचे नियम मनुष्यसमाजालाही पण लागूं आहेत. त्यामुळें बाह्यजगत् ( World of things ) आणि आंतरजगत् ( World of thought ) यांमध्यें एकतऱ्हेचा समन्वय राहिला पाहिजे.

मनुष्येतर जीवसृष्टीकडे नजर टाकली तर, निकृष्ट पिंडाचा नाश आणि जीविताला लायक तेवढ्याच पिंडांची निवड, ही प्रणाली अव्याहत चालू आहे. तेथें कोणी पिंड नालायक झाल्यास त्याला अनैसर्गिक रीतीनें जगवीत नाहींत, अथवा लायक पिंडाला अनैसर्गिक रीतीनें मागेंही टाकलें जत नाहीं. मानवामध्येंदेखील ज्यांना आपण कमी उत्क्रांत वंश असें म्हणतों, त्यांच्यामध्येंही या प्रणालीचा जोर अजून चालूच आहे. सुधारलेला समाजदेखील नैसर्गिक निवडीच्या बाबतींत निरपेक्ष नाहीं[२]. सुधारलेल्या समाजांत देखील निसर्गाचें—म्हणजे जन्ममृत्यूचे नियम हे प्रभावी असतातच. आज आफ्रिकेमध्यें ज्या जाति रानटी या नांवानें गणल्या जातात ( येथें एवढें नमूद करून ठेवतों कीं, जातीची खरोखरीच म्हणजे मानवी नमुना म्हणून प्रगति होते, ही गोष्ट आम्हांला मान्य नाहीं. येथें आम्हीं रानटी, प्रागतिक वगैरे शब्द चर्चेच्या सोयीकरितां वापरिले आहेत. ) त्यांच्यामधील आपसांतील जीवनार्थकलहाकडे बारकाईनें दृष्टि दिल्यास, मानव किती संकटांतून आणि बाह्य परिस्थिति बिकट असतांना सुधारणेच्या मार्गाकडे

---

१ Social Statics by Herbert Spencer, Rise of the Christian power in India by B. D. Basu.

२ See Karl Pearson's pamphlet in answer to Lord Salisbury.

वळला याची अल्पशी कल्पना येईल.[१] त्याला प्रगतीचा मार्ग डोळ्यासमोर येण्याला तरी किती पिढ्या खर्च घालाव्या लागल्या असतील, त्यानें प्रगतीचा मार्ग चोखाळतांना किती चुका केल्या असतील, एक एक चुकी सुधारत जाण्यांत किती पिढ्या घालाव्या लागल्या असतील, ह्या सर्व मुद्यांची थोडीशी कल्पना आल्यास, मनुष्याची सुधारणा करण्याचा प्रयत्न करणारांच्या छातींत धडकी भरल्याशिवाय राहणार नाहीं ! या स्थितींत नैसर्गिक निवडीचा अंमल पूर्णत्वानें असतो आणि कोणत्याही दृष्टीनें हीन झालेल्या पिंडांचें रक्षण कृत्रिमदृष्ट्या करण्याची सोय येथें केलेली नसते. अशा पद्धतींचा परिणाम असा होईल कीं, अशा समाजांतील स्त्रीपुरुष काटक, बलवान्, शूर, उद्योगी, साहसप्रिय असेच निर्माण होतील. कारण यांतील कोणत्याही गुणाची जर एखाद्या जातीमध्यें थोडीशीही कमतरता उत्पन्न होईल तर, ती जाति नैसर्गिक निवडीच्या रेट्यांत केव्हांच नष्ट होऊन जाईल. याचें एक प्रत्यक्ष उदाहरण घेऊं. अमेरिकेमध्यें रेड इंडियन नांवाची एक जाति रहात असे. ती जाति देशांतराच्या—म्हणजे स्थलांतराच्या—प्रवासाला निघाली असतां, त्यावेळीं जर त्या जातीपैकीं एखाद्या स्त्रीचा प्रसवकाल प्राप्त झाला तर, ती थोडीशी झुडुपाआड होऊन प्रसूत होई आणि प्रसूति झाल्याबरोबर आपलें बालक खांद्यावर घेऊन पुन्हां आपल्या जातिबरोबर चालावयास लागे. अशा परिस्थितीमध्यें पुष्कळ स्त्रिया निःसंशय मेल्या असतील ! परंतु ज्या कांहीं शिल्लक राहिल्या त्यांची शरीरशक्ति व त्यांना होणारी संतति काय स्वरूपाची असेल, याचा ज्याचा त्यानेंच मनाशीं विचार करावा.

निसर्गाच्या रेट्यामध्यें जीवजाति पुढील तीन प्रकारांनीं टिकाव धरूं शकते. ( १ ) आपल्या जातीचे पिंड इतके निर्माण करावयाचे कीं, निसर्गानें अगर नैसर्गिक शत्रूनें कितीही नाश केला तरी, आपली संख्या शिल्लक रहावी. अशा तऱ्हेचे वर्ग दुबळे असले तरी विजयी होतातः 'विनयशीलाला जगाचें राज्य प्राप्त होईल[२].' अशा तऱ्हेचा प्राणिवर्ग म्हणजे

१ Martyrdom of man-Winwood Reade.

२ Holy Bible. Drawinism and Race progress by J. B. Haycraft.

ही दिखाऊ सुधारणा जर टिकून रहावयाची असेल तर, व्यक्तीनें आपल्या हयातींत प्राप्त करून घेतलेले गुण त्या व्यक्तीच्या संततींत संक्रांत होण्याची कांहीं तरी व्यवस्था सृष्टीच्या प्रक्रियेंत असावयास पाहिजे. म्हणजे जातींची आनुवंशपद्धति, लामार्क किंवा त्याचे आधुनिक चेले सांगतात त्या पद्धतीची असावयास पाहिजे. परंतु तो प्रश्न विवाद्य आहे. आजपर्यंत गोळा झालेली सर्व माहिती आणि सर्व पुरावे पाहिले तर ते या पद्धतीच्या[१] विरुद्ध आहेत, तरी देखील आमच्या समाजांतील कांहीं व्यक्तींकडून त्या पद्धतीचा वर्णांतर अगर जात्यंतर करण्याला आधार घेतला जातो! म्हणून खरोखरच लामार्कची पद्धति मान्य केल्यास समाजरचना काय स्वरूपाची होईल त्याचा विचार करूं.

लामार्कच्या आनुवंशपद्धतीचें तत्त्व असें आहे कीं, जें इंद्रिय किंवा जो गुण किंवा जी शक्ति यांचा पिंडाकडून उपयोग केला जाईल तें इंद्रिय किंवा तो गुण किंवा ती शक्ति यांची त्या पिंडांत वाढ होत जाईल. अशा तऱ्हेनें व्यक्तीनें आपल्या हयातींत ज्या गुणांची वाढ करून घेतली असेल, ते गुण त्या व्यक्तीच्या संततीमध्यें देखील संक्रांत होतील. पुन्हा त्या संततीनेंही तीच प्रक्रिया चालूं ठेवल्यास, त्या कुटुंबामध्यें त्या गुणाची सारखी वाढ होत राहील. समजा, एक कामकरी दोन मण वजनाचें ओझें उचलूं शकतो. त्यानें वजन उचलण्याचाच सारखा सराव केला तर, कालांतरानें तो चार मण ओझें उचलूं लागेल. त्याचा मुलगा जर त्याच्या सारखाच असेल व तोही पण तोच धंदा करूं लागेल तर, त्याला त्याहीपेक्षां मोटें वजन सहज उचलितां येईल. पुढें तोही पण हें वजन उचलण्याचें कौशल्य उत्पन्न होण्याची लायकी आपल्या मुलाच्या स्नायूंमध्यें उत्पन्न करील. हीच प्रक्रिया बौद्धिक प्रगतीला अक्षरशः[२] लागू पडेल. या सर्व तत्त्वज्ञानाचा समाजदृष्ट्या काय अर्थ होतो तें पाहूं. आमच्याइकडे देखील समाजसुधारकांकडून जातिभेद नसावा, हा सिद्धांत प्रस्थापित करण्याकडे याच कल्पनेचा उपयोग केला जातो. या गोष्टीला प्रमाण म्हणून महाभारतांतर्गत

१ J.A, Thomson- 'outlines of modern science, Mendel's principles of heredity'-Genetical theory of natural selection by R, A. Fisher.

२ L'Anthropologie et la science sociale by Paul Topinard.

पुढील श्लोक सांगितले[1] जातात.

“ न विशेषोऽस्ति वर्णानां सर्वं ब्राह्ममिदं जगत् ।
ब्रह्मणापूर्वसृष्टं हि कर्मभिर्वर्णतांगतं ॥ १० ॥
कामभोगप्रियास्तीक्ष्णाः क्रोधनाः प्रियसाहसाः ।
त्यक्तस्वधर्मा रक्तांगाः ते द्विजाः क्षत्रतां गताः ॥ ११ ॥
गोभ्यो वृत्तिं समास्थाय पीताः कृष्युपजीविनाः ।
स्वधर्मान्नानुतिष्ठन्ति ते द्विजा वैश्यतां गताः ॥ १२ ॥
हिंसाकृतप्रिया लुब्धाः सर्वकर्मोपजीविनः ।
कृष्णाः शौचपरिभ्रष्टाः ते द्विजाः शूद्रतां गताः ॥ १३ ॥
इत्येतैः कर्मभिर्व्यस्ता द्विजा वर्णान्तरं गताः ।
धर्मो यज्ञक्रिया तेषां नित्यं न प्रतिषिध्यते ॥ १४ ॥
इत्येते चतुरोवर्णा येषां ब्राह्मी सरस्वती ।
विहिता ब्रह्मणापूर्वं लोभात्त्वज्ञावतां गताः ॥ १५ ॥ ”

वर्णांमध्यें एकमेकांपासून वेगळेपणा दाखविणारे असे कांहीं गुण नाहींत. ब्रह्मदेवानें पूर्वी सर्व जग ब्राह्मणमय उत्पन्न केलें. ते ब्राह्मण आपआपल्या व्यावहारिक कर्मांनें वेगवेगळ्या वर्णांत विभक्त झाले. तांबड्या रंगाच्या, ऐहिक भोगांची इच्छा करणाऱ्या, तीव्र वृत्तीच्या, रागीट स्वभावाच्या, साहसी वृत्तीच्या ज्या ब्राह्मणांनीं आपला धर्म सोडला, ते क्षत्रियत्वाप्रत पोहोंचले. पिवळ्या रंगाचे आणि गौळवाडा आणि शेती यावर उपजीविका करणारे जे ब्राह्मण ते वैश्य झाले. हिंसा करणें आणि खोटें बोलणें हें ज्यांना प्रिय आहे, जे लोभी असून कोणतेंही कर्म करून आपली उपजीविका करतात, जे काळ्या रंगाचे आहेत, ज्यांनीं आचारांचा शुद्धपणा सोडला ते ब्राह्मण शूद्र पदवीला पोहोंचले.

या श्लोकांना चर्चेची शास्त्रीय पद्धति लावण्याची सोयच नाहीं. प्रथमतः हे श्लोक मोक्षधर्मपर्वांतील आहेत आणि मोक्षधर्मामध्यें खरोखरच वर्णांना विशेष नसेल. ती गोष्ट कोणीही नाकबूल करीत नाहीं. परंतु त्या गोष्टीचा व्यवहारधर्माशीं संबंध कसा पोहोंचतो, हें कळणें आमच्या बुद्धीच्या

१ महाभारत-शांतिपर्व-मोक्षधर्मपर्व अध्याय १०८.

आटोक्याबाहेरचें आहे. पुढें त्या श्लोकांत तरी किती सुंदर संगति आहे. पहिल्या श्लोकांत सांगतात, वर्णांना विशेष नाहीं. म्हणजे इंग्रजी तर्कशास्त्राच्या भाषेंत सांगावयाचें तर, वर्णांचा (differentia) सांगतां येणार नाहीं. मग पुढील श्लोकांत दिलेले रक्तत्व, पीतत्व आणि कृष्णत्व हे विशेष नाहींत तर काय आहेत ? तें कसें का असेना. वेगवेगळीं कामें* केल्या-मुळें हे वर्णविभाग झाले, म्हणजे धंद्यावरून वर्णव्यवस्था झाली असें मत यांत दिलेलें आहे. आणि अर्थातच या सर्व तत्त्वज्ञानाच्या मुळाशीं लामार्कचीच कल्पना प्रच्छन्न आहे.

आमच्या समाजसुधारकांपैकीं बऱ्याच लोकांनीं या बाबतींत पांढऱ्यावर काळें केलेलें आहे आणि या सर्वांची कल्पना अर्थातच व्यक्तीनें आपल्या हयातींत प्राप्त करून घेतलेले गुण, त्या व्यक्तीच्या संततींत संक्रांत होतात अशीच आहे. तद्विरुद्ध आनुवंशाच्या दृष्टीनें जाति शुद्ध करण्याची जी अत्यंत शुद्ध पद्धति आणि जी मनुस्मृतीवरील टीकाकारांनीं बरोबर दिलेली आहे ती, या पंडितांनीं अनैतिहासिक[१] ठरविली आहे ! 'जातीचा उत्कर्ष आणि अपकर्ष यासंबंधानें टीकाकारानें दिलेला दुसरा अर्थ कसा अव्यव-हारिक आणि अनैतिहासिक आहे, हेंही पाहिलें पाहिजे.' आमचे मित्र वे. शा. सं. महादेवशास्त्री दिवेकर यांनीं आपल्या ग्रंथाच्या पान पन्नासपासून पान छप्पनपर्यंत जे शाखाग्राही पांडित्य केलें आहे, त्याचें खंडन जाति-व्यवस्थेच्या प्रकरणीं करूं. येथें एवढेंच सांगावयाचें कीं, आचारानें जात्यु-त्कर्ष होतो असें त्याहीपण शास्त्रीबोवांचें मत आहे. त्याप्रमाणेंच नागपूरचे पंडित केशव लक्ष्मण दप्तरी यांचेंही मत आहे. पं. दप्तरी यांनीं आपल्या ग्रंथांत[२], 'जात्युत्कर्षो युगे ज्ञेयः पंचमे सप्तमेऽपिवा । व्यत्यये कर्मणां साम्यं पूर्ववच्चाधरोत्तरं ॥' याज्ञवल्क्य अध्याय ३, हा श्लोक देऊन त्याचा पुढीलप्रमाणें अर्थ दिलेला आहे. "वर्णाचा उत्कर्ष ( विवाहानें ) पाचव्या किंवा सातव्या पिढींत होतो. कर्में ( वृत्ति ) बदलण्यानें जें कर्म स्वीकारलें असेल, तें ज्या वर्णाचें कर्म आहे तें साम्य होतें. तें साम्य पूर्वीप्रमाणेंच म्हणजे

---

१ 'धर्मशास्त्रमंथन'-महादेवशास्त्री दिवेकर, 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न'-वि. रा. शिंदे.

२ 'धर्मरहस्य' केशव लक्ष्मण दप्तरी.

विवाहाप्रमाणेंच पांचव्या किंवा सातव्या पिढीस खालच्या किंवा वरच्या वर्णाशीं होते." या अर्थाचा अर्थ समजण्याला एक स्वतंत्र टिप्पणीच जोडा-वयास पाहिजे. वर्णाचा उत्कर्ष विवाहानें पांचव्या किंवा सातव्या पिढींत होतो, या वाक्याचा बरोबर अर्थ काय? या पांच किंवा सात पिढ्या चालू रहाणाऱ्या विवाहांत वधूवरांचे वर्ण अगर जाति काय स्वरूपाच्या असाव्यात? ती पद्धति सारखी कशी चालू ठेवावी? वगैरे गोष्टींचा पंडितांनीं जरा विस्तृत खुलासा करावयास पाहिजे होता. पुढें वृत्ति बदलल्यानें वर्णांतर होतें म्हणून जें सांगितलें आहे, त्याची प्रक्रिया त्यांनीं सांगावयास पाहिजे होती. त्यांनीं सांगितली नसली तरी प्रच्छन्नतः ती लामार्कची पद्धति आहे. आम्हीं लामार्कचीच पद्धति बरोबर नाहीं, असें सांगितलें असतां दुसरे एक समाजसुधारक शास्त्री तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं, मुलाला तिखटी मीराच्या आवेशानें ती पद्धति असिद्ध नाहीं, असें प्राणिशास्त्रानभिज्ञ सर्वसाधारण समाजाला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला! आधुनिक सुशिक्षितांना ही त्यांची अति बालबोध भाकडकथा पटल्या-सारखी वाटते! आम्ही म्हणतों एक जनक कर्मानें गुण सिद्ध होतात, ही लामार्कची पद्धति बरोबर आहे असें कबूल करून त्या पद्धतीनें वर्णांतर होतें किंवा कसें याचा विचार करूं. समजा कीं, दर पिढीस वृत्तिकर्माकारामुळें त्या वृत्तीला लायक अशा मूळ गुणांचा कांहीं तरी अंश वाढत जातो. दर पिढीस शेंकडा एक या प्रमाणांत जर तो गुण वाढत असेल, तर ज्यांच्या शंभर पिढ्या एकाच वर्णांत गेल्या, त्यांच्याशीं ज्यांच्या पांच अगर सातच पिढ्या त्या वर्णांत गेल्या, त्यांचें साम्य कसें होईल? संस्कारांचा परिणाम जर वर्ण बदलण्याइतका जबरदस्त आहे, तर पांच सात पिढ्या झाल्यानंतर तो पुढें कां होऊं नये? पांच सात पिढ्यानंतर तो थांबतो असें मानावयाचें तर, पूर्वी म्हणजे पहिल्या पांच सात पिढ्यांत तरी तो कां होतो हें कळावें ना? थांबत नाहीं असें म्हणावयाचें तर, आम्हीं पूर्वी धरलेलें प्रमाण जें शेंकडा एक त्या प्रमाणांत वाढत गेलेला जो गुण तो सात पिढ्यांमध्यें जेथें एक इतका होता तेथें $(१\cdot०१)^{७}$ इतका झाला आणि शंभर पिढ्यांमध्यें $(१\cdot०१)^{१००}$ इतका झाला. म्हणजे पहिल्यामध्यें जर तो १·०७२ इतक्या प्रमाणांत वाढला तर, दुसऱ्यामध्यें तो २·५९२ इतक्या

प्रमाणांत वाढतो म्हणजे पहिल्याच्या जवळ जवळ अडीच पट वाढतो. आम्हांला यावर गुणांना संख्यापरिमाण लावतां येत नाहीं, असा आक्षेप येईल, ही गोष्ट माहिती आहे. परंतु गुणांना संख्यापरिमाण लावतां येत नसलें तरी, त्यांच्या तीव्रतेला ( intensity ) संख्यापरिमाण लावतां येतें आणि त्या दृष्टीनें बुद्धि वगैरे गुणांचीं मोजमापें[1] चालू आहेत एवढें येथें नमूद करून ठेवतों. बुद्धि हा नुसताच गुण घेतल्यास तो कमी अधिक प्रमाणांत सर्व प्राणिवर्गांमध्यें सांपडतो. म्हणून बुद्धीचे बाबतींत प्राण्यांमध्यें फरक नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून वर घेतलेल्या उदाहरणांत एकाचा गुण जास्त वाढला, म्हणजे जास्त तीव्र झाला असें म्हणावयास पाहिजे. म्हणजे एका जातीमध्यें तो गुण ज्या प्रमाणांत असेल, त्यापेक्षां दुसऱ्या जातीमध्यें तो अडीचपट जास्त प्रमाणांत असणार अशी स्थिति असल्यामुळें मग 'व्यत्यये कर्मणां साम्यं' कसें ? असो. खरी गोष्ट अशी आहे कीं, या थोरांना कोणत्याही तत्त्वाचा बोध नाहीं, कोणत्याही तत्त्वज्ञानावर श्रद्धा नाहीं, फक्त समाजसुधारणा झाली म्हणजे झालें इतकाच त्यांचा हेतु आहे.

लामार्कचें तत्त्वज्ञान अगर स्मृतिपुराणादि ग्रंथांत उल्लेखिलेलें तशा तऱ्हेचेंच तत्त्वज्ञान यांचा आश्रय केल्यास समाजरचना काय स्वरूपाची होईल, याचा विचार करूं. जर[1] लामार्क म्हणतो त्याप्रमाणें अगर आमच्या इकडील जात्युत्कर्ष पंडित म्हणतात त्याप्रमाणें गुणांच्या, इंद्रियांच्या अगर शारीरिक उद्योगानें त्या त्या गोष्टींची त्या त्या वंशांत प्रगति होत असेल तर, कोणत्याही मनुष्याचा धंदा त्याच्या अभिरुचीवर अवलंबून ठेवितां येणें शक्यच नाहीं. ब्राह्मणांनीं शेंदोनशें पिढ्या बुद्धिप्रधान कामें केलीं असल्या-कारणानें, त्यांच्यामध्यें त्या गुणाला लायक अशीच शारीर आणि मानस-रचना ( mechanism ) तयार झालेली आहे आणि ती वर दाखवि-ल्याप्रमाणें हें तत्त्व खरें मानल्यास तीव्रत्वाला गेली असलीच पाहिजे. वैद्यकीय धंदा करणाऱ्या व्यक्तीच्या मेंदूमध्यें वैद्यकीय ज्ञानाला लायक असेच फरक पडत जात असले पाहिजेत. ते फरक लामार्कच्या पद्धतीनें त्याच्या मुलाच्या मेंदूंत संक्रांत होणार, म्हणजे मुलाचा मेंदू इतर कोणत्याही ज्ञाना-

१ या बाबतींत Simon, Terman, Spearman, Goddard, Ballard, Burt वगैरे पंडितांनीं पुष्कळ कार्य केलें आहे.

पेक्षां वैद्यकीय ज्ञान जास्त लवकर ग्रहण करूं शकणार. अर्थात् हा मुलगा बापाला वैद्यकीय धंदा करूं लागण्याच्या पूर्वी झाला असला तर, काय परिणाम होईल हें कांहीं सांगतां येत नाहीं ! याच कारणाकरितां कायदे-पंडिताच्या मुलानें कायदेपंडित व्हावें आणि शेतकऱ्याच्या मुलानें शेतकरीच रहावें. समाजाला नवीन धंद्यांची जरूर लागल्यास ते कोणीं करावे, या-संबंधीं या तत्त्वज्ञानांत कांहीं खुलासा केलेला नाहीं. परंतु कोणीतरी करूं लागतीलच. मग लामार्कच्या नियमानें जसजसे धंदे वाढत जातील तसतशी जातींची संख्या वाढत जाईल. या सर्व पंडितांच्या या कल्पना खऱ्या मान-ल्यास प्रथमतः धंद्यानें एका विवक्षित तऱ्हेचा शारीर आणि मानस पिंड तयार होणार. पुढें त्या पिंडांत उत्पन्न झालेले गुण संततींत वाढत जाणार असें हिंदुस्थानांतील जातींतल्याप्रमाणें पन्नास पिढ्या चालल्यास त्या जातींतील व्यक्तींना धंदा बदलण्यास सांगणें, म्हणजे अत्यंत घोर असा सामाजिक गुन्हा आहे असें म्हटल्याशिवाय रहावत नाहीं, याची सज्जनांनीं माफी करावी. एकीकडून संस्कारांचे परिणाम होतात, ते संततींत संक्रांत होतात आणि त्यांचा प्रभाव इतका जबरदस्त आहे कीं, पांचसात पिढ्यांत ते वर्ण देखील बदलूं शकतात असें सांगून, ताबडतोब त्याच वाक्यांत दुसरी-कडून शंभर शंभर पिढ्या एका तऱ्हेच्या संस्कारांत मुरलेल्या हिंदुस्थानांतील जातींमध्यें ढवळाढवळ करणें म्हणजे, आपण स्वतः सांगितलेल्या तत्त्वाची थट्टा करण्यासारखें आहे असें आम्हांला वाटतें. परंतु या तत्वज्ञानाचा अर्थ काय होतो ? या नियमानें पाहूं गेल्यास जाति रोटीबंद, बेटीबंद व चिरेबंद अशाच व्हावयास पाहिजेत. त्या गोष्टीला दुसरा इलाजच नाहीं. या पद्धतीनें ब्राह्मणाचा मुलगा ब्राह्मण आणि चांडाळाचा मुलगा जन्मानेंच जातितः चांडाळच ठरेल. पुष्कळ पिढ्या शेतकी करणाऱ्या घराण्यांतील मुलांना दुसरा धंदा करूं देणें ही चूक आहे. मग आमच्या इकडील बाबासाहेब, अण्णासाहेब, नानासाहेब काकासाहेब कांहींही म्हणोत आणि लिहोत. खरी गोष्ट अशी आहे कीं, आज समाजसुधारणा सांगितली जात आहे, ती कोणत्या एका शास्त्रीय तत्त्वावर उभारली आहे असें नव्हे. ती आज सुशिक्षित म्हणून मिरवणाऱ्या वर्गाच्या—समाजांतील बहुसंख्य वर्गाच्या नव्हे—'हृदयेनाभ्यनुज्ञात' आहे आणि म्हणूनच पण ती धर्मही आहे. 'हृदयेनाभ्यनुज्ञात' आणि आत्मतुष्टि-

कारक अशी एखादी क्रिया असल्यास तीही पण धर्मच होय, असें भगवान् श्रीकृष्णाचें[1] मत असल्याचाही निर्वाळा एका आधुनिक पंडितानें आपणांस दिलेला आहे. त्यानें आत्मतुष्टी या पदावर अनेक गृहीत कृत्यें—असिद्ध गृहीत कृत्यें—[illegible] वगैरेंचसें भाष्य केलें आहे. परंतु त्याचा सर्वथा परामर्श या ठिकाणीं घेतां येत नाहीं. म्हणून आम्ही कर्मानें वर्ण बदलतों वगैरे भरमसाट विधानें करणारांना एवढीच हात जोडून विनंति करतों कीं, 'बाबांनो तुमच्या पाया माझें दंडवत,' परंतु आपण ज्या डहाळीवर बसतों ती डहाळीच तोडून टाकणारे असले सिद्धांत पसरविण्यापूर्वी जरा स्वस्थ बसून विचार करा. त्यापासून कांहीं नुकसान होईल असें नव्हे.

लामार्कची आमच्या मतानें असिद्ध[2] पद्धति सोडून देऊन नैसर्गिक निवड या पद्धतीचाच आश्रय करावयास पाहिजे. अनेकविध पिंड निर्माण होऊन त्यांतले प्रबल तेवढे शिल्लक ठेवणें, अशी सृष्टीची प्रक्रिया दिसते. येथें प्रबल शब्दानें जीवनक्षम एवढाच अर्थ अभिप्रेत आहे. मग तो कोणत्याही कारणानें जगलेला असो. उदाहरणार्थ, बर्फाच्छादित देशामध्यें काळ्या सशापेक्षां पांढरा ससाच जगून राहील. कारण, तो रंगामुळें पारध करणाराला दिसणार नाहीं. ज्याप्रमाणें एकाच जातींत अनेक व्यक्ति उत्पन्न होऊन त्यांतील सकस असतील त्यांचीच निवड व्हावयाची, त्याप्रमाणेंच एका जातींत अनेक उपजाति उत्पन्न होऊन त्यांतील सकस जातींना ऐश्वर्य आणि स्वातंत्र्य प्राप्त व्हावयाचें असा नियम दिसतो. उगीच कुठली तरी [illegible] उठते आणि कांहींतरी अज्ञात कारणाकरितां दुसऱ्या जातीवर चढून जाऊं लागते अशा तऱ्हेची अलीकडील विधानें म्हणजे नवशास्त्रांचा खून तो. विषम वस्तूंना त्याचवेळीं समान करण्याच्या प्रयत्नांची हास्यास्पदता लवकरच प्रतीत होईल.[3] म्हणजे वैयक्तिक लायकी स्थिर होण्याकरितां ज्याप्रमाणें व्यक्तीव्यक्तींत स्पर्धा व्हावयास पाहिजे, त्याप्रमाणें जातीय लायकी स्थिर होण्याकरितां गटागटांत देखील अहमहमिका

---

१ 'धर्मस्वरूपनिर्णय' – तर्कतीर्थ कोकजे.

२ Genetical theory of natural selection by Fischer, Evolution by Lotsy.

३ Darwinism and Race progress by J. B. Haycraft.

व्हावयास पाहिजे. समाजरचना करतांना ती अशा कौशल्यानें व्हावयास पाहिजे कीं, त्या समाजामध्यें या दोनही तत्त्वांचा अंतर्भाव होईल.

व्यक्तींचा व्यक्तींशीं कलह, गटांचा गटांशीं कलह, जातींचा जातींशीं कलह, राष्ट्रांचा राष्ट्रांशीं कलह आणि त्या कलहांमुळें या सर्वांची सुदृढ स्थिति, अशीच जर सृष्टीची मांडणी असेल आणि कलह साधूनच जर मनुष्यप्राण्याला आपलें हित करून घ्यावयाचें असेल आणि असेंच जर मानवी प्रगतीचें मूलभूत शास्त्र असेल, तर दया, प्रेम, सहानुभूति वगैरे मानव ज्यांना उच्च गुण असें म्हणतो, ते सर्व कवडीमोल आहेत असें म्हणावें लागेल! हे सर्व गुण जर जीवनार्थ कलहांत निरुपयोगी असतील तर त्यांचें मानवी समाजांतून शक्य तेवढें लवकर उच्चाटण व्हावयास पाहिजे. 'जें विनाशी आहे, ज्याला मोडून, तोडून, भाजून, अग्नींतून शुद्ध करून मग आकार द्यावयाचा आहे, अशा क्षुद्र जंतूला तुम्ही दया दाखवितां ही गोष्ट तुमच्या लक्षांत येत नाहीं काय? जें कष्टाकरतांच जन्माला येतें त्याच्याबद्दल दया कसली? आम्ही, तुम्ही दाखविलेल्या दयेनें समाजावर जे घातुक परिणाम होतात, त्या गुन्ह्यांपासून व त्या दौर्बल्यापासून स्वतःचें रक्षण करूं इच्छितों, आम्हांला दयावंतांची कीव येते,' अशा तऱ्हेचें तत्त्वज्ञान एकांगी होईल असें आमचें मत आहे. आम्हांला वाटतें कीं, आम्हीं मागें वैयक्तिक आणि जातीय अशा दोन नीतितत्त्वांच्या पद्धति सांगितल्या. ह्या पद्धतींचा गोंधळ केल्यामुळें अशा तऱ्हेचे प्रश्न उत्पन्न होतात. राग-द्वेष, लोभ-औदार्य, हिंसा-अहिंसा वगैरे एकूणएक मानवी गुणांचें या झगड्यांत कार्य आहे. निव्वळ राग हा जसा समाजांना संघटीत करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें एकटा द्वेष हाही पण पांगळा आहे. यांतील कोणत्याही एका गुणाच्या अतिरेकाचे परिणाम सृष्टींत अनेक वेळां दिसून आलेले आहेत. आणि त्यांवर कलावंतांनीं ग्रंथही लिहिले आहेत. सर्व गुणांचें कार्य आहे, परंतु तें आपला कोण आणि परका कोण हें तारतम्य पाहून व्हावयाचें आहे. मनुष्यप्राणि एखाद्या कोणत्या तरी संघाशीं एकनिष्ठ रहावयास पाहिजे तर अवयव अवयवीभाव सिद्ध होईल, ही गोष्ट नजरेसमोर असा-

१ Fredric Nietzsche.

वयास पाहिजे. मग विशाखदत्तानें म्हटल्याप्रमाणें, 'द्वयोः सारं तुल्यं द्वितय-मभियुक्तेन मनसा । फलं कोपप्रीत्योर्द्विषदि प्रविभक्तं सुहृदिच ॥[1] ' अत्यंत [illegible] मनानें कोपाचें फल शत्रूला दाखविलें आणि स्नेहाचें फल मित्राला दिलें. राष्ट्रनिष्ठा या गोंडस नांवाखालीं इतर सर्व निष्ठा आज कळत न कळत [illegible] केल्या जात आहेत ही गोष्ट बरी नव्हे. आपण राष्ट्राचे ऋणी आहोंत हें खरें. त्याप्रमाणें आपण सर्व जगताचेही ऋणी आहोंत आणि तीं ऋणें आपणांला कर्तव्यकर्म करून, जगांत रहाण्याला जास्त हितावह करून फेडावयास पाहिजेत या बाबतींत कोणाचाही मतभेद नाहीं. परंतु कार्य कोठून सुरू करावें एवढाच प्रश्न आहे. तें, जगत् या दुसऱ्या टोंकापासून सुरू करावें, कीं कुटुंब या जवळील टोंकापासून सुरू करावें ? हा प्रश्न कोणीं सोडविला तर रोजच्या आचारव्यवहार या [illegible] आमच्यासारख्या प्राकृत व्यक्तींच्या मनांत उत्पन्न होणारा गोंधळ [illegible] कमी होईल. आज आमच्याकडे घडत असलेले चमत्कार पाहून मात्र आश्चर्य वाटतें. स्वतः पतित आणि दीन झालेला ब्राह्मण अस्पृश्यांचा उद्धार करूं इच्छितो ! आणि कोणी ब्राह्मण त्याच्याचकडे मदत मागावयास गेला तर, [illegible] तत्त्वज्ञानाचा आणि पोक्तपणाचा आव आणून ' उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् । आत्मैव ह्यात्मनो बंधुः आत्मैव रिपुरात्मनः '[2] असा उपदेश करूं लागतो. पण काय हो ! भगवद्गीकारांचा वरील जो उपदेश आहे, तो अस्पृश्यांना लागू नाहीं काय ?

येथें एक गोष्ट नमूद करून ठेवावीशी वाटते ती अशी कीं, जीवनार्थ-कलहाचें तत्त्व मान्य असणाऱ्यांमध्यें देखील, हें तत्त्व प्राधान्यानें व्यक्ती-व्यक्तींतील कलहाला लागू आहे, अशा तऱ्हेचा गैरसमज पसरलेला दिसतो. जीवनार्थकलहाची म्हणजे वैयक्तिक जीवनार्थ कलहाची कल्पना समाज-शास्त्रांत प्रधान नाहीं. समाजशास्त्रांत देखील या कल्पनेला स्थान आहे, परंतु तें बरेंच संकुचित स्वरूपाचें आहे. समाजशास्त्रामध्यें जीवनार्थ कलह मुख्यतः गटागटांमध्यें असतो. कळत नकळत एका जीवजातीचें दुसऱ्या जीवजातीबरोबर आणि भौतिक परिस्थितीबरोबर अशा तऱ्हेचा तिरंगी झगडा

१ मुद्राराक्षस-विशाखदत्त.
२ भगवद्गीता.

चाललेला असतो. संघप्रधान जीवाची सुरक्षितता तो जीव ज्या संघांत अंतर्भूत झाला असेल, त्या संघाशीं त्याचें जितपत तादात्म्य असेल, त्या प्रमाणावर अवलंबून राहील. कोणत्याही जातीचें अस्तित्व त्या गटांत अंतर्भूत झालेल्या व्यक्तींमध्यें त्या गटाबद्दलचें आत्मीयत्व ज्या प्रमाणांत वाढलें असेल, त्या प्रमाणांत जास्त निश्चित होईल. ज्या जातीमध्यें अगर गटामध्यें व्यक्तींना आपल्या गटापैकीं दुर्बलापेक्षां इतर गटांतील सबल दुर्बलाबद्दल जास्त आपलेपणा वाटूं लागतो, ती जाति नष्ट होणारच.

आपण कौरव आणि पांडव या युद्धाला संमुख टाकलेल्या दोन गटांबद्दल विचार करूं. कौरवांचें संख्याबल पांडवांच्या संख्याबलापेक्षां श्रेष्ठ होतें. कौरवांकडील वैयक्तिक योद्धे आणि सेनापति हे पांडवांच्या इकडील योद्ध्यांपेक्षां किंवा सेनापतींपेक्षां कोणत्याही बाबतींत कमी नव्हते. एकंदर सैन्यरचना त्यांना अत्यंत चातुर्यानें करतां येत होती, हें सहज दिसून येईल. अशीं सर्व साधनें जवळ असून आणि अधर्मानें युद्ध केव्हांही केलें नसून कौरवांना नाश आलेला दिसतो! याचें कारण असें आहे कीं, कौरव गटांपैकीं कांहीं श्रेष्ठ पुरुषांना वैयक्तिक नीतिशास्त्र हें जातीय नीतिशास्त्रापेक्षां श्रेष्ठ वाटत असे. ते पुरुष आपल्या गटाशीं पूर्ण एकजीव झाले नव्हते. भीष्मांना कौरवांच्या रक्षणापेक्षां आपल्या शब्दाची किंमत जास्त वाटली! द्रोणांना भारतीय युद्धापेक्षां आपल्या मुलाचें जीवन अगर मरण जास्त वाटलें! कर्ण दातृत्वाच्या नांवाखालीं आपली कवचकुंडलें गमावून शत्रूकडून मारला गेला! उलटपक्षीं संघाच्या रक्षणाकरितां भगवान् श्रीकृष्णानें आपली शस्त्रसंन्यासाची प्रतिज्ञा मोडली! आढेवेढे घेत कां होईना, धर्मराज खोटें बोललें, अर्जुनानें निःशस्त्र प्रतिस्पर्ध्यावर बाण टाकले! आणि भीमानें गदायुद्धाचे नियम मोडले! सांगण्याचा इत्यर्थ इतकाच कीं, कोणत्याही संघामध्यें त्या संघाशीं तादात्म्य न पावलेले जितके लोक जास्त तितका त्या संघाचा नाश लवकर. जगाच्या इतिहासांत प्रत्येक ठिकाणीं हीच गोष्ट घडून आलेली आहे. परंतु त्याची पूर्णांशानें चर्चा स्थलाभावास्तव येथें करतां येत नाहीं. जगाच्या इतिहासांत ज्या मोठमोठाल्या क्रांत्या होऊन गेल्या, त्या तरी काय शिकवितात?

फ्रान्समधील क्रांतीचें स्वरूप तरी काय होतें, याचा कोणी विचार केला

आहे काय ? राजकारणांत उपयोगी पडणाऱ्या ज्या तीन संस्था म्हणजे राजा, सरदार आणि धर्मसत्ता ( church ), ज्या इतरांना कितीही नांवें ठेविलीं तरी इंग्लंडमध्यें कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत अजूनही हयात आहेत, त्या तीन्ही संस्थांमध्यें आपल्या गटाशीं एकरूप न झालेले असे ओर्लीन्स, मिराबु, अबेसायस् वगैरे पुरुष निर्माण झाले. त्यांनीं ह्या तीनही संस्थांचा नाश करून, भांडवलवाल्या बनिया वर्गाला अखंड प्रभुत्व प्राप्त करून दिलें. पैसा हें जीविताचें सर्व ध्येय मानण्याला ब्राह्मणादि विद्वान् आणि धार्मिक वर्ग व क्षत्रियादि शूर वर्ग हेच विरोधी असतात. त्यांचीच समाजांतून उचलबांगडी झाल्यामुळें, निव्वळ पोटाची काळजी वहाणारा वर्ग हा समाजांत अधिकारारूढ होऊन पोट भरणें हें सर्वश्रेष्ठ ध्येय आणि औद्योगिक प्रगति हें त्याचें साधन होऊन बसतें ! 'जगावर[१] आज सर्वसाधारण हलक्या वर्गांचा—संख्याबलानें प्राप्त करून घेतलेला —ताबा आहे.'

ही जी मानवामध्यें संघनिष्ठा टाकण्याची प्रवृत्ति आहे, तिला कांहीं औषध असल्याचें आमच्या वाचनांत नाहीं. हिंदूंनीं जातिसंस्था हें औषध देऊन तें आज तीनचार हजार वर्षें प्रभावी करून दाखविलें. परंतु त्याचें पुढें काय होईल, तें भविष्य सांगणें फारच कठीण आहे. खरोखर पाहिलें तर, गटांना एकजीवत्व प्राप्त होणें अत्यंत जरूर आहे. एकाच जातींत आचार-विचार, आहार-विहार, कपडालत्ता वगैरेंच्या बाबतींत फारसे फरक दिसून येतां कामा नयेत. याकरितां हिंदुसमाजशास्त्रज्ञांनीं वर्णांच्या आचारविचारांची किती काळजी घेतली आहे, ही गोष्ट कोणताही स्मृतिग्रंथ वरवर चाळला तरी दिसून येईल. अशा तऱ्हेनें जातीमध्यें सर्व तऱ्हेची एकरूपता ( Standardization of caste ) उत्पन्न व्हावयास पाहिजे. आम्हीं वर सांगितलेल्या बाबतींत एकाच जातीमध्यें जर अनेक फरक दिसूं लागले तर, जातीयत्व जाऊन व्यक्ति व्यक्तींमधील कलह नजरेस भरून दिसूं लागतात. मग बारिकशीं जाति भोंवतालीं पसरलेल्या मानवसमुद्रांत विलीन होऊन जाते. जाति नष्ट झाली तरी गट होण्याची प्रवृत्ति मनुष्यस्वभावांतच असल्यामुळें पुन्हां गटांची घटना होऊं लागते. जेथें जातीचें हित आणि व्यक्तीचें सुख यांमध्यें झगडा लागल्यास व्यक्ति आपलें सुख प्रधान

१ Future of life by Dr. C. C. Hurot.

मानते, तेथें ती जाति इंद्राच्या अमरावतींत रहात असो अगर साबरमतीच्या आश्रमांत रहात असो, ती विनष्ट होणार असें खुशाल भविष्य करावें. प्रथमतः जाति जातींतील झगड्यामध्यें जास्त एकजीव झालेल्या जाती जगल्या, त्याच नियमानें या एकरूपत्वाच्या कल्पना कुटुंब, जाति, वर्ण, राष्ट्र, मानव इत्यादि एकापेक्षां एक जास्त विस्तृत अशा गटांना लागू होऊं लागल्या. परंतु जातिनिष्ठ मनुष्यानें कुटुंबनिष्ठ असूं नये, वर्णनिष्ठानें जातिनिष्ठ असूं नये वगैरे नियम कसा सिद्ध होऊं शकेल, हें कळणें फारच कठीण आहे. एकापेक्षां एक जे वरचढ गट आहेत त्यांच्याशीं अर्थात्च व्यक्तींची निष्ठा विरळ रहाणार. तीव्र निष्ठेनें मानवादि गटांशीं वागणारे पुरुष विरळा. ही आपल्या स्वतःच्या संघाशीं एकनिष्ठ रहाण्याची जी प्रवृत्ति, तिलाच आम्ही नीति असें समजतों. ज्या वर्तनानें आपल्या संघाचा नैसर्गिक निवडींत टिकाव लागेल, तें नीतियुक्त व इतर सर्व वर्तन अनीतियुक्त, असें आमचें मत आहे. परोपकार करण्याची इच्छा असली तरी प्रबल संघच करूं शकतो, दुर्बल नव्हे. मग हें तत्त्वज्ञान सिद्ध करण्याला वाटेल तें तत्त्वज्ञान सांगावें, परमेश्वराचा आधार घ्यावा, ग्रंथांचे दाखले द्यावे, आपणांला जे जे करतां येईल तें तें करावें. प्रत्येक धर्मप्रवर्तकानें[१] हेंच तत्त्व पुढें ठेविलें होतें. म्हणूनच मुसलमान पुढारी, एकादा फाटका मुसलमान देखील आम्हांला गांधीजीपेक्षां श्रेष्ठ वाटतो असें म्हणतात !

एखादा मनुष्य मला माझ्या संघाचा म्हणजे जातीचा अभिमान नाहीं, असें म्हणत असेल तर त्याची कोठें तरी चूक होते आहे असें खुशाल समजावें. तें त्याचें म्हणणें जर अंतःकरणपूर्वक सत्य असेल, तर इतकाच इषारा देऊन ठेवावयाचा कीं, ज्या संघामध्यें अशा व्यक्ति जास्त प्रमाणांत असतील, तो संघ नैसर्गिक कलहांतून बाहेर पडून लवकरच नष्ट होईल ! अलीकडच्या सुशिक्षितांना वाटतें त्याप्रमाणें, आपल्या संघाबद्दल अगर जातीबद्दल अभिमान बाळगणें म्हणजे कांहीं एखादी लज्जास्पद गोष्ट करणें नव्हे !

कलह संघासंघांमध्यें असून त्यामुळें मानववंश सुस्थितींत रहातात, ही

१ Improvers of mankind, Twilight of idols by Nietzsche.

२ Reflections on the revolution in France by Burke.

गोष्ट आतांपर्यंत केलेल्या चर्चेवरून लक्षांत येईल. परंतु मानवसंघांतील कलह फारच गुंतागुंतीचा असतो. आपण पुष्कळ वेळां प्रगति हा शब्द वापरलेला ऐकतों. परंतु बोलणारा बहुतकरून कांहींएक कल्पनांना प्रागतिक मानून त्या कल्पना जेथें प्रतीत होतील त्या समाजांना सुधारलेले म्हणतो. त्यामध्यें या कल्पनेपेक्षां ती कल्पना श्रेष्ठ कां हें दाखविण्याचा प्रयत्न केलेला नसतो. अमेरिका आणि युरोप हे पुढारलेले आहेत अशी भाषा ज्यावेळीं आपल्या कानावर येते त्यावेळीं, खरोखर प्रगति ही काय कल्पना आहे, याचा बोलणारा आणि ऐकणारा या दोघांनाही बोध असतो असें आम्हांला वाटत नाहीं.

**२३ प्रगतीचें द्वैविध्य**

निसर्गाकडे पाहूं लागलें तरी असें दिसून येईल कीं, प्रगति दोन तऱ्हेची असते. एक म्हणजे मानवपिंडाचीच प्रगति व्हावयाची म्हणजे मानवजाति ( type ) हांच श्रेष्ठ गुणयुक्त बनावयाचा. याला आपण पिंडप्रगति ( Eugenic or biological ) म्हणूं. दुसरी म्हणजे मनुष्य वंश या नात्यानें कसाही असो, त्याच्या भोंवतालची परिस्थिति अशीच करावयाची कीं, त्याची क्रिया गुणयुक्त होऊन नीतीला पोषक आणि समाजहितवर्धक अशी व्हावी. यामध्यें मनुष्याचा आचार, मनुष्याचा धर्म, मनुष्याचा कायदा, मनुष्याचें राज्यशास्त्र, मनुष्याची समाजरचना, मनुष्याचें वाङ्मय एकूणएक ज्या कांहीं हालचाली मनुष्यप्राणी करीत असेल, त्या सर्वांचा समावेश होतो. या प्रगतीला आपण सांस्कारिक ( Traditional or Psychosocial ) प्रगति असें म्हणूं. पिंडप्रगति म्हणजे मनुष्यजातीच्या गुणधर्मांतच फरक पडत जाऊन गुण श्रेष्ठ श्रेष्ठ होत जाणें. अशा तऱ्हेचा फरक नैतिक, बौद्धिक, आध्यात्मिक अगर सामाजिक गुणधर्मांचे बाबतींत पडत चालला आहे असें मानण्याला मागील तीस हजार वर्षांत तरी कांहीं पुरावा[1] नाहीं, असें शास्त्रज्ञांचें मत आहे. म्हणजे अशा तऱ्हेची प्रगति कधीं काळीं होतच असल्यास, ती अत्यंत

---

१ Stream of life by Julian Huxley ; Outspoken essays by Dean Inge ; Social decay and regeneration by R. Austin Freeman ; Racial realities in Europe by Stoddard.

मंद गतीनें म्हणजे जवळ जवळ नाहींच अशी, अगर गणिताच्याच भाषेंत बोलावयाचें तर ' tending to zero ' अशी असते. ही प्रगति फारच हळूहळू होत जाणारी असल्याकारणानें, अधीर मनुष्यप्राण्याला कांहीं इतका वेळ थांबण्यास वेळ नसतो. परंतु दुसऱ्या तऱ्हेची प्रगति मात्र वाटेल तेवढ्या झपाट्यानें होऊं शकते. जपाननें एकदोन पिढ्यांत युरोपांतील संस्कृति पूर्णपणें उचलली. हिंदुस्थानांतील सुधारलेल्या वर्गानें एक दोन पिढ्यांत युरोपियन संस्कृतीचा रागरंग ओळखला. परंतु, सर्व पृथ्वीवरील राष्ट्रांपैकीं फक्त हिंदुस्थान या परतंत्र राष्ट्रानेंच पाश्चात्य संस्कृतीच्या हित-कारकत्वाबद्दल संशय प्रदर्शित केला आहे आणि तशा तऱ्हेनें शंका उत्पन्न करण्याला जबरदस्त कारणेंही आहेत. पहिल्या तऱ्हेची प्रगति शुक्रबिंदूच्या गुणधर्मांत हळूहळू निवड होत जाऊन व्हावयाची आहे. दुसऱ्या तऱ्हेच्या प्रगतीचें कारण मनुष्यबाह्य समाजरचना आहे. पहिल्या तऱ्हेच्या प्रगतीचा हेतु मनुष्यप्राण्याची कर्तृत्वशक्तीच वाढवावयाची हा आहे. तर दुसऱ्या तऱ्हेच्या प्रगतीचा हेतु मनुष्यप्राण्याची सामाजिक चालरीत थोडीशी सुधारावयाची हा आहे. थोडक्यांत हें उपमेनें सांगावयाचें तर, संस्कृति ही एक टोलेजंग इमारत मानल्यास पहिल्या तऱ्हेची पद्धति उत्तम माल-मसाला गोळा करूं इच्छिते तर दुसऱ्या तऱ्हेची पद्धति त्या इमारतीवर रंग-रंगोटी कशी करावी, नकशी कशी करावी, चित्रें कोठें काढावींत वगैरे गोष्टींचा विचार करते. रंगरंगोटी नसली तरी इमारत टिकावू होईल आणि मालमसाला चांगला नसला तरी इमारत मोहक होईल ! परंतु अडचणींत सांपडलेला प्रवासी कांहीं इमारतीचें मोहकत्व पहात बसणार नाहीं ! कोणीही विचारी पुरुष चंचल मोहकपणापेक्षां स्थैर्याकडेच जास्त लक्ष देईल. कोणीही मनुष्य उन्हाळ्यामध्यें चहूंकडे पसरणाऱ्या माशांच्या[१] सारखी आपली संस्कृति असावी, असें म्हणेल असें मला वाटत नाहीं.

परंतु आज सर्व जगभर ज्या सामाजिक आणि राजकीय चळवळी 'सुधा-रणा ' या नांवाखालीं चालल्या आहेत, त्या पहिल्या म्हणजे मात्र प्रत्येक सुधारणेमध्यें फक्त आजच्या पिढीचेंच कल्याण अगर अकल्याण पहाण्या-

---

१ Reflections on the revolution in France by Burke.

कडे दृष्टि लागलेली आहे असें दिसतें. पुढल्या पिढीसंबंधीं जी भाषा ऐकूं, ती पुढील प्रजा उत्पन्न होऊंच नये, झालीच तर कमी उत्पन्न व्हावी अशाच तऱ्हेची असते ! परिस्थिति मृदु करण्यापेक्षां पिंडच जास्त कार्य-क्षम करणें जास्त हितकारक आहे असें कांहीं फारसें कोणी म्हणतांना तर ऐकूंच येत नाहीं ! आणि तसें म्हणण्याचें कोणीं धाडस केल्यास त्याची जमा वेड्यांमध्यें केली जाते ! सुप्रजाशास्त्राच्या नियमानें प्रजा सुदृढ करा, असें म्हणण्याऐवजीं शिक्षणानें उजळा द्या, अशी सर्व जगांत घोषणा चाल-लेली आहे !

सार्वत्रिक शिक्षण हितकारक आहे, अशी चहूंकडे हांकाटी चालली असल्यामुळें, कर्तृत्ववान् कर भरणाऱ्या रयतेचा पैसा पाण्याप्रमाणें ओतला जात आहे. परंतु ज्यांना शिक्षण द्यावयाचें ते शिष्य शिक्षण घेण्याला लायक आहेत किंवा नाहींत, हें पाहण्याची मात्र फारशी विवंचना होत असलेली दिसून येत नाहीं ! निसर्गतः कर्तृत्वशक्तींत फरक असलेल्या दोन व्यक्तींना सारखेंच शिक्षण दिलें असतां, त्यांच्यामधील अंतर कमी होईल किंवा जास्त होईल हेंही पण पहावयाची कोणालाही सवड नाहीं ! याच लोकांना जर घोड्याच्या पागेवर, अथवा गाईच्या गौळवाड्यावर अथवा मेंढवाड्या-वर अधिकारी नेमले तर त्यांचें वर्तन खात्रीनें वेगळ्या तऱ्हेचें होईल ! एखादा खिलारी धनगर, अगर गुराखी अगर घोडेवाला याला घोड्यांचा, अगर गाईचा अगर मेंढरांचा कळप दिल्यास, तो कांहीं एकदम त्या कळ-पाची सुधारणा करण्यास लागणार नाहीं ! म्हणजे अर्थातच त्याला मान-वाच्या सामान्याप्रमाणें सर्व पशु समान आहेत हें तत्त्व मुळींच पटणार नाहीं. तो प्रथमतः त्यांपैकीं कोणत्यांमध्यें चांगले गुण आहेत आणि कोणते निर्गुण आहेत याची विवंचना करील आणि चांगले प्राणी निवडून वेगळे काढील. त्यांपैकीं जेवढीं फार चांगलीं जनावरें असतील, त्यांचीच जास्त काळजी घेण्यास व निगा राखण्यास सुरुवात करील. कारण, त्यांची निगा राखणें हें अंतीं फलदायक आहे, ही गोष्ट त्याला निश्चित माहीत आहे. इतरांवर श्रम करणें फुकट आहे, ही गोष्ट त्यांला कळते. परंतु मनुष्याचे बाबतींत मात्र तसा विचार करण्याची जरूरी आहे असें दिसत नाहीं. उलट वाङ्मयामध्यें नांव मिळविलेल्या लेखकांकडून असल्या प्रश्नांची

थट्टा मात्र केली[१] गेलेली दिसते ! मुलाची निसर्गानें दिलेली बौद्धिक शक्ति काय स्वरूपाची आहे, हें जाणण्याच्या पद्धती आतां बिनेट, सायमन, टरमन, गोडार्ड, कुहेलमन, बॅलार्ड, बर्ट वगैरे शास्त्रज्ञांच्या श्रमांनीं सांपडलेल्या आहेत. त्या पद्धतींचा उपयोग करून, शिक्षण घेण्याची लायकी अगर नालायकी ठरवून लायकीप्रमाणें शिक्षण दिल्यास जास्त फायदा होणार नाहीं काय ? मग त्यांनीं समता, व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक ऐक्य वगैरे कल्पनांचें काय करावें हा प्रश्नच उत्पन्न होईल ! सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं, समाजसुधारणेच्या कितीही गप्पा आपण ऐकत असलों तरीहीं सुधारणेमध्यें जास्त महत्त्वाचें काय आणि गौण वस्तु कोणती हें ठरविण्याचा दमच या लोकांत नाहीं. त्यांत त्यांचा तरी दोष काय ? त्यांचा सर्वांचा परात्पर गुरू जो साहेब, त्यालाच त्या गोष्टीचा कालपरवांपर्यंत बोध नव्हता, त्याचा आमच्या सुधारकांना तरी कसा होणार ? आमचे सुधारक अजून तरी स्पेन्सर, मिल यांच्या युगांत आहेत ! युरोपियन समाजरचनेवर आतां कोठें डार्विनच्या तत्त्वांची छाप पडूं लागली आहे. वेजमान आणि मेंडेल यांचीं तत्त्वें समाजांत रुजून त्याप्रमाणें राजकीय पद्धति, समाजरचना, तत्त्वज्ञान वगैरे क्षेत्रांत फरक पडण्याला यूरोपमध्यें एक शतक तरी जावयास पाहिजे.[२] मेंडेल आणि वेजमान यांचे नियम प्रजोत्पादन आणि आनुवंश यांबद्दलचे आहेत. त्यामुळें युरोपियन समाजरचना आज आनुवंशाचे नैसर्गिक नियम डावलून चालली आहे. तत्त्ववेत्ता नित्शे आणि शास्त्रज्ञ सर फ्रॅन्सिस गाल्टन यांनीं सुप्रजाजननशास्त्राकडे युरोपखंडाचें लक्ष वेधण्याचे प्रयत्न मागील शतकांत केले.[३] अजून देखील युरोपखंड ही पद्धति उचलील असें वाटत नाहीं. मग जे गुरुलाच उलगडत नाहीं, त्याचा बोध करून घेण्याइतकी स्वतंत्र बुद्धि आमच्या इकडील सुधारकांना नसली तर त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं ! अगदीं महात्मा मोहनदास

१ Eugenics and other evils by G. K. Chesterton.

२ Science and future by J. B. Haldane.

३ Anti-christ by Nietzsche, Hereditary genius, inquiries into human understanding and Natural inheritance by Sir Francis Galton.

करमचंद गांधी यांना देखील या बाबतींत भोंपळ्याएवढें शून्य आहे !

आजची स्थिति पाहिली तर यूरोपमध्यें संस्कृति या शब्दाची व्याख्याच तशी करतात, ' मनुष्याला शारीरिक आनुवंश असतो त्याप्रमाणेंच मानसिक आनुवंशही असतो. मानसिक आनुवंश म्हणजे पूर्वजांनीं मिळवून ठेविलेलें ज्ञान, ठरविलेल्या चालीरीति, निश्चित केलेले नीतिनियम आणि आचारधर्म या होत. या कांहीं सर्वथा पिंडावर अवलंबून नसतात. मनुष्याला कर्णपरंपरेनें आणि लेखनपरंपरेनें जें ज्ञान मिळतें, तें तशी व्यवस्था नसती तर नष्ट झालें असतें आणि प्रत्येक पिढीला पुन्हां शोधून काढावें लागलें असतें. हा जो सामाजिक अगर मानसिक आनुवंश हा मनुष्यसमाजाला अतिशय हितकारक आहे. म्हणूनच ' पिंडप्रगतिनिरपेक्ष सुधारणा करून घेण्याच्या युक्त्यांचा समुच्चय म्हणजे सुधारणा अशी व्याख्या मी पूर्वीं सुचविलीच आहे ' असें प्रो. रिचि म्हणतो.[१] किती सुंदर व्याख्या ! आणि या व्याख्येमध्यें अंतर्भूत झालेल्या मूलतत्त्वांवर, जिला पाश्चात्य सुधारणा म्हणून म्हणतात, तिची उभारणी झालेली आहे, ही गोष्ट आतां पुष्कळ पाश्चात्य शास्त्रज्ञांना देखील कबूल होत चाललेली आहे.

पिंडप्रगति आणि सामाजिक प्रगति या दोन प्रगतींचें कार्य, कारण, हेतु, गति वगैरे एकूनएक बाबतींत आत्यंतिक फरक आहे. त्यामुळें कोणत्याही समाजांत सांस्कारिक प्रगति किती होऊं द्यावयाची या बाबतींत अत्यंत श्रम न घेतल्यास, थोड्याच अवधींत या दोन प्रगतींमध्यें विसंगती उत्पन्न व्हावयास लागते. मग पिंडापिंडत्व आणि संस्कारासंस्कारत्व यांच्या विभेदानें संस्कृतीचे चार पर्याय होतात.

**२४ प्रगतीचे पर्याय**

पिंडप्रगति कनिष्ठ + सांस्कारिक प्रगति कनिष्ठ — परिणाम नाश.

पिंडप्रगति कनिष्ठ + सांस्कारिक प्रगति श्रेष्ठ — परिणाम—.

कांहीं काळपर्यंत चहूंकडे बोलबाला, जगज्जेतृत्व, ऐहिक सुखसंपत्तीचा उपभोग. प्रत्यक्ष परमेश्वराशीं स्पर्धा, परंतु शेवटीं विनाश. 'मुहूर्तं ज्वलितं श्रेयः न तु धूमायितं चिरं, ' ' अभिमानधनस्य गत्वरैरसुभिः स्थास्नु यशः

१ Darwinism and politics by Dr, Ritchie.

चिचीषतः, ' ' संगर नाहीं संगरिं नाहीं जनपद तो कसला। सूड न जेथील खल ललनाश्रु जलांजली प्याला। जयासि भाला न खड्ग ढाला धिक् त्या लोकाला। प्रणाम माझा स्वतंत्र राज्यालंकृत राष्ट्राला। ' वगैरे सर्व ध्येयें याच संस्कृतींतील आहेत. तत्त्वज्ञानाचे भाषेंत या संस्कृतीचें वर्णन करावयाचें तर : 'विषयेंद्रिय संयोगात् यत्तदग्रेऽमृतोपमम्। परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतं।' ही प्रगति सुरुवातीला अमृताप्रमाणें गोड आहे यांत कांहीं शंका नाहीं. कारण, इंद्रियार्थसंनिकर्ष हेंच तर येथील पहिलें ध्येय आहे.

पिंडप्रगति श्रेष्ठ + सांस्कारिक प्रगति कनिष्ठ – परिणाम–भौतिक शक्तीच्या जोरावर उत्कृष्ट संस्कृतीचा नाश करून, शेवटीं आपणही सृष्टींतून अंतर्धान पावावयाचें. या संस्कृतीचें कार्य जगन्नाश. तत्त्वज्ञानाचे भाषेंत या संस्कृतीचें वर्णन करावयाचें तर तें पुढीलप्रमाणें करतां येईलः—

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरं।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम्॥
एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः।
प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः॥

पिंडप्रगति आणि सांस्कारिक प्रगति समबल–परिणाम सनातनजीवन. या संस्कृतीची प्रतिज्ञा : ' यावद्भूमंडलं धत्ते सशैल वनकाननं। तावत्तिष्ठति मेदिन्यां संततिः पुत्रपौत्रिकी।' – वंशपरंपरागत संतति पृथ्वीनाश अगर प्रलयकाल येथपर्यंत ठेवण्याचा प्रयत्न—या संस्कृतीच्या स्थितीचें वर्णन भगवद्गीताकारानें पुढीलप्रमाणें केलें आहे.—

' अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम्॥
अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्।
दयाभूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्॥

१ भगवद्गीता.
२ मार्कंडेय पुराण.
३ भगवद्गीता.

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवंति संपदं दैवीं अभिजातस्य भारत ॥
दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ।
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ '

अशा तऱ्हेचाच उपदेश तत्त्ववेत्ता फ्रेडरिक नित्शे हा पुढील शब्दांत करतो.[१] ' काय, तूं एकदा सद्गुणांचा आणि तदनुषंगिक दुःखांचा स्वीकार केलास ना! मग आतां असद्गुणी लोकांना मिळणाऱ्या ऐहिक फायद्यांकडे अभिलाषबुद्धीनें काय म्हणून पहातोस ? ज्या दिवशीं तूं सद्गुणांची निवड केलीस, त्याच दिवशीं तूं सर्व इंद्रियार्थांच्या फायद्यांचा त्याग केलास, '—या चारही पर्यायांच्या ऐहिक कार्यांचें पर्यालोचन करून, आपण त्यांपैकीं कोणता पर्याय स्वीकारावयाचा व तो पर्याय सिद्ध होण्याला कोणते मार्ग अवलंबिले पाहिजेत, त्यांची विवेचना करावयास पाहिजे.

पूर्वी अरब आणि हल्लीं यूरोपीयन या लोकांचा प्रवेश होण्यापूर्वी आफ्रिका या तमोमय खंडामध्यें ( dark continent ) जो मानव वंश रहात होता आणि ज्यांचे वंशज आजही तेथें आहेत, त्या लोकांमध्यें संस्कृतीचा पहिला पर्याय दिसून येईल. एक मोठें थोरलें खंड परमेश्वरानें म्हणा अगर निसर्गानें म्हणा, हजारों वर्षे या लोकांच्या ताब्यांत दिलेलें होतें. त्या खंडामध्यें जातीय श्रेष्ठत्वाकरितां गटागटांचे खटके चालू होतेच आणि आहेतही. परंतु त्यांच्या या एकंदर धकाधकींतून आर्यसंस्कृतीच्या तोडीची निदान तिच्या जवळजवळ लायकीची तरी संस्कृति कां निर्माण झाली नाहीं, याचीं कारणें तेथें राहून आलेले आणि हिंदुस्थानांतील तत्सम जातींची अस्पृश्यता निवारण झाल्यास सुधारणा होऊं शकेल, असें म्हणणारे महात्मा गांधी अगर त्यांचे कोणी अनुयायी सांगूं शकतील तर तो समाजशास्त्रांत फारच मोठा शोध होईल, असें आम्हांला वाटतें. महात्मा गांधी अगर पंडित काका कालेलकर यांनीं या गोष्टीची चर्चा करून खुलासा केल्यास समाजशास्त्राच्या अभ्यासकांवर त्यांचे फारच उपकार होतील. खरी गोष्ट अशी आहे कीं, उत्तम संस्कृति उत्पन्न करण्याची आणि ती दीर्घकाल टिकविण्याची लायकीच या

[१] Twilight of idols by Nietzsche.

वंशामध्यें नाहीं ! कोणत्याही कर्तृत्ववान वंशाला कितीही समर्थ असलेलें सरकार फार काळ दाबून टाकूं शकत नाहीं, याचें प्रत्यक्ष प्रमाण हिंदुस्थानांतील आजची चळवळ हेंच आहे. ती हितकारक दिशेनें चालली आहे किंवा नाहीं हा प्रश्न वेगळा. परंतु सर्वसमर्थ सरकारला भंडावून सोडणारी चळवळ सुरू झाली याचें कारण, हिंदुस्थानांत असलेल्या कांहीं वंशांमध्यें कर्तृत्वशक्ति आहे. आफ्रिकेंतील वंशामध्यें तसा कांहीं प्रकार झाला नाहीं, याचें कारण जातीय नालायकी ! परंतु आज कांहीं तसें म्हणण्याची सोय नाहीं. तसें म्हटल्यास रुसो, मार्क्स, लेनिन, स्टॅलिन वगैरेंनीं प्रतिपादन केलेली जी मानवी समता, त्या समतेचें काय होणार ! आमच्या इकडे रशियन अर्थशास्त्र पसरवूं पहाणाऱ्या पंडितांना आमची अशी हात जोडून विनंति आहे कीं, त्यांनीं या महामूर्ख हिंदु समाजाच्या नादीं न लागतां, रशियन सर्वाधिकाऱ्याला पत्र लिहून आज आफ्रिकेमध्यें जे वेगवेगळे वंश आहेत, त्यांना समाजसत्तावादाच्या नियमानुसार आपल्या राष्ट्राचे घटक करून घेण्याची गळ घालावी म्हणजे मानवाच्या दृष्टीनें फारच फायदा होईल आणि सर्व मानवजातीच्या उद्धाराकरितांच रशियांतील अर्थशास्त्र अवतरलेले आहे ही गोष्टही सिद्ध होईल. बरें ! वंश, भाषा आणि लोकसंख्या इत्यादि सर्व दृष्टीनें हे लोक कांहीं थोडथोडके नाहींत ! त्यांचे भूरचना, मानव वंशशास्त्र आणि भाषा या दृष्टीनें सहा विभाग पडतात. अॅरॅबोनबर्बर अथवा सेमिटो—हॅमाईट, इथिओपियन, फुलाझांडे, पिग्मिज, सुदानीज गिनीनिग्रो, बंटु आणि हाटेंटॉट बुशमेन. एवढी मोठी लोकसंख्या असूनही सुधारलेल्या आरब अगर युरोपियन लोकांशीं संबंध येण्यापूर्वी अथवा आल्यानंतर अजून तेथें संस्कृति कां उत्पन्न होत नाहीं, याची सांगोपांग चर्चा समतावाद्यांनीं खरोखर करावयास पाहिजे. करतील तो दिवस भाग्याचा ! तोंपर्यंत समता, बंधुत्व, स्वातंत्र्य, समाजसत्तावाद, भांडवलशाही, दुष्ट जातिभेद, हिंदुधर्मावरील कलंक वगैरे अघळपघळ चलती नाणीं बाजारामध्यें चालू रहाणार यांत कांहीं शंका नाहीं. असो. अशा तऱ्हेचे वंश जगांत आहेत. त्यांचा धर्मप्रवण, सच्छील, परमेश्वराची भीति बाळगणाऱ्या चांगल्या वंशांशीं व्यवहार आल्यास ते सृष्टींत टिकाव धरून रहातात, त्यांचें सृष्टींतून उच्चाटन होत नाहीं. परंतु त्यांचा जर युरोपियनांसारख्या सुधारलेल्या, प्रागतिक,

सभ्य अशा वंशांशीं संबंध आला तर, ते जगांतून उठले असें खुशाल समजावें ! आमच्या इकडील ब्राह्मणादि सुधारलेल्या ( युरोपियन दृष्टीनें अर्धसुधारलेल्या[1] ) पांढरपेशा वर्गाला आमची तरी हीच विनंति आहे कीं, राजकीय क्षेत्रांत आपण मारामारी करूं नका, इतकेंच नव्हे तर ज्यू लोकां-प्रमाणें राजकीय हक्कनिरपेक्ष आपल्या वंशाचें रक्षण करण्याची व्यवस्था करा, म्हणजे आमच्या इकडील हलक्या जातींचा ब्रिटिशांशीं प्रत्यक्ष संबंध येऊन त्यांना कितपत हक्क मिळतात, तें त्यांचें त्यांनाच कळून येईल. तसे ते मिळत नाहींत ही गोष्ट पुष्कळांच्या लक्षांत येऊन चुकली आहे, लष्करी खात्यांत तर जातिभेद आणि अस्पृश्यता यांचा कांहीं प्रश्न नाहीं आणि तें खातें तर सर्वथा माबाप सरकारच्या ताब्यांत आहे, तेथें तर दुष्ट ब्राह्मण आणि त्यांनीं लादलेली अस्पृश्यता यांचा कांहींही संबंध नाहीं, परंतु तेथेंही अस्पृश्यांची प्रगति होत नाहीं. इंग्रज लोकांना राज्य चालवावयाचें आहे, दीनदुबळ्यांकरतां, नीतिप्रचाराकरितां साबरमती आश्रम उघडावयाचा नाहीं ! जसजसें[2] इंग्रजांचें बस्तान येथें बसत चाललें तसतसें लष्करांत एतद्देशीय लोकांची भरती करण्याचें बादशाही धोरण बदलत चाललें आणि तशी लष्करांतून ह्या अस्पृश्यांना हळूहळू बेमालूम बंदी होऊं लागली. मग इंग्रजांना येथील जातींचा लष्करी दृष्टीनें अस्सल आणि कमअस्सल असा भेदभाव सुचूं लागला आणि हिंदी लष्कराचें अस्सलीकरण सुरू झालें. ‘ जातिवंत इभ्रतदार वतनदार जातींतून ही भरती व्हावी असें वळण पडत चाललें. ’ अस्पृश्याला देवळांत घुसविण्याकरितां हिंदूंशीं मारामारी करीत बसण्यापेक्षां, त्याला लष्करांत घुसवून नोकरी देण्याकरितां ब्रिटिश लोकांशीं वाद घालावा, अशी महात्मा गांधींना हात जोडून विनंति आहे. डॉ. अंबेडकरांच्यासकट सर्व अस्पृश्य त्यांचे ऋणी होतील अशी डॉक्टरसाहेबांच्या अनुमतीशिवायच आम्ही त्यांना ग्वाही देतों.

ही पाश्चात्य संस्कृति अशी आहे कीं, ती जेथें जेथें गेली तेथें तेथें तिनें दुर्बळ मानववंशांना एकमेव दुःखांतून मुक्त केलें, म्हणजे त्यांचा नाश

---

१ Is India civilized by Sir John Woodroffe या ग्रंथांत टीकाकार William Archer यांच्या हिंदुस्थान सुधारलेला नाहीं या मताला उत्तर दिलें आहे.

२ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न–शिंदे.

केला म्हणजे त्यांना ईश्वरबापाच्या आधिराज्यांत पाठवून दिलें ! (Thy kingdom come ' तुझें आधिराज्य होवो. ) आतां त्यांच्या सुखाला काय पारावार विचारावा ! भौतिक आणि शारीरिक दृष्ट्या जीवनार्थ कलह हा जीवसृष्टीचा नियमच असल्याकारणानें अशा तऱ्हेच्या वंशांमध्यें तो चालूच असतो. मग निकोप प्रकृतीचे आणि प्रबल लोक हे अन्नाच्छादनाचा पुरवठा दुर्बलांकडून हिरावून घेतच असतात. परंतु सामाजिक प्रगतीमध्यें आणखी कांहीं अनिश्चित शक्तींची वाढ होतच असते. ती अनिश्चित शक्ति म्हणजे बुद्धीची वाढ आणि त्या वाढीबरोबरच उत्पन्न होणारे सर्व गुणदोष. सामाजिक आणि बौद्धिक दृष्ट्या वाढ न झालेले वर्ग म्हणजे निव्वळ मानव पशु म्हणून वावरणारे वर्ग, बौद्धिक आणि सामाजिक दृष्ट्या वाढ झालेल्या वर्गांचा शेजारी प्राप्त झाल्यास, मृत्यूपंथाला लागतात असा इतिहास सृष्टीमध्यें दिसून येतो. परंतु हा परिणामही हजारों वर्षें हिंदुस्थानांत रहात असलेल्या ब्राह्मणांच्या शेजारांत मात्र घडलेला दिसून येत नाहीं. त्यांच्या समाजरचनेमध्यें अत्यंत नीचांतील नीच अशी जाति देखील सुरक्षित रीतीनें आणि सुखानें कालक्रमणा करतांना दिसून येते. परंतु येशू ख्रिस्ताच्या बापाप्रमाणेंच मायाळू असलेली पाश्चात्य संस्कृति जेथें जेथें प्रवेश करील तेथें तेथें तिनें हलक्या वंशांचा नाशच केलेला आढळून येईल[1] ! अशा तऱ्हेनें आस्ट्रेलियांतील तद्देशीय वंश उध्वस्त झाला, न्यूझीलंडमधील मावरी लोकांचा नाश झाला, टास्मेनियन् लोक देवबाप्पाच्या घरीं गेले, रेड इंडियन आतां शेवटच्या न्यायाचा दिवस येण्याची वाट पहात बसले आहेत ! सँडविच बेटांतील तद्देशीयांची वसती चाळीस वर्षांत अडुसष्ट टक्के घटून गेली, असें डार्विन म्हणतो ! जर्मन भूगोलशास्त्रज्ञ आणि मानववंश शास्त्रज्ञ रॅटझेल म्हणतो : सन १८१५ सालीं टास्मेनियन लोकांची संख्या पांच हजार होती, त्यांपैकीं १८६० सालीं सोळा जीव शिल्लक राहिले आणि १८७६ सालीं एकही टास्मेनियन औषधाला देखील शिल्लक राहिला नाहीं ! न्यूझिलंडमधील मावरी सन १८५८ सालीं ५३,७०० इतके होते, ते सन १८७२ सालीं ३६,३५७ इतकेच शिल्लक राहिले. हीच स्थिति हॉटॅटॉट आणि रेड इंडियन लोकांची झाली. या सर्व परिणामांची कारणमीमांसा

१ Descent of Man by Darwin.

डार्विन पुढीलप्रमाणें करतो,[१] मारक हवापाण्यानें तद्देशीय वंशांना मदत न केल्यास सुधारलेले आणि रानटी वंशांमधील कलहाचा फारच लवकर निकाल लागून सुधारलेला वंश विजयी होतो. या विजयाचीं कांहीं कारणें स्पष्ट आहेत. परंतु इतर बरीचशीं कारणें कांहीं समजून येत नाहींत. पहिली गोष्ट अशी कीं, मागसलेले वंश आपल्या चालीरीती बदलावयास लवकर तयार होत नाहींत. सुधारलेल्या लोकांनीं नेलेले नवीन रोग आणि नवीन दुर्गुण यांनीं पुष्कळ वेळां नाशाचें कार्य घडवून आणलेलें आहे. असें दिसून येतें कीं, नवीन रोगांनीं प्रजांचा नाश फार झपाट्यानें होतो. तसाच मादक दारूचाही परिणाम होतो. कारण, कांहींही असो, दोन वेगवेगळे वंश एका जागीं आल्यास त्यांच्यामध्यें नवीन रोगांचा प्रादुर्भाव होतो ही गोष्ट निश्चित आहे.' गरीब बिचारा डार्विन ! समाजांच्या नाशाचीं कारणेंच त्याला कळलीं नाहींत, असें आमच्या इकडील सुधारकवर्ग खास म्हणेल ! त्या समाजामध्यें विवाहाच्या वयाची वाढ, सार्वत्रिक शिक्षण, स्त्रीशिक्षण, अनाथ विद्यार्थीगृहें वगैरेंची वाढ केली असती म्हणजे, तो समाज लवकर भरभराटला असता ! आतांपर्यंत प्रगतीच्या पहिल्या पर्यायाचा विचार झाला, आतां दुसऱ्या पर्यायाकडे पाहूं.

दुसरा पर्याय म्हणजे पिंडनिरपेक्ष संस्काराच्या जोरावर मानवाची प्रगति करणें असा आहे. या वर्गामध्यें भूतकाळीं जगांत होऊन गेलेल्या सर्व संस्कृति आणि आज जगावर पसरलेल्या युरोपियन आणि तत्सम विकृती या सर्व येतात. या तऱ्हेच्या सुधारणेला विकृती हा शब्द आमच्यापूर्वी इतरांनींही लाविलेला[२] आहे. अशा तऱ्हेच्या संस्कृतींची यादी करावयास बसलों तर, मनुष्याचें अंतःकरण खेदानें भरून गेल्याशिवाय रहाणार नाहीं. 'मरणं प्रकृतिः शरीरिणाम्' या नियमाप्रमाणेंच 'मरणं प्रकृतिः सुधारणानाम्' असाच जर सृष्टीचा नियम असेल, जर सुष्ट–दुष्ट हे दोघेही सृष्टीच्या कराल दाढेंत नष्ट होणार असतील.

१ Descent of Man by Darwin.

२ Civilization, a disease its causes and Cures by Edward Carpenter; Dilemma of civilization by Dean Inge; Decline of the West by Oswald Spengler.

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धः लोकान् समाहर्तुमिहप्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताप्रत्यनीकेषु योधाः ॥
तस्मात्त्वमुतिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुंक्ष्व राज्य समृद्धम् ।
मयैवेते निहताःपूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥
द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपियोधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठाः युद्धस्व जेतासि रणे सपत्नान् ॥

या न्यायानें नाश अगर उदय हीं जर कालाचींच कार्यें असतील, म्हणजे मानवी प्रयत्नाच्या टप्याच्या पलीकडील असतील तर, संस्कृति वा विकृति या दोनही स्थितींशीं मानवप्राण्याचा मुळींच संबंध पोहोंचत नाहीं अशा तऱ्हेचे विचार कोणाही विचारी मनुष्याच्या अंतःकरणाला भंडावल्याशिवाय सोडणार नाहींत.

अशा तऱ्हेच्या प्राचीन काळीं नष्ट झालेल्या संस्कृती म्हणजे सुमेरियनसंस्कृति, इराणीसंस्कृति, असुरसंस्कृति, मिसरीसंस्कृति, कार्थेज, अथेन्स, मॅसेडोनिया येथील संस्कृति, रोमनसंस्कृति, नामावळी तरी कोटवर द्यावी ! सुमेरियन संस्कृतीचा इतिहास देखील सांपडत नाहीं. त्या संस्कृतीच्या कलाकौशल्य वाङ्मयादि गोष्टींचा वारसा देखील कोणाकडे आलेला दिसत नाहीं. त्या संस्कृतीची भाषा देखील आज वाचतां[1] येत नाहीं. त्यावेळीं ती संस्कृति विजयी नव्हती[2] काय ? तर मग ती संस्कृति आज मातीच्या ढिगांतून उकरून काढावी लागत आहे त्याचीं कारणें काय असतील, तीं शोधून काढलीं पाहिजेत. 'उद्वृत्तः सच राजपुत्रनिवहस्ते बंदिनः ताः कथाः । सर्वं यस्य वशादगात् स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ।' असे राजा भर्तृहरीप्रमाणेंच प्रत्येकाला उद्गार काढावे लागतील असें आम्हांला वाटतें. अथेन्सनें आपलें तत्त्वज्ञान आणि आपली कला मानवाला वारसा म्हणून टेवलेली आहे, तत्त्ववेत्ते आणि इतिहासकार, मुत्सद्दी आणि सेनापति, शिल्पी आणि नाटककार अशा तऱ्हेचे पहिल्या प्रतीचे पुरुष या ग्रीक संस्कृतींत निर्माण झाले. कांहीं क्षेत्रांमध्यें तर त्यांच्या बुद्धीला अजूनही प्रतिस्पर्धी मिळाले नाहींत. सॉक्रेटीस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, डेमेट्रिअस्, थिओफ्रेस्टस्, डेमॉस्थेनिस्, इसोक्रेटस्, ॲरिस्टाईडस्

१ Sumerian seals deciphered by L. H. Waddel.
२ The Sumerians by C. L. Wooley.

थेमिस्टॉक्लीस, पेरिक्लीस— थोरांचीं नांवें तरी किती सांगावींत? परंतु ज्या संस्कृतीमध्यें हे लोक निर्माण झाले, ती संस्कृति कांहीं चिरंजीव होऊं शकली नाहीं! सृष्टीला म्हणजे अनंताला हें सांताचें ऐश्वर्य पाहवलें नाहीं म्हणून उदात्त ग्रीक संस्कृति नष्ट झाली. रोमन साम्राज्यानें आपला कायदा आणि आपलें राज्ययंत्र मागें ठेविलें आहे. आज विसाव्या शतकांत देखील कायद्याचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला,जस्टिनियनचा कायदा पहावा लागतो! परंतु रोमन सम्राटांचीही भोजानें म्हटल्याप्रमाणें, ‘नैकेनापि समं गता वसुमती’ अशीच स्थिति झाली. आम्हांला असें वाटतें कीं, सृष्टीचा नियम जो दुःखशोकांत मानवाची शुद्धावस्था रहाणें, तो लवकरच मनुष्याच्या डोळ्यांपुढून बाजूला सरूं लागतो आणि मानव हा एकदां सुख हें आपलें ध्येय मानून चालूं लागला म्हणजे, हळूहळू त्याची अधोगति होऊं लागते. जगांत कोठेंही पाहिलें तरी सृष्टीमध्यें हाच अनुभव सर्व ठिकाणीं आलेला दिसतो. हिंदुस्थानांत तरी तोच अनुभव येतो. ज्यानें कावेरी नदीपासून तों हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीपर्यंत द्विग्विजय केला, ज्याचें अतुल यश कविश्रेष्ठ कालिदासानें ‘विनांताध्वश्रमास्तस्य सिंधुतीरविचेष्टनैः। दुधुवुर्वाजिनः स्कंधान् लग्नकुंकुमकेसरान्[1]॥’ अशा तऱ्हेनें मृतालाही तेजस्वी बनविणाऱ्या पंक्तीमध्यें गाइलें,त्या समुद्रगुप्ताच्या साम्राज्यसत्तेचा शेवट तोच झालेला दिसतो! अथेन्सची संस्कृति त्या संस्कृतीच्या प्रतिस्पर्धी संस्कृतींच्यापेक्षां श्रेष्ठ होती, या बाबतींत काडीइतकी देखील शंका घेण्याला जागा नाहीं. परंतु अथेन्सच्या संस्कृतीचा नाश कांहीं टळला नाहीं! रोमची संस्कृति आपल्या पडत्या काळांत देखील गोथ, हूण, वेंडाल वगैरे लोकांच्या संस्कृतीपेक्षां श्रेष्ठ होती. परंतु याच रानटी लोकांनीं त्याच रोमन साम्राज्याचा नाश केला!

समाज हेही व्यक्तीप्रमाणेंच परिस्थितीच्या रेट्यांत बनत जातात. सार्वत्रिक सत्ता गाजविल्यानंतर हळूहळू अर्धांगरोग म्हणजे सत्ताहीनता उत्पन्न होऊन हळूहळू नाश, अशा तऱ्हेची प्रणाली या तऱ्हेच्या सर्व संस्कृतींमध्यें घडलेली दिसून येईल. इसवी सन ४७६मध्यें पश्चिम साम्राज्याचा नाश होण्यापूर्वीच युरोपचा बहुतेक भाग नव्या दमाच्या लोकांनीं आक्रांत केलेला दिसून येतो. इसवी सन ३७६ सालीं विसिगोथ लोकांनीं रोमन साम्राज्यावर हल्ला केला

१ रघुवंश.

आणि तेव्हांपासून सात शतकें सारखे युरोपवर हल्ल्यावर हल्ले होत होते. शेवटीं जेव्हां त्या लाटा ओसरल्या, तेव्हां मानव युरोपामध्यें स्थिर झाला. या एकंदर चर्चेवरून एक गोष्ट निश्चित होईल कीं, निव्वळ सांस्कारिक प्रगतीबरोबरच मानवाच्या नमुन्याची प्रगति न झाल्यास ती प्रगति या सृष्टींत टिकाव धरूं शकत नाहीं. त्याप्रमाणेंच निव्वळ पिंडप्रगतीच होऊन सांस्कारिक प्रगति न झाल्यास, तीही प्रगति सृष्टींत विनष्ट होईल आणि तिचें नामरूप देखील मागें रहाणार नाहीं!

तिसरा पर्याय म्हणजे, पिंड सुदृढ पण संस्कृतीचा अभाव. अशा तऱ्हेचे समाज भौतिक शक्तीचें मुख्य कार्य जो विनाश, तो केल्यानंतर जगांतून नामरूप देखील शिल्लक न ठेवतां अंतर्धान पावतात. अशा तऱ्हेचे समाज म्हणजे गोथ, हूण, वेंडाल वगैरे लोकांचे समाज होत. गोथ लोकांनीं वेळोवेळीं हल्ले करून रोमन साम्राज्याची कशी दुर्दशा उडवून दिली आणि तें साम्राज्य कसें खिळखिळें करून सोडलें ही गोष्ट इतिहासज्ञांस विदितच आहे. वेळींअवेळीं शौर्याचे पोवाडे गाणाऱ्या आमच्या इकडील लेखकांनीं, पुढाऱ्यांनीं आणि इतरांनीं ॲटिला या हूण सरदारानें युरोपमध्यें केवढाल्या लढाया मारल्या, त्यांचीं वर्णनें गिबनच्या इतिहासांतून जरूर वाचून पहावीं. त्या सरदारानें युरोपच्या पांचशें मैलांच्या सरहद्दीवर आपल्या अगणित सेनेसह एकदम हल्ला करून, ती लाट फ्रान्सपर्यंत नेऊन पोहोंचविली. रणांगणामध्यें एवढे मोठाले पराक्रम करून देखील, या लढवय्यांना आपला समाज टिकवून धरितां आला नाहीं अगर त्यांच्या संस्कृतीचा मागमूस देखील आज शिल्लक राहिला नाहीं! यावरून समाजरक्षणामध्यें युद्धाचें कार्य किती कमी आहे आणि वेळींअवेळीं युद्धाचे पोवाडे गात बसणें बरें नव्हे, ही गोष्ट कोणाच्याही लक्षांत आल्याशिवाय रहावयाची नाहीं.

असो. वरील चर्चेवरून पुढील अनुमानें काढतां येतील.—

(१) पिंडदृष्ट्या सुदृढ परंतु सांस्कृतिकदृष्ट्या मागसलेले अशा लोकांची पिंडदृष्ट्या हीन परंतु सांस्कृतिकदृष्ट्या सुधारलेले अशा लोकांशीं स्पर्धा झाल्यास पहिल्या तऱ्हेचे लोक अंतिम झगड्यांत विजयी होतील. उदाहरणार्थ—गोथ, हूण, वेंडाल या लोकांनीं वैभवशाली रोमन साम्रा-

ज्याचा नाश केला. श्वेतहूणांनीं स्कंदगुप्ताच्या मृत्यूनंतर गुप्तसाम्राज्याच्या ठिकऱ्या उडविल्या. मोंगल लोकांनीं चीन आणि हिंदुस्थान येथील राज्यें काबीज केलीं.

( २ ) वरवर श्रेष्ठ दिसणाऱ्या समाजामध्यें अशा तऱ्हेची जी वांशिक हीनता दिसून येते ती, तो समाज पूर्वीं केव्हांतरी श्रेष्ठत्वाला पोहोंचून सामाजिक चुक्यांमुळें अधोगतीला पोहोंचला असला पाहिजे असेंच दर्शविते. कारण पूर्वीं केव्हांतरी वांशिक श्रेष्ठत्व प्राप्त झालें असल्याशिवाय, सामाजिक संस्कृति त्या समाजामध्यें उत्पन्न होणें शक्यच नाहीं.

( ३ ) जे समाज पिंडदृष्ट्या श्रेष्ठ परंतु सांस्कृतिकदृष्ट्या हीन आहेत, अशा समाजांची पिंडदृष्ट्या श्रेष्ठ आणि सांस्कृतिक दृष्ट्याही श्रेष्ठ, अशा श्रेष्ठ समाजांशीं स्पर्धा झाल्यास पहिला समाज हतवीर्य होईल. म्हणजे, पिंड-प्रगति आणि सांस्कृतिक प्रगति या समांतर रेषेंत चालल्या पाहिजेत. त्यांच्या-मध्यें विषमता उत्पन्न होऊं देणें योग्य नाहीं. एकदां कां विषमता उत्पन्न झाली म्हणजे विनाश हा नक्की ठेवलेलाच !

( ४ ) पिंडगत श्रेष्ठत्वामध्यें पुढील गोष्टींचा अंतर्भाव होतो.—

( अ ) प्रजोत्पादनाची शक्ति उत्तम सुस्थितीमध्यें असावयास पाहिजे. यामध्यें कोणत्याही नैसर्गिक अगर अनैसर्गिक उपायानें अडथळा अल्यास त्या समाजाचा निश्चित नाश व्हावयाचा[१]. या मुद्याची सांगोपांग चर्चा संतति-नियमनाच्या चर्चेच्या वेळीं करूं.

( आ ) राजकीय, सामाजिक, आर्थिक वगैरे कोणत्याही तऱ्हेची आपत्ति कोसळली तरी, कोणत्याही परिस्थितींत आपले कुटुंबाचें रक्षण करण्याची धमक असणें. अंगांत धमक नाहीं म्हणून संतति-नियमनाची आवश्यकता आहे, असें म्हणणाऱ्या समाजांतील जीवनार्थ कलहाची शक्ति ओहोटीस लागलेली आहे असें खुशाल समजावें.

( इ ) परकीय संस्कृतीबरोबर आलेले रोग, दारू वगैरे मादक द्रव्यें आणि उपदंशादि वंशनाशक रोग, या सर्वांपासून समाज अलिप्त ठेवून, समाजाचें रक्षण करण्याची लायकी त्या त्या गटांत उत्पन्न झालेली असणें.

---

१ Types of economic theory by Othmar Spann.

(ई) परकीयांनीं आणिलेले दुर्गुण आणि दुष्प्रवृत्ति हे समाजाची फारच लवकर हानि करूं शकतात, हें ध्यानीं ठेवून परकीय चालीरीति शक्य तेवढ्या पारखूनच उचलणें.

आज चहूंकडे समाजांचें निरीक्षण केल्यास असें दिसून येईल कीं, समाजांमध्यें जो वर्ग सुधारलेला या नांवानें ओळखला जातो, त्या वर्गाची स्थिति वर सांगितलेल्या बाबतींत अगदीं उलट आहे. वर सांगितलें कीं, प्रजोत्पादनाची शक्ति नेहमीं सुदृढ स्थितींत रहावयास पाहिजे. सुधारलेला वर्ग ती शक्ति युक्तिप्रयुक्तीनें कमी करण्याचा प्रयत्न करीत आहे. मेजर[१] लेनार्ड डार्विन म्हणतो, 'जर चहूंकडे श्रेष्ठ वर्ग समाजांतून नष्ट होत असतील तर, ते वर्ग पिंडदृष्ट्या नालायक होत चालले आहेत असेंच म्हणणें भाग आहे.' सुधारणा आणि नाश यांचें साहचर्यच असल्यासारखा भास होतो. असें कां व्हावें? कोणतीही संस्कृति पाहिली तर ती चिरंजीव झालेली दिसत नाहीं. हल्लीं जिला पाश्चात्य संस्कृति म्हणतात आणि जी आज जगाच्या कानाकोपरा देखील व्यापून राहिली आहे, जिला आज कोणी प्रतिस्पर्धी नाहीं असा भास होतो आणि जी आज परमेश्वराशीं देखील स्पर्धा करण्याला मागें पुढें पहाणार[२] नाहीं, ती आम्हीं वर दाखविलेल्या पर्यायांपैकीं दुसऱ्या नंबरच्या पर्यायांत अंतर्भूत होईल. कारण कीं, पाश्चात्य पंडितांनीं त्या संस्कृतीची व्याख्याच मुळीं तशी केलेली आहे ही गोष्ट आम्हीं मागेंच नमूद केलेली आहे आणि म्हणूनच आम्ही म्हणतों कीं, ती संस्कृति डोळ्याला कितीही जरी उठाव दिसत असली, तरीही ती विनाशीच आहे. ही गोष्ट आमच्यापैकीं सर्व समाजसुधारकांनीं जरूर लक्षांत धरावी. आज शास्त्रीय प्रगति म्हणून ज्या प्रगतीचा डांगोरा पिटविला जात आहे, ती प्रगति म्हणजे जड सृष्टीचा शोध करून त्यांचा समाजकार्याला उपयोग करणें एवढीच आहे. परंतु या प्रगतीनें मानवी भावनांमध्यें कोणत्याही तऱ्हेची सुधारणा झाली नसल्यामुळें, ही प्रगति मानवी संस्कृतीचें थडगें बांधील अशी बरट्रँड रसेल, जे. बी. एस्. हाल्डेन वगैरे पुष्कळ विचारवंतांना भीति वाटूं लागली आहे! अशा तऱ्हेची संस्कृति हिंदुसमाजामध्यें

---

१ Need for eugenical reform by Leonard Darwin.

२ Reflections on the revolution in France by Burke.

प्रचलित करावी, असें आज समाजधुरीणांचें मत झालेलें दिसत आहे, म्हणून या संस्कृतीच्या मूलतत्त्वांचा जरा जास्त लक्षपूर्वक विचार व अभ्यास करावयास पाहिजे.

आज सुधारलेला समाज असें नामाभिधान ज्या समाजांना प्राप्त झालेलें आहे, त्या सर्व समाजांच्या रचनेमध्यें एकच मूलभूत तत्त्व चहूंकडे उपयोगांत आणलेलें दिसून येईल. तें म्हणजे उदारमतवादित्व किंवा तेंच युरोपमधील लाडक्या शब्दत्रयींत सांगावयाचें म्हटलें तर समता, बंधुभाव आणि स्वातंत्र्य असें सांगतां येईल.

### २५ आधुनिक सुधारणेचें मूलतत्त्व

हें तत्त्वज्ञान प्रचलित झाल्यानंतर त्याला उचलून धरणारे अनेक तत्त्ववेत्ते, अर्थशास्त्रज्ञ, कायदेपंडित, राजशासनशास्त्रज्ञ, मुत्सद्दी वगैरे होऊन गेले. या सर्वांनीं उदारमतवादित्वाला अनुमति दिली म्हणून, तें तत्त्वज्ञान आणि त्याच्या आधारावर उभारलेलें समाजशास्त्र हें निर्दोष ठरतें असें म्हणतां येणार नाहीं ! सबब आपणांला त्याची छाननी करणें जरूर आहे. येथें आपणांला दोन प्रश्नांची निःपक्षपात अंतःकरणानें चर्चा करावयास पाहिजे ते दोन प्रश्न पुढीलप्रमाणें ( १ ) उदारमतवादी तत्त्वज्ञानाचीं मूलतत्त्वें वर वर वाटतात तितकीं निरपवाद आहेत काय ? ( २ ) या तत्त्ववेत्ते, अर्थशास्त्रज्ञ वगैरे लोकांनीं उदारमतवादित्वाचें जें फल प्राप्त होईल म्हणून घोषणा केली आहे, तें फल समाजांना आजपर्यंत प्राप्त झालें आहे काय ?

उदारमतवादी तत्त्वज्ञानाचें मूलतत्त्व काय आहे, याचा बारकाईनें विचार करूं लागलें असतां असें दिसून येईल कीं, त्यांचे सर्व विचार 'व्यक्ति हें समाजाचें साध्य आहे, साधन नव्हे,' या कल्पनेवर उभारलेले आहेत. रक्षण व्यक्तीचें, पोषण व्यक्तीचें, कर्तृत्व व्यक्तीचें आणि उत्क्रांतीही पण व्यक्तीचीच. येथें व्यक्ति हा समाजाचा आद्य घटक आहे. इमॅन्युएल कांट म्हणतो, 'Treat every man as an end in himself and not as a means to an end.' प्रत्येक व्यक्तीला साध्यरूप समजा, साधनरूप समजूं नका. आम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, जुने समाजशास्त्रज्ञ उपजातींनाच जाति समजले. त्याच तऱ्हेची कांहीं तरी फसगत याही बाबतींत झालेली दिसते ! व्यक्ति हा अवयव आणि गट हा अवयवी. या तत्त्वज्ञानांत

अवयव हा अवयवीपेक्षां जास्त श्रेष्ठ समजला जातो. फिश्ट याचेंही मत असेंच आहे. तो म्हणतो, 'Limit thy liberty by the concept of the liberty of all those persons with whom thou comest into contact.' 'ज्या ज्या कोणा व्यक्तींशीं तुझा संबंध येईल, त्या त्या व्यक्तींच्या स्वातंत्र्याची कल्पना डोळ्यापुढें ठेवून, आपल्या स्वातंत्र्याचें नियंत्रण कर.' या दोघांच्याही मतानें व्यक्ति हा प्रधान घटक असून समाज हा त्या घटकाचे रक्षणाकरितां उत्पन्न झालेली संस्था आहे. आजची स्थिति पाहिली तरी राजसत्तेच्या कोणत्याही व्याख्येमध्यें व्यक्तीचें रक्षण हाच प्रधान हेतु सांगितला गेलेला दिसून येईल! अगदीं कांटेतोल गणिताच्या भाषेंत सांगावयाचें तर, 'Society is the function of man.' पुन्हां या तत्त्ववेत्त्यांची व्यक्ति म्हणजे व्यक्ति, त्यामध्यें कांहीं अधरोत्तर व्यक्ति, तरतम भाव नाहीं, कमी अधिकपणा नाहीं. व्यक्ति म्हणजे व्यक्ति आणि रक्षण म्हणजे रक्षण! या तत्त्वज्ञानानुसार ओखा भंगी आणि मोहनदास करमचंद गांधी हे सारखेच! म्हणजे यांतून दुसरा अर्थ निघतो तो असा कीं, ज्या दुर्बलांना आपल्या स्वतःच्या हिंमतीवर समाजांत टिकाव धरून राहणें शक्य नाहीं, त्यांचें पद्धतशीर रक्षण करण्याकरितां निर्माण केलेली रचना म्हणजे समाज होय. अगर याचा असाही अर्थ होईल कीं, ज्या कोणाला निसर्गानें श्रेष्ठत्वाचे गुण दिलेले आहेत त्यांना फार उच्च होऊं न देण्याचा पद्धतशीर प्रयत्न म्हणजे समाजरचना. हा दुसरा अर्थ अगर परिणाम तावडतोब कांहीं लक्षांत येणार नाहीं; परंतु तो पुढील चर्चेमध्यें सहजच विशद होईल. अगदीं थोडक्यांत सांगावयाचें तर, सर्व साधारणतः सामाजिक व्यक्तींची उंची सारखी करण्याचा प्रयत्न म्हणजेच समाजरचना होय.

येथें समाजांतर्गत व्यक्तींना कांहीं नैसर्गिक हक्क आहेत, ते नैसर्गिक हक्क सृष्टींत सांपडतात, कां समाजानें बहाल केले किंवा या तत्त्वज्ञानांनीं गृहीत धरले यासंबंधीं कांहीं खुलासा हे तत्त्ववेत्ते कोठेंही करीत नाहींत. आतां आपण एक एक हक्क घेऊन त्याची छाननी करूं. पहिला हक्क म्हणजे स्वातंत्र्य. परंतु स्वातंत्र्य म्हणजे तरी काय? वाटेल त्यानें वाटेल तें करण्याचा हक्क. अशी स्वतंत्रता, अशी बंधनाच्या पलीकडील स्थिति वाङ्मय-

पंडित सांगतील ! तत्त्ववेत्ते केव्हांही सांगणार नाहींत, याबद्दल आमची खात्री आहे. या तत्त्ववेत्त्यांची स्वातंत्र्याची कल्पना अशी आहे कीं, व्यक्तीनें ज्या कायद्यांना अनुज्ञा दिलेली असेल तेवढेच कायदे पाळण्याची व्यक्तीची जबाबदारी. दुसरा नियम म्हणजे समता आणि समता म्हणजे सर्वानुमतें कायदे अमलांत आणण्याकरितां ज्या व्यक्ती नेमल्या गेल्या असतील, त्यांचेच हुकूम फक्त व्यक्ति पाळणार. आईबाप हे अशा तऱ्हेनें नेमले गेले नसल्यास त्यांची आज्ञा पाळण्याची जरूरी नाहीं. तिसरा हक्क म्हणजे काम करून पोट भरण्याचें स्वातंत्र्य. एखादी व्यक्ति जर काम करावयास तयार असेल तर त्या व्यक्तीला काम देऊन तिला अन्नाच्छादन पुरविण्याची जबाबदारी समाजावर आहे. बरें, हीं तीनही तत्त्वें समाजांत सिद्ध व्हावयाचीं असतील तर मार्ग कोणता असें कोणी म्हणेल, तर त्याला उत्तर अनिर्बंध स्पर्धा. ॲडम स्मिथ, रिकार्डो, बास्तिआ, जॉन स्टुअर्ट मिल वगैरे जुन्या पद्धतीचे सर्वच अर्थशास्त्रज्ञ या तत्त्वाची मुक्तकंठानें स्तुति करतांना दिसून येतील. अलीकडे अर्थशास्त्राच्या रचनेमध्यें फरक पडतांना दिसतो. परंतु फरक एवढाच कीं, सर्वथा वैयक्तिक स्पर्धेच्या जागीं सर्वच वैयक्तिक स्पर्धा नष्ट करण्याचा प्रयत्न चाललेला आहे ! सर्वथा वैयक्तिक स्पर्धेचें अगर वैयक्तिक अस्पर्धेचें साम्राज्य, हीं दोनही आम्हांला आत्यंतिक टोकें[१] भासतात. जुन्या तत्त्वज्ञान्यांच्या मतानें व्यक्ति म्हणून व्यक्तीला कांहीं हक्क आहेत. परंतु ते त्या व्यक्तीनें त्यांचा यथायोग्य रीतीनें उपयोग केल्यास, समाजाचा उत्कर्ष खात्रीनें करतील. नव्या तत्त्वज्ञानाच्या अनुरोधानें पाहिलें तर, व्यक्तीला हक्क आहेत परंतु ते त्या व्यक्तीनें समाजाच्या मध्यस्थीनें उपयोगांत आणावयाचे आहेत. एका ठिकाणीं पूर्ण स्वातंत्र्य आणि एका ठिकाणीं पूर्ण अस्वातंत्र्य, असा सध्यां तरी प्रकार चाललेला आहे. परंतु उदारमतवादित्वाचें मूलतत्त्व अनिर्बंध स्पर्धा हें आहे !

हें तत्त्वज्ञानाचें कोडें सोडविण्यास फारच कठीण आहे, स्पर्धा अनिर्बंध आहे. एका व्यक्तीला आपली उन्नति करून घेण्याचा अधिकार आहे त्याप्रमाणेंच दुसऱ्याही व्यक्तीला पण आहे ! पुढें दोन व्यक्तींच्या उन्नतीमध्यें जर कलह उत्पन्न झाला तर, कसें वागावें हा मोठा प्रश्नच उत्पन्न झाला !

---

१ Types of economic theory by Othmar Spann.

मग एका व्यक्तीनें दुसऱ्या व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा विचार करून, आपल्या स्वातंत्र्याला मर्यादा घातली पाहिजे. ही स्वातंत्र्याला पहिली मर्यादा पडली. आमच्या दृष्टीनें व्यक्तिस्वातंत्र्याला मर्यादा जरूर पाहिजे. परंतु, या तत्त्वज्ञानानुसार मर्यादा कशी घालतां येईल, तें मात्र उलगडत नाहीं. मर्यादा घालूनही स्वातंत्र्य कायम राहूं शकतें हें आश्चर्य नाहीं काय ? जॉन स्टुअर्ट मिल म्हणतो, 'स्वातंत्र्याचा कोणत्याही तऱ्हेनें संकोच होऊं देणें हें हितकारक नाहीं.'[१] त्या अर्थशास्त्रज्ञाचें मत असें कीं, व्यक्तीचें हित आणि समाजाचें हित हीं एकरूपच आहेत ! ज्यांत व्यक्तीचें हित आहे त्यांतच समाजाचें हित आहे; अर्थातच प्राणिशास्त्राचा थोडासा गंध असलेला मँचेस्टर स्कूल ऑफ लिबरॅलिझम् मधील लेखक तत्त्ववेत्ता हर्बर्ट स्पेन्सर[२] याला, हें व्यक्तीच्या आणि समाजाच्या हिताच्या एकरूपाचें मत मान्य नाहीं. याचा अर्थ असा कीं, स्वातंत्र्य आणि बंधनें हीं समाजामध्यें एकसमयावच्छेदेंकरून रहावयास पाहिजेत. स्वातंत्र्यामध्यें विजयाची इच्छा नैसर्गिक आहे. प्रत्येक व्यक्ति सामर्थ्यसंपादन आणि विजय यांची निसर्गतःच भुकेली आहे, असें फ्रेडरिक नीत्शे म्हणतो. बंधनामध्यें विजयाच्या इच्छेची पायमल्ली आहे. व्यक्ति विजय मिळविण्याला समर्थ आणि उद्युक्त असून त्या व्यक्तीनें तो विजय मिळवूंच नये. एकाचा विजय दुसऱ्याच्या हक्काची पायमल्ली केल्याशिवाय कसा होणार ? याचा अर्थ असा आहे कीं, पराभूताला हक्क नाहींत आणि असले तरी त्यांची पायमल्ली झाली तरी हरकत नाहीं ! सहजच असें घडून येईल कीं, नैसर्गिक निवडीमध्यें जे श्रेष्ठ असतील ते टिकतील आणि जे कनिष्ठ असतील त्यांचा नाश होईल. हर्बर्ट स्पेन्सर[३] म्हणतो, "दारिद्य, दुःख वगैरे गोष्टी असमर्थ, अदूरदर्शी, व्यसनी वगैरे लोकांच्या नशिबीं येतील.' आमच्या मतानें हें सर्व बरोबर आहे. परंतु, या तत्त्वज्ञानाला मात्र असें बोलण्याचा हक्क मुळींच पोहोंचत नाहीं. खरोखर प्रत्येक समाजामध्यें परोपजीवी वर्ग ( Parasite ) नेहमींच असतो. त्या वर्गाला सुखोपजीवनाची इच्छा असते. अशा तऱ्हेच्या वर्गाची प्रक्रिया अर्थातच

१ Principles of political economy by J. S. Mill.

२ Man Versus state by Herbert Spencer.

३ Man Versus state by Herbert spencer.

वेगवेगळ्या तऱ्हेची असते. यांपैकीं एका वर्गाला दंगाधोपा करून द्रव्य हिसकावून घेण्याची इच्छा नसते. तो वर्ग अनाथविद्यार्थिगृह, सार्वजनिक फंड वगैरे भिक्षाप्रधान संस्था निर्माण करतो. दुसऱ्या तऱ्हेचा वर्ग हा मानवाच्या सुखोपभोगेच्छेचा उपयोग करून घेऊन, वेश्यावृत्तीची संस्था प्रस्थापित करतो ! तिसऱ्या तऱ्हेच्या वर्गाला सुखोपभोगाला फारसे श्रम करण्याची इच्छा नसते. असा वर्ग चोर, सट्टेवाले वगैरे लोकांचा समाजांत पुरवठा करतो. या सर्व वर्गांची समाजांत वाढ होत जाणें, हें समाज अधोगतीला जात आहे याचें स्फुट लक्षण आहे. अशा तऱ्हेचे वर्ग आज समाजांत वाढत आहेत किंवा नाहींत याचा ज्याचा त्यानें मनाशीं विचार करावा. म्हणून एकीकडून अनिर्बंध स्पर्धा आणि दुसरीकडून प्रत्येक व्यक्तीला ध्येयरूप मानणें, हें परस्पर विसंगत आहे इतकेंच येथें नजरेस आणावयाचें.

प्रत्येक व्यक्ति जर दुसऱ्याच्या हक्काकरितां आपली उन्नत होण्याची इच्छा मर्यादित करूं लागेल तर, स्पर्धेचा शेवट झाला असें समजावें आणि मग कर्तृत्ववान आणि लायक व्यक्तीलाही या तत्त्वज्ञानाचे दृष्टीनें श्रेष्ठ होण्यास मार्गच राहिला नाहीं. कांट, फिश्ट, ॲडॅम स्मिथ, रिकार्डो, माल्थस, जॉन स्टुअर्ट मिल, बास्तिआ यांच्या तत्त्वज्ञानानुसार अक्षरशः वागावयाचें जर समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें ठरविलें तर, श्रेष्ठ पुरुषाचा कनिष्ठांशीं संबंध आल्यास साधारणतः पुढीलप्रमाणें विचारसरणी श्रेष्ठ पुरुषानें अनुसरावयास पाहिजे. ‘ मी श्रेष्ठ आहें आणि आपणां दोघांमध्यें जीवनार्थ कलह झाल्यास मी तुझा निश्चित नाश करीन अगर तुला माझा अंकित बनवीन. परंतु माझें स्वातंत्र्य हें तुझ्या स्वातंत्र्यानें मर्यादित असल्यामुळें तुझा नाश करणें अगर तुला अंकित करून टाकणें हें सामाजिक तत्त्वज्ञानाशीं विसंगत आहे. मला दुसऱ्याचें स्वातंत्र्य हिरावून घेण्याचा हक्क नाहीं. नीतीनें बद्ध असल्यामुळें मी बलाढ्य असलों तरी, मला तुझा नाश करण्याचा हक्क नाहीं. मी तुझ्याप्रमाणें एक व्यक्तीच आहें आणि मला तुझ्याकडे श्रेष्ठ अगर श्रीमंत बनण्याचें साधन म्हणून पाहतां यावयाचें नाहीं. तूं आपलें स्वतःचें नैतिक साध्य हीच दृष्टि मला लावणें भाग आहे. म्हणून मला तुझ्या हक्कांची पायमल्ली करणें शोभणार नाहीं. ’ हा समंजसपणा मानवव्यक्तीला साधणार नाहीं म्हणून तो समंजसपणा त्याच्यावर लादण्याकरितां जें तत्त्वज्ञान निर्माण

झालें, त्याच तत्त्वज्ञानाचें नांव समाजसत्तावाद. एका समाजावर असा आक्षेप आणला जातो कीं, त्या समाजामध्यें बळानें व्यक्तिव्यक्तींमध्यें विषमता ठेविली जाते. तर अशा समाजावर असा आक्षेप आम्ही करतों कीं, या समाजामध्यें समता बळेंच लादिली जाते !

उदारमतवादी तत्त्वज्ञान हें असें एक कोडें आहे ! त्यांत एका बाजूनें व्यक्तीला नैसर्गिक हक्क आहेत, तर दुसऱ्या बाजूनें अनिर्बंध जीवनार्थ कलह अगर समता आहे ! एका बाजूनें जन्मसिद्ध हक्क आहेत तर दुसऱ्या बाजूनें अनिर्बंध स्पर्धा अगर हक्कांची पायमल्लीही आहे ! शिवाय तेंच तत्त्वज्ञान सांगतें कीं, अनिर्बंध कलहामध्यें नालायक आणि दुर्बल असतील ते अर्थातच नष्ट होतील. एका बाजूनें मानवी हक्काची घोषणा आहे तर दुसऱ्या बाजूनें बळी तो कान पिळी हाही न्याय त्यांत मान्य केला जातो ! ही कल्पना रशियांतील समाजसत्तावादांत नाहीं, असें सांगत सुटणें ही चूक आहे. पूर्वी अल्पसंख्य बहुसंख्यांवर जुलूम करीत असत, आतां बहुसंख्य अल्पसंख्याकांवर जुलूम करतात, एवढाच फरक ! झार निकोलसपेक्षां लेनिन कमी सुलतानशाही गाजवी असें कोणी म्हणतील, असें आम्हांला वाटत नाहीं. समाजसत्तावादामध्यें फक्त अर्थशास्त्राचा प्राधान्यानें विचार केलेला दिसतो, आणि तोही कांहीं मोठ्याशा शास्त्रीय तत्त्वावर उभारलेला आहे असें नव्हे.[१] परंतु असें दिसतें कीं, उदारमतवादी तत्त्वज्ञानामध्यें व्यक्तींना स्वातंत्र्य आहे आणि त्या स्वातंत्र्याला मर्यादाही पण आहेत.

असो तत्त्वतः (a priori) आणि ऐतिहासिक दृष्ट्या (a posteriori) असें दाखविणें शक्य आहे कीं, उदारमतवादी तत्त्वज्ञान आणि त्यावर उभारलेली समाजरचना ही मूळांतच चूक आहेत ! हा पाया जरी चूक असला तरी, ही समाजरचना मानवी मत्सर आणि मानवी वित्तेषणा या दोन गुणांवर उभारलेली असल्याकारणानें ती किंचित्काळ विजयी होते आणि होईलही. पंचवार्षिक बेत खरे ठरतील, देशांत सोन्याचा पाऊस पडेल, परंतु अंतिम झगड्यामध्यें अशी समाजरचना टिकाव[२] धरून राहणें शक्य

१ Principles of Economics by Seligman; Types of economic theory by Othmar Spann.

२ Outspoken essays by Dean Inge.

नाहीं. कारण, त्यामध्यें सृष्टीच्या एकाच अंगाचा विचार[१] झाला आहे.

आतांपर्यंत संस्कृतींच्या तीन पर्यायांची चर्चा करून त्यांचीं मूलतत्त्वेंच अशीं आहेत कीं, त्या सृष्टींत चिरंजीव होऊन राहणें शक्य नाहीं असें दाखविलें. इतिहासानेंही आमच्या या म्हणण्याचा पाठपुरावा केलेला आहे. आतां संस्कृतीचा जो चवथा पर्याय त्याकडे वळतों.

**२६ आर्यसंस्कृति आणि इतर संस्कृती**

या रचनेमध्यें पिंडप्रगति ( biological) आणि सांस्कारिक प्रगति ( psychosocial ) यांमध्यें तोल राखून धरावयाचा असतो, परंतु ही गोष्ट अत्यंत कठीण आहे. पिंडप्रगति तर शास्त्रज्ञांचीं मतें खरीं मानावयाचीं असल्यास चाळीस हजार वर्षांत देखील फारच थोडी होत असते. सामाजिक प्रगति तर पावसाळ्यामध्यें ज्याप्रमाणें छत्र्यासारखीं लहान लहान झुडपें उगवतात त्याप्रमाणें, एक दोन पिढ्यांत होऊं शकते. या दोन संस्कृतींत काळजी न घेतल्यास विसंगति–होत गेल्यास आश्चर्य मानावयाचें कारण नाहीं. अशा तऱ्हेची विसंगति अगर वैषम्य उत्पन्न झाल्यास नाश हा ठेवलेलाच ! हा नियम गुरुत्वाकर्षणाच्या अगर लोहचुंबकाच्या नियमाइतकाच त्रिकालाबाधित आहे. हें वैषम्य उत्पन्न होऊं न देण्याचें तत्त्व कसें सिद्ध करावें, हाच समाजशास्त्रज्ञापुढें खरोखर प्रश्न असतो. मानवाची वैयक्तिक महत्त्वाकांक्षा तर फार मोठी ! आपला धर्म, म्हणजे धर्मानें समाजांत लावून दिलेला आचार सोडून, मानीव वरच्या वर्गांचे आचार उचलण्याची प्रत्येक व्यक्तीची निसर्गसिद्ध प्रवृत्ति. त्यामुळें इतिहासपुराणांतून अनाचाराचीं उदाहरणें काढून दाखविल्यास, त्यानें मानवी समाजाची वर सांगितलेली प्रवृत्ति सिद्ध होईल, परंतु, त्या उदाहरणांनीं अशा प्रवृत्तीचें हितकारित्व सिद्ध होत नाहीं, ही गोष्ट देखील पुष्कळच लोक विसरतात. मग व्यक्तीनें यावच्छक्य आपला वर्ग सोडून वरील वर्गांत प्रविष्ट होऊं नये असें वाटत असल्यास, कांहीं तरी युक्ति करावयास पाहिजे. पण यावर कांहीं लोक विचारतील, एकच एक व्यक्ति

---

१ Heredity and selection in sociology by George Chatterton Hill.

खालच्या वर्गांतून वरच्या वर्गांत गेल्यास त्याला काय म्हणून हरकत असावी?[१] यूरोप अमेरिकेमध्यें तर अशा गोष्टी हरहमेश घडत आहेत. तिकडे जर एकाद्या चांभाराचा मुलगा मुख्य मंत्री होऊं शकतो आणि इतरही हलक्या धंद्यांतून लोक श्रेष्ठ धंद्यांत प्रविष्ट होऊं शकतात तर, हिंदुसमाजांतही तसें घडणें खरोखरीच शक्य आहे[२] आणि तसें तें घडलेलेंही आहे. बॅ. आंबेडकर महार जातीय असूनही मोठा पंडित झाला नाहीं का? या जातिभेदाच्या थोतांडानें सबंध हिंदुसमाजाचा नाश झाला[१]! यूरोप अमेरिकेंतील संस्कृति केवढी उच्च आणि उदारमतवादी! तिकडेच जाऊन कायमची वसाहत करावी असें वाटतें! तसें ज्यांना वाटत असेल त्यांना वाट मोकळी आहे; इतरांच्या करितां पुढील चर्चा करीत आहें.

ही वर सांगितलेली व अशाच तऱ्हेची वर एक एक उदाहरण घेऊन उत्पन्न होणारी भाषा समाजशास्त्राची फारशी माहिती नसलेल्या व्यक्तीकडूनच येते. त्यामध्यें समाजरचनेचा फारसा विचार झालेला नसतो. यूरोप असो, अमेरिका असो नाहीं तर ब्रह्मलोक असो, जातीय संकरानें समाजाचा नाश, हा जो सृष्टीचा नियम तो कांहीं प्रभावी झाल्याशिवाय रहाणार नाहीं. मग तो होण्याला किती पिढ्या लागतील त्या लागोत. म्हणून आतां युरोपमधील वर्णांतराच्या परिणामाचा विचार पाहूं. येथें एक गोष्ट सांगून ठेवावयाची कीं, जेथें वर्णांतर होत असेल तेथीलच अभ्यास करावयाचा आणि तेथीलच उदाहरणें द्यावयाचीं. जेथें ही गोष्ट घडत नाहीं तेथें ती घडूं लागल्यास, त्या गोष्टीचे इतर ठिकाणीं घडून आलेले परिणाम सांगून आणि मानवी[३] आनुवंश हा सर्वंकष प्राणिशास्त्राचा नियम आहे ही गोष्ट लक्षांत धरून, धोक्याची सूचना देणें हें आम्ही आपलें कर्तव्य समजतों म्हणून आम्ही आपलीं उदाहरणें यूरोप–अमेरिकेमधून घेतों असली हास्यास्पद टीका आमच्या मित्रमंडळींनीं करूं नये, इतकीच हात जोडून विनंति आहे. युरोपांत जातिभेद नाहीं. परंतु तेथेंही व्यक्ति खालच्या वर्गांतून वरच्या

१ अस्पृष्टांचा प्रश्न–गांटे.

२ Ancient law by H. S. Maine, Castes and races in India by Ghurye and all rabid writers on Indian sociology.

३ In-breeding and out-breeding by East and Jones.

वर्गांत गेल्यास त्याचे काय परिणाम होतात तें दर्शवितों.

सामाजिक गटांचा सुप्रजाशास्त्रीय परिणाम मुख्यतः गटागटांत घडून येणाऱ्या विवाहांच्या संख्येवर अवलंबून असतो. जर एका गटांतील स्त्री-पुरुष प्राधान्यानें दुसऱ्या गटांतील पुरुष-स्त्रियांशीं संगत होत असतील तरच प्राणिशास्त्रीय प्रश्न उत्पन्न होतो. ज्या ठिकाणीं मूलतःच वांशिक भेद असतील आणि त्या भिन्न वंशांमध्यें संकर होणें हानिकारक आहे असें वाटत असेल, तेथें अर्थांत्च तसे विवाह कायद्यानें बंद होऊन जातिसंस्था उत्पन्न होते. परंतु जेथें जातिसंस्था उत्पन्न केली गेली नसेल, तेथेंदेखील अशा तऱ्हेचे विवाह फार मोठ्या प्रमाणावर होत असतील अशा तऱ्हेची जी एक कल्पना हल्लीं तरुणांत पसरविली जात आहे ती खरी नव्हे. तत्कालीन लोकमत, परस्परहितसंबंध, समाजामध्यें गांठीभेटीचे प्रसंग इत्यादि गोष्टींमुळें येथेंही अशा तऱ्हेचे संबंध अनिर्बंध नसतात. अशा ठिकाणींही वधुवर हे बहुशः समानवर्गांतूनच निवडले जातात. समान वर्ग म्हणजे कांहीं निव्वळ आर्थिक उत्पन्नच नव्हे, तर धंद्याचा दर्जा, वैयक्तिक बुद्धि, घराण्याची मानमान्यता याही गोष्टींचा त्यामध्यें अंतर्भाव होतो; म्हणजे, 'सामाजिक वर्ग' शब्दाची व्याप्ति अशी सांगतां येईल कीं, ज्या वर्गांतील व्यक्तींनीं विवाह केल्यास कोणताही सामाजिक अडथळा येऊं शकणार नाहीं; येथें जातिभेदांतील आनुवंशाचें तत्त्व वजा करून बाकी सर्व अटी पाळल्या जात आहेत.

**२७ वर्गांतराचे परिणाम**

जेथें या अटी पाळूनही आनुवंशिक तत्त्व पाळलें जात नाहीं तेथें काय परिणाम होतो तें पाहूं. प्रथमतः साध्या सुशिक्षित वर्गांतून आपल्या लायकीच्या आणि कर्तृत्वाच्या जोरावर सरदारकी पटकावून, तेथें सरदार घराण्यांतील मुलींशीं लग्न करून ज्या ज्या पुरुषांनीं सरदार घराणीं स्थापन केलीं, त्या त्या घराण्यांचीं पुढें काय स्थिति झाली त्याचा विचार करूं. येथें सर्व विचार युरोपियन समाजासंबंधीं करणार आहों. कारण तो समाज जातिहीन आहे आणि त्या पद्धतीचा आमचा समाजही बनावा अशा तऱ्हेची सुधारक, दुर्धारक, उद्धारक, संचालक, उपासक (उपास करणारे) वगैरे वगैरे सर्व समाजहितचिंतकांची ( नाटकमंडळीची

नव्हे ) मागणी ! म्हणून हे सर्व लोक म्हणतात त्या तऱ्हेची समाजरचना मुमूर्षु म्हणून त्याज्य आहे येवढें दाखविणें हें आमचें कार्य आहे असें आम्ही समजतों. सर्वसाधारण सुशिक्षित लोक वर्णांतरानें सरदार वर्गांत प्रविष्ट झाल्याचा काय परिणाम झाला तें दाखवितों. इंग्लंडमध्यें न्यायाधिशाचें काम उत्तम केल्यामुळें राजानें त्या पुरुषांना सरदारकी देऊन त्यांची एकतीस सरदार घराणीं नवीन निर्माण केलीं. त्यांपैकीं बारा गाल्टनच्या काळींच नष्ट झालीं होतीं. हा काळ म्हणजे इसवी सन १८७० ते १८८० पर्यंतचा काळ असें मानूं. कारण, गाल्टननें आपला ग्रंथ त्या सुमारास लिहिला. त्यांपैकीं पुष्कळशा सरदारांनीं आणि सरदार पुत्रांनीं आपले विवाह सरदार घराण्यांतच केले. त्यांच्या परिणामाचा इतिहास सर फ्रॅन्सिस गाल्टन पुढीलप्रमाणें देतो : 'गणितागत अभ्यास केला असतां असें दिसून येतें कीं, अशा तऱ्हेच्या विवाहांचा परिणाम म्हणजे मुख्यतः त्या त्या घराण्यांत नापीकता उत्पन्न होणें असाच होतो. आतां असेंही म्हणतां येईल कीं, आईबापांची एकुलती एक मुलगी पुष्कळ बहीण भावंडें असलेल्या मुलीपेक्षां साहजिक नापीकच असेल. तसें होणें शक्य आहे. इतर शारीरिक आणि मानसिक गुणधर्मांप्रमाणेंच कमी अधिक प्रमाणांत वंध्यात्व हेंही आनुवंशिक असण्याचा संभव आहे.' पुढें एकूनएक घराण्यांचा पिढ्यानपिढ्या इतिहास देऊन तो पुढील अनुमानें बांधतो.

( १ ) एकतीस घराण्यांपैकीं सतरा घराणीं अशीं होतीं कीं, ज्यांमध्यें निपुत्रिक लक्षाधिशाच्या मुली केल्याकारणानें पहिल्या अगर दुसऱ्याच पिढीला निर्वंश झाला. अशा तऱ्हेचे विवाह हेंच कारण त्यांपैकीं सोळा कुटुंबाच्या बाबतींत नक्की प्रभावी दिसते. म्हणूनच मनूनें विवाहयोग्य कुटुंबांचा विचार करतांना 'निपुत्रिक आईबापांची मुलगी करूं नये' असा जो निर्बंध घातला आहे तो घातला असेल असें वाटतें. मनुवचनांची विस्तृत चर्चा विवाहप्रकरणीं करूं.

( २ ) लक्षाधिशांच्या एकुलत्या एक कन्यकांशीं विवाह केल्याकारणानें, त्यांपैकीं आठ घराण्यांचा निर्वंश झाला. या आठही घराण्यांची नांवनिशीवार यादी सर फ्रॅन्सिस गाल्टन यानें दिली आहे. इतर सहा, संत-

१ Hereditary genius by Sir Francis Galton.

तीच्या दृष्टीनें विचार करावयाचा तर मोठ्या शिकस्तीनेंच बचावलीं. त्याला एकच असें घराणें ठाऊक होतें कीं, त्यामध्यें द्रव्याचा परिणाम निर्वंश, असा कांहीं झालेला दिसून आला नाहीं.

( ३ ) ज्या बारा घराण्यांमध्यें निर्वंश झाला म्हणून सांगितलें त्यांपैकीं आठ घराण्यांच्या बाबतींत आम्हीं वर सांगितलेल्या अर्थानें केलेला असवर्ण विवाहच कारण झाला असें तो म्हणतो. बाकीच्या चारांपैकीं लार्ड सोमर्स आणि लार्ड थर्लो यांनीं विवाहच केला नाहीं ! असो. सर फ्रॅन्सिस गाल्टन म्हणतो, ' अशा तऱ्हेनें असवर्ण विवाह हे निर्वंशाला म्हणजे नाशाला कारण झाले. '

तोच ग्रंथकार पुढें म्हणतो, 'घराण्याला मोठेपणा येऊं लागला म्हणजे हळूहळू लक्षाधिशांच्या म्हणजे आमच्या प्रक्रियेंत बोलावयाचें तर वैश्यांच्या मुलीशीं विवाह करण्याची प्रवृत्ति बळावूं लागते. म्हणून ड्यूकच्या घराण्यामध्यें अर्लच्या घराण्यापेक्षां लक्षाधिशांच्या कन्यका जास्त प्रमाणांत आल्या असल्या पाहिजेत.' म्हणून तर्कशास्त्रदृष्ट्या विचार केला तर, अर्लच्या घराण्यांचा जेवढा नाश झाला त्यापेक्षां ड्यूक घराण्यांचा नाश जास्त प्रमाणांत झालेला दिसावयास पाहिजे. सर बर्नार्ड बर्क म्हणतो, ' दुसऱ्या चार्लस राजाच्या कारकीर्दींतच सर्व ड्यूक घराणीं नष्ट झालीं होतीं. परंतु अगदीं नार्मन काळापासून चालत आलेलीं अकरा अर्ल घराणीं लेखकाच्या काळापर्यंत हयात होतीं.' असो. न्यायाधिशांचा लक्षाधिशांशीं संबंध आणि सरदारांचा लक्षाधिशांशीं संबंध किंवा आपल्या इकडील भाषेंत बोलावयाचें तर ठोकळपणें ब्राह्मणांचा क्षत्रिय-वैश्यांशीं संबंध आणि क्षत्रियांचा वैश्यांशीं संबंध हा त्या त्या घराण्यांच्या नाशाला कारणीभूत झाला. हीं सर्वच घराणीं समाजांत रहावीं अशीं नामांकित होतीं. अशी खरोखर स्थिति असतांना घटपटादि खटपट करून वर्णांतराला आधार काढून देणारे नागपुरी भटजी, वाईकर भटजी, लोणावळी तर्कतीर्थ, उपवासी महात्मे, कर्मवीर आणि इतर सर्व यच्चयावत् सुशिक्षित, अर्धसुशिक्षित वगैरे वर्ग हे सर्व हिंदुसमाजाचे हितकर्ते आहेत, असें आम्हांला तरी म्हणवत नाहीं. परंतु मराठींत म्हण आहे, ' हुरळली मेंढी आणि लागली लांडग्याच्या पाठीं.' हिंदुस्थानांत देखील हा वर्णांतराचा प्रयोग

जेथें जेथें झाला तेथें तेथें हाच परिणाम दिसून आला. जात्यंतर न होतां नुसतें एका थरांतून एखादें घराणें दुसऱ्या थरांत प्रविष्ट झाल्यास त्याचा नाश होतो. त्या घराण्याच्या ज्या शाखांनीं वर्गांतर केलें नसेल त्या मात्र भरभराटलेल्या दिसतात. आपण चार दोन उदाहरणेंच घेऊं. प्रथमतः गो-ब्राह्मणप्रतिपालक, शककर्ते, हिंदुस्थानांत हिंदूंची नष्ट होऊं लागलेली शेंडी ज्यांच्या अतुल पराक्रमानें शिल्लक राहिली असें म्हणतात, ते महाराष्ट्र पदपादशाहीचे आद्यसंस्थापक श्रीशिवाजीमहाराज, यांचें घराणें या दृष्टीनें विचार केला तर काय स्थिति दिसून येते? शिवाजी-संभाजी-शाहू आणि पुढें निर्वंश! राजपदवीला न पोहोंचलेलीं पुष्कळ भोसले घराणीं अजूनही शिल्लक आहेत. फक्त राज्यपदावर आरूढ झालेली शाखाच तेवढी नष्ट झाली! मग फार थोर, अगदीं 'अतीतः पन्थानं तव च महिमा वाङ्मन-सयोः।' किंवा 'ज्या शिवरायाचें आठवावें रूप। शिवरायाचा आठवावा प्रताप॥' त्या शिवरायाच्या घराण्याची सृष्टीला मुळींच म्हणजे जगवून ठेवण्याइतकी मातबरी कां वाटूं नये, याचा विचार व्हावयास पाहिजे असें आम्हांला वाटतें. या सर्व गोष्टींचा विचार करून 'राज्यान्ते नरकं घोरं' असा सिद्धांत आर्य समाजशास्त्रज्ञांनीं काढलेला आहे. परंतु आज देविदास गांधी, बाबासाहेब आंबेडकर वगैरे महात्मे, शिक्षणाच्या जोरावर एका पिढींत वर्णांतर करूं इच्छितात आणि समाजांतील कांहीं लोक ती गोष्ट इष्ट आहे असें मानतात! हा कलियुगाचा महिमा आहे! आम्ही रानटी असून आमचा कलियुगावर[१] विश्वास आहे, हें सांगण्यास आम्हांस कांहींही दिक्कत वाटत नाहीं!

एकदोन नव्हे, वर्णांतरानें घराणींची घराणीं उत्सन्न झाल्याचीं हवीं तेवढीं उदाहरणें इतिहासभर पसरलेलीं आहेत. महाराष्ट्रांतील दुसरें एक प्रसिद्ध उदाहरण चर्चेकरितां घेऊं; तें म्हणजे कोंकणांतून देशावर आलेलें भट घराणें. या घराण्याच्या इतर शाखा अजूनही कोंकणांत अगर इतरत्र सुखानें नांदत आहेत. परंतु जेवढी शाखा राज्यारूढ झाली तेवढीच शाखा सृष्टींतून नाश पावली! आतां आम्हांला महाराष्ट्रांतील कांहीं पुढाऱ्यांनीं सांगितलें त्याप्रमाणें, 'नाश झाला तरीही हरकत नाहीं पण वर्णांतर झालें

१ धर्मशास्त्रमंथन– दिवेकर.

पाहिजे' असें ज्यांना वाटत असेल, त्यांना कांहींच नको आहे असा त्याचा अर्थ आहे! परंतु आपणांला सार्वत्रिक विचार करावयाचा आहे. भट घराण्यांत देखील बाळाजी-बाजीराव-रघुनाथराव-दुसरा बाजीराव या चवथ्या पिढींतच खेळ खलास! या दोनही घराण्यांबद्दल असें म्हणतां येणार नाहीं कीं, यांतील पुरुष अल्पायुषी झाले म्हणून हीं घराणीं उत्सन्न झालीं! कारण, या दोनही घराण्यांतील शेवटच्या पुरुषांना परमेश्वराच्या कृपेनें पूर्णायुष्य लाभलें होतें! परंतु सृष्टीचे नियम मोडल्यास त्याचें फळही मिळणार. सृष्टि आपले नियम कांहीं बॅ. आंबेडकर अगर रा. विठ्ठल रामजी शिंदे यांना विचारून, त्यांच्या अनुज्ञेनुसार बदलील असें वाटत नाहीं! पुराणांत गाजलेल्या एका जुन्या घराण्याचा विचार करूं. तें घराणें म्हणजे वसिष्ठ घराणें. वसिष्ठांचा जन्म हा घृताची अप्सरेपासून मित्र आणि वरुण या दोघांच्या व्यभिचारापासून झाला. सर्व लोकांच्या दोषांची यादी करणाऱ्या एका कवीनें 'वेश्यापुत्रो वसिष्ठो' असा क्षेपक वसिष्ठाच्या नांवावर घालून ठेवलेला आहे. असे हे वसिष्ठ वर्णांतर करून (त्यांचा पूर्वीचा वर्ण कोणता मित्राचा, कीं वरुणाचा कीं घृताची अप्सरेचा म्हणजे हे द्विपितृसावर्ण्य किंवा एकमातृसावर्ण्य याचा खुलासा वे. शा. सं. महादेवशास्त्री दिवेकर मंथनाधीश यांनीं करावा, अशी आमची त्यांना सप्रश्रय विनंति आहे.) ब्राह्मण वर्णांत प्रविष्ट झाले. त्या घराण्याची वंशावळ पुढीलप्रमाणें—वसिष्ठ, शक्ति, पराशर, व्यास आणि शुक, पुढें निर्वंश! हें घराणें त्या काळीं फारच प्रसिद्ध असल्यामुळें त्यांना ब्राह्मणांनीं विवाहांत कन्या अर्पण केल्याचें दिसत नाहीं. त्यांची दुसरी वंशावळीही कोठें दिलेली सांपडत नाहीं. म्हणून आम्ही म्हणतों कीं, गोत्रप्रवर्तक वसिष्ठ आणि या यादींतील वसिष्ठ हे एक नव्हत. व्यासाचें गोत्र जर वसिष्ट—कारण, तो व्यासाचा पणतू—तर त्याचें नांव आणि दुसरें एक गोत्राचें नांव हीं सारखीं कां? त्यावेळीं व्यक्तिनामें आणि गोत्रनामें एकच असत असाही शोध आमचे आधुनिक पंडित काढतील, यांत आम्हांला काडीभरही शंका नाहीं! अभिधानचिंतामणीमध्यें 'पाराशरिः सात्यवतो माठरो बादरायणः'। अशीं व्यासाचीं नांवें दिलेलीं आहेत. हा माठर कोण? प्रसिद्ध जें माठर गोत्र, त्याचा प्रवर्तक हा व्यासच कीं काय? मग एकच वसिष्ठ घराण्यांतून त्या

घराण्याचा निर्वंश झाला असूनही, दोन गोत्रें प्रवृत्त झालीं असें म्हणावें लागेल ! म्हणून, व्यक्तिनामें आणि गोत्रनामें यांचा घोंटाळा करून, वडाच्या साली पिंपळाला चिकटवून वाटेल तसलीं अनुमानें काढूं नका, एवढी विद्वज्जनांना हात जोडून विनंति आहे.

आतांपर्यंत जी चर्चा झाली, तीवर असा आक्षेप येऊं शकेल कीं, वर-वरच्या वर्गांमध्यें असे परिणाम घडून येत असतील, म्हणून त्या जातींमध्यें तर वर्णांतराला बंदी ठेवल्यास हितकारक ठरेल. परंतु सर्वसाधारण समाजामध्यें जात्यंतराला अगर आंतरजातीय विवाहाला त्यामुळें अडथळा करावा, असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. एकच धंदा एका गटानें करावा आणि त्यांचे विवाह देखील आपसांत व्हावे, हा नियम करण्याचें कारण दिसत नाहीं. एखाद्या व्यक्तीला ज्या गटांत त्या व्यक्तीचा जन्म झाला असेल, त्या गटाचा धंदा झेपला नाहीं अगर आवडला नाहीं तर त्या व्यक्तीनें धंदा बदलून, आपला उदरनिर्वाह कां करूं नये ? या बाब-तींत हिंदुसमाजाचें जें मत आहे तें किती हितकारक आहे, त्याची सांगो-पांग चर्चा जातिभेदप्रकरणीं करूं. येथें अशा वर्णांतराचे जातिहीन समाजावर काय परिणाम होतात तेवढीच चर्चा करतों.

यूरोप अमेरिकेमध्यें एकंदर लोकसंख्येमध्यें काय चढउतार होतात त्यांचा विचार करूं. कोणत्याही थराकडे पाहिलें तर, त्या थरांतील जास्त कर्तृत्ववान व्यक्तींची आपला पूर्वपरंपरागत धंदा सोडून नवीनच धंदा उचलण्याची प्रवृत्ति दिसते. कर्तृत्ववान व्यक्तीची नैसर्गिक प्रवृत्ति मानीव हलक्या धंद्यांतून निघून मानीव उच्च धंद्यांमध्यें प्रविष्ट होण्याकडेच असते. म्हणजे आपल्या मतानें वर्णांतर करून तो नीच वर्णांतून उच्च वर्णांत प्रवेश करीत असतो आणि हीच आपली उन्नति झाली असें मानतो. वेगवेगळ्या थरांतील जननसंख्या आणि मृत्युसंख्या याचा ज्यांनीं खरोखर अभ्यास केलेला आहे त्यांना ही गोष्ट माहिती आहे कीं, वरच्या वर्गांत जाण्याची पूर्वतयारी म्हणून अगर त्या वर्गांत प्रवेश केल्याबरोबर, त्या त्या वर्गाची जननसंख्या कमी होऊं लागते. हा परिणाम सर्व स्थळीं आणि सर्व काळीं घडलेला दिसून येतो. तेथें हळूहळू त्या शुक्रबिंदूचा नाश होतो. म्हणजे परिणाम काय झाला तो पहा. ज्या थरांत तो पूर्वी

रहात होता त्या थरांतच राहून तो कार्यकर्ता झाला असता, तेथून तो नष्ट झाला. आपला थर सोडून ज्या दुसऱ्या थरांत प्रविष्ट झाला, तेथेंही पण तो कांहीं वर्षांनीं विनष्ट झाला ! याचा अर्थ असा कीं, ज्या समाजांत ही प्रक्रिया चालू असेल त्या समाजाचा ऱ्हासकाळ फार जवळ आला आहे असें समजावें. तें राष्ट्र आज कितीही मोठें दिसो, अशा तऱ्हेच्या समाजरचनेंत त्याचा नाश ठेवलेलाच. अशा तऱ्हेची इंग्लिश समाजाची स्थिति झाली आहे असें पुष्कळ शास्त्रज्ञांचें[1] मत आहे. अमेरिकेंत देखील अँग्लोसॅक्सन वंश हळूहळू घटत जाऊन त्याची जागा इतर वंश भराभर पटकावूं लागले आहेत. हे नवे लोक पहिल्या लोकांची सामाजिक घटना एक दोन पिढ्यांत हस्तगत करून घेतील. परंतु एवढी गोष्ट निश्चित आहे कीं, त्यांना आपल्या शरिरांत नसलेल्या नैसर्गिक शक्ती उत्पन्न करतां येणार नाहींत आणि पूर्वीच असलेल्या शक्ती कमीही पण करतां येणार नाहींत ! वर सांगितलेला परिणाम, सुप्रजाजननशास्त्राच्या मदतीशिवाय मानवीवंशाची सुधारणा करूं इच्छिणाऱ्या, एकूनएक प्रयत्नांत कोणत्याही तऱ्हेचें यश येऊं देणार नाहीं. समाजांतील वेगवेगळ्या थरांत ज्या कोणी कर्तृत्ववान् व्यक्ती असतील, त्यांची संतति दर पिढीला जास्त रहात जाईल आणि कनिष्ठ प्रजेची संतति दर पिढीला कमी कमी रहात जाईल अशी कांहीं तरी व्यवस्था समाजरचनेच्या मूलतत्त्वांतच गोवून ठेविलेली असावयास पाहिजे. एकदां मनुष्य हा समान आहे अशा तऱ्हेचें अशास्त्रीय आणि वरिष्ठांचा कनिष्ठांना मत्सर करावयास शिकविणारें मत प्रचलित केल्यानंतर मग समाजशास्त्राचे नियम लागू करण्याचा प्रयत्न म्हणजे मूर्खपणाचा कळसच आहे ! परंतु आज तर यूरोपमधील समाजरचनेमध्यें कोणत्याही तऱ्हेची शास्त्रीय व्यवस्था केलेली दिसत नाहीं ! हिंदूंच्या समाजरचनेमध्यें अशा तऱ्हेच्या सर्व तत्त्वांचा पूर्ण विचार केलेला आहे. अशी सर्वांगशास्त्रीय रचना सोडून त्या ठिकाणीं वेगळ्याच आणि चुकीच्या तत्त्वांच्या पायावर उभारलेली समाजरचना काय म्हणून प्रवृत्त करावी हें कोडें आम्हांला तर कांहीं उलगडत नाहीं ! थोडें

१ National welfare and national decay by McDougal; National life from the standpoint of science by Pearson; Balance of birth over deaths by R. R. Kuzeyniski.

पुढें गेलें असतां असें दिसून येईल कीं, आजच्या कायद्यांची प्रणालीच अशी आहे कीं, त्यांमध्यें कनिष्ठांच्या लोकसंख्येची वाढ झपाट्यानें होत जाऊन वरिष्ठांच्या संततीची घटही तेवढ्याच झपाट्यानें होत आहे ! आज समाजांची रचना अशीच झालेली आहे कीं, कोणालाही सामाजिक प्रगति करून घ्यावयाची असल्यास संतती कमी असणें हेंच मोठें साधन होऊन बसतें. अत्यंत श्रीमंत वर्गांत जितकी संतती कमी तितका प्रत्येक वारसदाराचा वाटा जास्त ! मध्यम वर्गाकडे पहावें तर, सर्वसाधारण शिक्षण, धंद्याला उपयुक्त असें शिक्षण यांचा खर्च अनान्वित वाढल्यामुळें आणि प्रत्येक धंद्यांत भांडवल हें अत्यंत जरूर असल्याकारणानें येथेंही संतती कमीच असणें बरें अशी सहजच वृत्ति होऊं लागते ! त्याहून हलक्या वर्गांत सर्वच भांडवल रोजच्या निर्वाहाच्या साधनाकडेच उपयोगांत आणलें जातें ! अशा तऱ्हेच्या अर्थप्रधान समाजांची धुळधाणही लवकरच झाल्याशिवाय रहाणार नाहीं ! ( Adopted from Gate's Heredity and Eugenics. )

याच वर्णांतराच्या अगर जात्यंतराच्या अगर वर्गांतराच्या बाबतींत आणखी कांहीं शास्त्रज्ञांची साक्ष घेऊं. हॅवेलॉक[१] एलिस म्हणतो, 'वंशाचें सुदृढत्व आणि त्यांची आपापलें नियतकर्म करण्याची लायकी ( functions and its own sphere ) ही, ते वंश ज्या थरांत असतील त्या थराच्या वरच्या वर्गाचीं कांहीं कामें ते करूं शकतात किंवा नाहीं यावरून अजमावयाची नसते. सर्वसाधारण दृष्टीनें पाहिलें तर सुदृढ वंशाचे लोक पिढ्यानपिढ्या आपल्या वर्गाचें नियतकर्म उत्तम तऱ्हेनें करीत रहातात. वेगवेगळ्या धातूंना जशी वेगवेगळी विशिष्ट गुरुता असते त्याप्रमाणें, प्रत्येक वर्गालाही आपलें असें विशिष्ट गुरुत्व असतें. प्रत्येक वर्ग आपल्या विशिष्ट गुरुत्वाला पोषक अशाच परिस्थितींत जगूं शकतो, असें म्हणावयास हरकत नाहीं. कित्येक वेळां असें घडून येतें कीं, एखाद्या कारू (master-craftsman ) घराण्यांतील एखादा महत्त्वाकांक्षी पुरुष आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर पांढरपेशा वर्गांत प्रविष्ट होतो. त्याच वर्गांत तो आपला विवाह करतो आणि तेथेंच आपलें कुटुंब स्थापन करतो ! अशा तऱ्हेनें उत्पन्न झालेलें घराणें साधारणतः तीन पिढ्या भरभराटलेलें दिसतें. पुढें ते वंश

१ The task of social hygiene by Havelock Ellis.

निपुत्रिक होतात म्हणजे निर्वंश होतात. कन्यासंततीला मात्र धक्का बसलेला दिसत नाहीं.' बरोबर हेंच मत मन्वादि आर्यशास्त्रज्ञांनीं दिलेलें आहे. भगवद्गीतेमध्यें कर्म करीत रहाण्याचीं जीं अनेक कारणें भगवंतांनीं सांगितलीं आहेत, त्यांपैकीं संकर झाल्यास उत्तम प्रजांचा नाश होईल तो टाळणें हें एक कारण सांगितलें आहे. भगवान्[१] म्हणतात—

'उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्मचेदहम् ।
संकरस्य कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥'

अशाच तऱ्हेचे विचार भगवद्गीतेंत जागोजाग विखुरलेले आहेत. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।' 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ।' 'श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।' इत्यादि वचनें अर्थशास्त्रीय सत्य दाखवितात, ही गोष्ट वरील चर्चेवरून कोणाच्याही लक्षांत आल्याशिवाय रहाणार नाहीं.

आतां हा जो कर्ता पुरुष एका थरांतून दुसऱ्या थरांत प्रविष्ट झाला, त्याचें, त्याच्या मताप्रमाणें महत्त्वाकांक्षेची पूर्ती होऊन समाधान झालें असेल, परंतु, त्यानें समाजाचें कोणतें हित साधलें तें कळणें बरेंच कठीण आहे. ज्या समाजांत तो मूळ कर्ता म्हणून राहिला असता तो समाज त्यांच्या कर्तृत्वाला मुकला आणि ज्या समाजांत तो प्रविष्ट झाला, तेथूनही सृष्टीच्या नियमानुसार त्याची हकालपट्टी झाली! एखादा कर्तृत्ववान पिंड आणि त्याचा वंश आपणांतून नष्ट होणें, हीच सुधारणेची व्याख्या होत असल्यास न कळे! म्हणूनच आम्ही आपलें नियतकर्म ( Functions and its sphere ) टाकून म्हणजे स्वधर्मत्याग करून जगांत जे लोक झळकले त्यांचें पुढें काय झालें, हा प्रश्न नेहमीं विचारीत असतों. त्या प्रश्नाचें उत्तर देण्याचें आमचे सुधारणावादी बंधु कां टाळतात तेंच समजणें फार कठीण आहे! आज चहूंकडे अशी स्थिति झालेली दिसते कीं,[२] जो मनुष्य उत्तम कारकून होण्याला लायक असेल तो हलक्या प्रतीचा शाळामास्तर झालेला दिसतो! खिळे जुळण्याची उत्तम लायकी असलेला

१ भगवद्गीता.
२ National life from the standpoint of science by Pearson.

मनुष्य, एखाद्या हलक्या पत्राचा संपादक झालेला दिसतो! अशाच तऱ्हेची परिस्थिति सर्व वर्गांत आणि सर्व धंद्यांत झालेली दिसून येईल. अशा परिस्थितीच्या एकंदर समुच्चयानें समाजाचा काय फायदा होतो अगर होईल, हें कळणें आपल्या आटोक्याबाहेरचें आहे. एकंदरीनें या लेखकाच्या[१] मतानें वर्णांतराची प्रवृत्ति ही परिणामीं नाशकारक आहे असें दिसतें.

शेवटीं समाजशास्त्रज्ञ जॉर्ज चॅटरटन हिल याचें म्हणणें पुढें मांडतों. तो ग्रंथकार[२] म्हणतो, 'ज्या समाजामध्यें वेगवेगळ्या थरांच्या उत्क्रांतीचा विचार करून, प्रत्येक थरांतील व्यक्तींनें आपल्या महत्त्वाकांक्षा किती मर्यादेपर्यंत ठेवाव्या आणि पुढें नेवूं नयेत अशा तऱ्हेचें नियंत्रण मनावर बिंबवून देण्याची हिंमत नसेल, तो समाज सृष्टींतून नष्ट होण्याच्या मार्गानें फार झपाट्यानें चालला आहे असें खुशाल समजावें.' आमच्या समाजामध्यें तशा तऱ्हेचें नियंत्रण प्रत्येक वर्गांतील व्यक्तींचे मनावर बिंबलेलें आहे. तें आतां काढून टाकावें अशा तऱ्हेची सुधारणा पुढें येऊं लागली आहे, हें महदाश्चर्य नव्हे काय? अशा तऱ्हेनें समाज विस्कळित केल्यानें समाज समर्थ होईल असें आम्हांला वाटत नाहीं. अशा तऱ्हेची जी सर्व समाजांची स्थिति होत चालली आहे त्या स्थितीवर उपाय शोधितां त्या ग्रंथकाराला दोन उपाय सुचतात. पहिला उपाय म्हणजे आज धर्मसत्ता जी चहूंकडे शिथिल होत चालली आहे, ती पुन्हा पूर्वीप्रमाणेंच दृढ करण्याचा प्रयत्न करणें. ती पुन्हा तशी करतां येईल किंवा नाहीं, या प्रश्नाचें उत्तर देणें अर्थातच फार कठीण आहे. परंतु धर्मसत्ता पुन्हां प्रस्थापित झाल्यास ती गोष्ट या लेखकाला अत्यंत हितकारक वाटते. आमच्या समाजांत तर जणूं कांहीं पुढारीवर्ग आणि धर्मसत्ता यांचें आत्यंतिक वांकडें असावें, असा भास झाल्यासारखा वाटतो. दुसरा उपाय, भांडवलवाल्यांचा उदय होण्याच्यापूर्वी धंद्याचे गट होण्याच्या पद्धतीवर जी समाजरचना उभारली गेलेली होती, म्हणजे हिंदू समाजशास्त्राचें भाषेंत बोलावयाचें तर, जी जातिसंस्था

१ National welfare and national decay by McDougal; Genetical theory of natural selection by Fisher; Hereditary genius by Galton.

२ Heredity and selection in Sociology by Chatterton Hill.

प्रचलित होती तशीच अगर तशासारखी जातिसंस्था पुन्हां उत्पन्न करतां आल्यास, तशी जातिसंघटना पुन्हां उत्पन्न करणें, हा होय. त्याचें म्हणणें असें कीं, त्या संस्थांचा पद्धतशीर अभ्यास करून पूर्वींच्या जातिसंस्थेसारखी कांहीं तरी घटना निर्माण केली तर समाज संघटित होतील !

**२८ जातिसंस्थाच हितकारक**

रे. डीन इंगे[१] म्हणतो, 'सृष्टींत जो जीवनार्थ कलह दिसून येतो (जीवनार्थ संहति हें प्रिन्स क्रोपाटकिन याचें तत्त्व कोठें लागू पडतें, त्याची थोडीशी चर्चा आम्हीं पूर्वीं केली आहे आणि पुढेंही यथावकाश करूं. येथें एकच गोष्ट नजरेस आणावयाची कीं, तें तत्त्व कलहतत्त्वाप्रमाणें सार्वकालीन नाहीं ), त्या कलहामध्यें टिकून रहाण्याची ज्या वंशांना संवय झाली असेल, त्या वंशांकडेच सृष्टीमध्यें अंतिम विजय जाईल. कमी अधिक प्रमाणांत कडक तऱ्हेनें पाळलेली जातिसंस्था ( modified caste system )–जशा तऱ्हेची जातिसंस्था कालपरवांपर्यंत युरोपियन समाजांत होती, आणि जी हिंदूंच्या जातिसंस्थेइतकी कडक असणार नाहीं–समाजांना चिरंजीवित्व देण्याचे बाबतींत प्रजासत्ताक समाजरचना अगर समाजसत्तावाद या दोहोंपेक्षांही श्रेष्ठ ठरेल .'

वरील चर्चेवरून दिसून येईल कीं, जातिसंस्था असणें हें समाजांना हितकारक आहे आणि त्याप्रमाणेंच वर्णांतराची प्रवृत्ति अहितकारक आहे. शास्त्रीयदृष्ट्या समाजाचा अभ्यास करणारा कोणताही लेखक घेतल्यास, समाज वर्णवारीच्या तत्त्वांवर उभारलेला असावा, सर्वसाधारण वर्गाचा लौकिक वाढल्याशिवाय एकच एक व्यक्ती जर उच्चवर्गांत प्रवेश करूं लागेल तर व्यक्तीची ती प्रवृत्ति समाजाला नाशक आहे, म्हणून अशा तऱ्हेच्या व्यक्तीला आपला वर्ग सोडून जाण्याची मोकळीक असूं नये, अशा तऱ्हेचींच प्रणाली सांगतांना दिसून येईल. परंतु कोणत्याही शास्त्राचा समाजरचनेशीं संबंध पोहोंचत नाहीं, असें मानणाऱ्या आजच्या सुधारकांना त्या गोष्टीची काय दरकार असणार ? शास्त्राची अशा तऱ्हेची हेळसांड व्हावी,

---

१ Outspoken essays by Dean Inge; The scientific outlook by Bertrand Russel; Anti-christ by Nietzsche.

हें बुद्धिप्रामाण्याचें लक्षण आहे असें आम्हांला वाटत नाहीं.

चार तऱ्हेच्या संस्कृतीपर्यायांचा विचार करून शास्त्रीयदृष्ट्या पाहिलें तर असा निष्कर्ष निघतो कीं, ज्या संस्कृतीमध्यें पिंडप्रगति ( biological progress ) आणि सांस्कारिक प्रगति(psychosocial or traditional) यांच्यामध्यें वैषम्य उत्पन्न होत नसेल, अशाच तऱ्हेची संस्कृति हिंसाप्रिय सृष्टीमध्यें चिरंजीवपदाचा मान मिळवूं शकते; म्हणूनच त्या संस्कृतीला सनातन संस्कृति आणि ती ज्या धर्मावर अधिष्ठित झाली असेल, त्या धर्माला सनातन धर्म, असें म्हणावयाचें. संस्कृतीचे इतर तीन्ही पर्याय विनाशी असतात म्हणून, तात्कालिक उन्नतीच्या विलोभनाकरितां देखील त्या संस्कृतीचा स्वीकार करूं नये. कारण, ' समूलंच विनश्यति ' हा मनुप्रणीत सिद्धांत त्यांना अक्षरशः लागूं पडतो. गत संस्कृतीचा अभ्यास करून सर[1] फ्लिंडर्स पेट्री यानें असा सिद्धांत काढला आहे कीं, अशा तऱ्हेच्या सर्व संस्कृती आपल्या उदयकालापासून फार झालें तर जास्तींत जास्त म्हणजे एक हजार वर्षे टिकाव धरूं शकल्या. आपणांला या वर सांगितलेल्या चार पर्यायांपैकीं कोणता संस्कृतीपर्याय स्वीकारावयाचा हें आपण निश्चित ठरवावयास पाहिजे. एक पर्याय निवडून घेतल्यानंतर त्या संस्कृतीमध्यें दुसऱ्या पद्धतींतील नीतिशास्त्र घुसडून देणें हा प्रयत्न हास्यास्पद आहे. परंतु त्याच प्रयत्नाला हल्लीं उदारमतवादित्व असा पर्यायशब्द होऊं पहात आहे. इतर संस्कृती कितीही मोठ्या दिसल्या तरीही त्यांच्या नाशावरून अनुमान काढावयाचें झाल्यास, त्या सृष्टींतील कोणत्या तरी नियमांशीं विसंगत असल्या पाहिजेत, असें म्हणण्याशिवाय गत्यंतर नाहीं.

एकंदर चर्चेचा निष्कर्ष असा निघतो कीं, सनातनी संस्कृति ही वर्गमूलक अथवा जातिमूलक असावयास पाहिजे. पुढें या संस्कृतीचा अर्थशास्त्र (Hunger) आणि कामशास्त्र (Family) या दोनही शास्त्रांच्या दृष्टीनें विचार करून ती सुव्यवस्थित आहे किंवा नाहीं, हें पहावयास पाहिजे आणि त्याची यथावकाश चर्चा करूंही. परंतु, मानवाची नैसर्गिक प्रवृत्ति पाहिल्यास ती सर्व तऱ्हेच्या संघटना मोडण्याकडेच असलेली दिसून येते. म्हणून

१ Revolutions of civilization by Petri.

संस्था वर्गवारीवर उभारली पाहिजे एवढाच निष्कर्ष काढून हा प्रश्न सुटत नाहीं; तर वर्गसंस्था मोडण्याचीं काय कारणें असतात, त्या कारणांच्या बुडाशीं कोणत्या नैसर्गिक मानवी प्रवृत्ति असतात, त्यांचें नियंत्रण कोणत्या मार्गानें करणें शक्य आहे, त्याला धर्मासारखी आधिभौतिक सत्ता ( Supra rational ) उपयोगी पडेल अगर निव्वळ बुद्धिप्रामाण्यावर ( Rational ) उभारलेली सत्ता उपयोगी पडेल, इत्यादि अनंत प्रश्नांचा समाजशास्त्रज्ञानें विचार करावयास पाहिजे. हा विचार झाल्यानंतर वर्ग मोडण्याला मूलभूत असलेलीं कारणें आपल्या समाजांत चोरून लपून अगर उघड उघड शिरणार नाहींत, अशा पद्धतीची व्यवस्था करावयास पाहिजे. अशा रचनेमध्यें समाजामध्यें अशीच विभागणी कां केली, अशा तऱ्हेचे प्रश्न विचारण्याची कोणालाही परवानगी देतां येणार[1] नाहीं. अशा तऱ्हेचे अनंत नियम करावे लागतील आणि ते व्यक्तींच्याकडून फारच कडक रीतीनें पाळून घ्यावे लागतील !

अशा तऱ्हेचे नियम करावयाचे तर कोणतीं तत्त्वें पाळावयास पाहिजेत, त्यांचा पुढें विचार करूं. मानवप्राण्याची समाजांत व्यवस्था करावयाची तर प्रथम दोन गोष्टी नजरेस येतात. पहिली म्हणजे प्रजा सृष्टींत निर्माण होते आणि त्या प्रजेची सामाजिक गटांत व्यवस्था व्हावयाची असते. यामुळें प्रजोत्पत्तीचे नियम — म्हणजे अमकी प्रजा सुप्रजा होईल किंवा अमकी प्रजा कुप्रजा होईल हे नियम — सृष्टीकडून समजावून घेऊन आपल्या ध्येयाला अनुसरून ते नियम पाळावयास पाहिजेत. ‘ कोणत्याही तऱ्हेच्या दंपतीची संतति काय स्वरूपाची होईल, तें निश्चित सांगण्याचे नियम ( गणितागत ) आम्हांला माहीत आहेत,’ असें डॉ. हर्स्ट[2] म्हणतो! ते नियम सृष्टीचे असल्याकारणानें येथें मानवी कल्पना किंवा तर्कशास्त्र यांचा कांहींही उपयोग नाहीं. ते प्रत्यक्ष[3] पद्धतीनेंच अभ्यासिले पाहिजेत.

**२९ धर्म अपरिवर्तनीय**

---

१ Scientific outlook by Bertrand Russel.

२ The future of life by Dr. C. C. Hurst.

३ Modification of germinal constitution by W. L. Tower.

ते अभ्यासण्याच्या अनेक पद्धती आहेत. परंतु सर्व पद्धतींमध्यें उत्तर एकच स्वरूपाचें येतें. या पद्धती पूर्वींच्या म्हणजे, एतद्विषयक नियम घालून देणाऱ्या मनुसारख्या लोकांना माहिती असाव्या असें त्यांनीं या बाबतींत जे नियम घालून दिले आहेत, त्यावरून अनुमान काढण्यास हरकत नाहीं असें आम्हांला वाटतें. युरोपमध्यें त्या नियमांचा अभ्यास चार पद्धतींनीं केला जातो. ( १ ) मेंडेलची पद्धति—येथें आनुवंश गुण विभागणीनें आहे (particulate or factorial analysis). हीच पद्धति आज प्रधान[1] मानली जाते. ( २ ) गणितागत[2] पद्धति ( Statistical method ), या पद्धतींत आनुवंशाची गणितागत पद्धतीनें मांडणी करतां येते. आनुवंशाच्या नियमावलीच्या बाबतींत या पद्धतीचीं उत्तरें पहिल्या पद्धतीसारखींच येतात. ( ३ ) पिंडांचा[3] ( cells ) अभ्यास करण्याची पद्धति. ( ४ ) गर्भविज्ञान पद्धति ( embryological ). या चारही पद्धतींनीं प्रजांची गुणोत्पत्ति, गुणोत्कर्ष गुणापकर्ष वगैरे मुद्यांबद्दल जे कांहीं नियम सांगितले असतील, त्या नियमांचा विचार करावयास पाहिजे. त्याबरोबर कांहीं लोक चुकीची अशी जी मिश्र आनुवंश पद्धति (blending inheritance) मानतात ती चुकीची आहे, ही गोष्ट त्या मानणाऱ्या लोकांच्या नजरेस आणावयास पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे प्रजा समाजांत उत्पन्न झाल्यानंतर त्या प्रजेची समाजांत व्यवस्था लावावयास पाहिजे. येथेंच संस्कार किंवा रहाणीचे आचारव्यवहाराचे नीतिनियम कसे असावयास पाहिजेत याचा विचार डोळ्यापुढें आपोआप येईल. हे नियम अर्थातच पहिल्या नियमांशीं अविरुद्ध असावयास पाहिजेत. येथें आचार पहिल्या नियमांची सिद्धि करण्याच्या दृष्टीनेंच ठरवावयाचे असल्याकारणानें, त्या नियमांचें पालन होण्याकरितां जे जे संकेत करावे लागतील ते ते संकेत करावयास पाहिजेत. हेच नियम दाखवून धर्मपरिवर्तन होतें, असें आधुनिकांचा एक वर्ग सांगत सुटला आहे ! कोणाच्याही ही गोष्ट सहज लक्षांत येईल कीं, प्रजोत्पादनाच्या नियमांशीं तुलना

---

१ Mendel's principles of heredity by Bateson ; Inbreeding and outbreeding by East and Jones.

२ Treasury of human inheritance Edited by Pearson.

३ Cytology by L. Doncaster.

करितां हे नियम अर्थात्च गौण आहेत. परंतु मानवी स्वभावाचा विचार करितां समाज शुद्ध रहावयाचा तर, हे संकेत देखील फार कडक तऱ्हेनें पाळावयास पाहिजेत. प्रत्यक्ष उदाहरणानें बोलावयाचें तर एकाच दांपत्याची संस्कार न होतां झालेली आणि विवाहसंस्कार होऊन झालेली जी दोन तऱ्हेची संतती, तीमध्यें जातीयदृष्ट्या कांहींही भेद असणें शक्य नाहीं. परंतु अशा स्थितींत फक्त पहिल्या तत्त्वाचाच विचार होईल आणि त्यामुळें अशी स्थिति अनैसर्गिक नसली तरी समाजविरोधी खास होईल. यालाच अलीकडे अनिर्बंध समागम ( free love ) असें गोड नांव देण्यांत येतें! उलट कोठल्या तरी दोन व्यक्ती घेवून त्यांचा सर्व संकेत पाळून विवाह केला तर, त्यामध्यें दुसऱ्या तत्त्वाचें पालन झालें. परंतु, मुख्य प्रजोत्पादनाचे नियमच मोडले जातील ! अशी स्थिति समाजविरोधी नसली तरी प्राणिशास्त्राला विरोधी होईल. एका ठिकाणीं सुप्रजाशास्त्राला (Eugenics) महत्त्व दिलें गेलें. तर दुसऱ्या ठिकाणीं सुव्यवस्थाशास्त्राला (Euthenics) जास्त महत्त्व दिलें गेलें ! परंतु समाजरचना ही दोन्ही शास्त्रांच्या मदतीशिवाय उत्पन्न होऊंच शकत नाहीं आणि ही दोन्हीं समाजरचनेचीं अंगें धरावीं लागतात ! म्हणून सांस्कारिक बाबतींतही कठोरपणाचा आश्रय करावा लागतो !

कोणाही व्यक्तीच्या मनांत नेहमीं तीन हेतू असलेले दिसून येतील. पहिला म्हणजे स्वोदरपूरणार्थ द्रव्यार्जन. म्हणून सर्व समाजरचना अर्थमूलक असावयास पाहिजे असें म्हणणारा एक तत्त्ववेत्त्यांचा वर्ग आहे. त्यांच्या मतानें अर्थ हा सर्व समाजरचनेचा पाया असावयास पाहिजे. मानवाचीं एकूणएक दुःखें त्याचें अंतःकरण उत्पन्न करीत नसून, तीं अर्थाचें उत्पादन आणि अर्थाची विभागणी ही विषम झाल्याकारणानें उत्पन्न होतात असें त्यांचें मत आहे. त्यांच्या मतानें द्रव्याची विभागणी यथायोग्य झाल्यास या पृथ्वीचें लवकरच नंदनवन बनेल. त्यांचीं द्रव्याचा अभाव म्हणजे दुःख आणि द्रव्याची सुबत्ता म्हणजे सुख अशीं समीकरणें बनलेलीं आहेत. या तत्त्वज्ञानानुसार मानवी सुखदुःखें हीं मानवबाह्य परिस्थितीचे परिणाम आहेत. या तत्त्वज्ञानाच्या आत्यंतिक प्रकर्षाचें स्वरूप रशियांत ज्या समाज-

रचनेचा आज प्रयोग केला जात आहे, तो समाजसत्तावाद होय. परंतु जगांतील कोणताही समाज घेतला तरी, त्यांतील धनवान असलेल्या थरांचा नाश आणि द्रव्यहीन असलेल्या थरांची वृद्धि कां होत जाते, या कोड्याचा खुलासा त्यांच्याकडून झालेला आमच्या पहाण्यांत नाहीं ! ज्याप्रमाणें एकाच समाजाच्या अंतर्गत असलेल्या अवयवभूत थरांची स्थिति, त्याप्रमाणेंच वेगळालीं राष्ट्रें घेऊन त्यांची तुलना केल्यास तीच स्थिति असलेली दिसून येते. राष्ट्रें जसजशीं धनवान् तसतशीं त्यांची नाशाकडे प्रवृत्ति ! उत्तर आणि पश्चिम युरोपांतील देश हे पूर्व युरोपांतील देशांपेक्षां जास्त श्रीमान आहेत. परंतु त्यांच्या लोकसंख्येबद्दल कुझिन्स्कि[२] म्हणतो, 'इसवी सन १९२६ सालीं उत्तर आणि पश्चिम युरोपांत असलेल्या जननसंख्या आणि मृत्युसंख्या यांच्या प्रमाणाचा विचार केल्यास असें दिसून येतें कीं, त्या देशांतील लोकसंख्या लवकरच नष्ट होणार, ही गोष्ट निश्चित आहे !' एकाच समाजांत वावरणाऱ्या थरांचें एक प्रत्यक्ष[३] उदाहरण घेतों. एका शतकापूर्वीं मॉरिशसमधील एक तृतीयांश लोकसंख्या युरोपियन वसाहतवाल्यांची होती, म्हणजे मुख्यतः फ्रेंच लोकांची होती. आज जवळजवळ तो देश हिंदुस्थानचा तुकडा असावा अशी लोकसंख्येच्या दृष्टीनें स्थिति झाली आहे ! येथें तर युरोपियन फ्रेंच हा धनवान् आणि सर्वसत्ताधारी व हिंदी कामकरी हा निर्धन आणि दुर्बल ! परंतु शंभर वर्षांत फ्रेंचांची नाशाकडे प्रवृत्ति स्पष्टच दिसून येते. युरोपमध्यें पहा, अमेरिकेमध्यें पहा, हिंदुस्थानामध्यें पहा, द्रव्य आणि वंशनाश यांचा एक तऱ्हेचा समन्वय असलेला दिसून येईल. जर धनामध्यें समाजाचें रक्षण करण्याचें सामर्थ्य असेल, तर समाजाची रचना धनप्रधान तत्त्वावर करणें इष्ट होईल. परंतु द्रव्य आणि समाजरक्षण यांचें साहचर्य तर इतिहासांत कोठेंच आढळून येत नाहींत, धनवान् समाज जगत नाहींत आणि दरिद्री समाज मरत नाहींत,

---

१ Marriage and Morals by Russel; Eugenics by Carr Saunders; Darwinism and Race-progress by Haycraft; Heredity and selection in sociology by Chatterton Hill.

२ Balance of births over deaths by R. R. Kuzeyniski.

३ Outspoken essays by Dean Inge.

असें पाहिलें म्हणजे धन हें समाजघटनेचें एक अंग आहे असें मानलें तरी प्रधान अंग आहे असें मानतां येत नाहीं ! आज जर चहूंकडे पाहिलें तर समाजाच्यापुढें धन हाच प्रधान हेतु आणि औद्योगिक प्रगति हेंच त्याचें साधन, असें समीकरण मांडलें जात आहे आणि त्या तत्त्वज्ञानाची झळ शास्त्रीलोकांना[1] देखील लागत चाललेली आहे !

व्यक्तींचा दुसरा हेतु म्हणजे, आपली संतति राहून आपल्या वंशाचें रक्षण व्हावें असा असतो. हा हेतु म्हणजेच कामशास्त्र. हाच मनुष्यांच्या सर्व हालचालींचें जबरदस्त कारण आहे, असें म्हणणारे फ्रॉईड, जुंग, ॲडलर, केम्फ, श्रोडर वगैरे तत्त्ववेत्ते आहेत. त्यांच्या मतानें या कामरूप शक्तीचें व्यवस्थित पद्धतीनें नियंत्रण करणें या तत्त्वावर, म्हणजे कौटुंबिक पद्धतीवर समाजरचना व्हावयास पाहिजे. ही कामाची शक्ति कोणीही नाकबूल करीत नाहीं. आर्य समाजरचनेचा वरवर अभ्यास केला तरी, या शक्तीचें नियंत्रण करण्याचाच प्रयत्न प्राधान्यानें केलेला दिसून येईल. भर्तृहरी म्हणतो, ‘ ते कामेन निहत्य निर्दयतरं नग्नीकृता मुंडिताः ’ अशी कामाची जबरदस्त शक्ति आहे !

आमच्या स्वतःच्या मतानें कामविकाराची बरोबर व्यवस्था न झाल्यास सुप्रजातत्त्व साधणार नाहीं आणि अर्थविभागणी यथायोग्य न झाल्यास संस्कारतत्त्व साधणार नाहीं. म्हणून या दोहोंचाही यथाप्रमाण मेळ घातल्याशिवाय सुस्थित समाज उत्पन्न होणार नाहीं. अशा तऱ्हेनें दोनही तत्त्वांचा विचार होऊन समाजरचना केल्यास, तो समाज कालत्रयीही नष्ट होणार नाहीं. नंतर भूतकालीन संस्कृतींचें परीक्षण करून त्यांच्या विनाशाचीं कारणें शोधून काढून, तीं कारणें आपल्या नैतिक मूल्यांत गुप्त अगर उघड रीतीनें प्रवेश करणार नाहींत अशी खबरदारी बाळगावयास पाहिजे.

सृष्टीनें व्यक्ती कर्तृत्ववान् रहाण्याकरितां योजलेली युक्ति जो जीवनार्थ कलह, त्याचीही व्यवस्था समाजरचनेंत असावयास पाहिजे. पण त्या बरोबरच समाजस्थितींत कलहाचा उपशम होण्याचीही पण व्यवस्था असावयास पाहिजे. संस्कृतीमध्यें लायकीच्या अनुरोधानें व्यक्तीचे अनेक थर पड-

---

१ धर्मशास्त्रमंथन– वे. शा. सं. महादेवशास्त्री दिवेकर.

तात. त्या थरांच्या लोकसंख्येचें प्रमाण बिघडणार नाहीं, अशी व्यवस्था करावयास पाहिजे. श्रेष्ठ घराणीं आणि श्रेष्ठ वर्ग हे, जसजसें श्रेष्ठत्वाचें प्रमाण जास्त तसतसा वांझपणाही जास्त या नियमानें बांधले गेलेले असतात असा सार्वत्रिक सिद्धांत आहे. असें असूनही वेगवेगळ्या वर्गांची संख्या समप्रमाणांत असावयास पाहिजे आणि येथेंच समाजरचनाकौशल्याची परमावधि होईल. मोठमोठालीं सशास्त्र युद्धें होण्याच्या अनेक कारणांपैकीं लोकसंख्येची अतोनात वाढ होणें हें एक कारण आहे. ती वाढ सृष्टीचे कार्यांत अडथळा न आणतां आवरून धरणें ह्यांतही कौशल्य दाखवावें लागेल. या सर्व व्यवस्था वाऱ्याच्या झुळकेप्रमाणें बदलणाऱ्या लोकमतावर अवलंबून ठेवितां येणार नाहींत. ही जी व्यवस्था आपण करणार, ती मूळ पिंडप्रगतीशीं विसंगत होतां कामा नये. अशा तऱ्हेची समाजरचना कोठें म्हणजे कोणत्या तऱ्हेच्या समाजांत सिद्ध होऊं शकते त्याचा आतां विचार करावयाचा.

आम्हीं मागें सांगितलेंच आहे, एकंदर जीवजात सुदृढ स्थितींत ठेवण्याचा सृष्टीचा मार्ग म्हटला तर व्यक्तींचा व्यक्तींशीं, उपजातींचा उपजातींशीं, जातींचा जातींशीं, राष्ट्रांचा राष्ट्रांशीं जीवनार्थ कलह हाच आहे. परंतु पुढें जीवनार्थ कलह हें तत्त्व डोळ्याआड होऊन सामर्थ्यसंपादनाकरितां कलह हें तत्त्व पुढें येऊं लागतें ! जीवन हें तत्त्व मागें पडून चांगलें जीवन हें ध्येय पुढें येऊं लागतें ! परंतु चांगलेपणा ही कल्पना सांकेतिक असल्याकारणानें अनंत मतमतांतरें, त्यामुळें अनंत नैतिक पद्धती उत्पन्न होऊं लागतात. या सर्व भानगडीमध्यें सृष्टीचा हेतु पार पाडण्याकरितां मदत करणें, हा जो संकेतांचा हेतु तोच नष्ट होऊन संकेतावरच भांडणें होऊं लागतात ! मानवाला जे कांहीं संकेत करावयाचे असतील, ते त्यानें खुशाल करावे. परंतु नैसर्गिक कलहाचा उपशम करण्याच्या गडबडीमध्यें त्यानें नैसर्गिक निवडीचे तत्त्वाला बाध लावितां कामा नये. एक जाति ( One type ) कळत नकळत इतर जाति आणि भोंवतालची परिस्थिति या दोहोंशीं एक तऱ्हेचें तिरंगी युद्ध खेळत आहे. म्हणून त्या जातींपैकीं जितक्या जास्त व्यक्ती त्या जातीशीं एकरूप झाल्या असतील म्हणजे, एकाच ध्येयानें प्रेरित झालेल्या आणि इतर ध्येयानें मोहीत न

होणाऱ्या असतील, त्या प्रमाणांत ती जाति जीवनार्थ कलहांत टिकाव धरून राहण्याला समर्थ होईल. ही एकरूपता यावयाची असेल तर, त्या जातीचे वांशिक गुण शक्य तेवढे समबल असावयास पाहिजेत. एकाच जातीच्या अंतर्गत चालीरीतीमध्यें द्रव्य, शिक्षण वगैरेपासून होणारे फरक फारसे दृग्गोचर होणार नाहींत, अशी व्यवस्था[१] असावयास पाहिजे. प्रत्येक जातीनें उपयोगांत आणावयाचें अन्नपान, कपडालत्ता, बाह्य रहाणी, दोन व्यक्ती भेटल्या असतां एकमेकाला अभिवादन करण्याची पद्धति, या सर्व गोष्टी त्या जातीपुरत्या एकरूप असावयास पाहिजेत. या बाबतींत आर्य-समाजशास्त्रज्ञांनीं किती सुंदर व्यवस्था केली होती, ही गोष्ट लक्षपूर्वक पहाण्यासारखी आहे. जिज्ञासूंनीं 'प्रत्यभिवादेऽशूद्रे' या पाणिनीय सूत्रावर रा. विश्वनाथपंत राजवाडे यांनीं केलेली चर्चा[२] जरूर पहावी. अशा तऱ्हेनें आचारामध्यें निश्चितपणा[३] यावयास पाहिजे. ( Standardization of caste ) याची मानसशास्त्रीय चर्चा ( Formation of complexes ) पुढें करूं. प्रत्येक व्यक्तीच्या मनावर व्यक्तीसुखापेक्षां जातिहिताचा पगडा जर जास्त बसेल तरच संघरूप व्यक्तीसमूह एकदिलानें कार्य करूं शकेल. आपण, आपलें कुटुंब, आपली जाति, आपला धर्म, आपला देश, मग या सर्वांच्या पलीकडे जाऊन चिनी लोक, निग्रो, काफीर, नंतर पशु, पक्षी वगैरे तिर्यक्जाति यांच्याकरितां किती प्रमाणांत स्वार्थत्याग करावयाचा, याचें कांहीं तरी कोष्टक प्रत्येक व्यक्तीच्या मनःचक्षूंपुढें निश्चित असावयास पाहिजे. 'एते सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थान् परित्यज्य ये' असे लोक सत्पुरुष असल्याकारणानें, समाजशास्त्राच्या कक्षेंत पडत नाहींत, ते म्हणजे आत्यंतिक ध्येयाचें एक प्रतीक होत. आपल्या समष्टीशीं तादात्म्य पावल्या-शिवाय मानव्याला कवटाळूं पहाणारा मनुष्य सृष्टीची घटना मुळींच जाणत नाहीं, असेंच अनुमान करणें भाग आहे. हिंदूनें पैसे खर्च करून मुसल-

१ National life from the standpoint of science by Pearson; Christian Ethics and Modern problems by Inge.

२ राधामाधवविलासचंपू प्रस्तावना—वि. का. राजवाडे.

३ **Mankind at cross-roads by Prof. E. M. East; Reflections on the revolution in France by Burke.**

मानांची मशीद बांधून दिल्यास वर्तमानपत्रांतून नांव येईल हें खरें, परंतु समाजशास्त्राच्या दृष्टीनें ही प्रवृत्ति अत्यंत गर्ह्य आहे !

कांहीं ठिकाणीं असा आक्षेप घेतलेला ऐकूं येतो कीं, हिंदूंमध्यें जात्यभिमान फारच बोकाळला आहे ! परंतु आमचें असें मत झालें कीं, हिंदु समाजांत जात्यभिमान फारच थोडा, म्हणजे जवळजवळ मुळींच नाहीं इतपत स्वरूपाचा आहे ! ही स्थिति शास्त्रीयदृष्ट्या बरी नाहीं, असें स्पष्टपणें तरुणांना बजावण्याचा आज काळ आलेला आहे !

**३० चातुर्वर्ण्याचा पाया**

संघोपसंघाची प्रवृत्ति ही सर्व सृष्टींत अस्तित्वांत आहे आणि सृष्टींतूनच ती मानवसमाजामध्यें प्रसृत झाली आहे, ही गोष्ट आम्हीं मागें सांगितलीच आहे. समाजव्यवस्था करतांना फक्त त्या प्रवृत्तीचा यथायोग्य उपयोग तेवढा करून घ्यावयाचा असतो. सृष्टीची संघाकडे प्रवृत्ति आणि मानवाची व्यक्तिस्वातंत्र्याकडे प्रवृत्ति या दोन्ही प्रवृत्तींचा समाजशास्त्रज्ञाला मेळ घालावयाचा असतो. आर्य समाजशास्त्रामध्यें हे संघोपसंघ कसे उत्पन्न झाले, याची काल्पनिक उपपत्ति काढीत न बसतां ते आहेत तसेच घेऊन त्यावर समाजरचना उभारण्याची प्रवृत्ति दिसते.

‘ मनुमेकाग्रमासीनं अभिगम्य महर्षयः ।
प्रतिपूज्य यथान्यायं इदं वचनमब्रुवन् ॥
भगवन्सर्ववर्णानां यथावदनुपूर्वशः ।
अंतरप्रभवाणांच धर्मान्नो वक्तुमर्हसि ॥

येथें वर्ण आणि अंतरप्रभव यांचें अस्तित्व गृहीत धरून धर्मशास्त्राच्या चर्चेला सुरुवात केलेली दिसते. मूळजाति कशा उत्पन्न झाल्या, जाति कशाला म्हणावें वगैरे डार्विन, हेकेल, वेजमान वगैरेंना देखील कठीण वाटणाऱ्या विषयांत निरर्थक शाब्दिक कोट्यांची खटपट केलेली नाहीं. पौर्वात्य अगर पाश्चात्य ज्या जुन्या ग्रंथांत ही खटपट केलेली दिसते, तेथें ती निरपवाद नाहीं. कुल्लूकभट्ट म्हणतो, ‘ अन्तरप्रभवाणां च संकीर्ण जातीनामपि अनुलोम प्रतिलोमजातानां. ’ अंतरप्रभव म्हणजे संकरजाति ज्यांना आम्ही

१ मनुस्मृति.

समाजशास्त्रांत ' Hybrid ' अथवा ' Cross ' असें म्हणतात त्या जाती होत. चातुर्वर्ण्याच्या मर्यादा पुढीलप्रमाणें सांगितलेल्या आहेत: 'चातुर्वर्ण्यसो प्रकृतिविशेषात् संस्कारवशाच्च.' चातुर्वर्ण्य हे प्रकृतिविशेष म्हणजे पिंडाचे नैसर्गिक गुणधर्म ( Eugenic ) आणि संस्कार म्हणजे सामाजिक संकेतांत उत्पन्न होणारे संस्कार. ( Psychosocial ), या दोहोंच्या यौगपद्यांत सिद्ध होत असतें. या दोन्ही तत्त्वांची भरपूर चर्चा आम्हीं पूर्वी केलेलीच आहे. या दोन तत्त्वांनाच लंडनचा प्रो. जूलियन हक्स्ले[१] स्वभाव ( nature ) आणि सामाजिक संस्कार ( nurture ) असें म्हणतो आणि त्यालाही यांच्या यौगपद्याची जरूरी भासते ! आजचे सर्व सुप्रजाशास्त्रज्ञ मानवी प्रगतीला असाच द्विविध हेतु सांगतात. याच दोन तत्त्वांना समाजशास्त्रज्ञ चॅटरटन् हिल हा आनुवंश ( Heredity ) आणि निवड ( Selection ) हे शब्द थोड्याशा फरकानें लावतो ! थोडक्यांत सांगावयाचें तर, एकरूप समाज बनण्याला ज्या तत्त्वांचें पालन करावें लागतें त्यांचा, चातुर्वर्ण्याच्या व्याख्येंत सूत्ररूपानें विचार केलेला दिसतो. हाच नियम अर्थात् इतर संघोपसंघांना लागू करणें इष्ट आहे. आनुवंशिक गुण आणि सामाजिक संस्कार या दोहोंचा विचार करून जातीय स्वरूप ठरवावयाचें असतें.

संघ अशा तऱ्हेनें उत्पन्न होत असल्याकारणानें, त्यापैकीं एकच एक व्यक्ति, दुसरा एकादा गट त्या व्यक्तीला आत्मसात् करावयास तयार असल्यास, संघ सोडून जाऊं शकेल, परंतु दुसऱ्या गटांतील एकच व्यक्ति त्या संघांत प्रवेश करूं शकणार नाहीं. याच पद्धतीला गटांतर्गत गटाची ( crystal within crystal ) समाजरचनापद्धति असें म्हणूं. आम्रवृक्षाला आलेला थोडासा मोहोर गळून पडला म्हणून तो आम्रवृक्ष मेला असें ज्याप्रमाणें कोणीही म्हणत नाहीं, त्याप्रमाणेंच, एका गटांतील कांहीं व्यक्ती तो गट सोडून गेल्यास तो गट मुमूर्षु झाला असें म्हणण्याचें कांहीं एक कारण नाहीं. गटांतील व्यक्तींना गटाभावस्वरूप येण्याला गटाबाहेर विवाह व गटाबाहेरील संस्कार हीं दोन कारणें होऊं शकतात. परंतु कांहीं व्यक्तींनीं विवाहरूप यूथभिन्नत्व स्वीकारल्यास सामाजिक संस्कार चहूंकडे फैलावून संस्कृतीचा प्रसार होतो. म्हणून हिंदु स्त्रियांनीं बाह्यांशीं विवाह करावे

१ Stream of life by Julian Huxley.

असें एक मत पुढें येऊं लागलें आहे, त्याचा यथाशक्ति परामर्श घेऊं.

आंतरजातीय विवाह हें सुधारणेचें एक लक्षण आहे असें मानणाऱ्या पंडितांकडून, प्राणिशास्त्रांत शुद्धाशुद्ध जाति कशाला म्हणतात, हें माहिती नसल्यामुळें अगर माहिती असूनही कांहीं अंतिम ध्येयानें प्रेरित झाल्यामुळें, आंतरजातीय विवाह हें ऐतिहासिक सत्य आहे, असा एक मुद्दा पुढें आणला जातो. या तत्त्वाचा विचार जातिप्रकरणीं करूं. अत्यंत उदार मतें आणि विशाल बुद्धि असलेल्या दुसऱ्या लोकांकडून हिंदु स्त्रियांचे हिंदुत्वबाह्य जातींशीं विवाह हेही हिंदुत्वालाच पोषक, अर्थात् असे विवाह घडून येणें इष्ट आहे असें मत पुढें येऊं लागलें आहे. या विधानांची बरोबर छाननी न झाल्यास हे शास्त्रज्ञबुव[1] आजच्या सुशिक्षित समाजाच्या नाशाला तरी कारणीभूत झाल्याशिवाय राहणार नाहींत. या शास्त्रज्ञांनीं पुढें आणलेलीं कारणें कितपत खरीं आहेत आणि समाजशास्त्राच्या कसोटीला तीं कितपत उतरतात याचा विचार करतों. अशा लोकांनीं तीन उदाहरणें पुढें आणलेलीं आहेत. आणखी पुष्कळही उदाहरणें ते आणूं शकतील. कारण आम्ही पुढें दाखविणार आहोंत कीं, अशा लेखकांची समाजशास्त्राच्या अभ्यासाची पद्धति फारच सूक्ष्म म्हणजे अर्थशून्य म्हणजे समाजांतील भोळ्या लोकांचा जाणूनबुजून सहेतुक बुद्धिभेद करणारी असते.

**२१ स्त्रियांचे बाह्यांशीं विवाह**

या लेखकांच्या मतानें आज पारशी, यहुदी आणि हबशी लोकांमध्यें कांहीं हिंदु चालीरीति पसरलेल्या दिसतात. हबशी समाज तर हिंदु समाजामध्यें गणला जातो ! ( सबंध गटच्या गट आत्मसात् करून घ्यावयाचे ही तर हिंदुधर्माच्या प्रसाराची[2] पद्धति आहे व ती गोष्ट या लेखकांना अवगत आहे.) या लेखकांच्या मतें या सर्व गोष्टींच्या मुळाशीं असें असलें पाहिजे कीं, हे परके लोक ज्यावेळीं हिंदुस्थानांत आले, त्यावेळीं त्यांच्याजवळ स्त्रियांचा भरपूर पुरवठा नसावा. हें काल्पनिक गृहीत कृत्य आहे, परंतु तें वादाकरितां खरें आहे असें गृहीत धरूं. त्यांचीं बहुतेक गृहीत कृत्यें अशींच

१ डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचे सकाळ पत्रांतील लेख.

२ संकीर्ण लेख– डॉ. केतकर; Asiatic studies by Sir Alfred Lyall.

काल्पनिक असतात, परंतु मनुष्याच्या जन्मस्वभावाला जगांत कांहीं उपाय नाहीं ! त्यांना हिंदुस्थानांतीलच स्त्रिया मिळाल्या. राजसत्तादि गुण नसलेल्या या लोकांना स्त्रिया मिळाल्या असल्यास काय लायकीच्या मिळाल्या असतील, या गोष्टीचा हिंदु स्त्रियांनीं ब्राह्मांशीं विवाह करावे अशा तऱ्हेचे सिद्धांत काढणाऱ्या लेखकांना विचार करण्याचें कारण न भासणें हेंच बरोबर आहे ! त्या बहुतेक हिंदूंतील विधवा स्त्रिया असाव्यात आणि त्यांच्यामार्फत हिंदुत्व या लोकांत शिरलें असावें. हिंदुत्व म्हणजे काय विचाराल तर विवाहप्रसंगीं नवरानवरींनीं सुपारी सोडण्याची, विवाहप्रसंगीं वधू निरीक्षणापूर्वीं आंतरपट धरण्याची आणि सूतकामध्यें षष्ठी देवीची पूजा करण्याची वगैरे ज्या किरकोळ चाली आहेत, त्या या तीन्ही समाजांत असलेल्या दिसून येतात. असें हें जें जंगी हिंदुत्व तें हिंदु स्त्रियांनीं ब्राह्मांशीं विवाह केल्यामुळेंच इतरत्र पसरलें. येथें सर्वच संकेतांचा विचार झाला असून, आनुवंशिक पद्धतीचा मुळींच विचार केलेला दिसत नाहीं. त्यामुळें येथें हिंदु गटत्व सिद्ध होणार नाहीं. तोही विचार किंचित्काल दृष्टीआड करून, त्यांनीं पुढें आणलेल्या विधानांचा विचार करूं. येथें एक गोष्ट नमूद करून ठेवितों कीं, हें जें जंगी हिंदुत्व ब्राह्मांध्यें पसरतें म्हणून सांगितलें, त्या ब्राह्मांपैकीं हिंदुस्थानांत फार मोठी असलेली अल्पसंख्याक जाति जी मुसलमान तेवढी जाति वगळून ठेविली आहे. त्या जातींतहीं कांहीं तरी हिंदुत्व स्त्रियांच्या मार्फत पसरल्याचें या लेखकांनीं दाखविलें असतें तर राजकीयदृष्ट्या बराच फायदा झाला असता. कांहीं थोडेसें हिंदुत्व आज पसरलें असल्यास आणखी कांहीं शतकें हिंदु मुलींनीं मुसलमानांशीं विवाह केल्यास, हिंदु व मुसलमान हे एकजीव होऊन जातील! अशाही तऱ्हेचें मत सदरहू लेखकानें दिलें आहे. परंतु ती संस्कृति काय स्वरूपाची होईल तें सांगण्याचें धाडस मात्र केलें नाहीं !

समाजाचा बुद्धिभेद करण्याच्या हेतूनें पुढें आणलेल्या या सर्व मायाजाळाचा विचार करूं. न्यायशास्त्रामध्यें असा नियम आहे कीं, दोन पद्धतींत अगर दोन स्थितींत सारखेपणा दाखवावयाचा असेल तर, त्या दोहोंतील प्रधान अंगांची तुलना करावयाची असते; तसें न करितां गौण गोष्टींतील

१ ज्ञानकोश खंड १– डॉ. केतकर.

साम्यांचा आधार घेतल्यास मोठे विलक्षण सिद्धांत प्रतीत होऊं लागतात. उदाहरणार्थः—

स्त्रिया पेटी वाजवितात.

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर पेटी वाजवितात.

∴ डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे स्त्रियांसमान आहेत.

कोणत्याही दोन स्थितींतील साम्यवैषम्य सिद्ध करावयाचें तर, त्यांचें प्रधान अंग, गमक अथवा विशेष ( differentia ) यांची तुलना करावयास पाहिजे असें सांगितलें. परंतु विशेष सांगावयाचा म्हणजे न्यायशुद्ध पद्धतीनें त्या पदार्थांची व्याख्या करावयास पाहिजे. आपणांस सिद्धांत काढावयाचे आहेत. प्रधान अंगाच्या ऐवजीं जर गौण अंगांची तुलना करावयाचें ठरलें तर, लेखक म्हणतात त्या तीनच काय, पृथ्वीवरील एकूणएक मानववंशांच्या चालीरीतींमध्यें कांहींना कांहीं तरी साधर्म्य सहज दाखवितां येईल आणि पृथ्वीवरील सर्व मानववंशांमध्यें स्त्रियांच्या मार्फत हिंदुत्वाचा प्रवेश झाला असें अनुमान सहजच सिद्ध करितां येईल ! पुन्हां त्या अप्रधान चालीरीति प्रगत होण्याला विवाह हेंच कारण असलें पाहिजे,—अनुकरण ( imitation ) हें कारण होऊं शकत नाहीं, असें मानण्याला काय सबळ कारणें असतील तीं त्या लेखकांनीं पुढें आणावयास पाहिजेत. त्यांनीं दिलेलें उदाहरण घ्यावयाचें तर आज समाजांत प्रौढ विवाह सुरू झाल्याकारणानें आणि सुधारणा मातबर माजली असल्याकारणानें, सुशिक्षितांमध्यें नवरानवरींनीं सुपारी सोडणें, सूतकामध्यें षष्ठी देवीची पूजा करणें वगैरे चाली बंद पडत चालल्या आहेत म्हणून या सुशिक्षितांचे बाह्य स्त्रियांशीं विवाह झाले असले पाहिजेत ! ऐन इंग्लिश अमदानी सुरू झाली, त्यावेळीं पुष्कळ ब्राह्मण कुटुंबांमध्यें आणि आजही तुरळक थोड्या थोड्या कुटुंबांमध्यें साहेबांच्या चालीरीति उचलल्या जात आहेत. इतक्या कीं, कित्येकांनीं द्विजत्वदर्शक संस्कार जो उपनयन तो देखील आपल्या संततीचे बाबतींत केला नाहीं ! म्हणून, या सर्व लोकांचे युरोपियन स्त्रियांशीं विवाह झाले असले पाहिजेत. अगदीं परमेश्वराच्या उपासनेचा प्रश्न घेऊं. हिंदु समाजामध्यें उपासना वैयक्तिक आहे, सांघिक नाहीं.

१ Golden bough by J. G. Fraser.

तशा तऱ्हेची प्रार्थना आर्येतर ( Semetic ) धर्मांमध्यें आहे. परंतु डॉ० भांडारकर, जस्टिस रानडे यांनीं संघोपासनाप्रधान प्रार्थनासमाज स्थापन केला आणि अजूनही तो हयात आहे. म्हणून, प्रार्थनासमाजाच्या संस्थापकांचे अगर अनुयायांचे ख्रिस्ति अगर मुसलमानी स्त्रियांशीं विवाह झाले असले पाहिजेत असें अनुमान मेंदू ठिकाणावर असलेला कोणीही मनुष्य काढील असें आम्हांला वाटत नाहीं. खरी गोष्ट अशी आहे कीं, कांहीं सामाजिक कारणांमुळें एकाद्या गटाचे आचार श्रेष्ठ मानले गेल्यास, इतर गटांची त्या समाजाच्या आचारांप्रमाणें आपले आचार बनविण्याची नैसर्गिकच प्रवृत्ति दिसून येते. यालाच समाजशास्त्रांत अनुकरण–पद्धति (Theory of imitation ) असें म्हणतात. गॅब्रिएल तार्द म्हणतो 'समाजाच्या क्षेत्रांत एकदां पाऊल टाकलें म्हणजे असें दिसून येतें कीं, आपण ज्या कांहीं क्रिया करतों, अगर जे कांहीं विचार करतों त्या सर्व बाबतींत आपण दुसऱ्याचें अनुकरण करीत असतों ही गोष्ट निःसंदेह आहे, फरक असा क्वचितच केलेला दिसून येईल. फरक केल्यासारखा म्हणून जेथें दिसतो तेथेंही तो पूर्वी होऊन गेलेल्या दोन अगर अनेक कल्पनांच्या मिश्रणानें बनलेली एक कांहीं तरी नवी कल्पना म्हणून पुढें आणिली जाते. अशा तऱ्हेच्या कल्पनेचें समाजांत अनुकरण न झाल्यास तीही कल्पना सामाजिक जीवनांत अंतर्भूत होऊं शकत नाहीं. तुम्ही धर्माचा असा कोणताही संस्कार करूं शकत नाहीं कीं, जो पूर्वी होऊन गेलेल्या कोणत्या तरी संस्काराचें अनुकरणरूप असत नाहीं.' ज्या काळाबद्दल हे पंडित बोलत आहेत त्या काळीं हिंदु लोकांचीं राज्यें होतीं. म्हणून त्यांच्या कांहीं किरकोळ चालीरीति या समाजांत शिरल्या असल्यास त्या हिंदु स्त्रियांशीं झालेल्या विवाहांच्या द्वारें शिरल्या असतील हें अनुमान अचिंत्य आहे. पुन्हां या लोकांच्याजवळ मुळींच स्त्रिया नव्हत्या; त्यांना सर्वच हिंदु स्त्रिया मिळाल्या असें या लेखकाचेंही म्हणणें नाहीं. म्हणून न्यायतः पाहिलें तर, या लोकांमध्यें चालीरीतीच्या दोन परंपरा दिसून आल्या पाहिजेत. थोडक्यांत सांगावयाचें तर असली पोरकट अनुमानें कोणींही खरीं मानूं नयेत.

बरें, हिंदुत्व उत्पन्न झालें असें म्हणावयास तरी हिंदुत्वाचें कांहीं प्रधान

१ Les lois sociales by Tarde.

अंग या लोकांच्या चालीरीतींत शिरावयास पाहिजे. सामाजिकदृष्ट्या हिंदुत्वाची चर्चा करतांना ज्ञानकोशकारांनीं ब्राह्मणांबद्दल आदर असणें, हें एक हिंदूंच्या संघटनपद्धतींतील प्रधान अंग म्हणून सांगितलेलें आहे. तो ब्राह्मणाबद्दलचा आदर या वरील लोकांत उत्पन्न झाला आहे काय? मग आपण दिलेलें गमक समाजांना न लावितां विरुद्ध अनुमानें काढणारा लेखक समाजाला कोठें नेईल या बाबतींत समाजाचें लक्ष असावयास पाहिजे असें आम्हांला वाटतें. या विषयाची चर्चा पाहिजे तितकी करितां येईल. परंतु पुढें फार न लिहितां हिंदुसमाजाच्या फार कळकळीनें प्रेरित झालेल्या या लेखकांना एवढीच विनंति आहे कीं, अशा तऱ्हेचीं भ्रामक अनुमानें काढून समाजांत घोंटाळे माजवूं नका!

दुसऱ्या तऱ्हेच्या लोकांचें म्हणणें असें आहे कीं, पूर्वीं आंतरजातीयच नव्हे तर असवर्ण विवाह देखील होत असत. ठीक गोष्ट झाली. एकाद्या तऱ्हेचा एखादा विवाह होणें, आणि तशा तऱ्हेचा विवाह होणें ही एक रीतच असणें या दोन स्थितींत फरक आहे असें आम्हांला वाटतें. अशा तऱ्हेनें क्वचित आंतरजातीय आणि असवर्ण विवाह होत असले तरी, हिंदु इतिहासाच्या कोणत्याही काळांत ती पद्धति प्रचलित होती, हें म्हणणें साफ खोटें आहे. परंतु होत असत असें किंचित्‌काल कबूल केलें तरी या मुद्यामध्यें फारच मोठा हेत्वाभास केला गेला आहे. येथें समाजाच्या घटनाकालांतील स्थिति अगर व्यवस्था आणि समाजाच्या सुसंघटितपणाच्या कालांतील स्थिति अगर व्यवस्था, यांची तुलना केलेली आहे. समाजाच्या घटनाकालांतील व्यवस्था समाज सुसंघटित झाल्यानंतर त्याही काळीं तशीच टेवणें हें ग्राह्य अगर इष्ट होईल असें अमेरिकन पीएच्. डी.नीं दडपून दिलें तरी तें शास्त्रीयदृष्ट्या अग्राह्य आहे. पोर्तुगिजांच्या संसर्गानें गोवन नांवाच्या एका वर्गाची घटना साधारणतः या तीनचारशें वर्षांत घडून आली आहे. त्या लोकांमध्यें पोर्तुगीजांचा ख्रिस्ती धर्म, व्हर्जिन मेरी वगैरे देवतांची पूजा, पोर्तुगीज नांवें,

### ३२ जातीय गटांची उत्पत्ति

१ राधामाधवविलासचंपू—वि. का. राजवाडे; Cambridge History of India Vol. I by E. G. Rapson.

पोर्तुगीज चालीरीति वगैरे गोष्टी सर्रास चालू आहेत, तर त्याबरोबरच हिंदूंच्या जातींची आठवण आहे! आतां संघटित झाल्यानंतर हिंदूंतील जातींची आठवण आहे म्हणून हिंदूंशीं व ख्रिस्ति धर्म आणि नांवें सर्रास प्रचारांत आहेत म्हणून पोर्तुगीजांशीं, एकसमयावच्छेदेंकरून दोन समाजांशीं त्यांनीं समरस होऊन जावयास पाहिजे! काय हरकत आहे? एकी होईलना? पुढें जाऊन विचारावयाचें तर, संघटनाकालची समाजस्थिति आणि संघटितपणाच्या कालाची समाजस्थिति या दोहींच्यामध्यें ज्या कांहीं पन्नास शंभर पिढ्या गेल्या असतील, त्यामुळें नैसर्गिक निवडीच्या तत्त्वानुसार कांहीं फरक पडला असेल किंवा नाहीं याचा कांहींच विचार न करणें हेंही पण अलीकडे सखोल विचाराचें लक्षण होऊं लागलें आहे! म्हणून आम्ही म्हणतों कीं, प्राणिशास्त्रांत उपजाति किंवा संघ कसे उत्पन्न होतात त्याचा विचार व्हावयास पाहिजे. डॉ. लोटझी म्हणतो, ' संकरापासून उत्पन्न झालेला विविधरूप व्यक्तींचा संघ—म्हणजे दोन वेगवेगळे वंश एके ठिकाणीं येऊन मोठ्या प्रमाणावर संगत झाल्यास, त्या विभिन्न जातींपासून होणारी संतती—त्यानंतर जर आपल्या गटाच्या बाहेर संकर करणार नाहीं, तर आम्हीं वर गणित केल्याप्रमाणें ( हें गणित बरेंच अवघड आहे म्हणून शक्य तर परिशिष्टांत देऊं ), कांहीं पिढ्यानंतर एकजातीय प्रजा उत्पन्न होऊन त्या जातीमध्यें संकरप्रजा शिल्लक रहाणार नाहीं.' संकर विवाहानें हिंदुसमाजाचा उत्कर्ष होईल असें म्हणणाऱ्या आमच्या सर्व सन्मान्य मित्रांना असें विचारतों कीं, जाति उत्पन्न होणें ( formation ) आणि त्यांच्यामध्यें स्थायिकत्व उत्पन्न होणें या दोन प्रक्रिया होण्याला ज्या कांहीं पिढ्या लागतात, त्या हिंदु जातींच्या बाबतींत होऊन गेल्या नाहींत असें आपलें म्हणणें आहे काय? या मुद्याचा सांगोपांग विचार विवाहसंस्था प्रकरणीं करूं. येथें इतकेंच निदर्शनास आणून ठेवतों कीं, तीन हजार वर्षांपूर्वीं आंतरजातीय विवाह होत असत किंवा नसत याचा दाखला देणें समाजशास्त्रदृष्ट्या गैरलागू आहे.

जातीय गट कसे पडत जातात याची जरा जास्त लक्षपूर्वक छाननी

---

१ Evolution by hybridization by J. P. Lotsy; Inbreeding and outbreeding by East and Jones.

करावयास लागलें असतां असें दिसून येईल कीं, हिंदूंच्या जातीय गटामध्यें आनुवंश हा अत्यंत प्रधान आहे आणि संकर हा त्याज्य मानलेला आहे. संस्कार हें दुसरें कारण आहे. हे दोनच पर्याय मानले तरी, या पद्धतीचे चार भेद सहज होतील.

| वंश | संस्कार | प्रजा |
|---|---|---|
| उत्तम | उत्तम | उत्तम. |
| उत्तम | हीन | उत्तम प्रजा होण्याची शक्यता. |
| हीन | उत्तम | बाह्यतः श्रेष्ठ दिसणारी. |
| हीन | हीन | हीन. |

या वर्णांना आपण सर फ्रान्सिस गॅल्टन याच्या मतानुरोधानें अ, ब, क, ड अशीं नांवें देऊं. वरील कोष्टकावरून पाहिलें तर, वंश मुख्य आणि शिक्षणादि संस्कार गौण अशी व्यवस्था असलेली दिसून येईल. आज संस्कार प्रधान आणि वंश गौण अशा कल्पना पसरल्या आहेत आणि त्याच अशास्त्रीय असल्यामुळें सर्वच संस्कृतीच वृत्तीच्या पायावर उभारली आहे, हेंच तर दाखवावयाचें आहे. कुठल्या मानवी बुद्धीचा विचार केला तरी तेथेंही वर्णवारी पडतेच. हिंदुस्थानांत बुद्धिमापनाचे प्रयोग फारसे झाले नसल्यामुळें, हिंदुस्थानांतील विभागणी देतां येणार नाहीं. परंतु सर्वसाधारण आनुवंशशास्त्राच्या नियमाच्या बाहेर हिंदु समाज आहे असें आम्हांला वाटत नाहीं. म्हणून यूरोपियन समाजाच्या 'बुद्धि' या तत्त्वाला धरून केलेली विभागणी देतों. सर फ्रान्सिस गॅल्टनचे काळापासून या बाबतींत पुष्कळच कार्य झालेलें आहे. लंडनच्या मानसशास्त्रज्ञ सिरिल बर्ट यानें मुलांची ( आमच्या समाजसुधारकांचे आद्यगुरु जे साहेब त्यांच्या घरच्या मुलांची ) विभागणी पुढीलप्रमाणें केलेली आहे. (१) शाळांमध्यें किंवा युनिव्हर्सिटीमध्यें शिष्यवृत्त्या मिळवूं शकतील अशीं मुलें एक हजारामध्यें एक; ( २ ) दुय्यम प्रतीच्या शिक्षणामध्यें शिष्यवृत्त्या अगर बक्षिसें मिळवूं शकतील असे विद्यार्थी शेंकडा एक अगर जास्तींत जास्त दोन; ( ३ ) साधारणतः दुय्यम शिक्षणापर्यंत पाठविण्याला लायक म्हणजे ज्यांना पाठविलें असतां कांहीं तरी उपयोग होईल असे जास्तींत जास्त शेंकडा दहा. थोडक्यांत

सांगावयाचें तर, शेंकडा दहा बाराच मुलें दुय्यम प्रतीचें शिक्षण घेण्याला लायक असतात. अशा तऱ्हेचीं मतें इतर शास्त्रज्ञांनींही दिलेलीं आहेत. एकंदरींत मनुष्यप्राणी हा घटनेच्या दृष्टीनें समान नाहीं. ही असमानता कोठून उत्पन्न झाली? कोणाही व्यक्तीवर दोन वेगळाल्या शक्तींचा परिणाम होत असतो. त्या व्यक्तीच्या बीजांत जे गुण आलेले असतील त्यांचे परिणाम आणि बाह्यस्थितीचे होत असलेले परिणाम. यांपैकीं प्रधान कोणते आणि अप्रधान कोणते याच्या निश्चितीवर समाजरचनेचीं बरीचशीं सूत्रें अवलंबून आहेत. आनुवंश प्रबळ मानणारे लोक लायक असतील तेवढ्यांचीच जोपासना करा, असें सांगूं लागतील. हा वर्ग म्हणजे आनुवंशप्राधान्य मानणारा वर्ग, थोडा थोडका आहे असें नाहीं. जवळजवळ एकूणएक सर्व प्राणिशास्त्रज्ञ या वर्गांत मोडतात. अशा तऱ्हेच्या विचारपद्धतींत मानव हा विषम आहे आणि सर्वांत श्रेष्ठ जो मानव त्याची जोपासना करावयाची आहे. या पद्धतींत एकाच वंशांतील वेगवेगळ्या थरामध्यें विषमता आहे, त्याचप्रमाणें वेगळाल्या वंशांमध्येंही विषमता आहे. म्हणून येथें समाजांत वेगवेगळ्या वंशांना आणि गटांना नैसर्गिक वैषम्यामुळें समान हक्क नाहींत. या पद्धतीमध्यें श्रेष्ठ वर्गाच्या रक्षणपोषणाकरितां सर्व व्यवस्था केलेली दिसून येईल. येथें एकूणएक मानवाचा विचार करण्याचें कारण राहणार नाहीं. जो श्रेष्ठ वर्ग त्याचेंच संरक्षण, त्याचेंच सुख, त्याचेंच शिक्षण, या गोष्टी डोळ्यापुढें ठेवून सर्व सामाजिक नीतिनियम केले जातील आणि त्या बाबतींत ढवळाढवळ करण्याचा कोणालाही हक्क राहणार नाहीं. अशा तऱ्हेची—म्हणजे शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास करून प्रतीत होणारी—समाजरचना पुष्कळांनीं सुचविली आहे. डॉ. वॉकर[१] म्हणतो: 'आज जो सरकारी पैसा नालायकांना शिक्षण देऊन लायक करण्याकडे खर्च केला जात आहे, त्यापैकीं अगदीं थोडासा भाग जरी जे लायक आहेत त्यांची संधि वाढविण्याकडे खर्च केला गेला तर समाजाचें अंतिम हित फार मोठ्या प्रमाणांत होईल.' तोच ग्रंथकार पुढें शिक्षण आणि सुधारणा यांचा बादरायण संबंध जोडून देणाऱ्या लोकांना उत्तर देतो: "डॉ. इस्टर ब्रूकनें ज्यूक्स घराण्याचा जो दीर्घकाळ अभ्यास केला आहे त्यावरून असें अनुमान कर-

१ An introduction to the study of heredity.

ण्यास हरकत नाहीं कीं, चांगली परिस्थिती अगर व्यवस्थितपणें घेतलेली काळजी या दोनही मार्गांनें हलक्या पिंडामध्यें श्रेष्ठ गुण उत्पन्न होत नाहींत. अशा तऱ्हेनें एकाच घराण्यासंबंधीं दीर्घकाळ अभ्यास केल्यानें समाजरचनेमध्यें आनुवंश किती प्रबल मानिला पाहिजे, हीच गोष्ट पुन्हां निदर्शनास आली. सृष्टीमध्यें पशु आणि वनस्पति यांच्या जाति सुधारण्याला जो मार्ग उपयोगी पडला, तोच मानव प्राण्याच्या बाबतींत उपयोगांत आणावयास पाहिजे. तो मार्ग म्हणजे कांहीं जे श्रेष्ठ गुणयुक्त प्राणी असतील त्यांची निवड करून, त्यांना इतरांपासून विभक्त करून त्यांचीच फक्त जोपासना करावयाची. सर्वसाधारण समाज घेऊन त्यांतून कनिष्ठांचा नाश करण्याची पद्धति ही कांहीं फारशी हितकारक होऊं शकत नाहीं." आमच्या मतें श्रेष्ठांची निवड करून, ते विभक्त[१] करून त्यांची संख्या दर पिढीला वाढत जाईल आणि कनिष्ठ जे उरले त्यांची संख्या दर पिढीला कमी होत जाईल, ही दुहेरी प्रक्रिया सारखी चालू राहिली पाहिजे. ही प्रक्रिया एकसमयावच्छेदें सारखी घडत गेल्यास हळूहळू समाज निसर्गतः शुद्ध, सद्गुणी आणि चिवट असा होत जाईल. त्याकरितां कितीही कडक नव्हे, निर्दय नियम करून ते पाळावयास लावण्याची जरूर भासल्यास त्याप्रमाणें आपोआप घडून येण्याची समाजयंत्रांतच व्यवस्था असावयास पाहिजे. जीव, मग तो कसाही असो त्याची काळजी घेतलीच पाहिजे ही गोष्ट शास्त्रज्ञ राहूंद्याच, परंतु साधुसंत आणि तत्त्ववेत्ते यांना देखील मान्य नाहीं. तुकाराम म्हणतोः 'दया नाम संतांचें पाळण। आणिक निर्दाळण दुर्जनांचें' चांगल्यांची वाढ आणि दुर्जनांची घट. त्याप्रमाणेंच भगवान् श्रीकृष्णही पण सांगतातः 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे॥' हीच समाजरचनेची पद्धति पर्यायानें सर्व हिंदु समाजशास्त्रज्ञांनीं सांगितली आहे. म्हणून त्या पद्धतीवर टीका करणारांनीं आपण ज्या पद्धतीचा आश्रय करून अशी टीका करतों, त्या पद्धतीचें निर्दोषत्व आणि अंतिम हितकारित्व आधीं सिद्ध करावयास पाहिजे. कोणती समाजरचना पूर्णांशानें निर्दोष आहे हें पहावयाचें नसून, कोणत्या पद्धतींत कमी दोष आहेत एवढेंच पहावयाचें असतें. कारण, 'सर्वारंभाहि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः।'

१ Segregation of the fit by Austin Freeman.

मानवी कृत्यें हीं नेहमींच सदोष राहणार. भगवान् शंकराचार्यांनीं हीच पद्धति सांगितली आहे. भगवद्गीतेवरील भाष्यभूमिकेंत शंकराचार्य म्हणतात: ' ब्राह्मण्यस्य रक्षणेन रक्षितःस्याद्वैदिकोधर्मः तदधीनत्वाद्वर्णाश्रमभेदानाम् । ' वर्णाश्रमभेद हे ब्राह्मणत्व या गुणावर अवलंबून असल्याकारणानें ब्राह्मण्याचें रक्षण केल्यानें वैदिक धर्माचें रक्षण होईल. येथें आज शिवीवाचक झालेला ब्राह्मण हा शब्द शंकराचार्यांनीं वापरला असला, तरीही समाजरचनेची त्यांनीं सांगितलेली पद्धति अत्यंत शास्त्रीय आहे, ही गोष्ट नजरेआड करून चालणार नाहीं. शब्दभेदानें अगर पर्यायानें हाच सिद्धांत इतर हिंदु समाजशास्त्रज्ञांनीं सांगितला आहे. मनु म्हणतो: " वैशेष्यात्प्रकृतिश्रेष्ठयात् नियमस्य च धारणात् । संस्कारस्य विशेषाच्च वर्णानां ब्राह्मणः प्रभुः ॥" १०।३. सर्व समाजाचा, सर्व वर्णांचा ब्राह्मण हा गुरु आहे, प्रभु आहे, नेता आहे. येथें निसर्ग गुण संस्कार या दोहोंचीही महती सांगितली आहे. अशाच तऱ्हेची समाजरचना युरोपमध्यें सुप्रजाजननशास्त्राची प्रणाली प्रथमच सांगणारा जर्मन तत्त्ववेत्ता फ्रेडरिक[१] नित्शे यानेंही सांगितली आहे, नित्शे म्हणतो: 'मनुच्या धर्मग्रंथासारखा ग्रंथ सांगणें म्हणजे भावी काळांत मानवाला पुढारी पुरविणें, मानवाला पूर्णत्वाचा मार्ग दाखविणें अगर मानवाला जीविताच्या श्रेष्ठत्वाची कला शिकविणें यासारखेंच आहे. हा हेतु सिद्ध करण्याकरितां तीं तत्त्वें प्रत्येक व्यक्तीच्या हाडींमासीं खिळून गेलीं पाहिजेत. निसर्गयुक्त समाजरचना ही फक्त जातिसंस्थेंतच सिद्ध होते. हाच जगांतील सर्वश्रेष्ठ आणि पहिल्या प्रतीचा कायदा होय. सर्वांत श्रेष्ठ जी जाति तिलाच सर्व हक्क असावयाचे, तिलाच सर्व सवलती असावयाच्या. तशा बुद्धिप्रधान जातीलाच सर्व सुखें आणि सर्व सौंदर्य यांवर हक्क आहे.' अशा तऱ्हेनें आपल्या ओजस्वी वाणीनें समाजरचना सांगून तो शेवटीं म्हणतो: 'श्रेष्ठाचा मत्सर करणें हा चांडाळांचा जन्मसिद्ध हक्कच आहे.' समाजरचना जातिप्रधान म्हणजे आहारविहारांनीं, संस्कारांनीं आणि जन्मानेंच विभक्त केलेल्या व्यक्तींच्या गटाच्या अगर संघाच्या स्वरूपाची असणेंच जास्त हितकारक आहे, या गोष्टीचेंच फक्त येथें दिग्दर्शन करावयाचें आहे. त्या सिद्धांताची सांगोपांग चर्चा पुढें येईलच.

---

१ Anti-christ by Fredrick Nietzsche.

उलटपक्षीं, यच्चयावत् मनुष्यप्राण्याच्या नैसर्गिक शक्ति सारख्याच होत्या अगर आहेत आणि मनुष्यामनुष्यांमध्यें जो कांहीं फरक प्रतीत होतो तो

**३३ आजची रचनापद्धति**

फरक बाह्य परिस्थिति भिन्न असल्या कारणानें उत्पन्न झाला आणि सर्व मनुष्यप्राण्यांची परिस्थिति सर्व ठिकाणीं सारखीच केल्यास, मनुष्यामनुष्यांतील भेद लवकरच नष्ट होतील असें कोणी म्हणतात. कोणी या भेदानें कारण आर्थिक परिस्थिति हें सांगतील, दुसरे कोणी कामाच्या वेगवेगळ्या तऱ्हेनें उत्पन्न होणारे वेगवेगळे मनोगंड (complexes) सांगतील, कोणी कांहीं सांगतील. परंतु कुळ सिद्धांतानें फरक असूं शकेल, ही गोष्ट कोणीही कबूल करणार नाहीं. मोठ्या मनुष्याच्या मोठेपणाची चर्चा करितांना तो मोठेपणा त्याला परिस्थितिभेदामुळेंच प्राप्त झाला असें सिद्ध करण्याकरितां जी ओढाताण शास्त्रज्ञांकडून केली जाते, ती पाहून मानवी बुद्धीच्या विकृतत्वाबद्दल एक तऱ्हेचें कौतुक वाटूं लागतें ! डार्विन मोठा कां झाला ? तर त्याच्या आईला निसर्गाचे शोध करण्याची फार आवड होती आणि ती लहान बाल्यपणींच तिनें आपल्या मुलाच्या मनावर बिंबविली. परंतु त्याच्या आईला नवीं निसर्गाची आवड कां लागली याला उत्तर देण्याचा अर्थातच प्रयत्न करण्याचें कारण नाहीं. जिज्ञासू वाचकांनीं, आनुवंशाचे गुण कबूल करणें टाळण्याकरितां विद्वानांकडून कशा भानगडी गेल्या जातात हें पहावयाचें असल्यास, केम्फ.चा[1] मनोविकारशास्त्रावरील ग्रंथ जरूर वाचून पहावा. ही पद्धति मानणारा वर्गच आज जगांतील समाजामध्यें फार वाढला आहे. आज समाजामध्यें जे कांहीं कायदेकानू, ज्या कांहीं चालीरीति, जी कांहीं नैतिक मूल्यें दिसून येत असतील, त्या सर्वांचा पाया याच कल्पनेमध्यें असलेला दिसून येईल. सर्व संस्कार परिस्थितीवर करा, सर्व संकेत बदला म्हणजे समाज सुधारतील हाच घोष चहूंकडे ऐकूं येतो.

रोगानें मनुष्यक्षय होतो ना ? ठीक, मग रोग कशानें होतात ? तर वातावरणामध्यें जे रोगजंतु पसरलेले असतात त्यांनीं जर शरीरावर हल्ला केला तरच रोग होतात. मग सर्वच रोगजंतूंचा नाश केला म्हणजे आपो-

१ Psychopathology by Kempf.

आपच मानवी जीवाची हानि थांबेल. परंतु असें जर कोणी विचारील कीं, एकाच परिस्थितींत राहणाऱ्या दोन व्यक्तींवर तुमच्या या रोगजंतूंचा सारखाच परिणाम कां होत नाहीं? रोगजंतू जर तेच आणि परिस्थिति सारखीच तर परिणामही सारखाच व्हावयास पाहिजे. एकाच खोलींत आणि बिछान्यांत शयन करणाऱ्या पतिपत्नींपैकीं एका व्यक्तीला क्षयासारखा रोग होतो आणि दुसऱ्या व्यक्तीला होत नाहीं, ही गोष्ट आपण प्रत्यक्षच पहातों. त्याप्रमाणेंच एकाच परिस्थितींत असलेल्या अमेरिकन सैनिकांपैकीं निग्रो सैनिकांना क्षय आणि न्यूमोनिया श्वेतवर्णीय सैनिकांपेक्षां जास्त प्रमाणांत कां होतो आणि उलट श्वेतवर्णीयांना नीग्रोपेक्षां त्वक्‌रोग, देवी, इन्फ्लुएन्झा वगैरे रोग जास्त प्रमाणांत कां होतात, याचाहि खुलासा झाला पाहिजे. असेच इतर अनंत फरक अभ्यासूंनीं दाखविलेले आहेत. परंतु हे सर्वच फरक परिस्थितीभेदानें उत्पन्न होतात असें सांगण्याचा कित्येकांकडून प्रयत्न केला जातो. बाह्य परिस्थितीनें रोगांची वाढ होते असें प्रतिपादन करणारांनीं पुढील गोष्टीचाही खुलासा करावयास पाहिजे. '[१]पूर्वीं अंधत्व हा दोष गलिच्छ रहाणीनें उत्पन्न होतो असें म्हणत परंतु आतां असें दिसून आलें आहे कीं, ज्या प्रांतांमध्यें शिक्षण आणि स्वच्छता यांची वाढ झालेली आहे त्याच प्रांतांत हा विकार झपाट्यानें वाढत चालला आहे.' असो. विषय फार मोठा आहे. असा सिद्धांत सहज प्रस्थापित करणें शक्य आहे कीं, रोगावर भर देऊन आणि रोग्याच्या अंतर्गत शक्तींचा विचार न करितां, ज्या वैद्यकीय शास्त्रांत अभ्यास केला जातो, तें आरोग्यशास्त्र मानववंशाची अधोगति फार झपाट्यानें घडवून[२] आणीत आहे !

येथें एवढेंच निदर्शनास आणावयाचें कीं, सर्वथा परिस्थितीवर संस्कार करणारें कोणतेंही समाजशास्त्र मानववंशाची सुधारणा करण्याला सर्वथा

१ Census Report for India 1931.

२ Darwinism, Medical progress and Eugenics by Pearson; Tuberculosis, Heredity and environment by Pearson; Darwinism and Race-progress by Haycraft; mending of mankind by Whitehead; Heredity and selection in Sociology by Chatterton Hill.

असमर्थ आहे. प्रथमतः रोगजंतूंचा नाश करण्याकरितां सुरू झालेली चळ-कळच अशास्त्रीय आणि पोरकट अशा कल्पनांवर उभारलेली आहे. कारण त्यांच्या नाशाकरितां आपण जी परिस्थिति उत्पन्न करणार ती सर्वच जंतूंचा नाश करील. परंतु सर्वच जंतु कांहीं हानिकारक नाहींत. जंतूंचे[१] तीन प्रकार असतात. कांहीं प्राणघातक असतात, कांहींचा परिणाम मुळींच होत नाहीं आणि कांहीं प्रत्यक्ष मनुष्यप्राण्याला उपकारक असतात. जे उपकारक असतात ते मनुष्यानें खाल्लेल्या अपचनीय अन्नाचा परिपाक होण्याला मदत करतात. आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, अलीकडील आरोग्यशास्त्र जी जंतु-नाशक परिस्थिति उत्पन्न करते त्यामध्यें हितकारक जंतूंचाही नाश होत असला पाहिजे. खरोखर पहातां हानिकारक जंतूंचा नाश आणि हितकारक जंतूंची वाढ या दोनही क्रिया शास्त्रानें एकसमयावच्छेदेंकरून घडवून आणावयास पाहिजेत.

पुन्हां हीही गोष्ट सिद्ध व्हावयास पाहिजे कीं, रोगजंतु खरोखर नैसर्गिक निवडीच्या तत्त्वाला पोषक नाहींत. हेक्रॅफ्ट म्हणतो; 'क्षयरोगाचे जंतु सुदृढ स्त्रीपुरुषांवर कांहीं परिणाम करूं शकत नाहींत, परंतु दुर्बलांचाच तेवढा नाश करतात ही गोष्ट डोळ्यासमोर ठेविली म्हणजे ते जंतू मानववंशाला हितकारक आहेत हें कठोर सत्य सांगण्याशिवाय गत्यंतर रहात नाहीं.' न्याचशा इतरही रोगांचा विचार करून तोच ग्रंथकार म्हणतोः 'आपण आतां या नैसर्गिक निवडीला मदत करणाऱ्या शक्ति कमी कमी करीत आहोंत. परंतु याच शक्तींनीं पूर्वी वंशामध्यें सुदृढता राखिली होती. सुधारलेल्या आरोग्यपद्धतीचा उपयोग करून रोगग्रस्तच फक्त आपली प्रजा वाढवूं शकतात. आणि त्यामुळें संबंध वंशाचे वंशच अधोगतीला लागले आहेत. अशीं व अशाच तऱ्हेचीं मतें जवळ जवळ सर्व शास्त्रज्ञांनीं[२] दिलीं आहेत. असें असून देखील परिस्थितीवर संस्कार करण्याचे प्रयोग मोठ्या प्रमाणावर चालूंच आहेत !

दुसरे उठून सांगतात कीं, सार्वत्रिक शिक्षण हेंच राष्ट्राला उपकारक

१ The animal world by F. W. Gamble.

२ Refer authorities on the last page.

आहे. सार्वत्रिक शिक्षण फुकट ठेवून देखील एकूणएक विद्यार्थी विश्वविद्यालयाच्या सर्वांत श्रेष्ठ परीक्षेंत पहिल्या वर्गांत येऊन सारखेच गुण मिळवितील, किंवा एकाच धंद्यात काम करणाऱ्या सर्वांना सारखाच फायदा करून घेतां येईल, असें त्यांचेही म्हणणें असेल असें आम्हांला वाटत नाहीं. तसें त्यांचें म्हणणें असेल तर तें साफ खोटें असें उत्तर देण्यांत भीति बाळगण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण तेथेंही ते परिस्थितीचें घोडें दामटणारच. परिस्थिति सर्वथा एकरूप होणें या जगांत शक्य नसल्याकारणानें त्यांचा हा सिद्धांत कधींच खरा किंवा खोटा ठरणें शक्यच नाहीं. अशाच तऱ्हेच्या पोरकट गृहीतकृत्यांच्या पायावर ही परिस्थिति-संस्काराची प्रणाली उभारलेली आहे.

आणखी एक उठतात आणि सांगतात कीं, शाळेंत जाणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला अर्धा शेर तरी दूध मिळावयास पाहिजे तर पुढची पिढी सुधारेल. दूध हें पोषक अन्न असेल. परंतु त्यामुळें मूळ पिंडांत नसलेली जीवनशक्ति अगर साधी शक्ति तरी उत्पन्न होईल, ही गोष्ट कोणीही सिद्ध करावी असें आमचें या पक्षाला जाहीर आव्हान आहे.

बाह्य परिस्थितीवर संस्कार केल्यानें असलेल्या गुणांची जोपासना आणि वाढ होईल. परंतु नसलेले गुण त्यामुळें कसे उत्पन्न होतील हें कोडें सोडविणें बरेंच कठीण आहे. परंतु मुळांतच त्यांचें म्हणणें असें आहे कीं, सर्व गुण सर्वच ठिकाणीं असतात आणि सर्व भिन्नता ही परिस्थितीच्या भिन्नतेचा परिणाम आहे. ही गोष्ट सिद्ध करण्याकरितां ज्या अनंत हेत्वाभासांचा आश्रय केला जातो, ते हेत्वाभास पाहून हसूं आल्याशिवाय रहाणार नाहीं. नैसर्गिक निवडीच्या तत्त्वानें असलेल्यांची निवड होऊन निरुपयोगी पदार्थ नष्ट कसे होतील तें सांगतां येतें. परंतु नसलेले गुण कसे उत्पन्न होतात तें सांगण्याचें त्या तत्त्वाचें कार्य नव्हे. हे गुण मुळ कसे उत्पन्न झाले तें सांगणें म्हणजे रसायनशास्त्रांतील मूलद्रव्यें कशीं उत्पन्न झालीं हें सांगण्याइतकेंच सोपें आहे! परंतु नैसर्गिक निवडीचें तत्त्व कशाशीं खातात याची असल्या लेखकांना कल्पनाच नसते. समजा, आज कोणताही श्रेष्ठ वर्ग घेतला कीं ज्या वर्गामध्यें 'सत्यं दया धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता' वगैरे श्रेष्ठ गुण निसर्गतः असल्याचें आढळून आलें. परंतु त्या वर्गाच्या भोंवतालीं

जीवनप्रणाली अशीच निर्माण केली कीं, तीमध्यें जीवनार्थ कलहांत हळूहळू ज्यांच्यामध्यें असत्याकडे जास्त प्रवृत्ति असेल अशाच व्यक्ती जास्त प्रमाणांत शिल्लक रहात जातील व शेवटीं असत्यप्रधान व्यक्ती प्रचुर होतील. उलट, निसर्गतः असत्यवादी व्यक्तींच्याभोंवतीं असलेली प्रणाली जर सत्यवचनाला पोषक असेल, तर हळूहळू त्या समाजांतून असत्याची हकालपट्टी होईल. परंतु या दोनही ठिकाणीं परिस्थितीनें असत्यवादी व्यक्तीला सत्यवादी अगर सत्यवादी व्यक्तीला असत्यवादी बनविलें असें नव्हे तर त्या त्या व्यक्तींचा नाशच करून टाकला. अशा तऱ्हेनें बाह्य परिस्थितीनें साधर्म्य आणलेला समाज हा समान व्यक्तीयुक्त नव्हे. गणिताच्या भाषेंत सांगावयाचें तर ऋणाकडून शून्याकडे जाणाऱ्या आणि धनाकडून शून्याकडे जाणाऱ्या संख्यांना कोणीही सारख्या म्हणत नाहींत. जिवावर प्रसंग आला म्हणून असत्य बोलणारी व्यक्ति आणि सहज जातां जातां थापा देणारी व्यक्ति या केव्हांही सारख्या नव्हत. सत्य हें स्वतःसिद्ध ध्येय नसून दुसऱ्या कांहीं तरी ध्येयाचें साधन असल्याकारणानें समाजांतील एकूण एक व्यक्ती केव्हां ना केव्हां तरी ( कांहीं नेहमींच आणि कांहीं एकादे वेळीं ) खोटें बोलतातच, अशी गोष्ट सिद्ध झाल्यानें सर्व व्यक्ती सारख्याच आहेत असें अनुमान निष्पन्न होऊं शकत नाहीं. अशा तऱ्हेनें आनुवंश कशाशीं खातात, ते गुण कोणते आहेत, त्यांची पद्धति काय आहे, ती मोजण्यालायक आहे किंवा अमोज आहे ही गोष्ट निश्चित केल्याशिवाय कांहीं काल्पनिक गुण-दोषांचें कमीअधिक प्रमाणांत साधर्म्य दाखवून मनुष्यप्राण्याची समानता सिद्ध करण्याचा प्रयत्न हास्यास्पद आहे, असें आम्हांला तरी वाटतें. तसा प्रयत्न ज्यांच्याकडून केला जातो ते कवि, नाटककार, कादंबरीकार, इतिहासलेखक, नीतिशास्त्रप्रवर्तक वगैरे सर्व लोक, फारच लवकर लोकमान्य होतात ही गोष्ट नैसर्गिकच आहे. परंतु अशा तऱ्हेनें वाङ्मयादि गौण वस्तूंना प्राधान्य येऊं लागलें म्हणजे मूलतः नैसर्गिक गुण कोणते, जोपासना कशाची करावयाची याचा बोध न होऊन नैसर्गिक निवडीच्याच तत्त्वांवर त्या गुणांची हळूहळू अधोगति होवूं लागते. त्याचप्रमाणें समजा, एक [illegible] वर्ग घेतला आणि त्या वर्गाची जीवनव्यवस्था कांहीं बौद्धिक गुणांवर अवलंबून आहे अशा स्वरूपाची ठेविली तर त्या वर्गांतील बुद्धिमान लोकच तेवढे

नैसर्गिक निवडीच्या रेट्यांत शिल्लक रहातील. परंतु त्या कामाला लायक अशी बुद्धि जर त्या वर्गांत मुळींच नसेल, तर तो वर्ग सृष्टीच्या रेट्यांत समूळच नष्ट होऊन जाईल. अशा तऱ्हेनें विचार करूं लागले तर, ज्याप्रमाणें व्यक्ती-व्यक्तींमध्यें कर्तृत्वाचे बाबतींत फरक असतात, त्याप्रमाणेंच जाति-जातींमध्यें आणि संघासंघांमध्येंही कर्तृत्वाचे बाबतींत फरक असतात. म्हणून त्या सर्वांची जीवनप्रणाली एकच ठेवणें अगर सर्वांना सर्वच धंदे मोकळे ठेवणें इष्टही नाहीं आणि कोठल्याही समाजांत सर्व व्यक्तींना सर्व धंदे मोकळें नसतातही. यामुळें जातींची अगर संघांची लायकी ठरवून त्यांचे धंदे निश्चित करावे लागतात. तसें न झाल्यास वरिष्ठ वर्गाचें कांहीं नुकसान नाहीं, नुकसान होतें तें नालायक वर्गाचेंच होतें. यामुळें कोठल्याही समाजांत– आजच्या रशियांतील समाजासकट– एकावर एक असे थर पडूं लागतात आणि प्रत्येक थराची लायकी त्या थरांत प्राचुर्यानें व्यक्ती ज्या गुणानें युक्त असतील, त्या गुणाचे बाबतींत निश्चित ठरते. जो गुण ज्या जातींत प्राधान्यानें असेल, तोच धंदा त्या जातीनें करावा ही गोष्ट निसर्ग-प्राप्त आहे. नित्शे[१] म्हणतो, ‘मनु नव्हे तर सृष्टीच मानवीप्राण्यांमध्यें जातिभेद उत्पन्न करते.’

एकच एक अगर कांहीं व्यक्ती खालच्या थरांतून वरच्या थरांत गेल्यास त्या प्रक्रियेचे एकंदर समाजावर– अगर आजचा लाडका शब्द वापरणें झाल्यास सबंध राष्ट्रावर- काय परिणाम होतील याचें दिग्दर्शन आम्हीं पूर्वी केलेंच आहे. रसायनशास्त्रामध्यें ज्याप्रमाणें वेगवेगळ्या धातूंचें वेगवेगळें विशिष्ट-गुरुत्व असतें, त्याप्रमाणें समाजामध्यें पडणाऱ्या थरांतील व्यक्तींचें असें कांहीं वेगवेगळ्या थराला धरून विशिष्टगुरुत्व असतें. आणि आपल्या विशिष्टगुरुत्वाला पोषक अशाच सामाजिक स्थितींत त्या त्या व्यक्ती जीवंत राहूं[२] शकतात. कोणत्याही तऱ्हेनें विचार करून पहातां, बाह्य परिस्थितीवर संस्कार करून अगर बाह्य परिस्थिति कमी कठोर करून असलेले गुण नष्ट अगर नियमित करतां येतील. परंतु नसलेले गुण केव्हांही उत्पन्न होणार नाहींत ही गोष्ट निश्चित आहे. म्हणून ज्यांच्या मनांतून आपल्या संस्कृतीला स्थैर्य

१ Anti-christ by Nietzsche.
२ Task of social hygiene by Havelock Ellis.

आल पाहिजे अशी इच्छा असेल, त्यांनीं नुसत्या बाह्य परिस्थितींत फरक केल्यानें स्थिर संस्कृति उत्पन्न होईल, अशी कल्पना देखील करतां कामा नये. आजकाल चाललेल्या सर्व सुधारणा अगर कुधारणा पाहिल्या, तर परिस्थितींत सुधारणा केल्यास वंशांतही सुधारणा होईल ही गोष्ट गृहीत धरूनच केलेल्या दिसतात ! परंतु ती गोष्टच तर अजून सिद्ध व्हावयाची आहे. सृष्टीकडेच पाहिलें तर खरी स्थिति अशी दिसते कीं, परिस्थिति सुधारणें हें कारण नसून कार्य आहे. म्हणजे वंश सुधारले तर परिस्थिति सुधारते. परहितनिरत (समाजासंबंधीं कल्पना मुळींच न समजावून घेणारे) आणि परिस्थितीच्या सुधारणेनें वंश सुधारतील अशी कल्पना करणारे भावनाप्रधान समाजसुधारक ज्या कल्पना आणि जीं मतें पुढें मांडतात त्यांनीं सर्वसाधारण मनुष्याच्या अंतःकरणांतील सर्व भावना उचंबळून येतात यांत शंका नाहीं; परंतु त्यांनीं मूळांत गृहीत धरलेला सिद्धांत अजून सिद्ध व्हावयाचा आहे. आमचें स्वतःचें मत असें आहे कीं, कारल्याच्या वेलाला साखरेचें आळें घातलें तरीही कारल्याला गोडपणा येणार नाहीं. निर्विष आणि सविष अशा दोनही तऱ्हेच्या सर्पांना नुसत्या दुधावर जरी अगदीं बाळपणापासून वाढविलें, तरी निर्विष सर्पांच्या शरीरामध्यें विष उत्पन्न होणार नाहीं अगर सविष सर्पांचें विष कमीही होणार नाहीं. हा प्रयोग आमच्या इकडील समाजसुधारकांनीं करून पहाण्यासारखा आहे म्हणून तो करून पहावा अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे. आज निर्विष असलेल्या सर्पांच्या जाती पूर्वी नागादि जातींपेक्षां श्रेष्ठ कशा होत्या ही गोष्ट त्यांना कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे बिशप काल्डवेलच्या द्राविडी भाषांच्या व्याकरणाच्या मदतीनें सहज सिद्ध करून दाखवितील. शारीरिक आणि मानसिक अधोगति कशाला म्हणावें, ती स्थिति कशी मोजावी, ती कशानें उत्पन्न होत असते आणि काय केल्यानें नष्ट होईल या सर्व गोष्टींचा अभ्यास केल्याशिवाय, शारीरिक आणि मानसिक अधोगतीचे प्रश्न कायद्यांचें पोंचट टेकू देऊन सुटणार नाहींत. अर्थात् काल्डवेलचें व्याकरण असल्या बाबतींत निरुपयोगी आहे. शारीरिक आणि मानसिकदृष्ट्या (आज येऊन उद्यां जाणाऱ्या राजकीय दृष्टीनें नव्हे) समाज उत्कृष्ट स्थितींत राखण्याचा हमखास असा एकच मार्ग आहे. तो

म्हणजे समाजामध्यें जे श्रेष्ठ घटक असतील त्यांची संतती प्रत्येक पिढीला जास्त रहात जाईल आणि जे हलके असतील त्यांची संतती कमी होत जाईल अशा तऱ्हेची सामाजिक व्यवस्था ठेवणें. दुसरा कांहींही मार्ग सृष्टींत सांपडत नाहीं. हलक्या समाजांतून श्रेष्ठ पुरुष निर्माण होतात, हा भ्रम अगर ही हल्लीं पसरविण्यांत आलेली दंतकथा आंकड्यांमध्यें मांडल्याबरोबर लुप्त होते. 'श्रेष्ठ तऱ्हेचीं दांपत्यें सर्वसाधारण दांपत्यांच्या पोटीं जे थोर पुरुष निपजूं शकतील त्याच्या दसपटीपेक्षां जास्त श्रेष्ठ पुरुष निर्माण करतात. परंतु अशीं दांपत्यें एकंदर समाजांत शेंकडा ½ या प्रमाणांत असल्याकारणानें सर्वसाधारण आईबापांच्या पोटीं उत्पन्न झालेले थोर पुरुष त्यांच्या पोटीं उत्पन्न झालेल्या थोर पुरुषांच्या सतरापट असावयास पाहिजेत[२].' याचा अर्थ असा होतो कीं, एका कर्तृत्ववान दांपत्याला एक पुत्र श्रेष्ठ प्रतीचा झाल्यास, उरलेल्या एकशेंनव्याणव कुटुंबांत तशा तऱ्हेचे सतरा पुत्र होण्याचा संभव आहे. ही स्थिति जेथें धंदा आणि जाती यांचा समन्वय नाहीं अशा ठिकाणीं दिसून येते. मग जेथें तसा समन्वय आहे, तेथें काय स्थिति होईल याचा विचार करून पहावा. एका कुटुंबाची काळजी घेणें बरें किंवा एकशेंनव्याणव कुटुंबांची व्यवस्था पहाणें सोपें, याचा ज्याचा त्यानें मनाशींच विचार करावा. युरोपमध्यें देखील वंश आणि कर्तृत्व यांच्यामध्यें समन्वय आहे ही गोष्ट आम्ही पुढें दाखविणार आहों.

### ३४ आनुवंश मुळींच नाहीं काय ?

यावर कांहीं लोक अशी शंका काढतात कीं, आपण ज्याला आनुवंशिक गुण म्हणून म्हणतों ते नाहींतच ! आनुवंश म्हणून कांहीं नाहींच असें म्हणणारे जे कोणी असतील त्यांच्यापुढें आम्ही पुढील कल्पना विचाराकरितां मांडतों. समजा असें दिसून आलें कीं, गाईबैलांच्या कळपामध्यें प्रत्येक दहापैकीं सरासरी दोन बांडीं, तीन तांबडीं, चार काळीं आणि एक पांढरें अशीं जनावरें आहेत. जर आनुवंशिक प्रक्रिया म्हणून कांहीं नसेल तर पुढील पिढींत

---

१ अस्पृष्टांचा प्रश्न– श्री. म. माटे; धर्मशास्त्रमंथन– महादेवशास्त्री दिवेकर.

२ Phil-Trans. Vol. CXCV p. 47, 1900; Hereditary genius by Sir Francis Galton ; Eugenics by Dean Inge.

उत्पन्न होणाऱ्या जनावरांमध्यें, कोणत्याही तऱ्हेच्या म्हणजे रंगाच्या आई-बापांची संतती असली तरी, रंगदृष्ट्या तेंच म्हणजे वर सांगितलेलेंच प्रमाण पडावयास पाहिजे. म्हणजे त्यांचा रंगदृष्ट्या सारखेपणा कोणत्या विवक्षित आईबापांशीं नसून सर्वसाधारण गटांशीं असावयास पाहिजे. परंतु प्रत्यक्ष प्रयोग करून पाहिल्यास तसें प्रमाण पडल्याचें कांहीं दिसून येत नाहीं. बांड्या बैलापासून कोणत्याही तऱ्हेच्या म्हणजे रंगाच्या गाईस संतती झाल्यास त्या संततीमध्यें बांड्या संततीचेंच प्रमाण जास्त राहील. मनुष्यप्राण्याकडे येऊन उंची या गुणाचा अभ्यास करून पहातां तसेंच प्रमाण पडत असल्याचें दिसून येतें; इतकेंच नव्हे तर आईबापांची उंची माहिती असल्यास मुलाची आणि मुलीची उंची सर्वसाधारणतः किती असेल, हें दर्शविणारें कोष्टक देखील डॉ० पियरसन[१] यानें दिलें आहे. अशा तऱ्हेनें मातापित्यांची निवड करून तशीच निवड पिढ्यानुपिढ्या करीत गेल्यास, त्या संततीमध्यें निवडलेलाच गुण स्थिर होत जातो. ती सर्व प्रजा त्या गुणाचे बाबतींत प्राधान्यानें चमकूं शकते. म्हणजे ती संतती त्या गुणाचे बाबतींत शुद्ध होते. इतर गुणांचे बाबतींत ती संतती अस्थिर ( heterozygous ) असूं शकेल. म्हणून कोणत्याही एका गुणाचे बाबतींत शुद्ध करीत गेलेल्या संततीमध्यें इतर कांहीं दुसऱ्या प्रजेमध्यें असणारे गुण कमीअधिक प्रमाणांत सांपडतात, असें दाखवून त्या दोनही प्रजांना समान मानणें ही चूक आहे. या दृष्टीनें कोणत्या एखाद्या बाबतींत घराण्याचा अभिमान असणें ही गोष्ट अत्यंत इष्ट आहे. अशाच तऱ्हेनें वेगवेगळ्या गुणांची निवड करीत जाणें हें हितकारक आहे.

हेच नियम मानसिक गुणांचे बाबतींत देखील खरे आहेत. जे या बाबतींत शंका घेतात, त्यांच्या आनुवंशिक शास्त्राच्या अज्ञानाची कींव करावयास पाहिजे असें डॉ० गेटस[२] म्हणतो. जर एखादा हुषार विद्यार्थी घेऊन त्याच्या रक्तानें जवळच्या नातलगांची अगर भावंडांची चौकशी केली तर असें दिसून येतें कीं, ते नातलग आणि तीं भावंडें साधारणतः हुषार या वर्गातच मोडतील. फारसा फरक असलेला दिसून येणार नाहीं. हेच नियम

१ Recent work on heredity by Pearson.

२ Heredity and Eugenics by Gates.

उत्साह, प्रभुत्व, मनाची विचारप्रधान प्रवृत्ति, लोकमान्यता, नेकजातपणा, बुद्धि, हस्ताक्षर वगैरे मानसिक गुणांच्या बाबतींत देखील खरे ठरतात असें दिसून येतें. म्हणजे आनुवंशाचें स्वरूप आणि प्रक्रिया कोणतीही असली, तरी निव्वळ गणितागत पद्धतीनें एखाद्या जोडप्याची संतती काय स्वरूपाची होईल तें सांगणें शक्य आहे. हीच गोष्ट ज्यांचा लोकसमूहांशीं नेहमीं संबंध येतो, ज्यांना शास्त्रीय पद्धति समाजांत सर्वमान्य करणें शक्य आहे, ज्यांचें भाषण समाज आप्तवाक्य मानावयास तयार असतो, अशा भिषक्, समाजसुधारक, राजकारणी, मुत्सद्दी वगैरे पुरुषांना मुळींच समजत नाहीं. म्हणून आम्ही पुन्हां बजावतों कीं, आनुवंशाचा विचार करून समाजरचना केल्याशिवाय, जे रोज भराभर कायदे करण्याच्या टांकसाळींतून आज बाहेर पडत आहेत, त्या कायद्यांनीं सामाजिक प्रगति कालांतरींही होणें शक्य नाहीं !

अशी स्थिति असल्याकारणानें समाजरचना करतांना काय मुद्द्यांचा विचार केला पाहिजे तें पाहूं.

(१) समाजांतर्गत व्यक्तींची लायकी, साधर्म्य, वैधर्म्य वगैरे तत्त्वांना धरून विभागणी करावयास पाहिजे किंवा तशा तऱ्हेची कांहीं तरी विभागणी पूर्वींच झाली असल्यास ती रक्षण करावयास पाहिजे.

३५ समाजरचनेंत लागू मुद्दे

झालेली विभागणी अशीच कां झाली अशा तऱ्हेचे प्रश्न सर्वसाधारण व्यक्तींनी विचारतां येऊं नयेत.

( २ ) गट निर्माण झाल्यानंतर त्या गटांमध्यें वर्णनाशक आणि वंशदूषक असे वर्णव्यभिचार, अवेद्यावेदन, कर्मत्याग, उपदंश वगैरे दोषांचा फैलाव होणार नाहीं अशी व्यवस्था करावयास पाहिजे. हिंदुसमाजाच्या आजच्या ज्या चालीरीतींवर हल्ले होत आहेत त्यांचें पद्धतशीर पृथक्करण केल्यास त्या चालीरीतींचें बीज या व्यवस्थेंत असल्याचें दिसून येईल.

---

१ Future of life by C. C. Hurst.

२ Genetics by Babcock and Clansen; Scientific outlook by Bertrand Russel.

( ३ ) प्राणिशास्त्रदृष्ट्या वरीलप्रमाणें व्यवस्था लावल्यानंतर अर्थशास्त्रदृष्ट्या अन्नाची आणि धंद्यांची विभागणी अशीच व्हावयास पाहिजे कीं, त्या व्यवस्थेमध्यें श्रेष्ठ प्रजेची उत्पादनशक्ति श्रेष्ठच राहील आणि कनिष्ठ प्रजेची उत्पादनशक्ति कमी होत जाईल. येथें दानपद्धतिदेखील श्रेष्ठवर्गाला दान देण्याचे धोरणावर आखावयास पाहिजे. अपात्रीं दान हें त्याज्य होय. निव्वळ हीनता ही दानाला पात्रता मानली जाणार नाहीं.

( ४ ) श्रेष्ठ प्रजेला आचारविचारांचे अत्यंत कडक नियम आणि संस्कार लावून देऊन ते त्या प्रजेकडून पाळून घेतले पाहिजेत.

( ५ ) आनुवंशाचे आणि समाजशास्त्राचे नियम प्रत्येक व्यक्तीला सहसा कळणें शक्य नसल्याकारणानें ते नियम चालीरीतींमध्येंच रूढ करून ठेवावयास पाहिजेत.

( ६ ) वंशनाशक विषांचा (racial poisons) फैलाव श्रेष्ठ प्रजेमध्यें होऊं देतां कामा नये.

( ७ ) विवाहसंबंध स्थिर आणि शुद्ध राखणें. येथें प्राणिशास्त्र, अर्थशास्त्र, कामशास्त्र, मानसशास्त्र, थोडक्यांत सांगावयाचें तर जवळजवळ सर्व शास्त्रांचा विचार करून नियम ठरवावे लागतील. ते नियम ठरविल्यानंतर कोणत्याही वैयक्तिक हेतूकरितां ते मोडतां येणार नाहींत. विवाहसंबंध स्थिर झाले म्हणजे ते शुद्ध आपोआपच होतील.

( ८ ) विवाहद्वारांच वंशाचें श्रेष्ठत्व उत्पन्न होणें इष्ट असल्याकारणानें, घराण्यांचे इतिहास आणि घराण्यांच्या गुणदोषांची जंत्री ठेवणें इष्ट आहे. घराण्यांचे इतिहास आणि वंशावळी एका ठिकाणीं पहाण्याची सोप्यांत सोपी युक्ती जी क्षेत्रोपाध्यायांच्या वह्यांमध्यें असलेल्या वंशावळ्या त्या आमच्याकडील सुधारलेल्या पंडितांकडून आज त्याज्य मानल्या जात आहेत. तसें न केल्यास जातींचा बरोबर इतिहास सांपडेल आणि मग भरमसाट थापा मारतां येणार नाहींत. आमच्या इतिहाससंशोधकांपैकीं कोणालाही ह्या वंशावळ्या पहाण्याची जरूरच भासत नाहीं !

( ९ ) जीं समाजव्यवस्थेला मारक अगर त्या व्यवस्थेमध्यें अंतराय उत्पन्न करणारीं कारणें असतील त्यांचे अत्यंत कडक रीतीनें नियंत्रण करा-

वयास पाहिजे. हें काम कांहीं कारणानें राजसत्तेकडून होत नसल्यास लोकमतानें, जातिपंचायतीनें, ग्रामपंचायतीनें अगर इतर कोणत्या तरी संस्थेनें करावयास पाहिजे.

प्रथम सामाजिक विभागणीचा प्रश्न येतो. प्रथमतः ही गोष्ट लक्षांत येईल कीं, पृथ्वीवरील एकूणएक समाजांमध्यें कोणत्याना कोणत्या तरी तत्त्वांवर सामाजिक विभागणी झालेलीच असते.

**३६ सामाजिक विभागणी** समाजामध्यें एकावर एक असे थर पडत जाणें हा नैसर्गिक नियमच दिसतो. या थरांमधील विवाह हे देखील कांहीं तत्त्वांवर नियंत्रित झालेलेच असतात. परंतु शास्त्रीय तत्त्वावर विभागणी करावयाची तर अनेक गोष्टींचा विचार करावा लागेल.

पहिली गोष्ट म्हणजे एखादा विद्यमान समाज मूलतःच एकवंशीय नसेल. उदाहरणार्थ, आजचा अमेरिकन समाज नीग्रो, नार्डिक, मेडिटरेनियन, अल्पाईन वगैरे अनंत वंशांच्या एकीकरणानें उत्पन्न झालेला आहे. त्याप्रमाणेंच आजचा हिंदुस्थानांतील समाज ( आम्ही धर्माच्या दृष्टीनें चर्चा पुढें करणार आहों.) अनेक वंशांच्या एकीकरणानें तयार झालेला दिसतो.एका तऱ्हेनें दिलेली[१] विभागणी मान्य केल्यास हिंदुस्थानांतील समाजांमध्यें द्रवीड, आर्य, तुर्कोइराणी, सिथिओद्रवीड, हिंदुस्थानी, मॉंगोल आणि मॉंगोलद्रवीड असे अनंत विभाग सांपडतात. ही विभागणी फारशी शास्त्रीय नसल्यामुळें आम्हांस मान्य नाहीं. याहून बरीच चांगली शास्त्रीय विभागणी सन १९३१ च्या सेन्सस् रिपोर्टामध्यें दिलेली सांपडेल. सांगण्याचा अर्थ इतकाच कीं, एकाच समाजांत जर अनेक वंश समुच्चित झाले असतील, तर तशी विभागणी प्रथम करावयास पाहिजे.

पुढें एका वंशाच्या अंतर्गत अनेक उपवंश, उपजाति वगैरे असतील ते बरोबर समजून घ्यावयास पाहिजेत. नंतर व्यक्तींच्या, कुटुंबांच्या, जातींच्या लायकीला धरून एकरूप, समानरूप, विषम असे वेगवेगळे गट होतील. एकच समाज घेतला तर असें दिसून येतें कीं, सर्व व्यक्ती आणि सर्व

---

१ Census report 1901 – Herbert Risley.

कुटुंबें कांहीं समान योग्यतेचीं नसतात. आम्ही समाजविभागणीची चर्चा करतांना सुप्रजाशास्त्रावरील लेखक सर फ्रॅन्सिस गाल्टन, डॉ. हर्स्ट, डॉ. वुड, प्रो. लाफलिन, रे. डीन इंग; मानसशास्त्रावरील लेखक प्रो. मॅक्डुगल, प्रो. सिरिल बर्ट, प्रो. थार्नडाइक; धर्मशास्त्रावरील लेखक मनु, याज्ञवल्क्य वगैरे विद्वानांच्या लेखांचा आधार घेणार आहोंत. हे लेखक सर्वसाधारण मनुष्य-प्राण्याबद्दलचे सिद्धांत सांगत असल्याकारणानें त्यांचे नियम कोठल्याही समाजाला लागू पडतात. समाज एकवंशीय असो अगर बहुविध वंशांचा बनलेला असो, असें दिसून येतें कीं, सर्वसाधारण समाजाचे साधारणतः तीन विभाग पडतात. बारीक बारीक वर्ग करूं लागल्यास दहा टप्पे पाडणें शक्य आहे. हे तीन विभाग म्हणजे शेंकडा दहा लायक आणि कर्ते स्त्री-पुरुष. शेंकडा ऐशीं सर्वसाधारण प्रजा आणि शेंकडा दहा समाजामध्यें कोणतेंही काम करण्याला नालायक असे वेडे, दुबळे वगैरे. काम करण्याला नालायक अगर नाखूष असा जो वर्ग त्याचेही पुन्हां तीन वर्ग पडतात. काम करण्याला नाखूष असे लोक पुढील वर्गात येतील. ते वर्ग म्हणजे भिकारी, वेश्या आणि चोर. पहिला पाहुणचाराच्या भिषानें, दुसरा सेवा करून आणि तिसरा दंडेलीनें समाजाकडून आपल्या पोटाची व्यवस्था करूं इच्छितो. असो. अशा तऱ्हेनें वेगवेगळ्या तत्त्वांवर विभागणी करून समाजाला हानिकारक लोक समाजांत किती आहेत, तें दाखवितां येईल.

मुख्यतः लायकीच्या दृष्टीनें समाजामध्यें श्रेष्ठ शेंकडा दहा, मध्यम शेंकडा ऐंशी आणि नालायक अगर नाखूष असे शेंकडा दहा अशी विभागणी होते. ज्या कोणत्या घराण्यांमध्यें हें कर्तृत्ववान प्रजेचें प्रमाण सर्वसाधारण प्रजेमध्यें जें कर्तृत्ववानांचें प्रमाण पडतें त्याहून जास्त पडेल, तीं घराणीं कर्तृत्ववान आणि अधिकार गाजविण्याला लायक अशीं होतील. सर्वसाधारण प्रजेमध्यें जें कर्तृत्ववानांचें प्रमाण पडतें तितकेंच ज्या घराण्यांमध्यें पडेल तीं घराणीं मध्यम वर्ग तयार करतील आणि अशा तऱ्हेनें एकवर्णीयांमध्यें देखील थर पडत जातील. अशा रीतीनें सुरुवातीला दोन तऱ्हेची विभागणी झाली. प्रथमतः वंशवार विभागणी, पुढें वंशांतर्गत कुटुंबांच्या लायकीप्रमाणें पडत जाणारे गट अगर थर. आतां या सर्वच थरांतील सर्वच व्यक्तींमध्यें वरवर दिसणारे, साधर्म्याचा आभास उत्पन्न करणारे पुष्कळ विशेष सांगतां

येतील, म्हणून कांहीं त्या सर्व व्यक्ती समान नव्हेत. मूलतः वंशावंशांमध्यें नित्य असे फरक आहेत. परंतु ते कांहीं शास्त्रज्ञब्रुव म्हणतात त्याप्रमाणें वरवर पाहून समजण्यासारखे[१] नाहींत. हे वंश अलगच म्हणजे विभक्तच राहिले पाहिजेत, ही गोष्ट शास्त्राचा ओनामा माहीत असलेला मनुष्य देखील सहज सांगू शकेल. पुढें एकजातीय समाजामध्यें जे विभाग पडतात त्यांची व्यवस्था करतांना पुढील तत्त्व लक्षांत ठेवावयास पाहिजे.

शास्त्रज्ञांच्या मतानें सर्वसाधारण म्हणून समाजामध्यें वावरणारी जी शेंकडा ऐशीं टक्के प्रजा, त्या प्रजेच्या शुक्रबिंदूमध्यें प्राणिशास्त्रदृष्ट्या बिग एन् (big N) नांवाचा एक आद्य जीवनगोलक असतो. त्या जीवनगोलकाचा असा गुणधर्म आहे कीं, तो गोलक ज्या ज्या व्यक्तींच्या प्रकृतींत वास करीत असेल, त्या त्या व्यक्तींचा दुसऱ्या कोणत्याही घराण्यांत विवाह झाला म्हणजे श्रेष्ठ घराण्यांत जरी विवाह झाला, तरीही त्या संबंधापासून होणारी प्रजा सर्वसाधारण राहील, श्रेष्ठ अगर लायक होणार नाहीं. उलट श्रेष्ठ घराण्यांचा अभ्यास करतां असें दिसून आलें कीं, ( High-grade ruling castes ) त्या घराण्यांमध्यें एन् एन् ( NN ) आद्य जीवनगोलक असतो. हा एन् एन् गोलक ज्यांच्या प्रकृतीमध्यें असेल त्या घराण्यांचे आपसांत विवाह संबंध झाले, तर त्या वर्गामध्यें पिढ्यानपिढ्या कर्तबगार व्यक्ती जास्त प्रमाणावर निर्माण होत जातात. याच कारणाकरितां राजघराणीं हीं निसर्गतःच अधिकार गाजविण्याला लायक अशीं असतात.

राजघराण्यांमध्यें सर्वसाधारण लायकीचे शेंकडा पन्नास पुरुष, श्रेष्ठ प्रतीचे शेंकडा बत्तीस आणि बाकीचे हलके, असें प्रमाण पडल्याचें शास्त्रज्ञांना दिसून आलें आहे. क्षत्रियधर्माचा सहजपरिणाम नाश हा असल्यानें आणि कानाला गोड लागणारी (चारुवाक्) समता समाजांत आज पसरूं लागली असल्याकारणानें, अशा घराण्यांचा पूर्वी नाश झाला आणि आजही होत आहे. एखादा कर्तृत्ववान वंश जगतीतलावरून नष्ट झाला तर त्याची जागा क्वचितच[२] भरून निघते ही गोष्ट समाजाचे हित इच्छिणाऱ्या प्रत्येक व्यक्तीनें

१ **Man's mental aptitudes by Sir Arthur Keith; Rationalist annual 1929.**

२ **Heredity and Eugenics by Gates.**

लक्षांत ठेविली पाहिजे. अशा घराण्यांतील लोकांचे अवरवर्णीयांशीं म्हणजे बिग एन् घराण्यांशीं विवाह टाळले पाहिजेत. म्हणजे, या घराण्यांना इतर सर्वसाधारण समाजांतून अलग करावयास पाहिजे.

प्रथमतः दोन तऱ्हेची विभागणी झाली. एक वंशविभागणी (inter-racial) दुसरी वंशांतर्गत गटांची पद्धति (intra-racial). वंशांतर्गत जे शेंकडा दहा लोक कर्तृत्ववान असतील ते अर्थातच इतर शेंकडा ऐंशीं-पासून विलग करावयास पाहिजेत. आनुवंशाच्या घराण्यांच्या दृष्टीनें ज्यांनीं अभ्यास केलेला आहे, त्यांना असें दिसून आलेलें आहे कीं, प्रजांतील श्रेष्ठ-कनिष्ठ भाव हा घराण्यावर अवलंबून असतो. म्हणजे कांहीं घराण्यांमध्यें श्रेष्ठ प्रजेची शेंकडेवारी जास्त असते तर कांहीं घराण्यांमध्यें हलक्याच प्रजेची शेंकडेवारी जास्त असते. आमच्या इकडील पंडीत धर्माचें रहस्य, मंथन वगैरे शाब्दिक प्रमाणावर करीत असतात. त्यापेक्षां त्यांनीं अशा तऱ्हेनें घराण्यांचा अभ्यास केला तर ती गोष्ट त्यांनाही प्रतीत होईल. आम्हीं अशा तऱ्हेनें कांहीं घराण्यांचा दहा दहा पिढ्यांचा अभ्यास केलेला आहे. अशा तऱ्हेचीं घराणीं निवडून काढलीं पाहिजेत. नंतर त्या घराण्यांतील साधर्म्य, वैधर्म्य पाहून त्यांचे गट बनवावयास पाहिजेत आणि याच घराण्यांना मुख्यतः जपावयाचें असल्याकारणानें त्यांच्यामध्यें संकेतानें उत्पन्न झालेले कडक संस्कार रूढ करावयास पाहिजेत. म्हणजे पिंडदृष्ट्या पिढ्यानपिढ्या प्रजा सुदृढ राहील. चांगला समाजशास्त्रज्ञ याच वर्गाची खरो-खर व्यवस्था करील.

म्हणजे वेगळाले वंश आणि त्या वंशांतर्गत एकावर एक असलेले असे थर अशी व्यवस्था झाली. वंशांतर्गत कोणत्याही गटामध्यें मूळ वंशांतच नसलेले गुण केव्हांही उत्पन्न होणार नाहींत, ही गोष्ट दृष्टिआड करतां येत नाहीं. हाच नियम सर्व अवयव आणि अवयवी यांना यथाप्रमाण लागू आहे. पुढें वंशांतर्गत असे जे थर पडतात ते सर्वसाधारणतः एकाच प्रका-

१ Eugenics by Dean Inge; Hereditary genius by Galton; The right of the unborn child by Karl Pearson; आमचे केसरी पत्रांतील जातिभेदावरील लेख.

रानें पडत जातात. जसें बुद्धिजीवि गट, आयुधजीवि गट, द्रव्योत्पादक गट आणि शरीरशक्तीनें काम करणारा गट. यांनाच आपण सर्वसाधारणतः ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशीं नांवें देऊं. म्हणजे निग्रोवंश आणि कॉकेशियन वंश या दोहोंमध्येंही ब्राह्मण असूं शकतात पण हे दोनही तऱ्हेचे ब्राह्मण समान नव्हेत.

**३७ विवाहाच्या मर्यादा**

वंशांतर्गत गट बनलेले असल्यास त्यांमध्यें आणि बनलेले नसल्यास ते बनवून त्यांच्यामध्यें, आपसांत किती प्रमाणापर्यंत विवाह होऊं दिल्यास हरकत नाहीं ही गोष्ट निश्चित करावयास पाहिजे. हिंदुसमाजामध्यें उत्पन्न झालेल्या जातीसंस्थेनें याचा पूर्ण विचार केलेला दिसतो. समाजशास्त्रज्ञ आणि प्राणिशास्त्रज्ञ यांचीं मतें पाहिलीं तर, फार जवळच्या रक्तांच्या व्यक्तींचे विवाह होऊं नयेत ( Consanguinity )आणि रक्तानें फार दूर असलेल्या व्यक्तीही विवाहाला लायक नाहींत. मनु म्हणतो :

'व्यभिचारेण वर्णानामवेद्यावेदनेन च ।
स्वकर्मणश्च त्यागेन जायन्ते वर्णसंकराः ॥'

वरील श्लोकावरून दिसून येईल कीं, मनूचें मत आधुनिक प्राणिशास्त्रज्ञांच्या मतांशीं जुळलें आहे. हे दोनही नियम बरोबर पाळावयाचे तर एका बाजूला सगोत्र विवाह त्याज्य आणि दुसऱ्या बाजूला व्यक्ती ज्या गटांत असेल त्या गटाच्या बाहेर जाऊन त्या व्यक्तीला विवाह करतां येणार नाहीं. हा नियम हिंदूंनीं आपल्या समाजशास्त्रांत पाळलेला दिसतो. अशा तऱ्हेनें वरिष्ठ वर्ग जो शेंकडा दहा लोक सांगितले त्यांच्यामध्यें पुन्हां संघोपसंघ ( crystal within crystal ) निसर्गनियमानेंच उत्पन्न होतील. या लोकांनाच हिंदूंच्या समाजशास्त्रांत त्रैवर्णिक अशी पदवी प्राप्त झाली आणि त्यांच्याच मागें आचाराचे कडक नियम लावले गेले. बाकी जो शेंकडा ऐशीं वर्ग राहिला त्याला आचारसुलभ जीवनाची व्यवस्था, आणि मानसिक समाधानाकरितां कांहीं तरी धर्माचें स्वरूप अशी व्यवस्था लावून दिली गेली. हे सर्व संस्कार म्हणजे मुख्यतः उपनयन हा संस्कार न लाव-

१ Anti-christ by Nietzsche.

त्यामुळें एकजाति– म्हणजे उपनयन –संस्कार न झालेले राहिले. येथें एक-जाति याचा अर्थ एकरूप असा नाहीं. त्यांच्यामध्येंही पुनः गट पडत जातील. ते गटही पुन्हां समान रहाणार नाहींत. म्हणूनच मनु म्हणतो,

“ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः त्रयो वर्णाः द्विजातयः ।
चतुर्थ एकजातिस्तु शूद्रोनास्ति तु पंचमः ॥ ”

अशा तऱ्हेनें घराण्यांची गटादिसंयोपसंघांत व्यवस्था झाल्यानंतर पुढें प्रकृष्टांची निवड कशी करीत जावी आणि निकृष्टांची घट कशी होईल या गोष्टीचा समाजशास्त्रज्ञाला अगर समाजनेत्याला विचार करावयास पाहिजे. श्रेष्ठ म्हणून जीं घराणीं निवडलीं, त्यांच्यामध्यें निसर्गाच्या नियमाला धरून शेंकडेवारीनें जास्त कर्तृत्ववान् प्रजा होत जाईलच. परंतु तें प्रमाण आहे तितकेंच पिढ्यानपिढ्या कायम ठेवण्याचा अगर वाढविण्याचा प्रयत्न करावयाचा तर उच्च कर्तृत्ववान घराणीं देखील वंशसंचारी अशा कांहीं दोषांनीं बाधित झालीं आहेत किंवा कसें ह्या गोष्टीचाही विचार करावयास पाहिजे. वंशसंचारी गुणही असतात आणि दोषही असतात. म्हणून गुण प्रकट होतील, निदान नष्ट होणार नाहींत; दोष नष्ट होत जातील, निदान प्रकट होणार नाहींत अशा तऱ्हेची कांहीं तरी व्यवस्था विवाहपद्धतीमध्यें असा-वयास पाहिजे. अशा तऱ्हेनें विचार आणि आचार करण्याच्या ऐवजीं आपण भावनाप्रधान मुत्सद्दी, झटपट झालेले समाजशास्त्रज्ञ, परमेश्वराकडून प्रेरणा होत असलेले प्रेषित वगैरे अर्धवट लोकांचीं व्याख्यानें ऐकत बसतों, ही गोष्ट सर्वथा निंद्य आहे. ही जी अशास्त्रीय प्रवृत्ति आपल्या समाजांत रूढ झालेली आहे, तीच आपल्या समाजाचा नाश करील, परकीय राज-सत्ता नव्हे ! परकीय राजसत्ता भौतिक विजय मिळविते. परंतु अशा प्रवृ-त्तीनें अंतःकरणच विघडून जातें. ज्याप्रमाणें फ्रान्सच्या क्रांतीच्या काळांत, आम्हांला रसायनशास्त्रज्ञांची कांहीं जरूरी नाहीं असें सांगून तेथील सुधारूं लागलेल्या प्रजेनें सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ लॅव्हायासियर याचा खून केला, त्याप्रमाणेंच आज लोकमत बुद्धिप्राधान्याच्या नांवावर बुद्धिप्रामा-ण्याचा खून करीत आहे ! जिकडे ऐकावें तिकडे बुद्धिप्रामाण्य आणि त्याचीं स्तुतिस्तोत्रें पुष्कळ ऐकूं येतात. परंतु त्याच बुद्धीचा उपयोग मात्र फारसा

कोठें केलेला दिसून येत नाहीं ! बुद्धिवंताच्या बुद्धीचा उपयोग करून घेण्यापेक्षां, त्याची थट्टा व्हावी ही गोष्ट लोकमत रानटी बनत चाललें आहे हीच गोष्ट दर्शविणारें गमक आहे ! आम्हांला तर या गोंधळाचा अर्थच कळत नाहीं. एकीकडे बुद्धिप्रामाण्य मानावयाचें आणि दुसरीकडे कोणत्याही प्रश्नाबद्दल पद्धतशीर अभ्यास न करितांच मतें बनवावयाचीं नव्हे, त्या मतांचा समाजांत प्रसार झाला पाहिजे असा हट्ट धरावयाचा. अजून सुशिक्षित आणि स्वत:स पुढारी म्हणवून घेणाऱ्या लोकांना अंत:स्फूर्ति म्हणजे बुद्धिप्रामाण्य नव्हे इतकी गोष्ट कळूं नये, हें समाजाचें दुर्दैव आहे. कोणाही तरुणाला अगर तरुणीला आपल्या भागीदाराच्या कुळांतील आनुवंशिक गुण पहाण्याची मुळींच जरूरी भासूं नये, ही गोष्ट कांहीं अभ्यास केल्याचें चिन्ह खास नव्हे. त्यांचें म्हणणें असें कीं, शिक्षणादि बाह्य गुण समान झाल्यास आनुवंशादि आंतरगुण पहाण्याची जरूरी कोणती रहाते ?

अर्थात् भागीदार शोधण्याचे बाबतींतही पुढील पर्याय उत्पन्न होतील, घराण्यामध्यें चांगले गुण आहेत, व्यक्तीही पण व्यवहारांत तरबेज आहे, परंतु अलीकडच्या समाजांत ज्याला शिक्षण म्हणतात, तशा तऱ्हेनें त्या व्यक्तीचें शिक्षण झालेलें नाहीं. अशा तऱ्हेनें कुलगुण, संसारयाला चालविण्याला लागणारे व्यावहारिक गुण आणि शैक्षणिक मुलामा या तीन तत्त्वांच्या दृष्टीनें विचार केल्यास पुष्कळच पर्याय होतील. परंतु विस्तारभयास्तव ते सर्व कांहीं देत नाहीं. आज चहूंकडे जी भाषा ऐकूं येते ती शैक्षणिक मुलाम्यासंबंधींच होय. इतर दोन गुणांचा कोठेंही विचार केलेला दिसून येत नाहीं. आधुनिकांचें मत असें कीं, शिक्षणानें संसारयात्रा हांकण्याकरितां लागणारे गुण उत्पन्न होतीलच. सुशिक्षित—म्हणजे ललित वाङ्मयाचा मुख्यत: अभ्यास करणारे लोक—व्यावहारिक बुद्धींत तरबेज असतात ही गोष्ट सिद्ध व्हावयाची आहे. तिसरें तत्त्व जे आनुवंशिक गुण त्यावर शिक्षणाचा परिणाम काय होतो त्याचा विचार करतों. या शिक्षणानें असें काय घडतें कीं, तें आनुवंशापेक्षां देखील जास्त प्रधान मानावें ? या गोष्टीचा आम्हांला तर कांहीं उलगडा होत नाहीं. डॉ. हर्स्ट[१] म्हणतो, ‘ सार्वत्रिक शिक्षण हाच आपल्या आधुनिक प्रजासत्ताक राज्यपद्धतीचा पाया मानला

१ The future of life by C. C. Hurst.

जातो. ' परंतु आपण शास्त्रानें पुढें आणलेले सिद्धांत जर मान्य केले आणि ते तसे मान्य करणें भाग आहे, तर आपणांला असेंच म्हणावें लागेल कीं, राष्ट्राचे हजारों रुपये आपण निव्वळ पाण्यांत टाकीत आहोंत. कारण, ' big N ' या आद्य जीवनगोलकानें युक्त असलेल्या, श्रीमंत असो अगर गरीब असो, कोणत्याही मुलाला दिलेलें निव्वळ अक्षर ओळखीच्या पलीकडील ( Barest elementary education ) शिक्षण हें निरुपयोगी ठरतें. आज जर पाहिलें तर जीं मुलें आपल्या लायकीनुरूप आपणांला आणि वडिलांना उपयोगी पडणारें धनार्जन करण्यांत गुंतलेलीं असावयास पाहिजेत, त्या मुलांना उगीच्चच फार काळपर्यंत शाळेंतील शिक्षणांत डांबून ठेवलें जातें. आपल्या विश्वविद्यालयांतील बरीचशी जागा श्रीमंत परंतु नालायक अशा सर्वसाधारण वर्गानें उगीच्चच व्यापून टाकिली जात आहे, अशी शास्त्रीयदृष्ट्या डॉ० हर्स्टच्या मतानें स्थिति आहे. तर आज आमच्या सुशिक्षित मानल्या गेलेल्या समाजांत तेंच शिक्षण विवाह करण्याला पुरेसा पाया होऊं पहात आहे. घराण्यांतील गुण आणि शिक्षणानें येणारे गुण, यांमध्यें विकल्प आल्यास शिक्षणादि गुणांपेक्षां घराण्यांत असलेले गुण जास्त महत्त्वाचे होत. या बाबतींत जवळजवळ सर्व शास्त्रज्ञांचें एकमत आहे. कारणें वेगवेगळीं सांगितलीं जातील, परंतु सिद्धांताच्या बाबतींत मतभेद दिसून येत नाहीं.

डॉ. हर्स्ट[१], डॉ. कार्ल पियरसन, सर फ्रॉन्सिस गाल्टन वगैरेंसारख्या लेखकांच्या मतानें व्यक्तीची प्रवृत्ति बदलण्याचे बाबतींत शिक्षणाचा फारसा उपयोग होत नाहीं, तर मेंडेलच्या अनुयायांच्या मतानें वंशसुधारण्याच्या दृष्टीनें शिक्षणाचा कांहींही उपयोग होत नाहीं. डॉ. डोनकॅस्टर[२] म्हणतो, ' म्हणून असाच सिद्धांत प्रस्थापित होतो कीं, शारीरिकच नव्हे तर मानसिक गुणधर्म देखील आनुवंशिक असतात. ' हा सिद्धांत व्यावहारिक दृष्ट्या फारच महत्त्वाचा आहे. बुद्धीची अगर मनाची वाढ बरी परिस्थिति

१ Future of life by C. C. Hurst; Relative strength of nature and nurture by Pearson and Elderton; Hereditary genius by Francis Galton.

२ Heredity in the light of recent research by Doncaster.

झाल्यास होऊं शकते असें म्हणण्याला फारच थोडी जागा उरते. बाह्य परिस्थितीनें त्या व्यक्तीला उदरंभरणार्थ कोणता धंदा करावा लागेल, ही गोष्ट फार झालें तर ठरूं शकेल. परंतु त्या बुद्धीची अगर मनाची मूळ जाति ( kind ) बदलणें शक्यच नाहीं. कारण, ती जन्मकाळींच निश्चित ठरून गेलेली दिसते. व्यक्तीनें इहलोकीं जे गुण संपादन केले असतील ते संततींत संक्रांत होण्याची आशा त्याहून फारच कमी. म्हणून शिक्षणानें वंश सुधारतील असें म्हणणें हा एक आधुनिक सुशिक्षितांचा भ्रम आहे ! बापानें स्वतःला शिक्षण मिळालें होतें, म्हणून पाहिजे तर मुलाला शिक्षण द्यावें. परंतु त्या मुलाला शिक्षण मिळालें अगर न मिळालें तरी त्याच्या बौद्धिक आणि मानसिक शक्ती असतील तशाच रहातील. पुष्कळ लोकांची अशी कल्पना असते कीं, व्याधींचा उद्भव वाईट परिस्थितींत पिढ्यानपिढ्या राहिल्यानें होतो. परंतु वाईट परिस्थितींत पिढ्यानपिढ्या राहिल्याचे परिणाम संततींत संक्रांत होतात किंवा कसें ही गोष्टच मुळांत विवाद्य[१] आहे. या बाबतींत वांशिक गुणांच्या तुलनेनें पाहिलें तर, परिस्थितीचा परिणाम हा फारच क्षुद्र स्वरूपाचा आहे. जर मानवाची प्रगति थोड्याही प्रमाणांत परिस्थितीच्या बरेवाईटपणावर अवलंबून असेल तर परिस्थितींत सुधारणा झाल्यानें वंश सुधारतील, परंतु आनुवंशाच्या अभ्यासावरून दिसून येतें त्याप्रमाणें मानवाचें जीवन मुख्यतः जर वांशिक गुणांवरच अवलंबून असेल, तर परिस्थितीच्या सुधारणेनें हलक्या वंशांची वाढ झपाट्यानें होऊन एकंदर समाजाची अधोगतीच होईल. मूल जन्माला येतें तें पित्याशीं सदृश असतें. याचें कारण, तें पित्यापासून जन्मलें हें नसून ते दोघेही एकाच शुक्रबिंदूपासून जन्मले हें आहे. म्हणजे मूल हें जणूं आपल्या बापाचें सावत्र भावंड—नव्हे स्वतः बापच आहे. ‘आत्मा वै पुत्र नामासि।’ ‘यादृशं भजते हि स्त्रीःसूतं सूते तथाविधं।’ ‘आकरे पद्मरागाणां जन्म काचमणेः कुतः।’ ‘यस्मिन्कुले त्वसुत्पन्नः गजस्तत्र न हन्यते।’ म्हणून आम्ही म्हणतों कीं, विवाहाचे बाबतींत— मुख्यतः ज्या श्रेष्ठ घराण्यांना जपलें पाहिजे त्यांचे बाबतींत कुलगोत हें जास्त महत्त्वाचें आहे, उत्तम परिस्थिति अगर शिक्षण नव्हे.

---

१ Stream of life by Julian Huxley.

श्रेष्ठ प्रजेला विवाहाच्या बाबतींत मार्गदर्शक होण्याकरितां म्हणून कोणतीं कुलें ग्राह्य आणि कोणतीं कुलें त्याज्य, याची सर्वसाधारण रूपरेषा कोणीं तरी आंखून द्यावयास पाहिजे. तशा तऱ्हेची रूपरेषा हिंदुसमाजशास्त्राशिवाय अगर आधुनिक सुप्रजाशास्त्रावरील लेखकांच्या लेखांशिवाय कोठेंही फारशी दिलेली आढळत नाहीं. हिंदुशास्त्रदृष्ट्या त्याज्य कुलांची व्यवस्था पुढीलप्रमाणें दिसून येते. यांत शास्त्रीय नियम अत्यंत उत्तम तऱ्हेनें पाळले गेले किंवा नाहींत, याचा विचार वाचकांनीं आपणच करावा. प्रथमतः त्याज्य म्हणजे बापाचें गोत्र आणि आईच्या माहेरचें घराणें. मनु म्हणतो :

**३८ कुलांची ग्राह्या-ग्राह्यता**

" असपिंडाच या मातुः असगोत्रा च या पितुः ।
सा प्रशस्ता द्विजातीनां दारकर्मणि मैथुने ॥ "

असपिण्डा म्हणजे सपिंड नव्हे ती; याच पदानें आईच्या माहेरचें गोत्र असा अर्थ घ्यावयास पाहिजे. भट्ट कुल्लूक म्हणतो : 'च शब्दान्मातृसगोत्रापि मातृवंशपरंपरा जन्मनाम्नोः अपरिज्ञाने सति न विवाह्या, तद्वितरातु मातृसगोत्रा विवाह्या इति संगृहीतम्।' याहून चांगला नियम सुप्रजाशास्त्राच्या दृष्टीनें कसा सांगतां येईल त्याचा मला कांहीं बोध होत नाहीं. कांहीं ग्रंथकार[1] मातृगोत्राची कोणतीही कन्या निषिद्ध मानतात. पहा : " सगोत्रां मातुरप्येके नेच्छन्त्युद्वाहकर्मणि । जन्मनाम्नोरविज्ञाने उद्वहेदविशंकितः ॥ परिणीय सगोत्रांतु समानप्रवरां तथा । तस्यां कृत्वा समुत्सर्गं द्विजश्चान्द्रायणं चरेत् ॥ मातुलस्य सुतां चैव मातृगोत्रां तथैवच ।" त्याचप्रमाणें 'असगोत्रा च' या पदानें सगोत्र आणि सपिंड हे दोनही अर्थ घ्यावयाचे. म्हणजे थोडक्यांत म्हणावयाचें तर, कन्या मातापितरांची सगोत्र आणि सपिंड नसावी. पुन्हा सपिंडाचे अर्थ लावतांना अडचण येणारच. म्हणून त्यासंबंधीं विचार करावयास पाहिजे. हिंदुधर्मशास्त्रकार सपिंडाचा अर्थ दोन पद्धतींनीं सांगतात. एक जीमूतवाहनाची पद्धति आणि दुसरी विज्ञानेश्वराची पद्धति. पैकीं सात पिढ्यानंतर सापिंड्य नाहींसें होतें असें म्हणणारी पद्धति प्राणि-

[1] कुल्लूकभट्ट on मनु.

शास्त्राला जास्त जवळची आहे. प्राणिशास्त्रांच्या दृष्टीनें विचार केल्यास ज्या दोन व्यक्तींच्या सापिंड्याचा निर्णय करावयाचा असेल, त्या दोन व्यक्तींचे कांहीं पिढ्यांपूर्वी जे पूर्वज असणें शक्य आहे, त्यांपेक्षां एकही पूर्वज कमी असल्यास कोठेंतरी थोड्याफार नात्यांत विवाह होत असले पाहिजेत. समजा कीं, आज हयात असलेल्या व्यक्तीचे दहाव्या शतकांत किती पूर्वज असतील याचें गणित करून पाहिलें. तीस वर्षाला एक पिढी असा हिशोब केल्यास सन ९४३ पासून १९३३ पर्यंत ९९० वर्षें म्हणजे तेहतीस पिढ्या होतात. म्हणून आजच्या एका हयात व्यक्तीचे सन ९४३ सालीं $(२)^{३२}$ म्हणजे ८५,९८,०९,४५२ इतके पूर्वज असावयास पाहिजेत. याहून जर एकही कमी असेल तर कोठेंतरी सपिंडांचा विवाह झाला असलाच पाहिजे. प्रश्न सपिंडांचा विवाह व्हावा किंवा नाहीं हा नसून, कोणत्या घराण्यांत करावा आणि त्याच्या मर्यादा कशा ठरवाव्या हा आहे. त्या प्रश्नांचा विचार न करतां धर्मशास्त्रामध्यें रूढ केले गेलेले अत्यंत उत्तम नियम मोडण्याकडे जी तरुणांची प्रवृत्ति वाढत आहे ती परिणामीं हितकारक होणार नाहीं. सपिंड दोन तऱ्हेचे[२] असतात. एक गोत्रज सपिंड आणि दुसरा भिन्नगोत्रज सपिंड. गोत्रज सपिंड म्हणजे वंशपरंपरेनें आलेली पुरुषसंतति (Agnates) आणि भिन्नगोत्रज सपिंड म्हणजे स्त्रीवंशपरंपरा संतति (Cognates). आतां आमच्या समाजशास्त्रज्ञांच्या मतानें हे लोक, 'पंचमात्सप्तमादूर्ध्वं मातृतः पितृतः तथा' असे मानलेले आहेत. म्हणजे मातेचे बाजूनें पांच पिढ्यानंतर आणि पित्याच्या बाजूनें सात पिढ्यानंतर सापिंड्यदोष नष्ट मानावा. सगोत्र म्हणजे एकाच गोत्रांत जन्मलेला. गोत्र शब्दाचा कोणीं कांहींही अर्थ केला, तरी प्रवराध्यायप्रसिद्ध गोत्रें जवळजवळ तीनचार हजार वर्षें आजच्याच स्वरूपांत बापाकडून मुलाला (In the male line) या पद्धतीनें चालत आलेलीं आहेत, ही गोष्ट निर्विवाद आहे. गोत्र शब्दाचें व्युत्पत्तिप्रधान असे जे अर्थ सांगितले जातात तसे अर्थ सांगणें बरें नव्हे इतकेंच नव्हे तर, हास्यास्पद आहे एवढेंच येथें नमूद करून ठेवतों. तीन हजार वर्षें म्हणजे जवळजवळ शंभर पिढया जातींच्या गुणविशिष्टीकरणाला

१ Modes of research in genetics by R. Pearl.

२ Hindoo law by D. F. Mulla.

पुरेशा नाहींत काय? मग मानवी गुणधर्म[१]— आनुवंशिक गुणधर्म—कधींच नाश पावत नाहींत, ही गोष्ट प्रसिद्ध असून देखील, गाल्टनच्या गणितागत पद्धतींतील न समजलेल्या नियमांचा आधार घेऊन, आज हिंदु म्हणजे उच्चवर्णीय हिंदुसमाजाला सगोत्र विवाह करण्याची शिफारस करणें, ही गोष्ट घातुक होईल असें आम्हांला वाटतें. परंतु तसा[२] उपदेश मुंबई विश्वविद्यालयाच्या खास कृपाछत्राखालीं केला जात आहे!

सगोत्र विवाहांचा विचार करावयास लागलें तर असें दिसून येईल कीं, अगदीं जवळचे सगोत्र विवाह म्हणजे बापमुलींचे किंवा भावाबहिणींचे. या विवाहांचें सापिंड्य आणि सगोत्रत्व यांचें मोजमाप कसें करावें, यासंबंधीं बरेच गणितागत नियम रेमंड पर्ल[३], कार्ल पियरसन् वगैरे लेखकांनीं दिलेले आहेत. अशा तऱ्हेच्या विवाहांचा उपयोग ज्यावेळीं एकादा गुण कोणत्यातरी घराण्यांत स्थिर करावयाचा असतो, त्यावेळीं करावयाचा असतो. म्हणजे बाह्यतः तरी, वंशतःच एकजातीय व्यक्तींचे विवाह होऊन गुणांची निवड करणें फारसें कठीण पडत नाहीं, परंतु अशा तऱ्हेचे विवाह नक्की फायदेशीर होतातच असें नाहीं. तें कसें तें पाहूं. प्रत्येक व्यक्ति कांहीं गुणांचे बाबतींत शुद्ध ( Homozygous ) आणि कांहीं गुणांचे बाबतींत संकीर्ण ( heterozygous) असते. शुद्ध म्हणजे तो गुण त्या व्यक्तीच्या संततीमध्यें जशाचातसा उमटतो. परंतु संकीर्ण गुणांची मांडणी त्याच व्यक्तीच्या संततींत वेगवेगळ्या तऱ्हेनें होणें शक्य आहे. म्हणून कोणत्याही घराण्यामध्यें अगर जातीमध्यें कोणतातरी एक अगर अनेक गुण शुद्ध झाले असतील ते शुद्ध ठेवणें हें पहिलें कार्य आहे. पुन्हां गुण हेही पण प्रत्यक्ष (Dominant) आणि तिरोहित ( recessive ) अशा दोन प्रकारचे असतात. सपिंड विवाहानें तें घराणें जे गुणदोष दर्शवीत असेल, त्या बाबतींत तें घराणें जरूर शुद्ध होत जाईल. परंतु, ज्याप्रमाणें घराण्यामध्यें गुण असतात त्याप्रमाणेंच दोषही असतात. हे दोष कांहीं घराण्यांना देखील प्रत्यक्षतः हितकारक होतील असें नव्हे. व्यक्तीमध्यें लुळेपांगळे करणारे, कुरूपपणा आण-

१ Heredity and Eugenics by Gates.
२ Hindoo Exogamy by Karandikar.
३ Modes of research in genetics by Pearl.

णारे, वेड लावणारे, मृत्यु उत्पन्न करणारे असेही जीवनगोलक असूं शकतात. पुन्हां हे गुण सृष्टीमध्यें तिरोहित असतात. हेही गुण सगोत्र विवाहानें वाढीला लागतील. याप्रमाणें सगोत्र विवाहानें इष्ट आणि अनिष्ट दोनही तऱ्हेच्या गुणांच्या बाबतींत व्यक्ति शुद्ध—म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें तेच गुण जसेच्या तसे संततीमध्यें संक्रांत करणारी— अशी होत जाईल. म्हणून सगोत्र आणि सपिंड विवाह प्राणिशास्त्रदृष्ट्या अग्राह्य आहेत. विवाहानें प्रत्यक्ष चांगले गुण तसेच राहणें आणि तिरोहित दुर्गुण आवरले जाणें या दोनही गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून साधावयाच्या असतात. एकरूप जीवनगोलकांची निवड होत असल्याकारणानें बाह्यतः एकरूप असलेल्या, परंतु आनुवंशानें एक नसलेल्या व्यक्ती जरी टाळल्या जातील तरी वर सांगितलेलें द्विविध कार्य सिद्ध होईल किंवा नाहीं हें सांगणें फार कठीण आहे. म्हणून सगोत्र, सपिंड विवाह निव्वळ सगोत्र–सपिंड म्हणून त्याज्य नसला तरी ज्या घराण्यांमध्यें मूळ दोष म्हणून कांहींच नाहींत अशीं घराणीं जगातीतलावर कोठें सांपडणें शक्य असल्यास, त्या घराण्यांमध्यें असे विवाह पाहिजे तर घडवून आणावे. परंतु अशा विवाहांची आज इतरत्र जरूर कां भासूं लागली आहे, हें कोडें आम्हांला उलगडत नाहीं. व्यावहारिक अडचणींकरितां सृष्टीचे नियम मोडूं नयेत अशी आमची अल्प समजूत आहे. पुन्हां सगोत्र, सपिंड म्हणजे रक्तानें जवळच्या व्यक्तींमध्यें विवाह होत गेल्यास त्या समाजांत दुसरेही पण पुष्कळ दोष उत्पन्न होतात. अशा तऱ्हेचे विवाह पिढ्यानपिढ्या सारखे होत गेले, तर गुणहानि झालेली दिसत नाहीं. परंतु एकाद्या पिढींत जर बाहेरचा भागीदार करावा लागला तर मात्र त्या घराण्यांतील सर्व सद्गुणांचा नाश[1] होतो. पुन्हां प्रत्यक्ष गुणांच्या सान्निध्यानें तिरोहित म्हणजे प्रत्यक्षतः प्रभावी न होणारे जे दुर्गुण असतात, ते प्रत्यक्ष होण्याची भीति असल्याकारणानें सगोत्र, सपिंड विवाह हे टाळावयास[2] पाहिजेत. आम्हीं वर दाखविल्याप्रमाणें अगदीं निर्दोष जीं घराणीं असतील त्या घराण्यांमध्यें असे विवाह होण्याला कांहीं हरकत नाहीं.

---

१ Basis of breeding by L. F. Whitney.

२ Effects of consanguinous marriage by Pearson.

परंतु अशा तऱ्हेचे प्रयोग करण्याच्या भानगडींत सर्वसाधारण समाजानें पडूं नये.

सगोत्र-सपिंड व्यक्ति या विवाहाला अग्राह्य ठरल्या तरी तेवढ्यानेंच हा प्रश्न संपत नाहीं. एकगोत्रीय नसून देखील वंशशुद्धीच्या आणि सुप्रजाशास्त्राच्या दृष्टीनें पुष्कळ तऱ्हेचीं घराणीं टाळावीं लागतात आणि त्यांची चर्चा हिंदुस्मृतिकारांनीं फारच सुंदर केली आहे. मनु म्हणतो :

" महान्त्यपि समृद्धानि गोजाविधनधान्यतः ।
स्त्रीसंबंधे दशैतानि कुलानि परिवर्जयेत् ॥
हीनक्रियं निष्पुरुषं निश्छंदो रोमशार्शसम् ।
क्षय्यामयीव्यपस्मारीश्वित्रिकुष्टी कुलानिच ॥ "

स्त्रीची निवड करण्याच्या दृष्टीनें मोठीं समृद्ध असलीं, तरी पुढील दहा कुळें वर्ज्य करावीं. हा लेखक वेडा असला पाहिजे; म्हणे श्रीमान् घराण्यांतील कन्या टाळावी. म्हणून आधुनिक सुशिक्षित म्हणतात कीं, ब्राह्मणांना परिस्थिति कळत नाहीं. परंतु कुलांशीं मनूस्त्रें कांहीं वाकडें नव्हतें. आतां यांत शास्त्रीय बीज कांहीं आहे किंवा काय याचा विचार केल्यास प्रत्येक पद सुप्रजाशास्त्राच्या दृष्टीनें वापरलेलें आहे असें दिसून येईल. तीं त्याज्य कुलें पुढीलप्रमाणें: जातकर्मादि संस्कार नसलेलें, नुसती स्त्रीसंतती ज्या कुलांत उत्पन्न होते अशा तऱ्हेचें, वेदविद्येचें अध्ययन ज्या घराण्यांत होत नाहीं असें, अतिशय केसानें युक्त, अर्श व्याधीनें युक्त, क्षयी, अग्निमांद्य असलेलें, अपस्माराच्या व्याधीनें युक्त आणि अंगावर कोड फुटलेलें. या घराण्यांच्या यादीकडे पाहिलें तर यांमध्यें वऱ्याचशा बाबतींत रोगांचा विचार केलेला दिसून येईल. म्हणून रोगांचा आणि घराण्यांचा काय संबंध आहे, हें पाहावयास पाहिजे.

आर्यवैद्यकाच्या दृष्टीनें बोलावयाचें तर, बहुतेक सर्व रोग आनुवंशिकच आहेत. आम्हांला कांहीं लोक विचारतात कीं, एकादी जखम होणें हेंही पण आनुवंशिक आहे असें आपण म्हणूं शकाल काय? तसें आम्ही म्हणत नाहीं. परंतु जखम झाल्यानंतर रक्त लवकर थांबणें आणि जखम लवकर भरून निघणें अगर न निघणें हें मात्र आनुवंशिकच आहे. कांहीं लोकांना

जखम झाल्यास त्यांचें रक्त लवकर थांबत नाहीं आणि कित्येक वेळां त्यांत त्यांचा मृत्यूही होतो. हा रोग आनुवंशिक आहे. बरेचसे रोग आनुवंशिकच आहेत याबद्दल शास्त्रज्ञांना ( ज्यांचा उदरनिर्वाह लोकांच्या अनारोग्यावर अवलंबून असतो त्या वैद्यांना नव्हे. ) आतां शंका राहिलेली नाहीं. कित्येक लोक बहिरे, मुके जन्मतात हा दोष आनुवंशिक आहे. अपस्मार ( epilepsy ) हा रोगही आनुवंशिक असतो आणि तो रोग ज्या घराण्यांमध्यें असतो, त्या घराण्यांमध्यें इतरही शारीरिक आणि मानसिक दोष असतात. कांहीं ठराविक स्नायूंचें आकुंचन-प्रसरण (tremour) हा रोग आनुवंशिक आहे. बरेचसे नेत्ररोग आनुवंशिक असतात. या सर्व गोष्टी आणि इतरही पुष्कळ रोग आनुवंशिक असतात, हें आतां पाश्चात्यांना मान्य होऊं लागलें आहे. त्यामुळें सुप्रजांचा विचार करणारा मनु रोगांची यादी देतांना चुकला असें आधुनिक सुशिक्षित म्हणोत बापडे, आम्हांला तरी म्हणण्याचें धाडस करवत नाहीं. आर्यशास्त्रानुरोधानें 'कारण गुणाः कार्ये संक्रामन्ति' असा नियम आहे. 'सर्वे संक्रामिणो रोगाः वर्जयित्वा प्रवाहिकाम् व्याधयः संचारिणः ।' पाश्चात्य वैद्यकांची वाढ मुख्यतः आनुवंशाचे नियम माहीत नसलेल्या काळांत झाली असल्याकारणानें आनुवंशाचे नियम माहीत झाल्यानंतर आज त्यांचे नियम कुचकामाचे आहेत. वैद्यकाच्या परिणामांची चर्चा आम्हीं मागें केलेलीच आहे. अशा तऱ्हेच्या शास्त्राचा पुरस्कार हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांकडून केला जावा हें देशाचें दुर्दैव होय !

वरील यादींतील प्रत्येक पदाचा विचार करूं. जातकर्मादि संस्कार नसलेले. या पदांत संस्काराचा विचार केलेला आहे. 'चातुर्वर्ण्यं प्रकृतिविशेषात्संस्कारवशात् च ।' आम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, श्रेष्ठ प्रजा निर्माण व्हावयास चांगला आनुवंश आणि चांगले संस्कार या दोहोंचाही समुच्चय व्हावयास पाहिजे. इतर अनेक सामाजिक कारणांचा विचार केला

---

१ Heredity and Eugenics by Gates. See also Pearson and other writers.

२ Tuberculosis, Heredity and Environment, and other pamphlets by Karl Pearson.

तरी असें दिसून येईल कीं, विवाहयोग्य व्यक्ती समान संस्कृतीच्या असावयास पाहिजेत. हा मुद्दा आमच्या समाजसुधारकांना देखील मान्य असल्याकारणानें त्याची जास्त चर्चा करावयास नको.

दुसरें पद—**निष्पुरुष**—म्हणजे ज्या घराण्यांतील संतति स्त्रीप्रधान असते अशीं घराणीं. हें एकटेंच पद हिंदूंच्या समाजशास्त्राचा हेतु काय आहे तें दाखविण्याला समर्थ आहे. त्याबरोबरच तें त्यांच्या समाजशास्त्राच्या ज्ञानाचेंही दिग्दर्शन करतें. आजच्या घरोवरीं पसरलेल्या समाजशास्त्रज्ञांनीं मनुस्मृतीचा अभ्यास केल्याशिवाय त्यांचें ज्ञानच अपूर्ण राहील. आपण या पदाचा आतां विचार करूं. ज्या घराण्यांत पुरुषसंतति नसेल म्हणजे ज्या घराण्यांत स्त्री वारसदार होण्याचा संभव असेल, त्या घराण्याशीं संबंध झाला असतां काय आपत्ति कोसळतात याची सुंदर चर्चा सर फ्रॅन्सिस गाल्टननें केलेली आहे. तो म्हणतो[१], 'मीं गणितागत पद्धतीनें अभ्यास केला त्यावरून असें दिसून येतें कीं, स्त्रीवारसदारांशीं झालेले बहुतेक विवाह नापीकच होतात. म्हणून सरदार घराणीं अगर बुद्धिमान घराणीं यांपैकीं कोणीही अशा स्त्रियांशीं विवाह केल्यास त्या घराण्यांचा निर्वंश होतो. मनु देखील तेंच म्हणतो कीं, 'समृद्ध असलें तरी देखील निष्पुरुष घराणें वर्ज्य मानावें.' परंतु हा मुद्दा येथेंच संपत नाहीं. मुख्यतः स्त्रीप्रधान अगर स्त्रीप्रज जीं घराणीं असतील त्या घराण्यांमध्यें, जगतावर त्रिखंड कीर्ति होईल असा पुरुष सहसा निर्माण होत नाहीं. हॅवेलॉक एॅलिस[२] म्हणतो, 'कोणत्याही तऱ्हेची युक्ति अगर शक्कल लढवून जो खोडून काढणें अशक्य आहे असा एक मुद्दा उत्पन्न होतो तो असा कीं, आपणांमध्यें जे श्रेष्ठ पुरुष होऊन गेले ते सर्व ज्या घराण्यांमध्यें मुलांची संख्या मुलींच्या संख्येपेक्षां जास्त होती अशाच घराण्यांमध्यें निपजलेले दिसतात. ज्या घराण्यांमध्यें नुसते मुलगे जन्मले तीं घराणीं जरी विभक्त केलीं, तरी मुलगे आणि मुली ही दोन्ही संतति ज्या घराण्यांत होती अशीं एकशेंऐशीं घराणीं अभ्यासिल्यावरही असें दिसून आलें कीं, थोर पुरुष हा पुरुषसंततिप्रधान घराण्यांतच निपजतो.' मनूनें पुरुषप्रजा जास्त कां व्हावयास पाहिजे, ह्याचीं कारणें सांगितलीं नसलीं तरी त्याचा निष्कर्ष

१ Hereditary genius by Francis Galton.

२ A study of British genius by Ellis.

चूक आहे असें कसें म्हणतां येईल ? हिंदूंमध्यें मुलाची महति कां, 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव।' असा अशिर्वाद कां द्यावयाचा, पुरुषसंततीकरितांच धडपड कां करावयाची, वगैरे मुद्यांचा थोडासा खुलासा वरील चर्चेवरून होईल असें वाटतें. पुरुषप्रधान संतति कां असावयास पाहिजे याला इतरही अनेक कारणें देतां येतील. परंतु त्यांचा संबंध लोकसंख्याविषयक प्रश्नांशीं असल्याकारणानें त्यांचा विचार लोकसंख्याप्रकरणीं करूं. मनूचा नियम किती बरोबर आहे ही गोष्ट कोणाच्याही सहज लक्षांत येईल. परंतु आजच्या सुशिक्षित अंधःकारांत त्याची किंमत कळणें शक्यच नाहीं. अशा तऱ्हेनें सर्व मानवजातीच्या बाबतींत लागू पडणारे जागतिक नियम घालून देणाऱ्या मनूला, एका महामूर्ख ग्रंथकारानें[१] पक्षपाती म्हणावें, दुसऱ्यानें त्याचा ग्रंथ जाळावा, हें कांहीं शहाणपणाचें लक्षण खास नव्हे !

निश्छंद्—ज्या ज्या घराण्याला जें जें शिक्षण युक्त असेल, त्या त्या शिक्षणाचे बाबतींत अभाव असलेलें घराणें. येथें पुन्हां संस्काराचाच प्रश्न आला. घराण्यांची शिक्षणपद्धति लायकीनुरूप वेगवेगळी असावयास पाहिजे. सर्वांना एक तऱ्हेचें शिक्षण देण्याची हिंदुसमाजानें कधींहि मान्य न केलेली आधुनिक पद्धति अत्यंत अशास्त्रीय आणि समाजनाशक[२] स्वरूपाची आहे, एवढेंच येथें नमूद करून ठेवतों. अशा तऱ्हेची शिक्षणपद्धति समाजांत पसरवूं पहाणारे लोक त्या समाजाचे शत्रू आहेत, असें मानण्याला आम्हांला कोणतीही हरकत दिसत नाहीं.

रोमश–केंसाळ–केंस फार असण्याचा विवाहयोग्यत्वाशीं काय संबंध असें वरवर पाहणाऱ्याला सहज वाटेल. परंतु मनुप्रमाणेंच सीझर लोंब्रोसो या ग्रंथकाराला त्यामध्यें हेतु दिसला. तो[३] म्हणतो, 'फार केंस असणें ही गोष्ट त्या केंस असलेल्या व्यक्तीमधील गुन्हेगारीची प्रवृत्ति व्यक्त करते.' हें म्हणणें बरोबर आहे किंवा काय हें आम्हांला सांगतां येणार नाहीं. परंतु दोन भिन्न स्थळीं, भिन्न काळीं आणि भिन्न संस्कृतीच्या लेखकांनीं एकाच तऱ्हेचें

---

१ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न– वि. रा. शिंदे.
२ Scientific outlook by Bertrand Russel.
३ Criminal man by Lombrosso.

विधान केलें असल्यास, तें सर्वथा चूक असेल असें आमच्यानें म्हणवत नाहीं. टायलर म्हणतो, ‘ समजा कीं, तार्तरांतील मुसलमान आणि डाहोमींतील आधुनिक इंग्रज किंवा फिजी बेटांतील वेस्लेपंथी ख्रिस्ती आणि फिजी बेटांतील जेजुईट पाद्री हे दोघेही एखाद्या स्थितीचें वर्णन सारख्याच शब्दांत करूं लागले, तर ती गोष्ट निव्वळ यदृच्छया साधर्म्य किंवा ग्रंथकारांची लुच्चेगिरी असेल असें म्हणणें अशक्य आहे. ’ येथें तर दोन शास्त्रज्ञ एकच अनुमान काढतात. म्हणून या प्रश्नाचा पद्धतशीर विचार व्हावयास पाहिजे असें आम्हांला वाटतें.

**आर्शसम्**—अर्श रोग असणारे. आम्हीं मागें सांगितलेंच आहे कीं, पाश्चात्य वैद्यकाला रोगांचा आणि आनुवंशाचा संबंध फारसा कळलेला दिसत नाहीं. तें वैद्यक मुख्यतः परिस्थितीचा विचार करतें. रानटी पाश्चात्य जसजसे सुधारत जातील, जसजसें शास्त्रीय ज्ञान सुधारत जाईल तसतसें त्यांना याही स्थितीचें ज्ञान होईल. परंतु ज्या समाजामध्यें हें ज्ञान पूर्वींचेंच आहे, त्या समाजानें पाश्चात्यांच्या तोंडाकडे कां पहावें ही गोष्ट आमचे सुशिक्षित लोक आणि सुधारणाच जाणें ! आमच्या आर्यवैद्यकांतील ग्रंथांमध्यें अशा तऱ्हेच्या रोगांची यादीच दिलेली आढळते. आर्शस् या पदानें हे सर्व रोग असलेलीं घराणीं असा उपलक्षणात्मक अर्थ घ्यावयाचा आहे. वाग्भट[1] म्हणतो,

“ वातव्याध्यश्मरि कुष्टमेहोदरभगंदराः ।
अर्शांसि ग्रहणीत्यष्टौ महारोगाः प्रकीर्तिताः ॥ ”

यांतील प्रत्येक पदावर भाष्य करावयाचें तर तो एक वेगळा ग्रंथच होईल. आणि पुष्कळ वेळां आमच्या हातून अधिकाराचें अतिक्रमण होण्याचा संभव आहे. येथें एवढेंच सांगावयाचें कीं, वर जी आर्यवैद्यकानें यादी दिलेली आहे त्यामधील बहुतेक रोगांच्या आनुवंशिकत्वाबद्दल पाश्चात्यांची देखील खात्री पटत चालली आहे. एकच उदाहरण द्यावयाचें तर मेहाबद्दल देतां येईल. डॉ० गेट्स म्हणतो, ‘ मधुमेह हा रोग त्याच्या प्रत्यक्ष पद्धतीवरून आनुवंशिक आहे किंवा प्रत्यक्ष त्याच व्यक्तीनें संपादन केला

१ अष्टांगहृदय.

आहे ही गोष्ट ठरेल. परंतु मुख्यतः हा रोग आनुवंशिकच असतो '. ह्या रोगाचा संचार मेंडेलच्या प्रत्यक्ष गुणसंक्रमण पद्धतीनें ( dominant ) झालेला दिसून येतो. जे. पी. स्वाझं या नांवाच्या गृहस्थाच्या घराण्याचा अभ्यास करतां असें दिसून आलें कीं, हा रोग दोषी घराण्यांतील शेंकडा साठापेक्षां जास्त संततीला होता.

क्षयी—म्हणजे राजयक्ष्मादि क्षय ज्या घराण्यांमध्यें आहेत अशा तऱ्हेचें घराणें. क्षयरोग या विषयाचा गणितागत अभ्यास करणारे लेखक डॉ० पियरसन[1] व डॉ० गोरिंग[2] या दोघांनाही असें दिसून आलें कीं, हा विकार देखील प्राधान्यानें आनुवंशिक आहे. पियरसननें मुख्यतः आर्थिकदृष्ट्या सुखी घराण्यांचा अभ्यास केला, तर गोरिंगनें समाजांतील खालच्या थरांचा आणि गुन्हेगारांचा अभ्यास केला. परंतु दोघांचाही सिद्धांत निश्चित एकच कीं, हा रोग प्राधान्यानें आनुवंशिकच आहे. पियरसन म्हणतो, ' स्पर्शजन्यत्व हें जर या रोगाचें प्रधान कारण असेल तर पतिपत्नीमध्यें दिसून येणारें क्षयरोगाचें प्रमाण हें पितापुत्रामध्यें दिसून येणाऱ्या क्षयरोगाचे प्रमाणापेक्षां जास्त असावयास पाहिजे. परंतु अगदीं काटेकोर अभ्यास केला असतां असें दिसून आलें कीं, आईबापांचा मुलांवर परिणाम नवऱ्याचा बायकोवर जो परिणाम होतो त्याच्या दुप्पट प्रमाणांत झाला. हिंदुस्थानांतील अगर युरोपांतील पोटभरू डॉक्टर काय सांगतात आणि खरोखरच या बाबतींत स्थिति काय आहे आणि आजच्या पद्धतीनें समाज अधोगतीला कसे जात आहेत हें ज्याला पहावयाचें असेल, त्यांनीं या विषयावरील मूळ ग्रंथच वाचावयास पाहिजे. चॅटरटन[3] हिल म्हणतो, "हा रोग प्रत्यक्ष संक्रांत होत असो अगर नसो, या रोगाच्या प्रसाराला हितकारक अशी शरीरघटना ( constitution ) संक्रांत होते खास." प्रत्यक्ष रोग संक्रांत होतो म्हणा अगर तत्पोषक शारीरघटना संक्रांत होते म्हणा, परंतु ह्या रोगानें दूषित असलेलीं घराणीं विवाहाचे बाबतींत त्याज्य आहेत असें सांगणारा मनु चूक कसा ठरेल, याचा आम्हांला बोध होत नाहीं ! या रोगाचें

१ Tuberculosis, heredity and environment, by Pearson.
२ British Convict by Charles Goring.
३ Heredity and selection in sociology by C. Hill.

प्रमाण शुद्धवंशीय प्रजेपेक्षां संकर प्रजेंत जास्त असतें ही गोष्टही समाजसुधारकांनीं लक्षांत ठेवावयास पाहिजे. अशा तऱ्हेचे रोग वाढले तरी हरकत नाहीं, आम्ही जातिभेद मोडणारच असा ज्या महात्म्यांचा निश्चय झाला असेल, त्यांच्याकरितां अर्थातच ही चर्चा नाहीं !

**मंदाग्नीचा** रोग असलेलीं घराणीं : पचनशक्ति चांगली नसणें हें सर्व रोगांचें उगमस्थान आहे, ही गोष्ट कोणालाही विशद करून सांगावयास पाहिजे असें नाहीं.

**अपस्मारादि** ( epilepsy ) रोग असलेलीं घराणीं टाळावयास पाहिजेत. एवंच, मनूनें विवाहाला भरभराटलेलीं आणि श्रीमान् असून देखील त्याज्य मानावीं म्हणून जीं घराणीं सांगितलीं आहेत त्या बाबतींत त्यानें लिहिलेला प्रत्येक शब्द शास्त्रीय आहे, ही गोष्ट सहज सिद्ध होते असें दिसून येईल. मग विवाह करून आपल्या घरांत जी कन्या आणावयाची व जिच्या साहचर्यांत पुढें आपणांला भौतिक अमरत्व प्राप्त होणार : ‘ प्रजाभिरग्नेऽमृतत्वमश्याम् , ’ त्या कन्येच्या कुलगोताची माहिती मिळविली पाहिजे, या गोष्टीचा आपलें घराणें श्रेष्ठ व्हावें अशी ज्याला इच्छा असेल त्या पुरुषानें विचार करावयास नको असें म्हणतां येणार नाहीं असें आम्हांला वाटतें. परंतु धर्मपरिवर्तन होतें, आचार बदलतो अशा तऱ्हेचीं सर्वसाधारण विधानें पसरवितांना आम्हीं वर चर्चा केलेल्या बाबतींत धर्मपरिवर्तन करावें, आचार बदलावे असें वाटतें किंवा कसें याचा त्यांनीं जाहीर खुलासा करावा अशी आमची त्यांना हात जोडून विनंति आहे. प्रेम अगर शिक्षण[१] या दोनही प्रक्रियांनीं वरील आनुवंशाच्या बाबतींत एक काडीभर देखील फरक पडणार नाहीं, ही गोष्ट आम्ही विवाहेच्छु तरुणांना देखील हडसून खडसून बजावून ठेवतों. शास्त्रीय तऱ्हेनें ज्याची रचना करावयाची तो समाज प्रेमप्रधानविवाहयुक्त होणें शक्य नाहीं.

असो. अशा तऱ्हेनें जातीचा आणि घराण्याचा गुणदृष्ट्या विचार करून ग्राह्य घराणें कोणतें आणि अग्राह्य घराणें कोणतें या गोष्टींची माहिती

१ Heredity in the light of recent researches by Doncaster; Mendelism by Punnet.

३९ कन्येची ग्राह्या-ग्राह्यता

आर्यसमाजशास्त्रांच्या इतकी स्पष्ट तऱ्हेनें दिलेली दुसरीकडे कोठेंही आढळून येत नाहीं. याबरोबरच त्यांनीं स्वतः कन्येच्याही गुणांचा विचार केलेला आहे. येथेंही अरोगित्व आणि शिक्षण या दोहोंच्या बरोबर इतर बऱ्याच गोष्टींचा विचार केलेला दिसतो. आम्हीं शिक्षण शब्द आधुनिकदृष्ट्या समजतात त्या अर्थानें वापरलेला नाहीं. कारण आधुनिक शिक्षणानें स्त्रीचें विवाहयोग्य वय होऊन गेल्या-नंतर पुढें कित्येक वर्षें विवाह होत नसल्याकारणानें, तिच्या शारीर आणि मानस पिंडांत वेगवेगळ्या तऱ्हेच्या विकृति[१] झालेल्या असतात आणि तशा शारीर[२] आणि मानस पिंडाला पूर्ण सुखाची प्राप्ति होणें शक्य आहे असें मानणें, म्हणजे टोणग्याच्या आंचळापासून दूध काढण्याचा प्रयत्न करण्या-सारखें आहे. अलीकडच्या पद्धतींत तें सुख अनियंत्रित स्त्रीपुरुषसंभोगानें प्राप्त व्हावयाचें आहे. प्रयत्न बरा आहे, करून पहावा ! आम्हीं शिक्षण शब्दाचा अर्थ ‘जीवनार्थकलहामध्यें पतीला अनुसरून आपलें घराणें सुखांत असो अगर कष्टांत असो, तें टिकवून ठेवण्याची लायकी’ असा घेतलेला आहे. इतर व्यक्तिगुण कोणते टाळावे तेही पण मनूनें आपल्या ग्रंथांत दिलेले आहेत. त्या यादीमध्यें कांहीं प्रधान आणि कांहीं अप्रधान गुण आहेत, कांहींचा शास्त्रीय अर्थ बरोबर लागतो, तर कांहींचा अर्थ आम्हांला लागत नाहीं. ज्यांचा अर्थ आम्हांला लागत नाहीं, ते निरर्थक असावेत असें म्हणण्याइतका सुशिक्षितपणा आम्हांला आलेला नाहीं, ही गोष्ट आम्ही प्रांजलपणें कबूल करतों ! मनु म्हणतो,

“ नोद्वहेत्कपिलां कन्यां नाधिकांगीं न रोगिणीम् ।
नालोमिकां नातिलोमां न वाचाटां न पिंगलां ॥१॥
नर्क्षवृक्षनदीनाम्नीं नान्त्यपर्वतनामिकां ।
नपक्ष्यहि प्रेष्यनाम्नीं न च भीषणनामिकां ॥२॥
अव्यंगांगीं सौम्यनाम्नीं हंसवारणगामिनीं ।
तनुलोमकेशदशनां मृद्वंगीमुद्वहेत्स्त्रियम् ” ॥३॥

१. Norman Haire.

२ Physical disabilities in wives by Hamilton and Mac Gowan.

यांपैकीं दुसऱ्या श्लोकामध्यें नामासंबंधीं जी चर्चा केलेली आहे, त्यासंबंधीं आम्हांला कांहीं फारसा बोध होत नाहीं. त्यानें सांगितलेल्या तऱ्हेचीं नांवें घेऊन त्यांचा गणितागत पद्धतीनें अभ्यास केल्यास, त्यांतून कांहीं अनुमान निघाल्यास निघणें शक्य आहे. परंतु इतर सर्व पदें मात्र अर्थपूर्ण आहेत, मग तीं अलीकडील प्रेमशास्त्राला पटोत अगर न पटोत. कपिला म्हणजे कपिलकेशा, काळ्या केसांची असा अर्थ कुल्लूक भट्टानें केला आहे आणि तो बरोबर आहे. केसांचा रंग हा वंश दाखवितो असें म्हणतात. मनु हा भुऱ्या केसांच्या आर्यांकरितां मुख्यतः नियम सांगत असल्याकारणानें तो काळ्या केसाला आक्षेप घेतो. परंतु त्याचा अर्थ असा नाहीं कीं, काळ्या केसांच्या लोकांनींही काळ्या केसांची कन्या करूं नये. अधिकांगी स्त्री करूं नये; अधिकांगी म्हणजे शरीराचे कांहीं भाग जास्त अगर उपलक्षणेनें कांहीं भाग कमी असलेली. उदाहरणार्थ, हाताला अगर पायाला सहा सहा बोटें असणें अगर हाताच्या बोटांना पेरेंच कमी असणें. या सर्व स्थितींना इंग्रजीमध्यें "brachydactyly, lobster claw, polydactyly" वगैरे संज्ञा आहेत. हे सर्व विपरीत गुण आनुवंशिक आहेत, असें झाडून सर्व प्राणिशास्त्रज्ञांचें[१] मत आहे. घराण्यांमध्यें संचारी दोष कोणताही नाहीं असें जरी ठरलें, तरीही प्रत्यक्षतः ज्या व्यक्तीशीं विवाह करावयाचा ती व्यक्ति देखील असंचारी वैयक्तिक व्याधीनें पीडिलेली नसावी म्हणून मनूनें रोगिणी हें पद घातलेलें दिसतें. मनूच्या दृष्टीनें अति केसाळ आणि फारच कमी केस असलेली,[२] या दोन्ही कन्या त्याज्य दिसतात. या पदाच्या अर्थासंबंधीं आम्ही डॉ. सीझेर लोंब्रोसो वगैरे गुन्हेगारी शास्त्रावरील लेखकांचा हवाला देतों. जिज्ञासूंनीं त्यांनीं केलेली चर्चा जरूर वाचून पहावी. म्हणजे शास्त्रीयदृष्ट्या पहाणारा अशा तऱ्हेच्या कन्या अग्राह्यच मानील. फार बोलणें हें मेंदूच्या अस्थिर स्थितीचें लक्षण आहे, असें शास्त्रज्ञ समजतात. अव्यंगांगीं म्हणजे सर्व अवयव यथाप्रमाण असलेली. केस पातळ, दांत बारीक आणि मृदु शरीराची स्त्री असावी. शेवटच्या पदांचा अर्थ लावावयाचा तर कामशास्त्रांत फार खोल शिरावें

---

१ Heredity and Eugenics by Gates.

२ Criminal man by Lambroso; Criminal sociology by Ferri.

लागेल. तसें न करतां इतकेंच सांगावयाचें कीं, तीं लक्षणें असलेली स्त्री कामसुखाचे बाबतींत जास्त चांगली असते.

एवंच, विवाहाचे बाबतींत वंश अगर जाति, कुल आणि व्यक्ति या तीन गोष्टींचा विचार करावा लागतो. त्यामुळें विवाहाच्या बाबतींत वरिष्ठ कनिष्ठत्वाच्या दृष्टीनें अनंत प्रकार होतील.

**४० ग्राह्याग्राह्यतेचा निष्कर्ष**

कुलगुण आणि व्यक्तिगुण ह्या दोहोंमध्यें विकल्प आल्यास कुलगुण प्रधान आणि व्यक्तिगुण गौण. व्यक्तींत गुण नसून कुलांत गुण असल्यास ती व्यक्ति विवाहाला ग्राह्य. कारण, व्यक्तीच्या शरीरामध्यें कुलाचे श्रेष्ठगुण तिरोहित स्वरूपांत असून, ते व्यक्तीच्या संततीमध्यें संक्रांत होण्याचा संभव जास्त. व्यक्तींत गुण असून अगर दुर्गुण नसून जर कुलांत श्रेष्ठ गुण नसतील तरी ती व्यक्ति विवाहाला अग्राह्य. कारण त्या व्यक्तीच्या पिंडामध्यें त्या घराण्याचे दुर्गुण जे तिरोहित स्वरूपांत असतात ते, त्या व्यक्तीच्या संततीमध्यें संक्रांत होण्याचें निश्चित समजावें. ह्याच पद्धतीनें जाति व घराणें यांचा विचार समजावा. हलक्या घराण्यांत एकादी वरवर सोज्वळ दिसणारी व्यक्ति जन्माला येऊन जर त्या व्यक्तीचें लग्न श्रेष्ठ कुलांत झालें, तर ती व्यक्ति श्रेष्ठ घराणें अधोगतीला नेईल आणि त्याप्रमाणेंच हलक्या वंशामध्यें जर एखादें घराणें वरवर श्रेष्ठ दिसलें आणि त्यानें उच्च वंशांत समावेश करून घेतला, तर तें घराणेंही तेवढ्या प्रमाणांत त्या वंशाची अधोगति करील. शास्त्रीय पद्धतीवर जो समाज आपली रचना करूं इच्छितो, त्या समाजामध्यें, सुशिक्षित समाजामध्यें अलीकडे प्रेम वगैरे ज्या गोष्टी विवाहाला आधारभूत मानल्या जाऊं लागल्या आहेत, त्यांना मुळींच थारा मिळणार नाहीं. बरट्रँड रसेल[१] म्हणतो, ‘ शास्त्रीय पद्धतीनें जे समाज उत्पन्न करावयाचे त्या समाजांतील व्यक्तींना काव्य हे यांत्रिक ज्ञानापेक्षां श्रेष्ठ आणि प्रेम हें प्रत्यक्ष ज्ञानापेक्षां हितकारक वगैरे कल्पना उत्पन्न करूं दिल्या जाणार नाहींत. जर कोणा धाडसी व्यक्तीनें अशा कल्पना सांगितल्या तर त्याकडे दुर्लक्षच केलें जाईल. ’ डॉ. डेव्हनपोर्ट[२] म्हणतो, ‘ घटस्फोटांच्या अर्जांचा

---

१ Scientific outlook by Bertrand Russel.

२ Heredity in relation to Eugenics, by C. B. Davenport.

विचार करणारीं न्यायगृहें आणि कादंबऱ्या, नाटकें इत्यादि वाङ्मय यांमध्यें प्रधान मानलेलीं मातापित्यांचीं सुखदुःखें यांचा सुप्रजाजननाशीं कोणत्याही तऱ्हेचा संबंध पोहोंचत नाहीं. प्रेम हा विवाहाचा पाया असावा, अशा तऱ्हेचीं कांहीं विकृत मेंदूंच्या व्यक्तींनीं जीं मतें फैलाविलीं आहेत त्याबद्दल सुप्रजाजननशास्त्राला फक्त तिरस्कारच वाटतो. कादंबरीमध्यें विवाह हा, कामयाचनेची पूर्ति, म्हणून मानला जातो. कायद्यामध्यें विवाहाचा, वारसा ठरविण्याच्या दृष्टीनें विचार केला जातो. समाजामध्यें विवाहावरून घराण्यांची उच्चनीच स्थिति ठरत असते. परंतु सुप्रजाजननशास्त्राला मात्र विवाह म्हणजे पुढची पिढी काय स्वरूपाची होईल, हें दर्शविणारा प्रत्यक्ष प्रयोग आहे असेंच वाटतें. व्यक्तीमध्यें गुण असून कुलामध्यें गुण नसल्यास ती व्यक्ति अग्राह्य कां मानावी, याचा आणखी थोडासा खुलासा प्रत्यक्ष उदाहरणानें करूं. पिअरसन[1] म्हणतो, 'वाईट घराण्यामध्यें सन १६८० च्या सुमारास एक चांगली व्यक्ति निर्माण झाली, तिचा इतिहास मला माहीत आहे. त्या व्यक्तीला झालेल्या संततीचे पुष्कळ चांगल्या घराण्यांत विवाह झाले. ज्या धार्मिक संघामध्यें या व्यक्ति अंतर्भूत झाल्या होत्या, त्या संघाच्या दप्तरीं सरासरी दीडशें वर्षेंपर्यंत या घराण्यांचा इतिहास नमूद केलेला आढळतो. तेथें प्रत्येक ठिकाणीं एकच तऱ्हेचा परिणाम दिसून येतो. तो परिणाम म्हणजे दर पिढीला दारुबाजी, वेड लागणें, शारीरिक दुर्बलता वगैरे दोषांनीं मित्रांना आणि नातलगांना भारभूत होणारी संतति सर्व ठिकाणीं सारख्याच प्रमाणांत उत्पन्न झाली.' हलक्या कुलामध्यें एकाद्या वेळीं तिरोहित दुर्गुणांनीं युक्त परंतु वरवर श्रेष्ठ दिसणारी व्यक्ति जन्माला येईल किंवा कित्येक वेळां अगदीं फारच काळजीनें शिक्षण दिल्यास व्यक्तींतील समाजविरोधी गुण लुप्त होतील. परंतु त्या व्यक्तीच्या संततीमध्यें जुने दोष पुन्हां पुन्हा अगदीं पूर्वीच्या प्रमाणांत उद्भूत झालेले दिसतील. हा आनुवंशाचा नियम इतर शास्त्रांतील नियम जितपत अढळ आहेत, तितपत अढळ आहे ही गोष्ट एकदां आपल्या लक्षांत आली म्हणजे मग समाजनेते अधोगामी प्रजा होऊं नये म्हणून विवाहाचे नियम बांधून देतील आणि ते व्यक्तीनें पाळावयास पाहिजेत. या बाबतींत स्वातंत्र्य देऊन वाटेल त्या तऱ्हेची प्रजा

१ National life from the standpoint of science by Pearson.

पुढील पिढींत ठेवण्याचा हक्क व्यक्तीला असूं शकणार नाहीं.

येथपर्यंत विवाहेच्छु व्यक्ति आणि त्या घराण्यांतील व्यक्ती यांचे बाबतींत विचार झाला. परंतु हें घराणें देखील कोठलें असावें याचा आतां विचार करूं. कोणत्याही दोन श्रेष्ठ गुणयुक्त

४१ गटांचा [illegible] घराणीं घेऊन त्यांचे विवाह केल्यास प्रजा श्रेष्ठ गुणयुक्त होईलच असें नक्की सांगतां येणार नाहीं. परंतु, कनिष्ठ गुणयुक्त होईल ही गोष्ट मात्र नक्की सांगतां येते. समजा, हिंदुस्थानांतील एक श्रेष्ठ घराणें आणि युरोपांतील एक श्रेष्ठ घराणें घेऊं. त्यांच्यामध्यें विवाह घडवून आणल्यास चांगली प्रजा उत्पन्न होईल काय? यासंबंधीं शास्त्राचें काय मत आहे? म्हणजे कुटुंबसमुदाय जो जाति तो कुटुंबसमुदाय कोणता घेणें हितकारक आहे असें शास्त्रें सांगतात? दुसरें उदाहरण घ्यावयाचें तर मध्यप्रांतातील नेहरू वगैरे ब्राह्मण घराण्यांनीं महाराष्ट्रांतील चित्पावन वगैरे ब्राह्मणांशीं विवाह करणें हितकारक होईल काय? भौगोलिक, सामाजिक, आर्थिक, धंदाविषयक वगैरे बाबतींतील वैषम्य जें दोन विवाहेच्छु व्यक्तींच्या मार्गांत आडवें येतें त्यासंबंधीं शास्त्र काय व्यवस्था करतें? हे प्रश्न आपणाला वाटतात तितके सोपे नाहींत. असेच गट कां पडले आणि पाडले अशा तऱ्हेचे प्रश्न कोणाही व्यक्तीनें उत्पन्न करावयाचे नसतात[१]. येथें मुख्य प्रश्न असा आहे कीं, आज जे गट ज्या नांवांनीं एकरूप मानले जातात त्या गटांनी विवाहानें म्हणजे आनुवंशानें सरमिसळ करावी किंवा काय असा आहे. हा प्रश्न प्रत्यक्ष प्रयोग करून, त्याचे परिणाम पाहून ठरवावयाचा असें म्हणूं तरी ती पद्धति फारच धोक्याची आहे. कारण, प्रयोगाचें फल हितकारकच होईल असें आधींपासून निश्चित सांगतां येणार नाहीं. सर्वसाधारणत: आनुवंशिक गुणसंक्रमणाचे नियम पाहिले तर ते अशा सरमिसळीला पोषक नाहींत. एका ठिकाणीं अभ्यास करून विद्वानांनीं काढलेलीं अनुमानें दुसऱ्या ठिकाणीं लागू पडतील किंवा नाहीं याची वानवाच. परंतु या विषयाचा अवघडपणा नजरेस आणून देण्याकरितां त्यांपैकीं कांहीं अभ्यासावरून

---

१ Scientific outlook by Bertrand Russel.

निघणारीं अनुमानें पुढें देतों. हॅवेलॉक[१] एलिसनें आयरिश, स्कॉच, इंग्लिश आणि वेल्श या वरवर एक दिसणाऱ्या आणि देशभेदावरून वेगवेगळी पोथीजात नांवें पडलेल्या चार गटांतील संकरांचा अभ्यास केला आहे. या चार गटांपैकीं देखील स्कॉच हा गट इंग्लिश या गटाला, आयरिश आणि वेल्श या गटांपेक्षां जास्त जवळचा आहे. यांचे विवाह झाल्यास अलीकडील सुशिक्षित पद्धतीनें पाहिलें तर स्कॉच व इंग्लिश यांच्या विवाहापासून होणारी प्रजा जास्त कर्तृत्ववान व्हावयास पाहिजे. परंतु प्रत्यक्ष अभ्यास करतांना असें आढळून आलें कीं, इंग्लिश आणि स्कॉच या दोन गटांमध्यें संख्येच्या दृष्टीनें जरी पुष्कळसे मिश्रविवाह होत असले तरी कर्तृत्वाच्या दृष्टीनें असल्या विवाहांपासून झालेली संतति फारच हलक्या दर्जाची ठरते. निव्वळ स्कॉच वंशामध्यें ज्या प्रमाणांत श्रेष्ठ गुण दिसून येतात, त्या प्रमाणांत या संकरामध्यें कोणतेच समाजपोषक गुण असलेले दिसून येत नाहींत. उलट पाहिलें तर इंग्लिश-आयरिश संकर प्रजेच्या दृष्टीनें तितके वाईट ठरत नाहींत. मग प्रश्न असा येतो कीं, शुद्ध स्कॉच वंश कर्तृत्ववान, शुद्ध इंग्रज वंश तितकाच कर्तृत्ववान. दोन्हीही रक्तानें फार दूरचे नव्हेत. हीं सर्व साधनें असतांना, पोटजातींनें अगर उपवंशांनें एकीकरण करून सबंध ग्रेटब्रिटन एकवंशीय करून त्याची संघटना करण्याची ही एक सोपी सोय असतांना, संकरप्रजा नाकर्ती होते असें उत्तर हॅवेलाक एलिसनें कां काढलें ? अशी प्रजा नाकर्ती झाली खरी. त्याचप्रमाणें इंग्लिश व यूरोपांतील इतर गट यांच्यामध्यें झालेल्या संकरांचा विचार करतां त्या गृहस्थाला असें दिसून आलें कीं, ‘ इंग्लिश आणि फ्रेंच या दोन गटांमध्यें झालेले संकर जास्त फलदायी झाले. त्यानें इंग्लंडमधील वेगवेगळे परगणे घेऊन त्यांचा देखील अभ्यास केला आहे. ती चर्चा आमच्या समाजांत जे कोणी वैवाहिक बाबतींत सुधारणा करूं इच्छितात त्यांना अभ्यास करावयाची इच्छा असल्यास अभ्यास करावयाची पद्धति या दृष्टीनें फारच बोधकारक होईल. परंतु तशी कांहींही इच्छा नसून नुसतीच समाजसुधारणा करावयाची असल्यास तो प्रश्न फारच वेगळा आहे.

---

१ A study of British genius by Havelock Ellis.

२ Genetical theory of natural selection by R. A. Fisher.

भौगोलिक अडचणींचें तसेंच आहे. भौगोलिकदृष्ट्या विचार करूं लागलें, तर एका अक्षांशांत राहणाऱ्या व्यक्तींच्या शुक्रबिंदूंतील जीवनगोलकांची ( genes ) निवड ज्या तऱ्हेनें होईल, त्याच तऱ्हेनें दुसऱ्या अक्षांशांत राहणाऱ्या व्यक्तींच्या जीवनगोलकांची निवड होत जाईल असें नव्हे. समजा, आपण जाति अशी घेऊं कीं, तिच्या दोन शाखा पृथ्वीवरील अगदीं परस्परविरुद्ध अशा ठिकाणीं वसती करून राहिल्या आहेत आणि दोनही ठिकाणीं जीवनार्थकलह आणि त्यामुळें प्रजेची निवड परस्परविरुद्ध स्थितींत चालली आहे. कांहीं जीवनगोलक जे परस्परांशीं असहकारी स्थितींत ( alternative ) असतात, त्यांपैकीं एकाची निवड एका क्षेत्रांत होईल आणि दुसऱ्याची निवड दुसऱ्या क्षेत्रांत होईल. म्हणजे जो गुण पहिल्या ठिकाणीं वाढत जाईल, तो गुण दुसऱ्या ठिकाणीं कमी होत जाईल आणि उलट जो पहिल्या ठिकाणीं कमी होत जाईल, तो गुण दुसऱ्या ठिकाणीं वाढत जाईल. या अत्यंत वेगळ्या तऱ्हेनें निवड होत गेलेल्या दोन जातींमध्यें वांशिक साम्य असूं शकेल काय ? तिर्यक् योनींतील अगदीं सोपें उदाहरण द्यावयाचें तर समजा कीं, एकच सशाची जात उष्ण आणि शीतकटिबंधांत वाढली गेली. शीतकटिबंधांत जगत् बर्फाच्छादित असल्याकारणानें तेथें पांढऱ्या स्वच्छ रंगांच्या सशांची निवड होऊन दुसऱ्या कोणत्याही रंगाचे ससे मारले जातील. येथें पांढऱ्या रंगाच्या जीवनगोलकांची सारखी निवड होत जाऊन सर्व सशांची प्रजा हळूहळू पांढऱ्या रंगाचे बावतींतच शुद्ध होत जाईल. या प्रजेची इतर प्रजेशीं मिसळ झाली तरी पुन्हां पांढरा आणि इतर रंगही अशुद्ध होत जातील. ह्याच नियम मानवी वंशांतही लागू आहे. म्हणून दोन वंश फार काळ अशा स्थितींत राहिल्यास या दोन वंशांमध्यें जीवनगोलकांच्या दृष्टीनें जास्त जास्तच वैधर्म्य वाढत जाऊन दोन्हीही आनुवंशाच्या दृष्टीनें विभक्त होत जातील. म्हणून आम्ही म्हणतों कीं, भौगोलिक फरक हे विवाहाचा विचार करतांना लक्षांत घ्यावयास पाहिजेत. मग आमच्या जहाल सुधारक बंधूंना कांहीं वाटो !

सामाजिक अडचणी येतात असें जे म्हणतात, त्यांचा मुद्दाच आमच्या फारसा लक्षांत येत नाहीं. कोणत्याही गटांतून बाहेर फुटून जाणारे लोक दोन तऱ्हेचे असतात. एक म्हणजे गटांतील श्रेष्ठ पुरुष वरच्या गटांत जाऊं

इच्छितील, अगर गटांतील फार हलके लोक त्याहून खालच्या गटांत जाऊं इच्छितील. या दोनही तऱ्हेचे लोक समाजांत फारच थोडे असतात. ही स्थिति जातियुक्त अगर जातिहीन दोनही तऱ्हेच्या समाजांत असते. हे थोडे लोक खालून वर गेले अगर वरून खालीं गेले तरी सर्वसाधारण समाचाचा तादृश फायदा असा कांहींच नसतो. समाजांतील खालच्या वर्गांतील पुरुष उच्च वर्गांत प्रविष्ट झाल्यास त्याचा निर्वंश होतो, ही गोष्ट आम्हीं दाखविलीच आहे.[1] या स्थितीलाच हिंदूंच्या परिभाषेंत बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, प्रतिलोम संकर हे समाजशास्त्रदृष्ट्या त्याज्य आहेत. उच्चवर्णीय लोकांनीं हीनवर्णीय स्त्रियांशीं केलेल्या विवाहांचा प्रत्यक्ष पद्धतीनें केलेला अभ्यास कोठें उपलब्ध आहे असें वाटत नाहीं. परंतु तसा उपलब्ध होईपर्यंत त्या बाबतींत निश्चय करणें इष्ट नाहीं. आर्य-वाङ्मयाच्या दृष्टीनें विचार केल्यास अनुलोम संकरांपासून, केव्हां केव्हां श्रेष्ठ प्रजा उत्पन्न होईल असें मानण्याकडे प्राचीनांचा कल दिसतो असें दिसून येईल. मनु म्हणतो,

> " अनार्यायां समुत्पन्नो ब्राह्मणात्तु यदृच्छया ।
> ब्राह्मण्यामप्यनार्यात्तु श्रेयस्त्वं केतिचेद्भवेत् ॥
> जातो नार्यामनार्यायां आर्यादार्यो भवेद्गुणैः ।
> जातोऽप्यनार्यादार्यायामनार्य इति निश्चयः ॥ "

वरिष्ठ पुरुषानें कनिष्ठ स्त्रीशीं संबंध केल्यास कित्येक वेळां संतति चांगली होऊं शकेल. परंतु कनिष्ठ पुरुषानें वरिष्ठ स्त्रीशीं संबंध केल्यास संतति निश्चित वाईटच होणार असें मनु म्हणतो. अशा तऱ्हेचे विचार डॉ. सी. बी. डेव्हनपोर्ट[2] यानें प्रदर्शित केलेले आहेत. परंतु त्यांचा अभ्यास केल्या-शिवाय मत देणें बरें नव्हे !

हिंदुसमाजाचे बाबतींत सामाजिक अडचणींचा विचार करावयाचा असें ठरविलें, तर पुष्कळच भानगडी उत्पन्न होतात. हिंदुसमाजामध्यें फक्त वरचा वर्ग आणि खालचा वर्ग या बाबतचा प्रश्न नसून, ते वर्ग पुन्हां आनुवं-

१ Task of social hygiene by Havelock Ellis.
२ Heredity in relation to eugonics by Davenport.

शिक अशा जातींमध्यें विभागले गेलेले आहेत. अशा विभागणीमध्यें धर्मशास्त्रज्ञांचा कांहींतरी हेतु असून तो त्या पद्धतीनें सिद्ध होत असेल तर तो समाज पूर्ण शास्त्रीय आहे असें मानणें भाग आहे. रसेल म्हणतो, ' एकाद्या तऱ्हेचा विशिष्ट हेतु मनांत ठेवून त्या हेतूच्या सिद्धीकरतां विवक्षित घटना ( Structure ) ज्या समाजांत बुद्धिपुरःसर घडवून आणली गेलेली असेल, त्याच समाजाला शास्त्रीयसमाज असें नांव देतां येईल. ' या पद्धतीलाच आमच्या समाजाची काळजी घेणारे राष्ट्रवीर पोथीजात समाज असें म्हणतात. आज त्या समाजांत ढवळाढवळ करावयास सांगावयाची, तर हिंदुसमाजघटनेला कांहीं ध्येय नाहीं अगर तें ध्येय त्या रचनेच्या हातून सिद्ध होत नाहीं, या दोहोंपैकीं एक कोणतातरी विकल्प सिद्ध करावयास पाहिजे. प्रथमतः कोठल्याही समाजाचे चार थर पडतात असें मानल्यास, डॉ. हर्स्टच्या मतानें मध्यम आणि हलके असे जे नव्वद टक्के लोक त्यांना आपण शूद्र या समुच्चयात्मक नांवानें संबोधूं. परंतु हाही सर्व वर्ग कांहीं एकरूप नव्हे. त्या वर्गामध्यें देखील अधरोत्तर व्यक्ती आहेतच. बाकी उरलेले जे दहा टक्के लोक ते बुद्धिवैशिष्ट्याच्या चढउतारीनें मुख्यतः तीन वर्गांत विभागले जातील. त्या वर्गांमध्येंही पुन्हा बऱ्याच आंतरजाती येतील. या चार थरांच जातिहीन समाजामध्यें शारीरशक्तीनें काम करणारा वर्ग, (Manual labourer) कलाकौशल्याचीं कामें करणारा वर्ग, (skilled Craftsman) भांडवलवाला वर्ग ( Capitalist ) आणि बुद्धिजीवि वर्ग ( professional classes ) अशीं नांवें देतात. त्याच थरांना थोड्याशा फरकानें हिंदूंच्या समाजरचनेमध्यें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि अतिशूद्र अशीं नांवें दिलेलीं आहेत. परंतु थरामध्यें पुन्हा पोटजाति नांवाचे बारीक बारीक संघ उत्पन्न झालेले दिसून येतात.

या संघासंबंधीं म्हणजे जातिभेदासंबंधीं प्राणिशास्त्राच्या आणि आनुवंशाच्या ज्ञानाच्या अभावीं पौर्वात्य आणि पाश्चात्य लेखकांकडून इतकें पांढऱ्यावर काळें केलें गेलेलें आहे कीं, त्या गोंधळांतून कांहीं निष्कर्ष निघेल असें आम्हांस वाटत नाहीं. जीवशास्त्रदृष्ट्या सजाति आणि विजाति गट कसे

१ Scientific outlook by Russel.

तयार होतात, ती पद्धति आम्हीं पूर्वी सांगितलीच[१] आहे. आजपर्यंत जातिभेदासंबंधीं काय काय कल्पना प्रसृत केल्या गेल्या आहेत, त्याचें विस्तृत परीक्षण जातिभेदप्रकरणीं करूं. येथें एकवर्णीय परंतु भिन्नजातीय असलेल्या गटांमध्यें मिश्रविवाह करण्याचें ठरविल्यास काय काय गोष्टींचा विचार करावयास पाहिजे तें पाहूं.

**४२ एकीकरणाचें पुढें आलेले हेतू आणि त्यांचें खंडन**

या पोटजातींचें एकीकरण करण्याचे बाबतींत पुढील प्रश्नांचा विचार करावा लागेल : (१) आज ज्यांची एकवर्णीय म्हणून परिगणना होते त्या भिन्नजाती कधींकाळीं एक वंशांतर्गत होत्या काय ? (२) त्या भिन्नजाति एकवंशिय असतील तर त्यांचें विभक्तीकरण काय तत्त्वावर झालें, कोणत्या काळीं झालें, त्यानंतर किती पिढ्या होऊन गेल्या, त्या पिढ्या झाल्यानंतरही ते समानवंशीय रहातात किंवा एकाच वंशाचे उपवंश होतात, त्यांच्या जीवनगोलकांची निवड काय पद्धतीनें होत गेली, या सर्व मुद्यांचा विचार करणें भाग पडेल. (३) त्या जाति जर मुळांतच एकवंशीय नसतील तर ही भिन्नवंशीय प्रजा काय कारणानें एका गटांत अंतर्भूत झाली आणि तीं कारणें त्यांना एकवंशीय बनविण्यास समर्थ आहेत काय ? त्या संस्कृतीनें तरी समान झाल्या असतील अगर एकाच रूपाचे धंदे करूं लागल्या म्हणून तरी समान झाल्या असतील ?

समाजसुधारक नांवाचा जो प्राणीवर्ग हिंदुसमाजांत उत्पन्न झालेला आहे, त्याचें म्हणणें असें कीं, हे गट पूर्वी एकरूप असून वेगवेगळ्या अनेक कारणास्तव विभिन्न झाले. एक शास्त्रीबोवा[२] सांगतात कीं, ' आचार, व्यवसाय, आहार, उपास्य, क्रांति, उत्पात अशा अनेक कारणांनीं जाति बनतात. एका मुख्य जातीमध्यें अनेक पोटजातीही आहेत. ' शास्त्रीबोवांच्या मतानें त्यांनीं जी कारणपरंपरा सांगितली त्या परंपरेच्या अनुरोधानें मुख्य जाति बनतात. मग त्या जातींत पोटजाति काय करणानें उत्पन्न झाल्या, याचा खुलासा

१ Evolution by J. P. Lotsy.

२ धर्मशास्त्रमंथन– दिवेकर.

शास्त्रीबोवांनीं दुसरें एकादें मंथन प्रसिद्ध करून करावा. असो ! या सर्व लोकांचा मुख्य मुद्दा असा कीं, पूर्वीं जे एक होते त्यांनीं पुन्हां एक होण्याला हरकत काय म्हणून असावी ? मानवेतर जातींत जो कांहीं प्रकार दिसतो त्यावरून त्यांच्या एकीकरणाला सृष्टीचा विरोध आहे खास ! कुत्रा हा लांडग्याच्या वंशांतील आहे असें प्राणिशास्त्रज्ञ म्हणतात. परंतु पूर्वीं एकवंशीय असलेला कुत्रा व लांडगा यांचें एकीकरण करण्याचा सृष्टींत प्रयत्न झालेला दिसत नाहीं ! महाराष्ट्रापुरतें पाहिलें तरी महाराष्ट्रांत आज ब्राह्मण या नांवानें ओळखिल्या जाणाऱ्या ज्या देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे, देवरुखे, सारस्वत— आणि सारस्वतांचे विविध भेद या प्रमुख जाति, त्या मूलतः एकवंशीय होत्या असा कांहीं शोध आजच्या सुधारकांनीं लाविला आहे काय ? ही गोष्ट दाखविणें अशक्य आहे असें आमचें स्पष्ट मत आहे. परंतु 'तुष्यतु दुर्जनः' न्यायानें ह्या एकवंशीय मानल्या तरीही त्यांच्यांतील जीवनगोलकांची निवड कोणत्या तऱ्हेनें झाली हें पहावयास पाहिजे. चित्पावन कोंकणस्थ ही जाति घेतल्यास असें दिसून येईल कीं, मत्स्यपुराणकाळीं म्हणजे सरासरी पंधराशें वर्षांपूर्वीं या जातीची वेगळी परिगणना झालेली होती. म्हणजे त्या जातीची आज जवळजवळ पन्नास पिढ्या एका पद्धतीनें निवड होत चालली आहे. आज पाहिलें तर हा वर्ग बुद्धि या गुणाला शुद्ध होत चालला आहे. सर्वसाधारण विद्वत्ता ( Scholarship ) अगर बुद्धीची तीव्रता हा गुण आनुवंशिक[1] आहे. अशा घराण्यांचा अभ्यास झाला पाहिजे. याचा अर्थ असा कीं, सर्वसाधारण समाजामध्यें बुद्धिमंतांचें जें प्रमाण पडेल त्यापेक्षां या जातिमध्यें जास्त प्रमाण पडावयास पाहिजे. आजपर्यंत जगामध्यें श्रेष्ठ पुरुषांची सर्वांत जास्त शेंकडेवारी राजघराण्यांत पडत असे, असें डॉ. हर्स्ट, डॉ. वुड[2] वगैरेंचें मत आहे. डॉ. हर्स्टच्या मतानें राजघराण्यांत शेंकडा बत्तीस हे सर्वसाधारण समाजापेक्षां श्रेष्ठ असे पुरुष निर्माण होण्याचें प्रमाण पडतें. कोंकणस्थ जातीचा गणितागत पद्धतीनें अभ्यास केल्यास बुद्धिमंतांची प्रमाणवारी इतपत पडेल असें आम्हांला वाटतें. ही गोष्ट

---

१ Eugenics by Dean Inge; Hereditary genius by Sir Francis Galton.

२ Heredity in Royalty.

चित्पावन ब्राह्मणांच्या बाबतींत खरी नाहीं, असें त्या वर्गाचे शत्रू देखील म्हणतीलसें आम्हांला वाटत नाहीं. दुसरा तत्समान मानला गेलेला वर्ग म्हणजे अनेक शाखानुयायी देशस्थ वर्ग हा होय. त्या वर्गाची निवड मुख्यतः खानदानी या शब्दानें जे सामाजिक गुण प्रतीत होतात त्या गुणाला झालेली दिसते. अशा तऱ्हेनें जे हे वर्ग वेगळे झाले आहेत, त्या वर्गाचें एकीकरण केल्यास हिंदुसमाज संघटित होईल, असें कित्येकांचें म्हणणें आहे !

यांचें एकीकरण करावयाचें तर मुख्यतः दोन प्रश्नांचा विचार करावा लागेल. ( १ ) ह्या जाति आतां उपवंश झाल्या आहेत काय ? ( २ ) यांच्या एकीकरणानें आज आहे त्यापेक्षां समाजाची स्थिति जास्त चांगली होईल काय ? अलीकडे कोणताही फरक होत असेल तर त्या स्थितीला चांगली स्थिति असें म्हणण्याची जी प्रवृत्ति पडत चालली आहे ती अत्यंत घातुक आहे. सजाति आणि विजाति कशा बनत जातात, यांचे जे नियम आम्हीं पूर्वी दिलेले आहेत, त्यावरून आमचें स्वतःचें मत असें झालेलें आहे कीं, या सर्व जाति उपवंशच होत. उपवंशाचा आंकडा किती असावा यासंबंधानें कांहीं एक मर्यादा सृष्टीनें घालून दिल्याचें आमच्या आढळांत नाहीं. आंतरजातीय विवाह होणें इष्ट आहे असें म्हणणाऱ्या वर्गाकडून त्या वर्गाच्या मतानें इष्ट फळकशास्त्र म्हणावें पण तें आंतरजातीय विवाहानें कसें घडून येईल, या गोष्टीचा खुलासा मात्र होत नाहीं ! येथें प्रश्न असा आहे कीं, समाजामध्यें वर्गवारी असावी किंवा नाहीं ? आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे कीं, समाजाची पहिली गरज म्हणजे व्यवस्था आणि वर्गवारी हीच आहे. अशी कांहींना कांहीं तरी तत्त्वावर वर्गवारी असावयास पाहिजे असें पाश्चात्य लेखकांचें देखील आतां मत बनत [१]चाललें आहे. इतर प्राणिवर्गाची ज्याप्रमाणें अभ्यासू विद्वानांकडून विभागणी केली जाते, त्याप्रमाणें या बाबतींत विभागणी सांकेतिक तत्त्वावर होणार आणि पुढें तीच विभागणी कांहीं पिढ्या गेल्यानंतर स्थिर होणार. कांहींतरी निश्चित संकेत ( arbitrary ) धरूनच विभागणी करावयास पाहिजे, असें मत बॅच कॉक आणि क्रॉसेन यांनीं दिलेलें

---

१ Need for eugonic roform by Darwin, Scientific outlook by Russel; An introduction to the study of horedity by Walker; Segragation of the fit by R. Austin Freeman.

आहे. ते ग्रंथकार म्हणतात, 'सुरवातीसच हें सांगून ठेविलें पाहिजे कीं, संकरापासून उत्पन्न होणारी नापीकता ही पूर्ण नापीकतेपासून पूर्ण सुपीकते-पर्यंत सर्व स्वरूपाची असते' म्हणून ही गोष्ट लक्षांत येईल कीं, नापीकता उत्पन्न होणें अगर न होणें हें तत्त्व जातींना विभागणीचें साधन म्हणून लावतां येत नाहीं. म्हणून कांहींतरी पोथीजात विभागणीचें तत्त्व उत्पन्न करावें लागतें. ( But an arbitrary one must be erected )[१] अशा तऱ्हेनें पहातां दिसून येईल कीं, जाति उत्पन्न करणें सामाजिकदृष्ट्या हित-कारक आहे. हें तत्त्व माहीत असून देखील ते जातिसंघटित समाज बनवि-ण्याला—आमच्या इकडील सुधारकांप्रमाणेंच—काय पोरकट तत्त्वांवर विरोध करतात, हें पाहिलें म्हणजे मनुष्यप्राण्याच्या दुराग्रही स्वभावाबद्दल कौतुक वाटल्याशिवाय रहात नाहीं !

जर कांहीं निवडक व्यक्तींचा संघ इतर सर्वसाधारण लोकसंख्येपासून विभक्त[३] केला आणि त्यांची विवाहपद्धतीनें बद्ध अशी सुप्रजायुक्त जाति बन-विली, तर पिढ्यानुपिढ्या त्या जातींमध्यें इतर सर्वसाधारण समाजाच्या मानानें श्रेष्ठत्व राखतां येईल यांत कांहीं संशय नाहीं. या जातीमध्यें निपज-णाऱ्यांत खरोखर बुद्धिमंतांची आणि कर्तृत्ववानांची शेंकडेंवारी जास्त राहून त्यामुळें समजाची बौद्धिक आणि नैतिक प्रगति फार झपाट्यानें होईल. अशा तऱ्हेनें जास्त लायक लोक एका बाजूला निवडून काढले म्हणजे अर्थातच कमी लायक आपोआप वेगळे पडतील. अशा तऱ्हेनें विभागणीच्या मूल-तत्त्वावर एक सुप्रजायुक्त जाति उत्पन्न करणें जर फायदेशीर असेल, तर त्याच तत्त्वावर प्राणिशास्त्र, कामशास्त्र, अर्थशास्त्र, सुप्रजाशास्त्र, वगैरेंनीं घालून दिलेल्या मर्यादा पाळून हिंदूंच्यासारखा जातियुक्त समाज कां करूं नये, हें आम्हांला तरी समजत नाहीं. असा समाज झाल्यानंतर प्रकृष्ट गटांना असे धंदे लावून द्यावयाचे कीं, दर पिढीला त्यांची संख्या वाढत जाईल आणि निकृष्ट गटांना असे धंदे लावून द्यावयाचे कीं, दर पिढीला त्यांची संख्या कमी होत जाईल. अशा तऱ्हेनें समाजाच्या दोनही टोकांशीं सुप्रजा

१ Genetics by Babcock and Clausen.

२ Need for eugenic reform by Major Darwin.

३ Ibid.

जननशास्त्राचा दोन तऱ्हेनें उपयोग केल्यास समाज हळूहळू सुधारत जाईल, परंतु ही गोष्ट झटपट होणारी नव्हे.

जातिभेदाच्या विरुद्ध हिंदुस्थानांतील समाजसुधारक आणि ख्रिस्ती परंपरेंत वाढलेला पाश्चात्य लेखकवर्ग यांच्याकडून जे कांहीं आक्षेप पुढें केले जातात त्यांचें क्रमशः परीक्षण करतों.

( १ ) अशा तऱ्हेच्या सुप्रजाशास्त्राच्या तत्त्वावर जाति निर्माण करावयाच्या तर त्या जातींतील तरुण पुरुषांना आणि स्त्रियांना, इतर जातींतील तरुण पुरुष आणि स्त्रिया यांच्यापासून विभक्त करावें लागेल; तरच त्यांचे आपआपसांत होणारे विवाह थांबतील. असें झालें म्हणजे इतर गटांतील व्यक्तींना त्या गटांत प्रवेश करतां येणार नाहीं. नाहींतर आमच्या समाजांतील वर्णांतरवादी पंडीत म्हणतात त्याप्रमाणें इतर गटांतील कांहीं निवडक व्यक्तींना या गटांत प्रवेश करूं द्यावा लागेल. परंतु येथें प्रेम आणि पक्षपात या दोन वृत्तींमुळें घोंटाळा उत्पन्न होईल. पुष्कळ वेळां त्या जातींत रहाण्याला नालायक असलेल्या व्यक्तींना प्रेमामुळें घालवून दिलें जाणार नाहीं आणि पक्षपातामुळें इतर व्यक्तींचा प्रवेश त्या जातीमध्यें होऊं दिला जाणार नाहीं. एका जातींतील व्यक्तींनीं विवाहाच्या बाबतींत दुसऱ्या जातींत प्रवेश कां करूं नये, याचें दिग्दर्शन त्रोटक रीतीनें आम्हीं पूर्वी केलेंच आहे. तें सविस्तर रीतीनें पुढें करूं. जी गोष्ट मुळीं घडूंच नये त्या बाबतींत प्रेम तरी कशाचें आणि पक्षपात तरी कशाचा ? खरोखर निसर्गतः जात्यंतराचा प्रश्न खालील थरांतील व्यक्ति ज्या वेळीं आपल्या कर्तृत्वानें वरच्या थरांत जाऊं इच्छिते अगर वरच्या थरांतील व्यक्ति आपल्या नाकर्तेपणामुळें अवर संस्कृतीचा स्वीकार करूं इच्छिते, त्या वेळींच उत्पन्न होतो. एकाच थरांतील दोन जातींतील व्यक्तींना आपली जाति सोडून तत्समान दुसऱ्या जातींत प्रवेश करून कांहींच फायदा नसल्याकारणानें, तसें करण्याची जरूर सहसा व्यक्तींना भासत नाहीं. अर्थात् प्रेमशास्त्र हें आहेच. परंतु प्रेम नांवाच्या मानवी मेंदूत किंचित्काळ येणाऱ्या वेडाच्या लहरीखातर समाजरचना बदलण्याचें कांहींच कारण नाहीं. रसेल[१] म्हणतो, 'शास्त्रीय

१ Scientific outlook by Bertrand Russel.

पद्धतीवर उभारलेल्या समाजामध्यें काव्य हें यंत्रशक्तिइतकेंच महत्त्वाचें आणि प्रेम हें शास्त्रीय शोधाइतकेंच महत्त्वाचें, अशा कल्पनांना थारा देतां येणार नाहीं. कोणा एकाद्या धाडशी व्यक्तीनें अशा कल्पना सांगण्यास सुरुवात केली, तर त्या बडबडीकडे दुर्लक्ष केलें जाईल.' दुसरा मुद्दा जो तरुणतरुणींना एकमेकांपासून दूर ठेविलें पाहिजे हा, त्यासंबंधीं इतकेंच सांगावयाचें कीं, ही गोष्ट पाश्चात्य लेखकांना वाटतें तितकी अवघड नाहीं. हीच गोष्ट हिंदुस्थानांतील जातिभेदानें प्रत्येक हिंदु व्यक्तीच्या अंतःकरणांत बाणवून त्या व्यक्तीकडून दुसरें कोणतेंही बंधन न ठेवतां आचरणांतही आणविली आहे. याकरतांच कमीअधिक प्रमाणांत नित्य आणि नैमित्तिक अस्पृश्यताही पण समाजांत रूढमूल झालेली आहे आणि याच्याच अनेक कारणांपैकीं बालविवाहाचें अस्तित्व हेंही पण एक कारण आहे.[१]

( २ ) जर या जातींतील उत्पादन इतर जातींत होणाऱ्या उत्पादनापेक्षां जास्त झपाट्यानें होईल, तर ती स्थिति हितकारक ठरेल यांत कांहीं शंका नाहीं. परंतु ती गोष्ट कशी घडवून आणतां येईल ? आज सुधारलेलीं राष्ट्रें श्रेष्ठ प्रजांची संख्या कमी कमी होत चालल्यामुळें अधोगतीच्या मार्गाला लागलीं आहेत. त्यांना म्हणजे श्रेष्ठांना इतर प्रजेपासून जर विभक्त केलें तर त्यांची संख्या कमी होईल कीं जास्त होईल हें पहावयास पाहिजे. जर या जातीला तिचा असा नियत धंदा लावून दिला म्हणजे तो धंदा करण्याचा हक्क इतर कोणत्याही जातीला ठेवला नाहीं, तर त्या जातीची प्रजा जास्त झपाट्यानें वाढेल. समजा, आपण कांहीं तरी युक्ति करून अशा तऱ्हेच्या जातीच्या उत्पादनाची गति वाढवूं शकलों तरी त्याबरोबरच हलक्या प्रजेचें उत्पादन कमी व्हावयास पाहिजे, तरच राष्ट्राची खरोखर प्रगति होत जाईल. हे जे वर मुद्दे सांगितले ते कांहींसे अज्ञानानें आणि कांहींसे गैरसमजानें पुढें आले आहेत असें वाटतें. हे पाश्चात्य[२] लेखक एक सुप्रजायुक्त जाति आणि इतर जातिहीन समाज अशी विभागणी करीत आहेत. एकाच समाजामध्यें जातिहीन आणि जातियुक्त अशी विभागणी अर्था-

---

१ Rabindranath Tagore in the book of marriage edited by Keyserling.

२ Need for eugenic reform by Major Darwin.

तच अनेक गोंधळ उत्पन्न करील. परंतु सर्वच समाज जातियुक्त बनविल्यास प्रत्येक जातीवर आपली प्रजा उत्पन्न करण्याची जबाबदारी पडून समाज एकसारखा सुव्यस्थित असा रहात जाईल. वर मेजर डार्विन यांनीं आण-लेल्या एकूनएक मुद्यांचा हिंदु समाजशास्त्रज्ञांनीं विचार केलेला आहे. त्यांनीं जातीय विभागणी केलेली आहे; प्रजांचें एकमेकींशीं प्रमाण बदलणार नाहीं, अशी व्यवस्था केलेली आहे; जातींना नियत धंदे लावून दिलेले आहेत. येथें आम्ही आमच्या पौर्वात्य आणि पाश्चात्य बंधूंना इतकी विनंति करतों कीं, समाजशास्त्र म्हणजे काय हें समजावून घ्यावयाचें असल्यास त्यांनीं मनुस्मृति जरूर वाचावी. फ्रेडरिक नित्शे म्हणतो, 'अशा तऱ्हेनें सर्व समाजाची कल्पना ज्यानें केली तो मनुष्य किती मृदुल अंतःकरणाचा आणि इतरांच्या सहस्रपट बुद्धिमंत असेल, ही गोष्ट तावडतोब लक्षांत येते. नवा करार हा ग्रंथ मनुस्मृतीच्या शेजारीं ठेवल्यास किती क्षुद्र दिसतो आणि त्याला केवढी दुर्गंधी येते![१]'

( ३ ) अशा तऱ्हेची जाति उत्पन्न केल्यास जातिहीन समाजाला त्या जातीबद्दल मत्सर वाटूं लागेल. या जातीनें काव्य, तत्त्वज्ञान, कला, शास्त्रें वाङ्मय या गोष्टींकडेच लक्ष दिल्यास अर्थातच त्या जातीचा समाजावर वचक राहील. परंतु त्या जातीला चालू राजकारण, समाजकारण वगैरे चळवळींत भाग घेतां येणार नाहीं. ही जाति संख्येनें लहान असावयास पाहिजे. अशा तऱ्हेच्या जातीय तत्त्वज्ञानाचा तर्कदृष्ट्या विचार करावयाचा तर एक जाति निर्माण करून भागणार नाहीं, तर एकाद्या जिन्याप्रमाणें एकावर एक अशी जातींची प्रणालीच उत्पन्न करावी लागेल. लागली तर लागली. शास्त्रांनीं जर एकादा सिद्धांत काढला तर तो इतर समजुती-करितां सोडून देणें इष्ट नाहीं असें आमचें मत आहे. या मुद्यांतील प्रत्येक आक्षेप फारच विचित्र स्वरूपाचा आहे. एकच जाति वेगळी केल्यास मत्सर वाढेल, परंतु सर्वच समाज जर जातिमय बनविला तर मत्सर वाट-ण्याचें काय कारण! उच्च जातींबद्दल इतरांना मत्सर वाटूं लागेल हें म्हणणें-ही थोडेंसें विचित्र आहे. मत्सर हा मानवी गुण असल्याकारणानें जेथें म्हणून कोणत्याही कारणाकरितां कमी अधिक भाव असेल तेथें मत्सर उत्पन्न

१ The twilight of idols by Friedric Nietzsche.

होणारच. आजच्या जातिहीन समाजामध्यें मत्सर हा गुण नष्ट झाला आहे काय? आज इतर राष्ट्रांमधून श्रीमंतांनीं मिळविलेली संपत्ति आपल्या खिशांत कशी जाईल, याची जो खालचा वर्ग विवंचना करीत असतो त्यामध्यें मत्सराचा भाग मुळींच नसतो असें आम्हांला वाटत नाहीं. अंतर्गत बखेडा माजविण्याची भीति घालून राष्ट्राकडून वाटेल तशी खंडणी उकळण्याचे जे प्रयत्न मजूरसंघांकडून केले जातात, ते कशाकरतां असतात? मत्सर हा गुण नाहींसा करावयाचा तर एकूणएक मनुष्यप्राणी एका पातळींत आणावयास पाहिजेत. तें शक्य असल्यास मत्सरभावाची भाषा बोलावी, नाहीं तर अशा तऱ्हेचा पोरकट मुद्दा पुढें आणूं नये. सुप्रजायुक्त जातीनें समाजांत काय काय गोष्टी कराव्या, तें साहेबाच्या भाषेंत वर सांगितलेलेंच आहे! आणि म्हणूनच आम्ही म्हणत असतों कीं, ब्राह्मण जातीनें आपली संस्कृति रक्षण करण्याचें कार्य टाकून राजकारण, समाजसुधारणा वगैरे भानगडींत पडूं नये. तर्कशास्त्रदृष्ट्या जी जातिप्रणाली हितकारक ठरेल असें पाश्चात्य मानतात, तीच जातिपद्धति हिंदुसमाजानें उत्पन्न करून टिकवून दाखविली आहे.

(४) पाश्चात्यांनीं पुढें आणलेले इतर आक्षेप पाहिले म्हणजे हे शास्त्रज्ञच लिहीत आहेत किंवा काय अशी शंका येऊं लागते! (अ) "समाजांत सर्व व्यक्तींना समान संधि मिळाली पाहिजे." असें मत प्रचलित होऊं लागलें आहे. किती सुंदर चर्चा ही! समाजांत वेळोंवेळीं प्रचलित होणारीं मतें हीं समाजाला हितकारकच असतात हा यांतील गर्भित असलेला मुद्दा एकदां कोणींतरी समाजांच्या उत्क्रांत्यांना लावून पहावा. ज्या समाजांचा जगांतून नाश झाला असें म्हणतात, त्यांचाही कारभार लोकमताप्रमाणें चालत असे. लोकमत हें हितकारक पद्धतीच दर्शवितें, हा एकोणीस आणि वीस या शतकांतील मुद्दा अजून सिद्ध व्हावयाचा आहे. (आ) "हलक्या लोकांना अशा तऱ्हेची सुप्रजायुक्त जाति कां करावी हें कळणार नाहीं." हलक्या लोकांना शाळा कां भरवाव्या, स्वच्छता कां ठेवावी प्रयोगशाळांचा उपयोग काय, या गोष्टी देखील कळत नाहींत! हलक्या लोकांना जें कळत नाहीं, तें समाजांत आणूं नये असें म्हणूं लागल्यास काय अनवस्था उत्पन्न होईल याचा ज्याचा त्यानेंच मनाशीं विचार करावा.

(इ) "हलके लोक बंड करतील." रानटी पाश्चात्यांचा अर्धवट शहाणपणा येथें येण्यापूर्वी हलक्या लोकांनीं बंड केल्याचें इतिहासांत कांहीं नमूद नाहीं. गौतम, महावीरासारख्या ज्या लोकांनीं पाखंडें नाचविलीं ते हलक्या जातीचे नसून व्रात्य क्षत्रिय होते. हलके लोक जगांत कोठेंच[१] बंड करीत नसतात. त्यांना बंड करण्याला प्रदीत करणारे लोक खरोखर वैयक्तिक मत्सरानें प्रेरित होऊन सुडाच्या भावनेनें कामें करीत असतात. 'लेनिननें विद्यार्थीदशेंत जो आपल्या भावाचा वध झालेला पाहिला तो पाहिला नसता, त्यानें जर इस्लाम अगर ख्रिस्ती धर्म याचा अभ्यास केला असता, तर त्याच्या अंत:करणांत जो द्वेषाग्नि भडकला होता तो भडकला नसता आणि आपण करतों तें बरोबर आहे किंवा नाहीं याबद्दल त्याच्या मनांत किंचित्सा तरी संदेह उत्पन्न झाला असतो.[२]' एकूणएक सर्व क्रांत्यांचा आणि बंडांचा इतिहास असाच आहे. (ई) "वैयक्तिक स्वातंत्र्य नष्ट होईल." ह्या एका वाक्यांतील हेत्वाभास इतके पुष्कळ आहेत कीं, त्यांचें खंडण करावयाचें तर एक मोठा ग्रंथच लिहावा लागेल. येथें एवढेंच नमूद करून ठेवतों कीं, कोणत्याही मर्यादा न सांगतां वापरलेला शब्द 'व्यक्तिस्वातंत्र्य' हा योजणें म्हणजे बेमालूम थापा मारण्याची सुधारलेली पद्धति आहे इतकेंच! हिंदुस्थानांत जातिसंस्था जवळजवळ तीन हजार वर्षें स्थिर झालेली आहे. परंतु, यांतील कोणताही परिणाम तेथें घडून आला नव्हता. पुढेंही आमच्यांतील स्वयंभू नेत्यांना समाजशास्त्राचा श्रीगणेशा जरी माहिती असता तरीही राजकारणामुळें गोंधळून जाऊन त्यांनीं स्थितिस्थापक हिंदुसमाजामध्यें जे गोंधळ माजविले आहेत ते माजविले नसते. पण आपणांला समाजसुधारणा करावयाची आहे ना!!!

असो. आम्हीं वर दाखविलेंच आहे कीं, जातिमय समाजरचनेवर जे आक्षेप येतात ते भावनामय, अशास्त्रीय आणि पोरकट स्वरूपाचे आहेत. जेथें अशा आक्षेपकांनीं सांगितलेले परिणाम घडून येत नसतील तेथें अर्थातच जातिमय संस्था असण्याला कांहीं सबळ अशीं विरोधी कारणें दाखविणें शक्य नाहीं. आपला पहिला मुद्दा जो समाजाची विभागणी,

१ Heredity and selection in sociology by Chatterton Hill.

२ Scientific outlook by Russel.

त्याची वर केलेली चर्चा लक्षांत घेतां असें अनुमान निघतें कीं, समाजांची विभागणी गटांच्या म्हणजे जातीय पद्धतीच्या स्वरूपाची असावयास पाहिजे. कारण, त्या पद्धतीपासून होणारे फायदे शास्त्रीयदृष्ट्या निश्चित स्वरूपाचे आहेत आणि तोटे निव्वळ सामाजिक भावनामय आहेत. त्या भावना नैतिक मूल्यें बदलून बदलतां येण्यासारख्या आहेत. यासंबंधीं मानव समाजाला लागू असलेला सार्वकालीन नियम आम्हीं पूर्वीं दिलाच आहे. पुढें त्या जाति स्थिर रहाण्याकरितां दोन जातींतील तरुण तरुणींना विभक्त ठेवावयास पाहिजे, हा मुद्दा येथें नमूद करून ठेवतों.

आपला समाजव्यवस्थेबाबत दुसरा मुद्दा असा होता कीं, त्या त्या जातीमध्यें वंशनाशक असे वर्णव्यभिचार, अवेद्यावेदन, कर्मत्याग वगैरे जे दुर्गुण, त्यांचा फैलाव होऊं देतां कामा नये. या तीन दुर्गुणांपैकीं प्रथमतः कर्मत्याग या दुर्गुणाचा विचार करतों. कर्मत्याग या शब्दामध्यें जातीय आचार आणि जातीय धंदे या दोन गोष्टींचा विचार करावा लागतो. उत्तम जाति शुद्ध रहावयाची असेल, तर त्या जातीला अनन्यसामान्य जीवनवृत्ति लावून द्यावयास पाहिजे असें मेजर लेनार्ड डार्विन म्हणतो.[२] परंतु सर्वच जाति शुद्ध ठेवण्याच्या इच्छेनें हिंदु समाजशास्त्रकारांनीं हाच नियम सर्व जातींना लावून दिला. तशा तऱ्हेनें तो कां लागू पडूं नये हें कळणें बरेंच कठीण आहे. हिंदु धर्मशास्त्रकारांनीं जीवनवृत्तीचे बाबतींत कांहीं आपद्धर्मही सांगितलेले आहेत. अशा तऱ्हेनें

**४४ अन्नाची विभागणी**

अन्नाची विभागणी केल्यास त्या विभागणीपासून काय फायदे तोटे होतात तें पाहूं. एकादी व्यक्ती आपली जीवनाची अर्थशास्त्रीय पद्धति सोडील, परंतु आचार सोडणार नाहीं. येथें समाजाच्या अर्थशास्त्रीय घटनेंत गोंधळ होईल, परंतु संस्कृति नष्ट होणार नाहीं. म्हणजे एक पिढींतील अडचण दूर झाल्याबरोबर तें घराणें पूर्वस्थितीला येण्याचा संभव रहातो. एकादी व्यक्ति आपला आचार सोडील, परंतु जीवनवृत्तिदायक धंदा सोडणार नाहीं. या बाबतींत अर्थशास्त्रीय व्यवस्थेंत घोंटाळे माजणार नाहींत, परंतु

१ Segregation of the fit by R. Austin Freeman.

२ The need for Eugenic reform by Leonard Darwin.

संस्कृति रहाणार नाहीं. बाकी दोन पर्याय धंदा ठेवणें, आचारही राखणें आणि धंदाही सोडणें आणि आचारही सोडणें; यांच्या गुणदृष्ट्या प्रणाली लावूं लागल्यास ( १ ) धंदा आणि आचार राखणें, ( २ ) धंदा सोडणें आचार राखणें, (३) धंदा राखणें आणि आचार सोडणें, (४) धंदा सोडणें आणि आचार सोडणें, अशी उतरत्या भांजणीनें लागेल. हें लक्षांत न घेतां एकादा काहीं तरी दोष काढून धर्म सोडावयास सांगण्याची जी पद्धति आज उत्पन्न झाली, ती फार आश्चर्यकारक आहे ! एकादा ब्राह्मण जर कुलाचार पाळीत असेल तर त्यानें जीवनार्थ एकादा धंदा केल्यानें संस्कृतीची हानि होत नाहीं. या वर दिलेल्या चार पर्यायांपैकीं अगदीं चवथ्या पर्यायांत किती हिंदु गेले आहेत, तें पाहूं लागल्यास फारच थोडे सुशिक्षत तसे झाले आहेत असेंच म्हणावें लागेल.

हिंदु समाजशास्त्रज्ञांनीं अन्नाची विभागणी केलेली आहे, ती सर्व शास्त्रांचा विचार करून केल्यासारखी दिसते. येथें अवयवभूत जातींची वाढ अवयवी जो समाज त्याच्या वाढीशीं विषम प्रमाणांत होऊं नये, अशी व्यवस्था ठेवलेली आहे, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. कोणत्याही प्राणिवर्गांतील लोकसंख्येची वाढ त्या वर्गाला मिळणाऱ्या अन्नसामुग्रीवर अवलंबून असते. जर अन्नसामुग्री[१] वाढली तर प्रजा वाढेल, अन्नसामुग्री कमी झाली तर प्रजाही कमी होईल. हिंदु समाजशास्त्रज्ञांनीं लावून दिलेला एकच धंदा जर जाति करीत राहिली, तर जातीमधील लोकसंख्येची वाढ एकंदर समाजांतील लोकसंख्येच्या वाढीशीं समप्रमाणांत राहील. अशा तऱ्हेनें त्या गटांतर्गत व्यक्तींमध्यें जीवनार्थकलह चालत राहून त्या गटांतील व्यक्ती नेहमीं कर्त्या अशाच रहातील. त्या समाजाचा वृत्तिच्छेद होणार नाहीं. कारण, त्या समाजाच्या वृत्तींत दुसरा कोणताही गट हात घालूं शकत नाहीं. हलक्या हातानें हजामत करणारा न्हावी, अगर उत्तम जोडा तयार करणारा चांभार या दोघांपेक्षां प्रवेशपरीक्षा पास होणारा अर्धवोवडा सुशिक्षित, सामाजिकदृष्ट्या जास्त उपयुक्त कसा याचा आम्हांला अजूनही खुलासा झालेला नाहीं. वृत्तिच्छेद नाहीं म्हणून बंडाकडे प्रवृत्तिही नाहीं.

---

१ Mankind at cross-Roads by Prof. East.

आमच्या समाजरचनापद्धतीमध्यें कार्ल मार्क्सनें[१] पुढें आणलेलें वर्ग-युद्ध (Class war)नाहीं, द्रव्याचें केंद्रीकरण (Concentration of Capital) नाहीं आणि वेळोंवेळीं होणारे उत्पातही (Crices) नाहींत. कारण, ज्याला स्वतःची वृत्ति नाहीं असा वर्गच या पद्धतीमध्यें नसतो. जाति-युक्त समाजरचनेमध्यें ऐहिक आणि वस्तुजात सुख यांकरितां भांडणच नाहीं. अशा तऱ्हेच्या समाजामध्यें समाजाचा नाश करण्याची इच्छा करणारें समाजकंटकच उत्पन्न होत नाहींत. समाजाची घडी विसकळली असल्यास सात्त्विकतेनें ती घडी बसविण्याचा प्रयत्न करणारे पुष्कळ थोर पुरुष होऊन गेले. परंतु, समाजाच्याच जीवावर उठण्याचें कार्य हें विसाव्या शतकाकरितां बाकी राहिलें होतें ! रे.डीन[२] इंग म्हणतो, 'जातीय समाजामध्यें समाजाचा नाश करणारे समाजघातक असे कंटक उत्पन्न होत नाहींत हें निश्चित आहे.' प्रजांची वाढ याप्रमाणें अन्नाच्या पुरवठ्यावर अवलंबून ठेविली म्हणजे प्रजांची अतोनात वाढ हें जें एक महायुद्धांचें कारण म्हणून सांगितलें जातें, त्याचीही निष्पत्ति होत नाहीं. हिंदुस्थानाच्या बाहेर हिंदु प्रजेला उठून जावें लागत नसे, त्याचेंहीं हें एक कारण आहे ! हिंदु धर्म पसरणें अगर हिंदूंचा व्यापार वाढणें म्हणजे हिंदु प्रजेनें परदेशांत जाऊन रहाणें असा अर्थ होत नाहीं. म्हणून पूर्वीं हिंदूंचा व्यापार किती वाढला आणि हिंदु धर्म कोठें पसरला ही माहिती कृपा करून आम्हांला सांगण्याची खटपट करूं नये. वर सांगितलेला मुद्दा उदाहरण घेऊन विशद करावयाचा तर समजा कीं, एके काळीं आणि एके स्थळीं समाजाजवळ शंभर सुतारांना देण्याइतकें काम आहे, तर तेथें शंभर कार्यकर्ते जीमध्यें असतील एवढी सुतारांची लोकसंख्या राहील. काम जास्त झाल्यास लोकसंख्या जास्त वाढेल, कमी झाल्यास कमी होईल. अशा समाजरचनेमध्यें गटांचा अंतर्गत जीवनार्थकलह चालू राहील, तर त्या गटाचा इतर गटांशीं असलेला जो कलह त्याचा उपशम होईल. म्हणजे येथें सृष्टीचें तत्त्व जीवनार्थकलह आणि समाजाचें तत्त्व जो कलहाचा उपशम हीं दोनही पाळलीं गेलीं. यांतच संस्कृतीच्या अभ्यासकांना समाजांतर्गत वेगवेगळ्या

---

१ History of economic doctrines by Gide and Rist.

२ Outspoken essays by Dean Inge.

गटांत जें वाढीचें वेगवेगळें प्रमाण पडूं लागलें आहे आणि त्यामुळें जी संस्कृतिनाशाची भीति पडूं लागली आहे तीही शिल्लक रहात नाहीं. कारण, अशा समाजरचनेंत लोकसंख्यांच्या वाढींत प्रमाणाचें वैषम्य कधींच पडत नाहीं. अशा तऱ्हेनें युरोपियन संस्कृतीचा नाश होईल किंवा काय, अशी भीति चॅटरटन[1] हिल, डीन इंग, प्रो. हाल्डेन, मि. बरट्रँड रसेल, डॉ. कुझिन्स्कि, प्रो. वुइल्यम मॅक्डुगल, आर. ए. फिशर आणि ज्यानें ज्यानें या विषयाचा शास्त्रीयदृष्ट्या विचार केलेला आहे अशा प्रत्येक लेखकाला वाटूं लागली आहे. परंतु ती भीति जन्म आणि धंदा (प्रकृति-विषेशात्संस्कारवशाच्च) यांवर उभारलेल्या जातिसंस्थेंत आपोआप नष्ट होते.

ही गोष्ट प्रसिद्ध आहे कीं, कांहीं धंदे प्रजांच्या वाढीला जास्त पोषक आणि कांहीं प्रजांच्या वाढीला हानिकारक असे असतात. म्हणून ज्यांच्या प्रजेची वाढ होणें इष्ट वाटत असेल, त्या जातींना प्रजापोषक धंदे आणि ज्यांच्या प्रजेची वाढ व्हावयास नको असेल त्यांना घट होण्यासारखे धंदे द्यावयास पाहिजेत. ह्यालाच मानवी समता असें म्हणावयाचें. परंतु त्यालाच हल्लीचे बायबलमय झालेले महात्मे विषमता, अन्याय वगैरे शब्द लावतात! अशी व्यवस्था फक्त हिंदूंच्या समाजरचनेंत केलेली दिसते. अस्पृश्योद्धारक अगर अस्पृश्य पुढारी देखील आज ज्या तऱ्हेची अस्पृश्य प्रजा दिसते, त्या तऱ्हेची प्रजा वाढावी असें म्हणतील असें आम्हांला वाटत नाहीं. परिस्थितीच्या सुधारणेनें अगर शिक्षणानें प्रजेच्या गुणधर्मांत[2] अगर लायकींत फारसा फरक पडत नाहीं, ही गोष्ट आम्हीं पुष्कळ वेळां विशद केली आहे आणि पुढेंही जरूर तेथें करूं. मग ही प्रजा दर पिढीला कमी कशी करावयाची, त्यांना धंदा कोणता द्यावयाचा, हा प्रश्न समाजशास्त्रज्ञानें सोडवा-

१ Heredity and selection in sociology by Hill; Outspoken essays by Dean Inge; Scientific outlook by Russel; Balance of births over deaths by Kuzynski, National Welfare and national decay by Mc Dougal; Genetical theory of natural selection by R. A. Fisher.

२ The future of life by C. C. Hurst.

वयाचा किंवा व्यक्तीच्या अभिरुचीवर अवलंबून ठेवावयाचा? ज्या धंद्यांत प्रजेची झपाट्यानें वाढ होत असेल व त्याबरोबरच ते धंदे करण्याची जर एकाद्या जातीची लायकी नसेल, तर ते धंदे या जातींना देतां येणार नाहींत. या बाबतींत आर्थिक वेतनाचा प्रश्नच येत नाहीं. दोन व्यक्तींना सारखेंच वेतन दिलें तर त्या व्यक्तींकडून त्याचा सारखाच विनियोग होईल असें नव्हे. आर्थिक उत्पन्न हें व्यक्तींची संस्कृति क्वचितच नियंत्रित करूं शकतें. मनूनें अवरवर्णीयांना जे धंदे लावून दिलेले आहेत, त्यांचें बारकाईनें निरीक्षण केल्यास त्यांमध्यें त्यानें दोन अटी पाळलेल्या दिसतात. पहिली अट पाहिली तर ते सोपे आहेत आणि दुसरे म्हणजे त्यांमध्यें प्रजांची वाढ नियंत्रित होते. यांत त्यांचा नाश नाहीं आणि इतर समाजांत संकरही नाहीं. अस्पृश्य मानलेल्या वर्गासंबंधीं मनुस्मृतींत पुढील श्लोक आढळतात :

“ चांडालश्वपचानां तु बहिर्ग्रामात्प्रतिश्रयः ।  
अपपात्राश्च कर्तव्याः धनमेषां श्वगदर्भम् ॥  
वासांसि मृतचैलानि भिन्नभांडेषु भोजनम् ॥  
कार्ष्णायसमलंकारं परिव्रज्या च नित्यशः ॥  
न तैः समयमन्विच्छेत्पुरुषो धर्ममाचरन् ।  
व्यवहारो मिथस्तेषां विवाहः सदृशैः सह ॥  
अन्नमेषां पराधीनं देयंस्याद्भिन्नभाजने ।  
रात्रौ न विचरेयुस्ते ग्रामेषु नगरेषु च ॥  
दिवा चरेयुः कार्यार्थे चिन्हिता राजशासनैः ।  
अबांधवं शवं चैव निर्हरेयुः इति स्थितिः ॥  
वध्यांश्च हन्युः सततं यथाशास्त्रं नृपातया ।  
वध्यवासांसि गृह्णीयुः शय्याचाभरणानि च ॥”

अस्पृश्यांना धंदे लावून दिलेले आहेत, त्याप्रमाणेंच त्यांना स्थानही सांगितलेलें आहे. त्या निवासस्थानीं त्यांनीं आपली वसति करून रहावें. हा जुलूम असल्यास तो ब्राह्मणादि मानीव श्रेष्ठ जातींवरही केलेला दिसतो. म्हणून जुलूम वगैरे शब्द उच्चारण्यापूर्वी तो एकस्या-

वरच आहे किंवा एकंदर समाजरचनेचें अंग आहे, हें पहावयास पाहिजे. सर्वांनाच जो सारखा नियम तो एकावरच जुलूम कसा होईल ? ब्राह्मणाला देखील वाटेल त्या ठिकाणीं रहाण्याचा अधिकार नव्हता. 'गृहस्थांचीं घरें जरी व्यक्तींच्या मालकीचीं असलीं तरी एकंदर समाजाच्या संमतीशिवाय त्यांना त्यांची खरेदीविक्री करतां येत नसे. सार्वजनिक स्नानगृहें, पवित्र बागा आणि सार्वजनिक बागा, हीं सर्व त्या वस्तूंच्या मालकांच्या सामाजिक स्थित्यनुरुप ठरीव ठिकाणींच बांधावयाचीं असत.' तोच ग्रंथकार पुढें म्हणतो, 'हिंदु शिल्पशास्त्रामध्यें वेगवेगळया तऱ्हेची ग्रामरचना सांगितलेली आहे. कांहीं ग्रामें निव्वळ ब्राह्मण वसतीचीं होतीं तर कांहीं ग्रामें पांचही वर्णांनीं वसविलेलीं असत.' हिंदूंच्या नगररचनाशास्त्रासंबंधीं कश्यप संहितेंत[२] पुढील माहिती सांपडते.

शस्त्रं सर्वत्र वाप्यादिह्युत्तरे पुष्पवाटिका ।
दक्षिणे गणिकावाटं परितः शूद्रजन्मनाम् ॥
वैश्यानां वणिजां प्राच्यां मध्ये राजापणो भवेत् ।
प्रागुदीच्यां कुलालानां वापकानां च वायवे ॥
जालिकानां च वायव्ये सूतानां पश्चिमे तथा ॥

अस्पृश्यांना बाहेर टाकलें आणि बाकीच्या सर्व जातींना वाटेल तेथें गृह बांधण्याची परवानगी दिली असें नाहीं. कांहींच व्यवस्था असूं नये असें ज्यांचें म्हणणें असेल, त्यांना अर्थात्‌च आमचें किंवा आर्यसमाजशास्त्रज्ञांचें म्हणणें रुचणार नाहीं. परंतु व्यवस्था करावयाची तर हिंदूंनींच चांगली केली होती, असें म्हटल्याशिवाय रहावबत नाहीं. याचप्रमाणें भृगु आणि मयासुर यांचींही मतें दिसतात. भृगु म्हणतो, 'अनुक्तानां तथाऽन्येषां युक्त्यावासं प्रकल्पयेत् ।' म्हणून समाजरचनेचे जे नियम सर्वांना लागू, त्या नियमांना जुलूम असें म्हणतां येणार नाहीं, मग कर्मवीर कांहींही म्हणोत.

अस्पृश्यांना कांहींच धंदा ठेवला नसता तर अर्थात्‌च तो त्यांच्यावर

१ The history of Aryan rule in India by Havell.
२ सनातनधर्मप्रदीप.

जुलूम झाला, असें कोणींही म्हणेल. परंतु मनुस्मृतीच्या वर दिलेल्या श्लोकांत तसें केलेलें दिसत नाहीं. त्यांच्याजवळ गाढव हें वाहतुकीचें आणि कुत्रा हें शिकारीचें साधन असलेलें दिसत आहे. आज देखील गाढवाच्या साधनावर पोट भरणारे प्रतिष्ठित वर्ग आहेत. दिवसा त्यांनीं आपल्या धंद्याकरितां ग्राम किंवा नगर, या दोन्हीं ठिकाणीं प्रवेश करावा आणि आपला धंदा करावा. शिवाय त्यांना इतरही धंदे दिलेले दिसतात. अशी त्यांची व्यवस्था केलेली दिसते. हल्लींचे अस्पृश्य म्हणून मानले गेलेले जे वर्ग आहेत ते आम्हीं पूर्वीं मानसशास्त्रज्ञ डॉ. हर्स्ट आणि डॉ. बर्ट यांच्या मतानें जी विभागणी दिली आहे, त्या विभागणीच्या दृष्टीनें कोणत्या वर्गांत पडतील ही गोष्ट प्रथमतः महात्मा गांधी, डॉ. अम्बेडकर, सी. राजगोपाळाचार्य, कर्मवीर शिंदे या थोरांनीं विशद करून दाखवावयास पाहिजे. शास्त्रांचा गंध नसलेले हे थोर पुरुष वाटेल तसे बरळतील, या बाबतींत आम्हांला काडीची देखील शंका नाहीं. परंतु त्यांचें तें बरळणें देखील समाजापुढें यावयास पाहिजे, म्हणजे त्यांना सप्रमाण खोडून काढणें सोपें पडेल. जर या लोकांची संख्या एकंदर समाजांशीं तुलना करतां फार वाढूं नये असें वाटत असेल, तर त्यांना ज्यामुळें प्रजा फार वाढणार नाहीं असेच धंदे लावून दिले पाहिजेत असें आम्हांला वाटतें आणि तेंच करण्याचा प्रयत्न मनूनें केलेला आहे. आज कोणते वर्ग वाढतात, याची तुलना करून पाहिली, तर हे नियम पाळले जात आहेत असें उत्तर येईल असें आम्हांला वाटत नाहीं. अलीकडील अगदीं १९३१ सालचा खानेसुमारीचा रिपोर्ट वाचून पाहिला, तरी उच्चवर्णीयांची घट आणि हीनवर्णीयांची वाढ झालेली दिसून येईल. ही स्थिति राष्ट्रीयदृष्ट्या हितकारक आहे असें कोणी महात्मे म्हणतील तर त्यांच्या बिरुदावलीला शोभण्यासारखेंच आहे ! त्यांच्या अन्नवस्त्राची हिंदूंनीं आपल्या समाजव्यवस्थेंत व्यवस्था केलेली आहे. त्यांची अशी नियतवृत्ति आहे आणि त्यांचें नियतकार्यही आहे. त्यामुळें युरोपियन वंशांचा शेजार आल्यास अशा समाजांची काय स्थिति होते, हें[१] लक्षांत धरल्यास हिंदुसमाजानें अस्पृश्यांशीं केलेलें वर्तन अन्याय्य आहे असें आमच्यानें म्हणवत नाहीं.

१ Origin of the species by Darwin.

अशा तऱ्हेनें सबंध समाजभर केलेली अन्नाची विभागणी (distribution of wealth) पाहिली, म्हणजे आर्यसमाजशास्त्रज्ञांना समाजरचनेची किती माहिती होती ही गोष्ट सहजच लक्षांत येईल. धंदे आणि योग्य प्रजेची वाढ यांचा एक तऱ्हेचा समन्वय आहे, अशी गोष्ट एकदां सिद्ध झाली म्हणजे हिंदूंचें धंदेविभागणीचें कौशल्य थोडथोडें लक्षांत येऊं लागतें.

कोणींही कितीही हाकाटी केली तरी ब्राह्मणवर्ण शेंकडेंवारीनें पाहिलें तर इतर वर्णांपेक्षां जास्त लायक प्रजा उत्पन्न करतो, यांत कांहीं शंका नाहीं. ब्राह्मणाला लावून दिलेले आचार आणि धंदे पाहिले तर मुख्यतः यजन, याजन, दान, प्रतिग्रह, अध्ययन आणि अध्यापन हे होत. म्हणजे ब्राह्मण हा मुख्यतः पुरोहित आणि शिक्षक आहे. रोमन कॅथालिक धर्मामध्यें आणि साधारणतः ख्रिस्ती धर्मामध्यें याच दोन धंद्यांचा समन्वय असलेला दिसून येतो. पौरोहित्य आणि शिक्षणखातें हीं दोनही एकाच व्यक्तीचे ताब्यांत दिलेलीं दिसतात. या एकीकरणाचा परिणाम कसा काय होतो तें पाहूं. युरोपांत दुष्ट जातिभेदाचें अस्तित्व नसल्यामुळें तेथें परिणाम होतात ते प्राधान्यानें वंशावर अवलंबून नसून धंद्यावर अवलंबून आहेत असें दिसून येईल. रे० डीन इंग म्हणतो,[१] 'भिक्षुक (clergy) सर्वसाधारण प्रजेपेक्षां जास्त दिवस जगतात, इतकेंच नव्हे, तर ते पुढील पिढीचे जनक या दृष्टीनेंही श्रेष्ठ असतात ही गोष्ट रजिस्ट्रार जनरलनें दिलेल्या आंकड्यावरून सहज सिद्ध होईल. प्रो. व्हार्टिंग आणि हॅवेलॉक एलिस यांना भिक्षुकांच्या संततींत थोर आणि कर्तृत्ववान् संतति सर्वसाधारण समाजांतील थोर संततीपेक्षां जास्त असते, ही गोष्ट मान्य आहे. सर फ्रॅन्सिस गाल्टननें मला सांगितलें आहे कीं, भिक्षुक हे उत्तम जनक होतात, याचीं कारणें कांहीं सांगतां येणार नाहींत, परंतु हा परिणाम सहज सिद्ध करितां येण्यासारखा आहे.' प्रथमतः घराण्यांची निवड चांगली करून घेतली, पुढें ते वंश विभक्त करून घेतले, सुप्रजाजननशास्त्रदृष्ट्या उत्तम परंतु

**४५ ब्राह्मणांचे धंदे अनुत्पादक**

---

१ Outspoken essays by Dean Inge.

अर्थशास्त्रदृष्ट्या हीन असे धंदे त्यांना लावून दिले, सर्वनाशाचीं आद्यकारणें जीं द्रव्य आणि सत्ता त्या दोन्हींचीही झळ त्यांना लागूं दिली नाहीं, म्हणूनच हे वंश निदान चार हजार वर्षें तरी पिढ्यानुपिढ्या सृष्टीच्या घडामोडींत टिकाव धरून राहिले आहेत. नाहींतर सृष्टीच्या घडामोडींत ते केव्हांच नष्ट होऊन गेले असते. वंश जगवून तरी काय करावयाचें, असाही प्रश्न कांहीं पुढारी विचारतात. त्यांना गेटस पुढीलप्रमाणें उत्तर[1] देतो, 'श्रेष्ठ गुणयुक्त असा एकादा वंश एकदां सृष्टींतून नष्ट झाला म्हणजे पुन्हां तसा वंश उत्पन्न होईल किंवा नाहीं याचीच वानवा.' रोम, ग्रीस आणि इतर विनष्ट राष्ट्रांचा इतिहास असेंच दाखवितो कीं, कोणत्याही कारणाकरितां का असेना, एकदां एकादा वंश विनष्ट झाला म्हणजे तो पुन्हां केव्हांही उत्पन्न होत नाहीं. म्हणून श्रेष्ठ वंशीयांनीं आपलें संतति-सातत्य राखलें पाहिजे; हें त्यांचें एक प्रधान कर्तव्य होऊन बसतें.' येथें ब्राह्मणाला धर्म म्हणून जें कांहीं सांगितलें आहे, त्याचें आर्थिक आणि सामाजिकदृष्ट्या परीक्षण करतों. धंदा सोडणें आणि आचार सोडणें, या द्विविध विभागणीमुळें होणारे चार पर्याय पूर्वीं दिलेच आहेत, ते वाचकांनीं नजरेसमोर ठेवून याचा अर्थ लावून पहावा. आचार हे संस्कृतिरक्षण करितात आणि धंदे हे अर्थशास्त्रीय व्यवस्था दाखवितात. धंद्यासंबंधीं आणि धंदेत्यागासंबंधीं आमच्या समाजांत हल्लीं बरेच गैरसमज पसरले आहेत, त्यांचाही पण येथें निरास होईल.

वर जें ब्राह्मणाला कर्तव्य म्हणून आचार सांगितले आहेत, त्यांपैकीं तीनच द्रव्योत्पादक आहेत. इतर तीन खातीं खर्चाचीं आहेत. द्रव्योत्पादक खातीं म्हणजे याजन, अध्यापन आणि प्रतिग्रह हीं होत. या तीनच वृत्तींनीं कोणत्याही वर्गाला पुरेसें धन मिळेल, असें आम्हांला वाटत नाहीं. आजच्या सर्वज्ञ समाजशास्त्रज्ञांचीं ( हिंदु समाजांतील ) मतें ऐकिलीं तर ब्राह्मण हा वर्ग फार लुच्चा होता; कारण, तो सर्वांना वेदविद्या शिकवीत नसे. हल्लीं मॅक्समुल्लरची वेदाची प्रत आणि त्यावरील सायनभाष्य किती पंडितांनीं वाचलें आहे त्याची आम्हांला आंकडेवारी कोणींतरी दिल्यास आमच्या-

१ Heredity and Eugenics by Gates, Genetical theory of natural election by R. A. Fisher.

वर फार उपकार होतील. पुन्हां सर्वांना वेदविद्या शिकविल्यास त्यांचींच जीवनवृत्तीचीं साधनें वाढलीं असतीं, तींच आपल्या हातानें त्यांनीं कमी करून घेतलीं, हा धूर्तपणा नसून मूर्खपणा आहे ! खरी गोष्ट अशी आहे कीं, ज्ञान हें एकाच[१] प्रकारचें नसतें आणि शास्त्रीय पद्धतीनें विचार केल्यास सर्वांना सर्व प्रकारचें ज्ञान द्यावयाचेंही नसतें. शास्त्रीय समाजांत ज्ञान कशा प्रकारचें असेल, शिक्षण काय धोरणावर द्यावें, याची चर्चा करतांना रसेल म्हणतो,[२] 'मला वाटतें शास्त्रीय पद्धतीनें उभारलेल्या समाजांत शिक्षण जेसुईट लोकांच्या शिक्षणपद्धतीच्या धर्तीवर जाईल. व्यावहारिक लोकांचें शिक्षण वेगळें आणि सोसायटी ऑफ जिजस या संस्थेंत जाऊं इच्छिणाऱ्या व्यक्तींचें शिक्षण वेगळें. त्याप्रमाणेंच शास्त्रीय पद्धतीच्या समाजांतील नेते सर्वसाधारण स्त्रीपुरुषांना एका तऱ्हेचें शिक्षण देतील आणि इतरांना म्हणजे श्रेष्ठ वर्गांना दुसऱ्याच तऱ्हेचें शिक्षण देतील.' पाश्चात्यांना अध्यात्म म्हणून कांहीं नसल्याकारणानें त्यांनीं शास्त्रीय समाजांतील शिक्षणाची विभागणी द्विविध केली. परंतु, हिंदुसमाजशास्त्रज्ञांनीं तीच विभागणी त्रिविध[३] स्वरूपाची केली. हिंदूंच्या मतानें शिक्षण हें लौकिक, वैदिक आणि अध्यात्मिक. त्यांपैकीं लौकिक ज्ञान समाजाला मिळत नव्हतें अगर देऊं नये असा दंडक स्मृतिशास्त्रांत कोठेंही घालून दिलेला आमच्या वाचनांत नाहीं. आध्यात्मिक ज्ञानासंबंधीं तर बोलावयासच नको. तें कोणी मागतही नाहीं आणि कोणी देतही नाहीं. परंतु ब्राह्मणेतरांना आध्यात्मिक ज्ञान नव्हतें ही गोष्ट साफ खोटी आहे. येऊन जाऊन राहिली वेदविद्या. या विद्येलाच हिंदु समाजशास्त्रज्ञ आपली शास्त्रविद्या समजत. शास्त्रीय समाजामध्यें शास्त्रविद्येचें गोपन कसें केलें जाईल, या बाबतींत रसेल म्हणतो[४], 'पुष्कळसें शास्त्रीय ज्ञान फार थोडे लोक सोडून इतरांपासून गुप्त ठेविलें जाईल.' हें वाक्य रसेलच्या ग्रंथांत सांपडल्यास तें शास्त्रीय असूं शकेल असें ठरतें आणि तेंच मनुस्मृतींत सांपडणारें, 'न शूद्राय मतिं दद्यात्' हें वाक्य दुष्टपणा

---

१ मनु ; Scientific outlook by Russel.

२ Scientific outlook by Bertrand Russel.

३ मनु.

४ Scientific outlook by Bertrand Russel.

दर्शवितें, ही स्थिति आपल्या मानसिक गुलामगिरीचें स्पष्ट द्योतक आहे !

असो. स्वतःच्याच जीवनवृत्तीवर निव्वळ दुष्टपणानें, निष्कारण, तसें सबळ कारण असल्याशिवाय, आपल्याच हातानें घाला घालण्याइतके मूर्ख तेव्हांचेही ब्राह्मण असतील असें वाटत नाहीं. शूद्रानें श्रुतिवाक्य ऐकूं नये असा जो नियम आला तो कोणाशीं मत्सर होता म्हणून नव्हे तर, शास्त्रीय पद्धतीनें विचार करून तसा नियम केला पाहिजे असें उत्तर आलें म्हणून होय ! आजच्या पंडितांनीं जुन्या पद्धतीवर टीका करण्यापूर्वी, हें त्यांचें उत्तर कसें चुकतें तें दाखवावयास पाहिजे. जी अध्यापनाची स्थिति तीच याजनाला खडानखडा लागू. जितके यज्ञ जास्त, तितकी पुरोहित करणाऱ्या ब्राह्मणाला यज्ञदक्षिणाही जास्त. म्हणून यज्ञाधिकारी लोकसंख्या जितकी जास्त तितका ब्राह्मण लोकांचा फायदा जास्तच. परंतु प्रत्यक्ष पहावें तर, बावळट ब्राह्मण कांहीं लोकांच्या पलीकडे जाऊन इतरांचें पौरोहित्य करावयास तयार नाहींत. अर्थात् यज्ञ कमी होणार आणि त्यांची उपजीविकेचीं साधनेंही हटणार. तीच स्थिति प्रतिग्रहाची. अभिजात ब्राह्मण वाटेल त्या तऱ्हेचें दान घेत नाहींत. परंतु दान ब्राह्मणानेंच घ्यावयाचें असें ठरल्यानंतर, तें घेणारा कोणीतरी हलका ब्राह्मणच असावयास पाहिजे आणि म्हणून एकाद्या समाजांत अगदीं शून्यप्रवृत्त (tending to zero) प्रमाणांत दुष्कृत्यें करणाऱ्या व्यक्ती उत्पन्न झाल्यानें तो समाज दोषी ठरत नाहीं. अर्थशास्त्रांतील पुढील सर्वसाधारण नियम लक्षांत ठेवला तर, हल्लीं धंदाविषयक जे आक्षेप कांहीं पंडितब्रुवांकडून आणले जातात त्यांना अर्थ रहाणार नाहीं.

जें जें म्हणून जीवनाचें द्रव्योत्पादक साधन असेल, त्यावर प्रजा अवलंबून राहूं लागते. (ए)

प्रतिग्रह हें जीविताचें साधन आहे. (ए)

प्रतिग्रहावर कांहीं प्रजा अवलंबून राहूं लागेल. (आय्)

**अनाथविद्यार्थीगृहांतून, तशीं गृहें नसतांना जी संख्या कशी तरी कालक्रमणा करीत होती, त्या संख्येची गर्दी कां होत जाते, ही गोष्ट वरील नियमावरून सहज लक्षांत येईल. त्यामुळें ब्राह्मणांमध्यें दुष्ट प्रतिग्रह घेणारा**

वर्ग असेल असें वाटतें. परंतु दुष्ट प्रतिग्रह घेणाऱ्या व्यक्ती समाजांत हीन समजल्या जात असत आणि अजूनही समाजांत ती प्रणालीच चालू आहे. शय्यादानासारखीं दानें अजून देखील सच्छील ब्राह्मण घेत नाहींत. परंतु एकाद्यानें जर दुष्ट दान घेतलें, तर हा प्रश्न निव्वळ संस्कारहेतुक असल्याकारणानें सामाजिक जीवनामध्यें त्याला फारसा कठोरपणा दाखवीत नसत ( तो तसा दाखवूंही नये असें आमचें मत आहे. ) असें दिसतें. मनु म्हणतो,

नाध्यापनाद्याजनाद्वा गर्हिताद्वा प्रतिग्रहात् ।
दोषो भवति विप्राणां ज्वलनांबु समाहिते ॥

जीवनाचीं जीं तीन मुख्य साधनें म्हणून सांगितलीं, त्याचाही ब्राह्मणांनीं बराच संकोच केलेला दिसतो. त्यामुळें त्यांच्यावरही जीवनार्थकलह म्हणून अगर निव्वळ अभिरुची म्हणून, क्वचित् आपद्धर्म म्हणून, इतर कांहींतरी मार्गांनें जीविका चालविण्याचा प्रसंग ओढवत असला पाहिजे. या बाबतींत ब्राह्मणांचे पक्षपाती म्हणून ज्या लेखकांची हल्लीं निंदा होते त्यांनीं देखील ब्राह्मणांना सरसहा वाटेल तें करण्याची परवानगी ठेवलेली नाहीं. ब्राह्मण झाला तरी त्यानें वाटेल तो धंदा करावा असा कांहीं नियम त्या ग्रंथांतून दिसून येत नाहीं. या बाबतींत हिंदु समाजशास्त्रकार फारच विचारी दिसतात.

**४६ आचारांच्या कडकपणाची जरूरी**

आम्हीं, खालच्या थरांतील पुरुष कर्तृत्वाच्या जोरावर वरच्या थरांत प्रविष्ट झाला तर त्या स्थितीचा काय परिणाम होतो, ही गोष्ट मागें याज्ञवल्क्य विशद केलीच आहे आणि ती स्थिति टाळावयास पाहिजे असें सांगितलेंच आहे. हिंदु समाजशास्त्रकारांच्या मतानें ज्या थरांत जी व्यक्ति असेल, त्या थरांतील धंदा त्या व्यक्तीला इतर थरांतील धंद्यापेक्षां कितीही अवघड असला तरीही तोच श्रेष्ठ आणि हितकारक होय. मनु म्हणतो,

“ वरं स्वधर्मो विगुणः न पारक्यः स्वनुष्ठितः ।
परधर्मेण जीवन्हि सद्यः पतति जातितः ॥ ”

आपला स्वतःचा धर्म गुणहीन वाटला तरी तोच श्रेष्ठ होय. दुसऱ्याच्या धंद्यावर उदरनिर्वाह करणारा पतन पावतो. हा व असेच दुसरे जे पतनासंबंधीं श्लोक आले आहेत, त्यांच्या बाबतींत बरेच गैरसमज, आम्हांला वाटतें, मुद्दाम पसरविण्यांत आलेले आहेत. गटयुक्त समाजामध्यें 'अमूक ठिकाणाहून पडतो,' असेंच नुसतें सांगून चालणार नाहीं. त्याबरोबरच तो कोठें पडतो हेंही पण सांगावयास पाहिजे. तो जातिहीन असा आणखी एक विस्कळीत समाज होईल. परंतु दुसऱ्या कोणत्याही जातींत अंतर्भूत होईल असा त्याचा अर्थ नव्हे. स्वधर्म आणि परधर्म या बाबतींतही बरेच गैरसमज पसरलेले आहेत. शास्त्रीय[१] समाजामध्यें धंदा व्यक्तीच्या अभिरुचीवर अवलंबून ठेवतां येणार नाहीं. त्या धंद्याच्या दृष्टीनें धंद्याला लायक अशी मनोभूमिका निर्माण करण्याकरितां ज्या काळांत मनोगंड निर्माण होतात, अशा कोवळ्या वयापासून शिक्षण द्यावयास पाहिजे. तोच आमच्याकडे मुंजीचा काळ धरलेला आहे. आतां वर्णांतर करावयाचें असेल तर तत्पूर्वीं त्या बालकाचा वर्ण ठरावयास पाहिजे. म्हणूनच सहज दिसून येईल कीं, जाति जन्मानेंच ठरत असे, गुणकर्मांनें नव्हे. परंतु[२] जातिबहिष्काराचा कडक नियम कां ठेवला याचाही थोडासा खुलासा व्हावयास पाहिजे. एकंदर सृष्टीचा स्वभावच असा आहे कीं, अनिर्बंध स्थितींत सृष्टीमध्यें घोंटाळे माजतात. हा नियम जर जडांना देखील लागू आहे, तर अहंकारप्रधान मानवाला कितीतरी जास्त प्रमाणांत लागू असला पाहिजे. थर्मोडायनामिक्सचा दुसरा नियम ज्यांना माहिती आहे त्यांच्या ही गोष्ट लवकर लक्षांत येईल. सोप्या भाषेंत सांगावयाचें तर तो नियम असा आहे कीं, जगाची जास्त जास्त अव्यवस्थेकडे प्रवृत्ति आहे. प्रो. सर आर्थर एडिंगटन्[३] ही गोष्ट पत्त्यांच्या डावाची उपमा घेऊन विशद करतो. तो म्हणतो कीं, "बाजारांतून पत्त्याचा डाव विकत आणून तो एकदां पिचला कीं त्याची पहिली व्यवस्था सुटली, ती पुन्हां कितीही वेळां पिचीत राहिलें तरी उत्पन्न होणार नाहीं. तशी उत्पन्न करावयाची तर पुन्हां बसून पोथी-

१ Scientific outlook by Bertrand Russel.

२ Need for Eugenic reform by L. Darwin.

३ The nature of the physical world.

जात पद्धतीनें करावयास पाहिजे." एवंच, अव्यवस्थेकडे निसर्गांत जी प्रवृत्ति आहे ती टाळावयाची तर कडक नियमच लावून द्यावयास पाहिजेत. जातिबहिष्काराचा कडक नियम असला म्हणजे आपला पितृ-पैतामहिक धंदा सोडून जाण्याची इच्छा व्यक्तीला सहसा होणार नाहीं. जर आपल्या पिढीजात धंद्यांत निभाव लागेनासाच झाला तर त्या व्यक्तीनें आपल्या खालच्या थरांतील धंदा करावा, वरच्या थरांतील करूं नये असें सांगण्याकडे मनूचा कल दिसतो. आम्हीं पूर्वी यासंबंधीं जी चर्चा केली आहे त्याचा मनुवाक्यांशीं मेळ घालून पाहिला म्हणजे, मनूच्या समाज-विषयक ज्ञानासंबंधीं खात्री झाल्याशिवाय रहाणार नाहीं. व्यक्ति खालच्या थरांतील धंदा करूं लागली तर तेथें वृत्तिसंकर होईल, परंतु वर्णसंकर होणार नाहीं. कारण, आपली स्त्री आपल्या वरच्या थरांतील असावी असें मानण्याकडे मानवाची नैसर्गिक प्रवृत्ति असते. ही प्रवृत्ति सुधारलेल्या आणि असुधारलेल्या चारही खंडांत दिसून येते. त्यामुळें व्यक्ति खालच्या थरांतील धंदा करूं लागली तरी विवाहही तेथें करील असें वाटत नाहीं. हिंदुधर्मशास्त्रामध्यें ब्राह्मणाला जी धंद्यांची प्रणाली लावून दिली, तीच उपलक्षणेनें सर्व जातींना लागू आहे.

मनूच्या मतानें ब्राह्मणाला हितकारक म्हणून जे धंदे सांगितले, ते धंदे करून उपजीविका होत नसेल तर त्रैवर्णिकांपैकींच, परंतु त्याच्याच शेजार-चा जो वर्ण क्षत्रिय त्याचा धंदा करण्याला परवानगी आहे. क्षत्रियाचें कर्म रक्षण म्हणजे राजसत्ता. त्या राजसत्तेंत ब्राह्मणानें स्थान मिळ-वून घ्यावें. परंतु राजसत्ता आणि द्रव्य यांचा जो समाजनाशाशीं समन्वय आहे, त्याचा विचार करतां ब्राह्मणानें तो धंदा करूं नये हें उत्तम. राज-सत्तेंत स्थान मिळाल्यास उपजीविका उत्तम चालते, परंतु ती सर्वथा शुद्ध असेलच असें नव्हे, म्हणून शक्य तर ब्राह्मणानें त्या वर्णाचीं कर्मे करूं नयेत. अशा तऱ्हेचीं कार्यें करणारे प्रसिद्ध ब्राह्मण पूर्वी होऊन गेले. परंतु त्यांना कोणीं जातिबहिष्कृत केल्याचें अगर त्यांचें वर्णांतर झाल्याचें दिसून येत नाहीं. महाभारतकाळचे सुप्रसिद्ध ब्राह्मण योद्धे द्रोण, कृप आणि अश्वत्थामा यांना कोणीं क्षत्रिय म्हटल्याचें महाभारतांत तरी आढळून येत नाहीं, त्यांना ब्राह्मणच म्हटलें. उलट जातीनें हीन परंतु सदाचारसंपन्न

अशा विदुराला ब्राह्मण अगर क्षत्रियही म्हटलेलें आढळत नाहीं. तोच नियम जामदग्न्य परशुरामालाही लागू असलेला दिसून येईल. जाति जन्मानेंच ठरावयाची. आम्हीं मागें लोकसंख्यांच्या कर्तृत्वशक्तीबद्दल आंकडेवारी दिलीच आहे ती पहातां सहजच कळेल कीं, ब्राह्मणवर्गांत देखील अतिशय हीन असे कांहीं लोक असणार. त्यांना क्षत्रिय वर्णाचीही वृत्ति साधली नाहीं तर त्यांनीं वैश्यवृत्ति कांहीं कांहीं बाबतींत स्वीकारण्याला हरकत नाहीं. मनु म्हणतो,

" उभाभ्यामप्यजीवंस्तु कथं स्यादिति चेद्भवेत् ।
कृषिगोरक्षमास्थाय जीवेद्वैश्यस्य जीविकाम् ॥
वैश्यवृत्यापि जीवंस्तु ब्राह्मणः क्षत्रियोऽपिवा ।
हिंसाप्रायां पराधीनां कृषिं यत्नेन वर्जयेत् ॥
इंदतु वृत्ति वैकल्यात्त्यजतो धर्मनैपुणम् ।
विट्पण्यमुध्दृतोद्धारं विक्रेयं वित्तवर्धनम् ॥"

या लावून दिलेल्या पद्धतीवरून सहज लक्षांत येईल कीं, कोठल्याच एका वर्गाची वृत्ति संकोचित केली आहे असें नव्हे. प्रत्येक वर्गाला कांहीं ना कांहीं नियम, अटी वगैरे आहेत. मुख्य प्रणाली अशी दिसते कीं, वरिष्ठ वर्गानें आपद्धर्म म्हणून कनिष्ठाचे धंदे केले तरी चालतील. या बाबतींत देखील वैश्याच्या उपजीविकेच्या साधनांमध्येंसुद्धां सर्व ठिकाणीं जीवनार्थ कलहाची परवानगी ठेवलेली नाहीं, नाहीं तर अशा तऱ्हेनें वैश्याच्या वृत्तीमध्यें घोंटाळे उत्पन्न व्हावयाचे. मनुष्यप्राण्याची नैसर्गिक प्रवृत्ति कमी कष्ट करून जास्त वेतन मिळविण्याकडे; त्यामुळें अवघड धंदा टाकून तत्काल फलदायी धंदा उचलणें मनुष्याला सहजच आवडतें. बारा वर्षें वेदाध्ययन करून शेवटीं चवली पावली मिळविण्यापेक्षां एका वर्षांत सुतारकी शिकून तितकेंच अगर त्यापेक्षां जास्त धन मिळत असल्यास वेदाध्ययनाकडे कोण जाईल ? हल्लीं संस्कृत पाठशाळा आणि वेदविद्येच्या शाळा ओसाड कां पडल्या आहेत ? विश्वविद्यालयांतून मोठमोठालीं बक्षिसें मिळविणाऱ्या संस्कृत पंडितांना स्वरसहित चार ऋचा तरी म्हणतां येतील किंवा नाहीं याची वानवाच ! म्हणून धंदा व्यक्तीच्या अभिरुचीवर अवलंबून

ठेवतां येत नाहीं. अशा तऱ्हेनें व्यक्तीची सोपा धंदा करून जास्त पैसा मिळविण्याकडे प्रवृत्ति होऊं लागली, सुखोपभोगाची लालसा वाढत चालली म्हणजे व्यक्तींची आणि एकंदर समाजाची जीवनार्थ कलहाची हिंमतच कमी होत जाते. परंतु तेच कष्टाच्या वृत्तीनें राहाणारे प्रतिपक्षाला सहज चीत करूं शकतात. पौर्वात्य राष्ट्रांबद्दल क्लॅरेन्स पो म्हणतो, 'दारिद्र्य आणि कष्ट या जोडगोळीमुळें जो काटकपणा येतो, तो काटकपणा अंगीं आलेल्या राष्ट्रांमध्यें आज जागृती होत असल्याकारणानें आपणाला होणारा त्यांचा विरोध हळूहळू वाढत जाईल. तीं राष्ट्रेंही आतां शास्त्रीय प्रगतीचा अभ्यास करूं लागलीं आहेत आणि त्यामुळें लवकरच वंशावंशांमध्यें जीवनार्थ झगडा झाल्याशिवाय रहाणार नाहीं.' सर्वच दारिद्र्य आणि कष्ट कांहीं वाईट नव्हेत. एकंदरींत समाजांतील बहुसंख्येमध्यें सुखाची लालसा वाढत जाणें हें जीवनाचें लक्षण नव्हे. अशी लालसा वाढूं लागली म्हणजे व्यक्ति आपल्या सुखदुःखाची जबाबदारी स्वतःवरून काढून दुसऱ्यावर लादूं लागतो. जें जें कांहीं सुख समाजांत प्राप्त होत असेल, तें तें व्यक्तीच्या स्वतःच्या कर्तृत्वाचें फळ आणि जें जें कांहीं दुःख प्राप्त होत असेल, तें तें समाजरचनावैगुण्यामुळें प्राप्त होतें ! सर्व व्यक्ती निर्दोषच आहेत. कोठें दोष असेल तर तो समाजरचनेंत, अशा तऱ्हेच्या कल्पना प्रसृत होतात अगर केल्या जाऊं लागतात ! व्यक्तीचें दुःख हा सामाजिक घटनेचाच परिणाम आहे, असें निश्चित ठरविल्याकारणानें प्रत्येक व्यक्ति आपल्याच दुःखाला धरून समाजसुधारणा सुचवूं लागते ! परंतु व्यक्तींचीं सुखःदुखें परस्परविरुद्ध असणेंही शक्य असल्याकारणानें परस्परविरुद्ध व्यवस्था याही पण समाजसुधारणा या नांवाखालीं गोळा होऊं लागतात ! उदाहरणार्थ, देवळांना जीं उत्पन्नें लावून दिलेलीं आहेत, त्यांचा विनियोग करण्याच्या हक्काचाच प्रश्न घ्या. हिंदूंच्या देवळांना लावून दिलेल्या उत्पन्नांचा विनियोग बरोबर होत नाहीं, म्हणून त्यांची कांहीं तरी सरकारी रीतीनें व्यवस्था केली जावी असे कायदे कायदेमंडळापुढें येतात तर, उलट सार्वजनिक पैशाच्या विनियोगाच्या बाबतींत प्रचलित असलेला कायदा आमच्या धर्मगुरुंना लागू करूं नये असें कांहीं एका विवक्षित

१ Quoted by Dean Inge in his Outspoken essays.

वर्गांचें म्हणणें ऐकूं येतें. एक पंडित[१] कन्यांचा विवाह चवदा वर्षांच्या आंत होऊं नये, असा अत्यंत मूर्खपणाचा कायदा विधिमंडळांत आणून पसार करून घेतात, तर तो कायदा आम्हांला लागू होऊं नये असें सनातनी हिंदु आणि मुसलमान समाज म्हणूं लागतात ! हिंदूंच्या देवळांमध्यें-एकून एक सर्व देवळांमध्यें—अस्पृश्यांनीं प्रवेश करण्यास हरकत नसावी असा कायदा एक पुढारी विधिमंडळांत आणतात, उलट हिंदूंचे सर्व शंकराचार्य, सर्व पुरातनमतवादी, थोडक्यांत सांगावयाचें तर नव्वद टक्के हिंदु समाज त्या मताला विरोध करतो ! कोठेंही मानीव दुःख उत्पन्न करून त्याचा निरास करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे समाजसुधारणा नव्हे. जगांतील सर्व दुःख, सर्व पाप, सर्व कष्ट वगैरे नष्ट करण्याचा प्रयत्न करणें, म्हणजे एक पोरकटपणाचें लक्षण आहे. व्यक्तीचें सुख कोठें तरी व्यक्तिबाह्य आहे, ती व्यक्तिबाह्य स्थिति सुधारली म्हणजे व्यक्ति सुखी होणार, अशा तऱ्हेच्या बेजबाबदार कल्पना कायदा सांगूं लागला, म्हणजे समाजांतील हितकारक अगर अहितकारक असा कोणताही नियम शिल्लक रहाणें शक्यच नाहीं. म्हणून, वेगवेगळ्या व्यक्तींची नैतिक बाबतींत अभिरुची काय आहे हें पाहून नीतिशास्त्राचे नियम ठरविण्याची पाश्चात्य पद्धति चूक आहे. नीति ही हितकारक अभिरुचीची वाढ आणि अहितकारक अभिरुचीच्या वाढीचें नियंत्रण असें उभयविध कार्य साधण्याकरितां उत्पन्न झालेली आहे. तें हितकारकत्व अगर अहितकारकत्व ठरविणें अभिरुचीला शक्य नाहीं. अभिरुचीला सुख आणि असुख कळतें. व्यक्तीला अगर सबंध समाजाला देखील अभिरुचीचें हितकारकत्व कळत नाहीं, म्हणून तर कांहीं समाजांचा सृष्टींतून नाश होतो. ज्या समाजांचा नाश झाला ते देखील आपल्या अभिरुचीप्रमाणेंच वागत होते. म्हणून प्रथमतः हित कोणतें तें समजून घेऊन समाजरचना अशीच करावयाची कीं, हित आणि सुख ही पूरक होतील. त्यामुळें धर्म अथवा हित आणि सुख यांमध्यें भेद उत्पन्न होऊन अभिरुची सुखाकडे धावूं लागल्यास अभिरुचींत बदल करावयाचा, धर्मांत नव्हे. म्हणून भगवान् शंकराचार्य म्हणतात, 'यो हि यं प्रति विधीयते स तस्य धर्मः न यः येन स्वनुष्ठातुं शक्यते चोदनालक्षणत्वाद्धर्मस्य । ' आत्म-

---

१ हरविलास सारडांचा कायदा; Report–Age of consent committee.

बुद्धि हें प्रधानांपैकीं एक प्रमाण मानणाऱ्या आधुनिकांनीं आम्हीं वर सांगितलेल्या गोष्टीसंबंधीं थोडा विचार करावा. आत्मतुष्टिप्रमाण सांगितल्यानंतर त्यापासून उत्पन्न होणाऱ्या अडचणींतून सुटण्याकरितां सुखाचे भेद सांगत बसण्यापेक्षां, त्या प्रामाण्याच्या लायकीचा थोडा दूरवर विचार केल्यास कांहीं नुकसान होणार नाहीं. व्यक्तीचें दुःख हा समाजरचनेचा परिणाम आहे असें मत एकदां समाजांत प्रसार पावूं लागलें म्हणजे समाजाला नियामक असे सर्व विधी आणि सर्व निषेध यांचा नाश होऊन समाज हे व्यक्तिप्रधान विनाशक स्थितीकडे हळूहळू ओढले जाऊं लागतात. असा कोणता नियम कोणत्या समाजांत आहे कीं, त्या नियमाचा कोणाना कोणाला तरी अडथळा होत नाहीं? नियम हे व्यक्तींना नियंत्रण घालण्याकरितांच असल्यानें ते बोचणारच. व्यक्ति हीच समाजशास्त्राचें ध्येय ठरल्यानंतर व्यक्तीला त्या समाजाबद्दल कोणत्याही तऱ्हेचा अभिमान रहाणें शक्यच नाहीं. व्यक्ति सुखी होईल (हितें नव्हे. हिताहित कळण्याची लायकी फारच थोड्या लोकांना आलेली असते.) तर त्या समाजांत राहील. तसें न झाल्यास, ती व्यक्ति त्या समाजाचे कोणतेही नियम बिनदिक्कतपणें पायाखालीं तुडवील. म्हणून एकीकडे समाजशास्त्रांतील ऱ्या अगर काल्पनिक चुकांच्या याद्या वेळींअवेळीं प्रसिद्ध करून पुन्हां हिंदु समाजांत स्वाभिमान उत्पन्न होत नाहीं म्हणून, लोक आपणच कां हाकाटी करतात तेंच कळत नाहीं. तुम्ही ज्या याद्या प्रसिद्ध करतां त्या असेंच दाखवितात कीं, या समाजव्यवस्थेंत कोणाही व्यक्तीला सुख प्राप्त होणार नाहीं. हिंदुसमाजानें ज्याचा अभिमान धरावा असा एखादा निर्दोष आचार आपणाला दिसून, तो आपण हिंदुसमाजापुढें ठेविला आहे काय? धर्मविषयक ज्या चळवळी झाल्या आणि जें वाङ्मय आजपर्यंत प्रसिद्ध झालें आहे, त्यामध्यें तर आम्हांला कांहीं तसा उल्लेख सांपडला नाहीं. खरें त्रिकालाबाधित सत्य असें आहे कीं, सामाजिक दोष नेहमीं डोळ्यांपुढें रहाणें, हें सर्वसाधारण मनुष्याच्या दृष्टीनें बरें नव्हे. ज्या वेळीं ज्या पक्ष-

१ धर्मस्वरूप निर्णय- तर्कतीर्थ कोकज.

२ 'We are governed by highgraded morcus' Dean Ingo 'आपल्यावर श्रेष्ठ तऱ्हेच्या वेड्यांचें राज्य आहे.'

तींत सुधारणा घडवून आणावयाची असेल, त्या पद्धतीवर हल्ले करीत रहाणें हीच एक समाजसुधारणेची पद्धति होऊन बसते, त्यावेळीं त्या समाजांतर्गत व्यक्तींच्या मनाची ठेवण अशीच होऊन बसते. ज्यावेळीं व्यक्तीनें निश्चयीपणा दाखवावयाचा असेल त्याच ठिकाणीं बरोबर व्यक्तीला निश्चयीपणा दाखवितां येत नाहीं. मग सर्वसाधारण समाजसुधारणेचें आद्यकारण जी समाजाची उत्साहवृत्ति ती नष्ट होऊन तिच्या जागीं निरुत्साह, भांडखोरपणा, तुटकपणा वगैरे गुणांचा प्रादुर्भाव होऊं लागतो. आजच्या हिंदुसमाजाकडे पाहिलें तर काय दिसतें ? एक ब्राह्मणजात सोडून दिल्यास बाकीच्यांनीं आपले सवते सुभे उभारले आहेत किंवा नाहींत या गोष्टीचा ज्याचा त्यानें विचार करून पहावा. मुंबई इलाख्यांत मराठा वर्गाला कायदेमंडळांत आपला वेगळा असा मनुष्य पाठविण्याची जरूरी वाटली. मराठा वर्ग सबंध हिंदु समाजाचें हित पहात आहे असें मानावें काय ? परंतु असा परिणाम न झाला तरच तें आश्चर्य ! कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी हिंदु समाजाच्या काल्पनिक होणाऱ्या—ते खरे दोष नव्हेत हें दाखविण्याकरितां तर या ग्रंथाची प्रवृत्ति आहे—चुका पुढें करून त्या पसरविण्याचे प्रयत्न पाहिले म्हणजे हिंदु समाजाचा स्वाभिमान नष्ट करण्याकरितां कट झाला आहे किंवा काय, असाच मनाला भास होऊं लागतो ! खिस्ती धर्मोपदेशकानें यावें आणि त्याच यादीचा पाठ करावा, मुसलमान मौलवीनें त्याच गोष्टींचा पुनरुच्चार करावा, बेहरामजीमल बारीसारख्या पारशी गृहस्थानें त्यांतच तोंड घालावें, युरोपियन राज्यकर्त्यांनीं तेच दोष दाखवून आमच्या रानटीपणाची कींव येऊन दुःखानें उसासे टाकावे, ज्यांचा आमचा सोयरेसुतकाचा देखील कांहीं संबंध नाहीं अशा मिस मेयोसारख्या[१] उर्मट आणि बेजबाबदार लेखकांनीं त्यांकडेच बोट दाखवून ऊर बडवून घ्यावा, आणि शेवटीं आमच्यांतीलच 'स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः ।' अशा वृत्तीचा आव आणणाऱ्या पुढाऱ्यांनीं या सर्व गोष्टींना मान तुकवावी ! ! 'निषेकादि श्मशानान्तं ।' हिंदूंचे एकूणएक आचार चूक आहेत, अशा तऱ्हेचा एकच ध्वनि या सर्व सज्-

१ Mother India by Miss Katharine Mayo.

कुंतल.

नांनीं ( शंखान् दध्मुः पृथक् पृथक्। ) काढल्यानंतर, 'त्रयाणाम् धूर्तानाम्' या न्यायानें हिंदु समाजानें आपल्या धर्माकडे पाठ फिरविल्यास त्यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे ? आतां याच हलकल्लोळांत तर्कतीर्थ, वेदांतवागीश, महामहोपाध्याय वगैरे रत्नांनीं आपला गळा मिळवून दिला आहे ! त्यामुळें हिंदु समाज आपला धर्म सोडणार. शंभर हिंदु महासभा आणि दोनशें दाढीवाले पुढारी यांच्या प्रयत्नाला किमपि यश येणार नाहीं. कारण, याच धर्मबुडव्या पुढाऱ्यांनीं आजपर्यंत जातीय म्हणजे संकटित आचारांनीं टर केलेली आहे आणि ते अजूनही करीत आहेत—हा विषवृक्ष—अश्रद्धारूपी विषवृक्ष—आपणच पोसला आहे, आतां खेद करून काय उपयोग ?

आम्हीं जीवनवृत्ति आणि आचार यांतील फरक सांगून त्या दोहोंपासून उत्पन्न होणारे आचाराचे चार पर्याय पूर्वीं सांगितलेच आहेत. त्या दृष्टीनें पाहिलें तर, आचार कायम राखून धंदा या दृष्टीनें विचार केल्यास अगदीं आपद्धर्म म्हणून—उगीच सुखासुखी किंवा थोडासा जास्त फायदा होतो म्हणून नव्हे— वरच्या थरांतील व्यक्तींनीं खालच्या थरांतील धंदा केल्यास हरकत नाहीं असें प्राचीनांचें मत दिसतें आणि तें समाजशास्त्रदृष्ट्या बरोबरही पण आहे, ही गोष्ट आम्हीं पूर्वीं केलेल्या विवेचनावरून सहज कळून येण्यासारखी आहे. अशा तऱ्हेनें ब्राह्मण क्षत्रियांना जरी वैश्यांचे धंदे ( आचार नव्हे ) करण्याची मोकळीक ठेविली असली तरी, त्यांनाही वैश्यांच्या सर्वच व्यवसायांत हात घालण्याची मोकळीक ठेविलेली नाहीं.

ब्राह्मण वर्गानंतर क्षत्रिय वर्गाचा विचार येतो. क्षत्रियांचे धार्मिक आचार पाहूं लागलें तर अध्ययन, अध्यापन आणि दान हे दिसतात.

**४७ क्षत्रियाचे आचार**

हीं तीनही खर्चाचीं खातीं आहेत. परंतु खर्च शिलकत असल्याशिवाय होऊं शकत नाहीं. तेव्हां स्मृतींचा अर्थ लावणाऱ्या आधुनिक सभ्यांना असा प्रश्न विचारावासा वाटतो कीं, धार्मिक अगर सामाजिक आचार आणि जीवनवृत्तीकरितां धंदा यांत कांहीं भेद आहे असें आपणांला वाटतें किंवा नाहीं ? वर जे तीन आचार सांगितले त्यांचें परिपालन करावयास द्रव्याची जरूरी आहे किंवा नाहीं ? क्षत्रियाच्या

१ भगवद्गीता.

देखील जीवनयात्रेला धनाची जरूरी आहेच. त्याला देखील वायु भक्षण करून रहातां येत नाहीं. येथें क्षत्रिय कोणाला म्हणत आणि क्षत्रिय ही कोणी जाति होती काय आणि आहे काय, या गोष्टीचा त्रोटक विचार केला पाहिजे. इतिहाससंशोधक राजवाडे यांच्या मतें चातुर्वर्ण्यांतर्गत क्षत्रिय हा एक गट होता. रा. राजवाडे म्हणतात[1], 'ह्या ब्राह्मण नांवाच्या आर्य लोकांशीं पामीरच्या पठारावर वर्णानें लाल अशा दुसऱ्या एका लोकांची गांठ पडली. हे रक्तवर्ण लोक शौर्यानें सिंहासारखे, क्रौर्यानें लांडग्यासारखे कजाखीनें कुक्कुटासारखे, सोशीकपणानें कुत्र्यासारखे असून, डोक्याचे किंचित मंद असत.' ऐतरेयारण्यककारानें तर क्षत्राची व्याघ्राला उपमा दिली आहे. 'क्षत्रं वा एतद् आरण्यानां पशूनां व्याघ्रः।' ह्या मंद डोक्याच्या रक्तवर्ण लोकांवर तीव्र डोक्याच्या शुक्लवर्ण ब्राह्मणांनीं बेमालूम छाप बसविली आणि वेदवाङ्मयांत गाजणारें ब्रह्मक्षत्रनामक जें द्वंद्व तें निर्माण केलें.' परंतु चातुर्वर्ण्येतरांमध्यें देखील आयुधजीवि संघ होतेच. चातुर्वर्ण्यबाह्य क्षात्रिय (आयुधजीवि संघ) पर्शु, असुर इत्यादि नांवांनीं प्रसिद्ध होते. ह्या सर्वच आयुधजीवि संघांना पुढें क्षात्रिय (Feudal barons) या शब्दानें संबोधूं लागले असावेत असें वाटतें. म्हणून 'क्षात्रियस्य रक्षणम्'[2] असा नियम सांगितलेला आहे. क्षात्रियानें राज्य मिळवून प्रजांचें रक्षण करावें. प्रजांचें आणि धर्मांचें रक्षण हा क्षात्रियांचा धर्म.

या पद्धतींत राजसत्ता एकमुखी होती, परंतु सर्वतंत्रस्वतंत्र नव्हती. आधुनिकांच्या कल्पनांप्रमाणें पाहिलें, तर राष्ट्र हें सर्वांत मोठें ध्येय आणि राजसत्ता हें अधिकाराचें सर्वश्रेष्ठ स्थान. प्राचीन हिंदूंची राजसत्ता अशी सर्वतंत्रस्वतंत्र नव्हती. त्या राजसत्तेला शासन करणारी अव्यक्त धर्म म्हणून संस्था होती. धर्म हा अव्यक्त असल्याकारणानें त्याचा, राजा असो अगर रंक असो, त्याच्या मनावर जास्त लवकर आणि जबरदस्त पगडा बसतो. हिंदूंच्या राजकीय पद्धतीचें यथातथ्य निरुपण करण्याचें मागें अभिवचन दिलें होतें; परंतु ग्रंथविस्तार फार होईल असें वाटतें, म्हणून त्याच विषयावर वेगळा ग्रंथ लवकरच लिहिण्याचें ठरविलें आहे. असो. राजसत्ता-

१ राधामाधवविलासचंपू, प्रस्तावना.

२ मनु.

धर्मांत त्याची उपजीविका असे. मग जो राजसत्ता मिळवी तो राजा. ते राजे इतर राजांशीं—ते वांशिकदृष्ट्या भिन्न असले तरी—विवाहसंबंध करीत. हा संकर आणि युद्धाचे नैसर्गिक परिणाम, या कारणानें क्षत्रिय वर्ण अग जाति कधींच निर्माण झाली नाहीं. ज्या क्षत्रियवर्णांतर्गत जाति म्हणून सांगितलेल्या आढळतात, त्या युद्धाचा घोर परिणाम जो सर्वनाश त्यामध्य गडप झाल्या. मनु म्हणतो,

"शनकैस्तु क्रियालोपादिमा क्षत्रियजातयः ।
वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेनच ।
पौंड्रकाचौड्रद्रविडाः कांबोजा यवनाः शकाः ।
पारदाः पह्लवाः चीनाः किराता दरदाः खशाः ॥

यांपैकीं सर्वांचा इतिहास सांगत बसणें शक्य नाहीं. शक म्हणजे सीथीअन वंश आज शिल्लक आहेत असें वाटत नाहीं. सर हरबर्ट रिस्लेनें शकांचा वांशिक छाप कांहीं हिंदु लोकांत दिसतो असें दाखविण्याचा जो प्रयत्न केला आहे, तो असिद्ध स्वरूपाचा आहे. पहिली गोष्ट अशी आहे कीं, राजसत्ता अगर राजतुल्य सत्ता गाजविणारे लोक एका वंशांतून आलेले नसतात, परंतु अधिकारसाधर्म्य प्राप्त झाल्यामुळें ते आपसांत विवाहादि संबंध करतात. या संकरानें फळ त्यांना प्राप्त होतेंच. शिवाय क्षत्रिय लोक युद्धप्रिय असतात म्हणूनही त्यांचा नाश होतो. येथें युद्ध या विषयासंबंधीं बऱ्याच गोष्टींचा खुलासा करावयास पाहिजे. इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत होण्यापूर्वी तो देश अंतर्गत लढायांनीं बेजार होऊन गेला होता, अशा तऱ्हेचें एक विधान पुष्कळ ठिकाणीं केलेलें ऐकूं येतें. येथें एक गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे ती अशी कीं, ज्या तऱ्हेचीं युद्धें हिंदुस्थानांत लढलीं जात त्या तऱ्हेच्या युद्धांमध्यें सर्वांची सर्व लोकसंख्या कधींही भाग घेत नसे. समाजांत वरिष्ठ मानले गेलेले राजेलोक, सरदार लोक आणि त्यांचीं सैन्यें या सर्वांच्या आपआपसांत काय भानगडी चालल्या असतील तेवढ्याच. बाकी सर्वसाधारण समाज आपल्या नैसर्गिक रहाणीपासून केव्हांही विचलित होत नसे. दुसरी गोष्ट अशी कीं, ज्या तऱ्हेच्या लढाया हिंदुस्थानांत लढल्या जात त्या तऱ्हेच्या लढाया लढणाऱ्या वर्गाला तरी नैसर्गिक निवडीच्या

दृष्टीनें थोडयाशा हितकारक होऊं शकत. कारण, त्या लढायांत शौर्यधैर्यादि गुण, शरीरशक्ति पंचेन्द्रियांची अविकलता वगैरे गुण थोडेसे कसाला लागत. परंतु एकंदरींत लढवय्या वर्गाच्या नशीबीं अंतिम परिणाम नाशच. कल्पना येण्याकरितां युद्धाच्या परिणामांचें थोडेंसें परीक्षण करतों. पुरातन काळीं मानवाच्या एका संघानें दुसऱ्या संघावर हल्ला केला तर ज्या संघांतील व्यक्तींमध्यें धैर्य, उत्तम दृष्टि, तेजस्विता, धूर्तपणा, शारीर-शक्ति, काटकपणा वगैरे गुण जास्त प्रमाणांत असतील, तो संघ विजयी होत असे. म्हणजे या पद्धतींत नैसर्गिक निवडीचें तत्त्व थोडेंसें उपयोगांत आलें. समाजांच्या कांहीं स्थितीपर्यंत या दृष्टीनें युद्ध हें हितकारक असतें. त्यामुळें युद्धानें समाजामध्यें कांहीं विवक्षित गुणांची वाढ होते. वाल्टर बेजहॉट म्हणतो[१], 'युद्धानें शौर्य, सत्यवक्तेपणा, आज्ञाधारकपणा, कडक शिस्त वगैरे गुण कांहीं विवक्षित प्रमाणांत उत्पन्न होतात आणि हे गुण समाजजीवनाला पोषक असेच असतात.' समाजांच्या विवक्षित स्थितींत युद्धाचे वर सांगितलेले सुपरिणाम खास घडून येत असले पाहिजेत. परंतु युद्धशास्त्रांत जसजशी प्रगति होत चालली, तसतसें युद्ध हें एक नैस-र्गिक निवडीचें साधन होतें, तो त्याचा गुण नष्ट होऊन आतां युद्ध म्हणजे श्रेष्ठांचा पद्धतशीर नाश करण्याचें एक हमखास साधन होऊन राहिलें आहे!

ज्या कोणत्या समाजामध्यें अगर राष्ट्रामध्यें वयांत आलेल्या प्रत्येक पुरुष व्यक्तीनें लष्करी शिक्षण घेतलेंच पाहिजे अशा तऱ्हेचा नियम असेल अगर केला जाईल, त्या समाजामध्यें देखील लष्करी पेशाकरितां जे पुरुष निवडावयाचे त्यांची वैद्यकीय तपासणी करून जे शरीराच्या सर्व इंद्रियांनीं सुदृढ असतील, त्यांचीच तेवढी निवड केली जाईल ही गोष्ट निश्चितच समजावयास पाहिजे. ज्यांची दृष्टि अधु असेल, जे शरीरानें रोगी अगर दुर्बल असतील, किंवा कोणत्याही शारीरिक अगर मानसिक दोषांनीं युक्त असतील ते अर्थातच वगळले जातील. ज्यांच्यामध्यें एक तऱ्हेची जोरदार शरीरप्रकृति असेल तेवढेच युद्धाला लायक म्हणून निवडले जातील. या गोष्टीचा एकंदर समाजावर काय परिणाम होतो तें पाहूं. हे निवडलेले पुरुष दोन वर्षें अगर तीन वर्षें इतर कोणत्याही धंद्यांत लक्ष घालूं शकणार

१ Physics and Politics by Bagehot.

नाहींत. कोणत्याही सरकाराला फार मोठें पगारी खडें सैन्य ठेवणें अर्थ-दृष्ट्या शक्य नाहीं. म्हणून या सर्वांना लष्करी शिक्षण घेऊन झाल्या-नंतर जीवितार्थ कोणता ना कोणता तरी पेशा स्वीकारणें अपरिहार्य आहे. परंतु समाज ही हळूहळू नीतिप्रधान स्थितींतून अर्थप्रधान स्थितींत चालला असल्याकारणानें, एकुणाक अर्थोत्पादक धंद्यांमध्यें चहूंकडे खेंचाखेंच झालेली दिसून येईल. या लष्करी शिक्षणाकरितां गेलेल्या पुरुषानें हीं जीं तीन वर्षे फुकट घालविलीं तेवढ्या मुदतींत दुसऱ्या कोणीतरी शारीरशक्तीनें दुर्बळ अशा व्यक्ती इतर धंद्यांतील जागा पटकावून बसतील. त्यामुळें या पुरुषांना धंद्यांत प्रवेश होऊन जम बसण्यासच बराच वेळ लागेल. ज्यांनीं धंद्यांमध्यें आधीं जम बसविला असेल त्यांना आर्थिक दृष्टीनें पहातां लवकर विवाह करतां येईल आणि त्यांची — म्हणजे जे लष्करी शिक्षणाकरितां नालायक ठरले होते त्यांची—संतति दर पिढीला जास्त जास्त शिल्लक रहात जाईल. सार्वत्रिक लष्करी शिक्षण देणारीं राष्ट्रें तात्कालिन युद्धांत खंबीर ठरत असलीं, तरी एकदोन पिढ्यांत त्यांची काय दशा होईल हें [illegible] पोर देखील सांगूं शकेल आणि नेमकी तीच तर गोष्ट मुत्सद्यांना कळत नाहीं ! खरी गोष्ट अशी आहे कीं, समाजाला एकाच तऱ्हेची [illegible]कृति लावणें ही गोष्ट कोणत्याही स्थितींत हितकर नाहीं. ह्या लष्करी शिक्षणाच्या मानगर्डीत उत्तम शरीर आणि त्याबरोबरच श्रेष्ठ बुद्धि असलेले लोक पडूं लागले, म्हणजे त्या स्थितीपासून आणखी केवढी हानि होईल याची कल्पना मनानेंच करणें बरें. विवाहाचें वय लवकरचें असलें तर त्या पुरुषाची स्त्रीही पण कोंवळ्या वयाचीच असणार. विवाह बालवयांत[1] होणें हें सुपीकतेला पोषक असतें. तीन वर्षेपर्यंत इतरांचा धंद्यांत जम [illegible]ल्या नसून त्यांना विवाह लवकर करतां येईल. मग अशा तऱ्हेनें मागें पडलेले आणि धंद्यांत स्थिर झालेले, यांच्या संततीच्या संख्येंत जरी अगदीं थोडा फरक पडत गेला आणि अशी स्थिति कांहीं पिढ्या राहिली तरी श्रेष्ठ लोकांचा लवकरच निःपात होईल. मग मुत्सद्यांनीं केलेले कायदे, नीतिशास्त्रज्ञांचीं व्याख्यानें, अर्थशास्त्रज्ञांच्या अर्थशून्य गप्पा, या सर्वांचाही राष्ट्रनाश

१ Studies in the psychology of Sex by Havelock Ellis; Genetical theory of natural selection by R. A. Fisher.

थांबविण्यास काडीचाही उपयोग होणार नाहीं ! उदाहरणाकरितां आपण असें समजूं कीं, जेथें श्रेष्ठांचीं ३३ मुलें जगतात त्याच समाजांत कनिष्ठांचीं ३४ मुलें जगूं लागलीं आणि हीच प्रणाली पिढ्यानपिढ्या चालू राहिली, तर सरासरीनें तेहतीस पिढ्यांत कनिष्ठ प्रजेची संख्या वरिष्ठ प्रजेच्या संख्येच्या दुप्पट होईल. परिस्थितीच्या गप्पा झोंकणाऱ्या पंडितांनीं युरोपियन समाजांत आणि त्यांची संस्कृति अंशतः उचलल्याकारणानें आमच्या समाजांत, आज काय चाललें आहे त्याची चवकशी करून पहावी, आणि प्रत्यक्ष परिस्थिति व त्यावरून निघणारें अनुमान काय सांगतें, तें आम्हास कळवावें. एकंदरीनें समाजाची लायकी कमी होईल, वाढणार नाहीं. म्हणून सबंध समाज युद्धप्रिय बनविणें हें राष्ट्रांना चिरंजीव करावयाचें असल्यास इष्ट नाहीं !

हा अप्रत्यक्ष म्हणजे कालांतरानें दिसून येणारा परिणाम झाला. तात्कालिक होणारा परिणामही तितकाच घोर आहे. आम्हीं वर सांगितलेंच आहे का, युद्धाकरितां निवड सकस प्रकृतीच्याच लोकांची केली जाईल. खरोखरच युद्ध झाल्यास ते अर्थातच मारले जातील. युद्धाचें वर्णन भट्टनारायणानें,[1] ‘ इयं परिसमाप्यते रणकथाऽद्य दोःशालिनः ।

व्यपैतु नृपकाननातिगुरुरद्य भारो भुवः ॥ ’

असें केलेलें आहे. याचा अर्थ असा कीं, लढवय्या भांडखोर लोकांचें जें जंगल पृथ्वीला भार होऊन राहिलें आहे तें जरा साफ होऊन जाईल. परंतु याचा तरी अर्थ काय होतो? आपल्याकडे हिंदुस्थानांत युद्धाच्या परिणामांचें आंकडेवारीनें गणित देतां येणार नाहीं. परंतु युरोपियन राष्ट्रांमध्यें अशा तऱ्हेची आंकडेवारी देण्याची व्यवस्था केलेली आहे. हिंदुस्थानामध्यें अगदीं कालपरवांपर्यंत युद्ध हें कांहीं श्रेष्ठांच्या संहाराचें यंत्र बनलें नव्हतें. युरोपमध्यें युद्ध हें श्रेष्ठांच्या संहाराचें यंत्र बनलें होतें आणि अजून तसेंच आहे. तीच युद्धपद्धति आपल्याकडेही अर्थातच प्रसृत होणार. कारण, तिच्यांत मारक शक्ति आहे आणि ती शक्ति हस्तगत करून घेतल्याशिवाय, या युगांत कोणाही स्वतंत्र राष्ट्राची तग लागणें शक्य नाहीं. म्हणून युरोपमधील स्थिति पाहून कांहीं तरी नियम

---

१ वेणीसंहार.

बसविणें आपणांला शक्य आहे. युरोपांत जे आंकडे उपलब्ध आहेत त्यावरून असें दिसून येतें कीं, इसवी सन १७८९ म्हणजे फ्रान्समधील राज्यक्रांतीचा आरंभकाल; या वर्षापासून सन १९१३ पर्यंत जीं युद्धें होऊन गेलीं त्या युद्धांमध्यें एकंदर जवळ जवळ दोन कोटी दहा लक्ष शिपाई मारले गेले. हे सर्व लोक पिंडदृष्ट्या दुर्बल असते तर प्रगतीच्या दृष्टीनें झाली ही स्थिति फारच चांगली झाली, असें आम्हीं बिनदिक्कत म्हटलें असतें. परंतु आपणांस तसें म्हणतां येईल असें आम्हांला वाटत नाहीं. याशिवाय युद्धामुळें राष्ट्रांची जी बिकट परिस्थिति होते त्या परिस्थितीमुळें सर्वसाधारण समाजांतही मृत्युसंख्येचें प्रमाण वाढतें. अशा तऱ्हेनें युद्धानें एकंदर सार्वत्रिक संहारच होतो. आतां यापुढें जीं म्हणून कांहीं युद्धें होणार, त्यासंबंधीं बोलावयासच नको. त्यांमध्यें रासायनिक द्रव्यांचा उपयोग जास्त जास्त वाढत जाईल. कोणत्याही राष्ट्रांतील कोणीही व्यक्ति आतां लढाईच्या क्षेत्राच्या[१] बाहेर राहू शकणार नाहीं.

युरोपच्या बाहेर युद्धप्रिय लोकांनीं काय कहर उडविले त्यासंबंधीं, जी कांहीं माहिती उपलब्ध आहे त्या माहितीचे आधारें दिग्दर्शन करतों. हिंदु आणि इस्राएल या दोन धर्मांचे अनुयायी सोडून दिल्यास इतर लोकांच्या युद्धाच्या पद्धति रानटी आहेत. हिंदूंच्या पद्धतींत ‘ शरणागताचें रक्षण राजानें करावें; निःशस्त्र, पळून जाणारा आणि प्रत्यक्ष युद्धांत भाग न घेणारा, यांच्यांवर प्रहार करूं नये, त्याप्रमाणेंच लढाईत हत्यार गळून पडलेला आणि जखमी झालेला यांच्यावर प्रहार करूं नये. ’ असा नियम आहे. हे नियम किती कसोशीनें पाळीत असत ही गोष्ट महाभारत, रजपूत[२] लोकांचा इतिहास, नेपाळी[३] युद्धाचा इतिहास वगैरे स्थल—कालदृष्ट्या अत्यंत विभिन्न परिस्थितींतील युद्धांचीं वर्णनें करणारे इतिहास वाचले तरी सहज लक्षांत येईल. परंतु इतर समाजांच्या बाबतींत युद्धाचे असे कांहीं नियम असून, ते काटेतोल पद्धतीनें पाळले गेलेले आम्हांला आढळले नाहींत. कुराण

---

१ Scientific outlook by Bertrand Russel; The next war by Major Axal Bralt quoted by Russel.

२ Annals and antiquities of Rajasthan by James Todd.

३ The rise of the christian power in India by B. D. Basu.

सांगतें,[१] 'धर्मावर श्रद्धा न ठेवणाऱ्या लोकांबरोबर सतत लढत रहा. त्यांच्याशीं कठोर हृदयानें वागा. कारण, त्यांच्या नशीबीं नरक आहे आणि तो प्रवास दुःखमय झाला पाहिजे. परमेश्वर आणि त्याचा प्रेषित यांच्याविरुद्ध जे हात उचलतात त्यांचा वध करणें अगर त्यांना क्रुसावर चढविणें हेंच बक्षीस मिळालें पाहिजे. निदान त्यांचा एका बाजूचा हात आणि दुसऱ्या बाजूचा पाय तरी तोडून टाकावयास पाहिजे.' हा उपदेश कुराणांत आहे किंवा नाहीं, त्याचा उपयोग मुसलमानांनीं केला किंवा नाहीं आणि अजून देखील सर्वसाधारण मुसलमान व्यक्तीची अशीच कल्पना असते किंवा नाहीं, तें जाहीर रीतीनें सांगावें, अशी आमची आमच्यांतील मुसलमान बंधूंना विनंति आहे (श्रीयुत कन्हयालाल गौबा यांनीं हा ग्रंथ पाहिल्यास आम्हांस ती माहिती कळवावी). अशा तऱ्हेच्या लोकांना प्रेमानें आणि निःशस्त्र प्रतिकारानें आपल्याकडे वळवून घेण्याचा एक प्रयोग येथें एका थोर पुरुषानें सुरू केला होता, परंतु त्या प्रयोगाचा शेवट काय झाला तें कांहीं त्यानें अजून प्रसिद्ध केलें नाहीं. असो. ॲटिलाचे हूण, चेंगिजखानाचे मोंगल आणि तैमूरलंगाचे तार्तार यांनीं वेगवेगळ्या लोकांवर जे कहर उडविले ते कोणाच्याही अंगावर शहारेच उत्पन्न करतील! एकट्या तैमूरलंगानें जवळ जवळ पन्नास लक्ष लोकांची कत्तल केली असें गिबन म्हणतो. अशा तऱ्हेनें युद्धांची माहिती देत बसलें तर तो एक ग्रंथच होईल. स्वंगुणविशिष्ट जें युद्ध, त्याला उचलून धरणारे कांहीं थोडे थोडके लोक होऊन गेले नाहींत. युरोपमध्येंच पाहूं लागलें तर व्हालटेअर, फ्रान्समधील एन्सायक्लोपिडिआचे लेखक रूसो, कांट, बेन्थॅम वगैरे तत्त्ववेत्ते युद्धाला विरोधी आहेत. उलट हेगेल, रस्किन, नित्शे हे युद्धप्रिय आहेत. बेकनचे युद्धाबद्दलचे उद्गार ट्रीश्क आणि बर्न हार्डी यांच्या उद्गारांच्या तोडीचेच आहेत. एकंदरीनें लढाईची बाजू सावरून धरणारे कांहीं थोडेथोडके थोर पुरुष नव्हते. प्रत्यक्षतः पाहिलें तर असें दिसतें कीं, १९१४ सालीं जें महायुद्ध सुरू झालें त्या सुधारलेल्या महायुद्धांत सर्व राष्ट्रांचे मिळून प्रत्यक्ष लढाईमध्यें त्रेचाळीस लक्ष शिपाई ठार झाले. याशिवाय जवळ जवळ तितकेच रोगराईनें मेले अगर नापत्ता झाले ही गोष्ट वेगळीच. म्हणून

१ The christian ethics and modern problems by Dean Inge.

आम्ही म्हणतों कीं, पुन्हां लवकरच आपल्यां एकादें महायुद्ध आल्यास तें बरें. म्हणजे पृथ्वीला झालेला या कलहप्रिय लोकांचा भार कमी होईल ! पूर्वी कलहप्रिय लोक फारसा संघटनानें वागत नसत, परंतु हल्लींचे कलहप्रिय लोक धूर्त असल्याकारणानें सबंध राष्ट्रेंच्यां राष्ट्रें निरेस घालतात. युद्धाचा परिणाम अमेरिकन पंडीत डेव्हिड स्टार जॉर्डन[1] पुढील-प्रमाणें वर्णितो, ' युद्धाचे परिणाम म्हणजे वंश निवडून टाकणें. कारण, येथें निवड डार्विनच्या अनुयायांना पाहिजे त्याच्या उलट दिशेनें चाललेली असते. राष्ट्रांनीं हत्या करण्याचें थांबवून त्यांना जगूं जर दिलें असतें तर, राष्ट्रें आहेत त्यापेक्षां फारच सुदृढ अशीं राहिलीं असतीं ' जॉर्डननें म्हट-लेलें, ' to spoil the breed ' आणि भगवद्गीतेनें म्हटलेलें, ' जायते वर्णसंकरः ' । हीं दोनही वाक्यें समानार्थी नाहींत काय ?

वर केलेल्या चर्चेचा निष्कर्ष असा निघतो कीं, कोणतीही आणि कशा तऱ्हेचीही असली तरी लढवय्या लोकांची संघटना, युद्धाचे भीषण परिणाम आणि तज्जन्य नैतिक परिणाम या दोहोंच्या कचाट्यांत क्षत्रियांची आनु-वंशयुक्त अखंडीत परंपरा असलेली जाति उत्पन्न करूं शकत नाहीं. जग क्षत्रिय नाहींसे झाल्यावर समाजरक्षणाचें काम कोणीं करावें, हा प्रश्नच मुळीं अर्थशून्य आहे. मानवामध्यें युद्धप्रियता ( pugnacity ) हा साधारण गुण आहे. तो शक्य तर कमी करावयाचा असतो, नाहींतर प्रत्येक व्यक्तींत तो आहेच. म्हणून आज क्षत्रिय आहेत किंवा नाहींत अशा तऱ्हेचे प्रश्न घेऊन काथ्याकूट करीत बसणें अप्रस्तुत आहे. आज क्षत्रिय आहेतही आणि नाहींतही. भगवान् रामचंद्राचें घराणें, ययातीचें घराणें, निषधापति नलाचें घराणें, हीं घराणीं क्षत्रिय असल्यास तें क्षत्रिय आज नाहींत. उलट बाप्पारावळांचे शिसोदिया, परमार, यादव वगैरे घराणीं क्षत्रिय असल्यास तीं आज हयात आहेत. क्षत्रिय धर्मच असा आहे कीं, जुनीं क्षत्रिय घराणीं नष्ट होऊन नवीं क्षत्रिय घराणीं उद्भूत व्हावीत. परशु-रामानें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली, ही दंतकथा तेंच दाखविते. पुन्हां क्षत्रिय घराणीं उत्पन्न होतात याचें कारण असें आहे कीं, युद्धामध्यें

---

१ Quoted by Dean Inge in 'Christian ethics and modern problems.'

कोणीही साधारण बुद्धीचा मनुष्य देखील यश मिळवूं शकतो. तसें ब्राह्मण-विद्येचें नाहीं. याचें उदाहरण सांगावयाचें तर जन्मभर विद्याव्यासंगांत घालविणारा मनुष्य उत्तम सेनापति होऊं शकतो. परंतु जन्मभर लढाई-मध्यें आयुष्य खर्च केलेला मनुष्य उत्तम मुत्सद्दी होऊं शकत नाहीं. उत्तम मुत्सद्याला शिस्त वगैरे सर्व युद्धोपयोगी गुण असून शिवाय आणखीही पुष्कळ गुणांची गरज असते. ज्युलिअस् सीझरनें वयाच्या पन्नास वर्षापर्यंतचा काळ विद्याव्यासंगांत घालविल्यानंतरही तो विख्यात आणि जगन्मान्य सेनापति झाला. परंतु हॅनिबाल बार्का, लुई बूर्बोन प्रिन्स डी कांड, मार्लबरो, ड्युक ऑफ वेलिंग्टन वगैरे जगन्मान्य सेनापतींना उत्तम मुत्सद्दी होतां आलें नाहीं. हॅनिबॉलबद्दल तर केनीच्या युद्धानंतर त्याचा एक दुय्यम महरबल यानें 'या थोर पुरुषाला युद्धें जिंकतां येतात, परंतु त्याचा उपयोग करून घेतां येत नाहीं' असे स्पष्ट उद्गार काढलेले आहेत. प्रथम सेनापति असून पुढें मुत्सद्दी बनल्याचें एक जगन्मान्य विख्यात उदाहरण म्हणजे मार्शल हिंडेनबर्गचें. परंतु सर्वसाधारण वर सांगितलेला सिद्धांत त्रिकालाबाधितच आहे. एवंच संस्कृति प्राधान्यानें युद्धप्रिय बनविणें म्हणजे त्या संस्कृतीच्या नाशाचा आपल्या हातानें पाया घालण्यासारखें आहे !

**४८ शांतताप्रधान संस्कृतीचें श्रेष्ठत्व**

उलट, शांतताप्रधान संस्कृति याच चिरंजीव होतात असा इतिहासाचा निश्चित दाखला आहे. आज युद्धप्रिय संघ किंवा राष्ट्रें जगांतून नष्ट झालेलीं दिसतात. पशुसृष्टीमध्यें पाहिलें तरी व्याघ्र सिंहादि क्रूर पशु हळूहळू नष्ट होत असून निरुपद्रवी शेळ्यामेंढ्या वगैरे पशु मात्र शिल्लक आहेत. त्या प्राणिवर्गाचा निपात करण्याला मनुष्य नांवाच्या द्विपाद पशूनें सुरुवात केली आहे ! उलट शांतताप्रधान संस्कृतीबद्दल डॉ. कुक[१] म्हणतो, 'जपान किंवा इतर कोणतेंही पौर्वात्य राष्ट्र आपणावर हल्ला करून आपला नाश करील असें भय बाळगण्याचें कांहीं एक कारण नाहीं. परंतु हळूहळू शांततेनें आणि एक तऱ्हेनें निष्प्रतिकार अशा पद्धतीनें जी पौर्वात्य संस्कृतीची वाढ चाललेली असते, त्या वाढीला आळा घालण्याला कांहीं मार्ग नाहीं. त्यांनीं अशाच तऱ्हेची

---

१ Buddhists deny heredity by Dr, Cook, journal of heredity.

जीवनप्रणाली उत्पन्न केली आहे कीं, जीमुळें कोणत्याही संस्कृतीशी त्यांची गांठ पडली असतां त्या संस्कृती ती नवीन संस्कृति आत्मसात् तरी करतात, अगर हळूहळू शांतपणें पोखरून काढून तिचा नाश तरी करतात.' चिनी लोकांच्याबद्दल स्टोडार्ड[१] म्हणतो, 'हजारों वर्षे अत्यंत दारिद्र्यांत आयुष्य घालविल्याकारणानें कोणत्याही भयंकर परिस्थितींत जगणें हें चिनी मानववंशाला जितकें शक्य आहे, तितकें तें दुसऱ्या कोणत्याही मानववंशाला साधणार नाहीं. आपल्या राष्ट्रामध्यें चिनी मनुष्य उपासमारीच्या जवळजवळ अशा स्थितींत आयुष्य काढीत असल्याकारणानें दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रांत त्याला साधारणतः बऱ्या स्थितींत नेल्यास तो तावडतोब तेथील लोकांना भारी होतो.' नैसर्गिक निवडीचे नियम ज्या कोणाला कळत असतील तो असें म्हणेल. अशा परिस्थितींत देखील आपले वंश टिकविण्याची आमच्यामध्यें जी हातोटी आहे ती नष्ट कशी होईल, या विवंचनेनें तर आज आमचा जीवनक्रम ( Standard of living ) सुधारण्याचे प्रयत्न चालू आहेत! त्या मार्गानें जाण्याला आमच्या सुशिक्षित वर्गानें सुरवातही केली आहे. सुशिक्षित वर्ग ज्यास्त सुसंस्कृत असतो हाही एक निव्वळ भास आहे. युरोपिअन आणि आशियाटिक यांची तुलना करून स्टोडार्ड[२] म्हणतो, 'ज्या वेळीं शुक्लेतर लोक शुभ्रवर्णीयांच्या राष्ट्रांत प्रवेश करतात, त्यावेळीं ते लोक शुभ्रवर्णीयांची तेथून हकालपट्टी करतात. प्रथम ते श्रमजीवी लोकांना शह देतात, मग व्यापारी वर्गाचा नाश करतात आणि शेवटीं श्वेतवर्णीयांतील उच्च घराणीं उधळून लावतात. भूमिपृष्ठावर कोठेंही वर्णयुक्त कामकऱ्याबरोबर श्वेतवर्णीय कामकरी स्पर्धा करूंच शकत नाहीं.' आज आफ्रिकेमध्यें[३] जो हिंदी लोकांचा प्रश्न आहे तो मुख्यतः आर्थिक आहे, ही गोष्ट वरील चर्चेवरून सहज लक्षांत येईल.

असो. अशा तऱ्हेनें ब्राह्मणक्षत्रियांची तुलना करून पाहिली तर असें दिसून येईल कीं, ब्राह्मणांचे शांतताप्रधान धंदे वंशरक्षणाला जितके पोषक आहेत तितके क्षत्रियांचे नाहींत. त्यामुळें एकादी संस्कृति अखंड परंपरेनें

१ Quoted by Dean Inge in his Outspoken essays.

२ Rising Tide of colours by Stoddard.

३ Oriental labour in South Africa by Neame.

रक्षण करावयाची असल्यास तें काम ब्राह्मण या वंशाकडून जितकें चांगलें होईल तितकें क्षत्रियांच्या हातून होणार नाहीं. उपमेनें सांगावयाचें तर बाह्य परिस्थितीचा फारसा परिणाम होऊं न देतां वंशाचे गुण अखंडित ठेवण्याचें जें कार्य शुक्रबिंदु[1] प्राणिशास्त्रांत घडवून आणितो, तेंच कार्य समाजशास्त्रांत ब्राह्मणाला करावयाचें असतें. म्हणून ब्राह्मणानें आपली संस्कृति आणि आचार परिस्थितिनिरपेक्ष स्थितींत राखावयास पाहिजेत आणि समाजानें तसें करण्याला त्यांना मदत केली पाहिजे. आतां येथें एक गोष्ट ध्यानांत धरावयास पाहिजे. ती ही कीं, ब्राह्मणक्षत्रियांच्या धंद्यांमध्यें धनाला बरेंचसें गौणस्थान दिलेलें आढळून येईल. धंद्याच्या विभागणींत सुप्रजा हा मुख्य हेतु डोळ्यांपुढें ठेवून हिंदु समाजशास्त्रज्ञांनीं रचना केलेली आहे ही गोष्ट सहज लक्षांत येईल. कोणी म्हणेल कीं, आज धंदे पुष्कळ वाढले आहेत. तर त्यांत इतकेंच ठरेल कीं, धंद्यांचीही वर्गवारी करून प्रकृष्टाला प्रजापोषक आणि निकृष्टाला प्रजानाशक धंदे लावून द्या. त्यामध्यें दोघांचाही वृत्तिच्छेद होतां कामा नये. हीच सृष्टीची समता होय. फ्रेडरिक नीत्शे[2] म्हणतो, 'विषमतेमध्यें अन्याय नसून समतेचा हक्क मागणें हा अन्याय आहे.' जे. बी. हेक्रॅफ्ट[3] म्हणतो, 'मूलतः विषम असलेल्यांना समान मानण्याचा हास्यास्पदपणा ताबडतोब लक्षांत येईल.'

४९ धंद्यांची पुनर्विभागणि

धंद्याची नवीन विभागणी ( redistribution ) पाहिजे तर करावी, परंतु स्वयंशुद्ध होणारे शौचकूप तयार होईपर्यंत, सुसंध्याचा रस पिऊन राहिलें तरी मनुष्याला शरीरधर्म सोडीत नाहींत ही गोष्ट लक्षांत ठेवून आणि कोणत्याही लोकसंख्येमध्यें भंगी, मेहेतर वगैरे शब्दांनीं ओळखले जाणारे लोक फारच थोडे असले तरी काम भागतें ही गोष्ट लक्षांत ठेवतां, ब्राह्मणादि श्रेष्ठ वर्गांनीं या धंद्यांत पडावें असें म्हणणारे लोक उदारमतवादी महात्मे ठरत असले तरी, त्यांना सामाजिक

१ Germplasm by Weismann.
२ Anti-christ by Nietzsche.
३ Darwinism and race progress by J. B. Haycraft.

बाबतींत मत निश्चित करण्याची हिंमतच नाहीं असें म्हणणें ओघानें प्राप्त होतें. हिंदुस्थानांतील शेंकडा नव्वद लोकसंख्या खेड्यापाड्यांत रहात असून त्यांचा भंगी या नांवाच्या वर्गाशीं काडीचाही संबंध नाहीं. खेड्यापाड्यांतील शेतकरी वर्ग हा भंगी-जाति-निरपेक्ष असल्याकारणानें येऊन जाऊन शहरांना काय तो प्रश्न रहातो. हिंदुस्थानांत असलेल्या अस्पृश्यांपैकीं हे लोक शेंकडा दोन टक्क्यांइतके देखील नाहींत. असें असून याच लोकांबद्दल आधुनिक महात्म्यांना पान्हा कां फुटावा हा प्रश्न मानसशास्त्रज्ञांनीं सोड-विण्यासारखा आहे. तुकारामानें परमेश्वराचें लक्षण पुढीलप्रमाणें केलें आहे:

“ ज्यासी आपंगिता नाहीं । त्यासी जो धरी हृदयीं ॥
तोच साधु ओळखावा । देव तेथेंची जाणावा ॥
दया करी जे पुत्रासी । तेचि दास आणि दासी ॥
तुका म्हणे ऐसे किती । जाणों भगवंताची मूर्ति ॥ ”

हें लक्षण जरी खरें असलें तरी त्यांना महात्म्यांनीं हृदयीं धरावें पाहिजे तर; परंतु ज्यांना भगवंताची मूर्ति व्हावयाचें नसेल त्यांच्यासाठीं ही व्याद कां? खरें पाहिलें तर या भंगी नांवाच्या वर्गाचा खेड्यापाड्यांशीं काहीं संबंध नाहीं आणि इतर जे वर्ग अस्पृष्ट म्हणून खेड्यापाड्यांत वागत आहेत, त्यांना समाजसंस्थेमध्यें मानसन्मानाचें स्थान पूर्वीच मिळालेलें आहे. आजची गोष्ट तर राहूं द्याच, परंतु ज्या पेशव्यांच्या ज्या ब्राह्मणी राज्याबद्दल इतका गवगवा केला जातो त्या राज्यांत देखील त्यांना मान-सन्मानाची जागा मिळालेली होती, ही गोष्ट पुढील उताऱ्यावरून नजरेस येईल. डॉ. घुर्ये म्हणतात[2], “दक्षिण हिंदुस्थानांत कार्यकर्त्या ग्रामसंस्थांमध्यें मानसन्मानाच्या कल्पना या वेगवेगळ्या जातींनीं शांतपणें मान्य केल्या होत्या. त्यामुळें जातीजातींत सलोखा राहून संघटित तऱ्हेनें कार्य करण्यास कोणत्याही तऱ्हेनें प्रत्यवाय येत नसे. दोन ब्राह्मण बंधूंमध्यें वंशपरंपरागत उत्पन्नासंबंधीं कांहीं भानगड उपस्थित झाल्यामुळें, ती गोष्ट ग्रामपंचायती-पुढें मांडण्याचें ठरलें. त्या पंचायतींत निकाल देणारे जे पंच होते त्या पंचांमध्यें मराठा, धनगर, गुरव, सुतार, लोहार, कुंभार, कोळी, न्हावी,

---

१ स्मरणांतून.
२ Caste and race in India by Dr. G. S. Ghurye.

चांभार, महार आणि मांग या जातींच्या लोकांचा समावेश झालेला होता." गांधी आणि मंडळींनीं मानलेला वृत्तिरहित, अपमानित, दलित ( depressed, suppressed, oppressed ) असा अस्पृश्य येथें दिसून येतो काय? येथें तर अस्पृश्य हा ब्राह्मणाच्या भांडणाचा निकाल लावणारा न्यायाधीश म्हणून दृष्टीस पडतो! खरी गोष्ट अशी आहे कीं, आमच्यामध्यें जे लोक आज पुढारी म्हणून वावरत आहेत, त्यांचा हिंदुसमाजांतील प्रत्येक गट आणि त्या गटांतील प्रत्येक व्यक्ति यांच्यामध्यें स्वाभिमानाचा एक लवलेश देखील राहूं न देण्याचा कट झालेला दिसतो! अस्पृष्टांना दलित हा खोटाच शब्द लावून त्यांच्या स्वाभिमानाचा नाश करावयाचा व श्रेष्ठ वर्गांत, तूं नव्हे तुझ्या बापानें पूर्वीं पातकें केलेलीं आहेत त्याबद्दलचीं फळें भोग असें सांगून त्यांचा स्वाभिमान नष्ट करावयाचा! आणि असे जे स्वाभिमानशून्य वर्ग त्यांच्या मदतीनें जेहेत्ते स्वराज्यप्राप्ति करून घ्यावयाची! विचार चांगला आहे आणि या प्रयत्नानें स्वराज्य मिळेलही!

वरील चर्चेवरून दिसून येईल कीं, वंशाच्या कल्पना ( heredity ), अर्थाची विभागणी, मानसन्मानाच्या कल्पना – अहंकारवृत्तीचें समाधान, व्यक्तींचा स्वाभिमान, अधिकारानुरूप धार्मिक व्यवस्था इत्यादि सर्व गोष्टींचा आश्रय करून हिंदूंची समाजरचना फारच कौशल्यानें केलेली आहे. त्यामुळें सबंध समाजाला धक्का बसेल अगर समाजांत समाजाचा नाश करणारी व्यक्ति उत्पन्न होईल अशी परिस्थितीच केव्हांही उत्पन्न होत नाहीं. मानवाला समाजामध्यें मुख्यतः अभिमान बाळगण्यासारखें स्थान, उदरपोषणापुरतें अन्न, मनःशांति प्राप्त होण्यासारखा धर्म इतक्या गोष्टी प्राप्त झाल्यास तो संतुष्ट राहून पुष्कळांचें पुष्कळ सुख, जें कांहीं तत्त्वज्ञान्यांना[1] सिद्ध व्हावयास पाहिजे तें, आपोआपच सिद्ध होतें. या सर्व प्रकारांची सर्वांनाच जरूर असते असें नाहीं. परंतु, ज्याला जो उचलावासा वाटत असेल त्याला तो मिळण्याची व्यवस्था केलेली आहे. अशी व्यवस्था इतर कोणत्याही समाजांत आहे असें आम्हांला वाटत नाहीं. युरोपियन समाजांत कामकरी वर्गाची त्याच्या हत्यारांवर देखील मत्ता

**५० चर्चेचा निष्कर्ष**

१ Mill, Bentham and others.

राहिली नाहीं, म्हणून तर कार्ल मार्क्सच्या अर्थशास्त्रासारख्या अशास्त्रीय पद्धतीला पाठिंबा मिळूं शकला. हिंदूंच्या शास्त्रीय पद्धतींत ब्राह्मण चांभाराचीं दुकानें काढीत नाहीं आणि चांभार जानवेंही मागत नाहीं. अशा रीतीनें व्यवस्था झाली म्हणजे सर्व विविध परींचें रक्षण ( Survival of the unlikes ) होतें. असें सांगूं लागलें म्हणजे असा प्रश्न विचारला जातो कीं, हें सर्व बरोबर असेल, परंतु परिस्थिति काय झाली आहे हें तुम्हांला कळत नाहीं ! आम्हांला कळत नाहीं ही गोष्ट सर्वस्वी कबूल करूनही आम्ही एक अशी शंका विचारतों कीं, अजूनही मुख्यतः अवरवर्णीय जाति आपापले धंदे सांभाळून आहेत, ही गोष्ट कोणाच्याही सहज लक्षांत येण्यासारखी आहे. उदाहरणार्थ, चांभार जाति अजून जोड्याचाच धंदा करून आहे, त्या जातीला प्रतिस्पर्धी म्हणून पुष्कळ चर्मकारेतर जोडेविक्ये झाले आहेत. परंतु चांभारांची संख्या कमी झाल्याचें खानेसुमारीवरून कांहीं दिसून येत नाहीं. परिस्थिति भयंकर झाली आहे वगैरे जी भाषा ऐकूं येते, ती त्यक्तस्वधर्म जातींबद्दलच खरी आहे असें दिसून येईल. इतरांचीही अन्नाबाबत तशी स्थिति होणें म्हणजेच सुधारणा असेंही म्हणतां येईल. ग्रामव्यवस्थेंत त्यांना वतनें लावून दिलीं, म्हणूनच त्यांचा सर्वनाश झाला असें म्हणणारे लेखक आजही आहेत !

समाजांतर्गत व्यक्तींना सुखाची इच्छा असते म्हणून सुख हें धर्माचें ध्येय असावें, असा एक पक्ष पुढें येऊं लागला आहे. व्यक्तींना ज्या ज्या गोष्टींची इच्छा असते त्या त्या धर्माचें ध्येय मानाव्या, असें म्हणूं लागल्यास मोठीच पंचाईत होईल. बऱ्याचशा पुरुषांना पुष्कळ स्त्रिया प्राप्त व्हाव्यात अशी इच्छा असते तेव्हां तेंही कृत्य धर्माचें ध्येय मानावें लागेल ! मनुष्याला छप्पन इच्छा असतात, पण त्यांचा त्याग करणें हेंच तर समाजरचनेचें आद्यतत्त्व आहे. रा. के. ल. दप्तरी म्हणतात, ' धर्माचें साध्य सुख हेंच आहे. कारण, सर्व मनुष्यें सुखाचीच इच्छा करतात. ' आतां

---

१ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न– वि. रा. शिंदे.

२ धर्मरहस्य– के. ल. दप्तरी; धर्मस्वरूपनिर्णय– तर्कतीर्थ कोकजे; धर्मशास्त्रमंथन– दिवेकर.

३ अस्पृश्यतानिवारण– के. ल. दप्तरी.

हा सिद्धांत अतिशय चमत्कारिक आहे. यांत सांगितलेलें कारण खरें असल्यास पाश्चात्य न्यायशास्त्रांत तो पुढीलप्रमाणें मांडतां येईल.

" ज्याची ज्याची सर्व मनुष्यें इच्छा करतात तें तें धर्माचें ध्येय असावें. "

" सर्व मनुष्यें सुखाची इच्छा करतात. "

∴ " सुख हेंच धर्माचें ध्येय असावें. "

यालाच तर्कतीर्थांनीं[१] आत्मतुष्टि असें नांव दिलेलें आहे. या आत्मतुष्टि शब्दावर त्यांनीं बरेंच भाष्य केलेलें आहे आणि पौर्वात्य तत्त्वज्ञानाची माहिती असल्याकारणानें तें भाष्य बऱ्याच अंशीं योग्यही आहे. परंतु त्यामुळें धर्माचें ध्येय आत्मतुष्टि हे कसें ठरेल हें कांहीं कळत नाहीं. एकंदरींत त्यांचा आशय असा कीं, विषयाचा उपभोग घेतल्यानें मनुष्याच्या वासना तृप्त होत नाहींत, तर जास्तच तीव्र होतात. म्हणून ' संतोषादनुत्तमसुख लाभः । ' आम्हींही पूर्वीं या बाबतींत दोन शब्द लिहिले आहेत; आतां त्यांना एवढेंच सांगतों कीं, मनुष्यांना सुख अगर आत्मतुष्टीची इच्छा असते हें खरें. परंतु त्याचेमागें अनुत्तम हा शब्द लावल्याबरोबर तो सोपाधिक म्हणून दुष्ट हेतु होतो एवढेंच. विषय मानसशास्त्राचा असल्याकारणानें येथें आत्मतुष्टि हें धर्माचें एक प्रमाण गृहीत धरावयास आम्ही तयार आहों. परंतु आत्मतुष्टि अगर अंतःकरणाचें समाधान या गोष्टी वैयक्तिक असल्याकारणानें हें तत्त्व समाजाला लागू कसें करावें, तेंही त्यांनीं सांगावयास पाहिजे, तसें तर कांहीं ते कोठेंच सांगत नाहींत. सुख हा शब्द उच्चारल्याबरोबर उपरिनिर्दिष्ट महंतांना तो कसाही वाटत असला —उपाधियुक्त सुख असा वाटत असला— तरीही सामाजिक व्यक्तीच्यापुढें सुख शब्दाचा एकच अर्थ उभा रहातो. तो म्हणजे कमी काम, जास्त वेतन आणि जास्त खर्चाची रहाणी. आतां त्यांचें जें अनुत्तमसुख तें सर्व समाजाला कळेपर्यंत आचारधर्म थांबवून ठेवावयाचे असें त्यांचें म्हणणें असल्यास तो प्रश्न वेगळा. त्यांनीं तसा प्रयत्न करावा. ' सामाजिक सुख ' शब्दानें आम्हीं कशाचा बोध करून घेतों तें सांगितलें. आमच्या मतानें वर जी मनुष्यांची सुखाची कल्पना सांगितली त्या कल्प-

---

१ धर्मस्वरूपनिर्णय— कोकजे.

नेचा अर्थ पुष्कळांचें पुष्कळ सुख असा होत नसून पुष्कळांचा पुष्कळ आळशीपणा असा होतो. म्हणून समाजरचना करतांना सुखदुःखाच्या व्यक्तिगत कल्पना टाकून देऊन सुखदुःखाचें प्रत्यक्ष मोजमाप देतां आलें तर द्यावयास पाहिजे. नीतिशास्त्र हें प्रत्यक्ष समाजाकरितां असल्यानें आत्म-तुष्टि (Subjective happiness) हें नीतीचें म्हणजे क्रियेच्या हिताहितत्त्वाचें प्रमाण करूं नये असें आम्हांला वाटतें.[१] मग तेंच मोजमाप सर्व समाजांना लावून कोणता समाज सुखी आणि कोणता समाज दुःखी, हें ठरवितां येईल. परंतु न जाणो, तसें सांगितलें तर निर्णय काय ठरेल कोण जाणे अशा भीतीनें ते सांगत नसावेत. सर्व मनुष्यें सुखाची इच्छा करतात हें ऐकल्याबरोबर आम्हीही पण सांगतों, "सुखापेक्षां[२] देखील सर्व मनुष्यें जिवंत रहाण्याची जास्त इच्छा करतात. म्हणून जगविणें हें धर्माचें ध्येय असावें."

सुखाच्या इच्छेपेक्षांही जीवनाची इच्छा ही मनुष्यप्राण्यांशीं जास्त निग-डित झालेली नाहीं काय? समाज सुखी आहे काय? समाज संघटित आहे काय? या दोनही प्रश्नांना प्रत्यक्ष मोजमाप करतां येईल असें समाजांचें कांहीं तरी लक्षण सांगून, त्यांचा श्रेष्ठकनिष्ठभाव ठरविल्यास उत्तर देणें बरेंच सोपें पडेल. कोणत्याही एका काळचे दोन समाज तुलनेला घेत-ल्यास असें सांगतां आलें पाहिजे कीं, अखिल मानवाला लागू असणारा कांहीं तरी समान धर्म आहे आणि तो मोजमाप करतां येण्यासारखा आहे, तरच आपणाला एका मापानें मोजतां येईल. तसा कांहीं धर्मच नसला तर मग वाटेल त्यानें वाटेल तें म्हणावें. त्यामुळें समाजरचनेचा पायाच नष्ट होईल.

परंतु अखिल मानवाला लागू असे तीन गुण आहेत आणि त्यांचे अनु-योगी तीन गुन्हेही आहेत. ते तीन गुण म्हणजे, जीवनार्थ[३] क्षुधा, वंश-रक्षणार्थ स्त्री आणि अहंकाराचें प्रदर्शन करण्याकरितां स्पर्धा. त्याचे अनु-

---

१ Ethics by Moore, Mackenzie, Green and others. 'उलट दुःख हेंच मानवाला आणि समाजाला पोषक आहे' Nietzsche.

२ Any work on biology.

३ Criminal Sociology by Enrico Ferri.

योगी गुन्हे म्हणजे द्रव्याकरितां चोरी, स्त्रीसंग्रहाकरितां जबरीसंभोग आणि प्रतिपक्षाला मार्गांतून दूर करण्याकरितां खून असे आहेत. या मानवाच्या इच्छा आणि त्यांचे अनुयोगी गुन्हे यांच्यावरून समाजसुदृढतेचें माननीय लक्षण ठरवितां येणार नाहीं काय ? ज्या समाजांत जबरीसंभोग जास्त होतील तो समाज स्त्रीसुखाचे दृष्टीनें संघटित नाहीं असें म्हणतां येईल.

**५१ सुखदुःखांचें मापन**

व्यक्ति कोणत्याही समाजाचा घटक म्हणून रहात असली अगर आम्ही सर्वतंत्र स्वतंत्र आहों, आम्हांला तुमच्या समाजाची जरूर नाहीं असें सांगून एकांड्या शिलेदाराप्रमाणें रहात असली, तरीही जगणें-यावच्छक्य जगणें– ही व्यक्तीची इच्छा असते आणि असावयास पाहिजे. म्हणून सामाजिक स्थितींत जीवन हें खरोखर व्यक्तींला मूल्यवान् वाटावयास पाहिजे. याकरितांच– म्हणजे जीवनाचें मूल्य चढविण्याकरितांच प्रत्येक धर्म कांहींना कांहीं तरी विचारकर्तृक जगत् उत्पन्न करीत असतात. कोणताही समाज निसर्गाच्या रेट्यांत कर्ता अगर बलवान् रहावा अशी इच्छा असल्यास व्यक्ति-व्यक्तींची गटांतर्गत स्पर्धा आणि गटागटांचा जीवनार्थ कलह हा धर्मानें बांधून टाकला नसल्यास चालू रहाणारच. परंतु कलहाच्या तीव्रतेनें जाति काय अगर व्यक्ति काय या दोहोंच्याही अंतःकरणांत निराशा उत्पन्न होऊन जाति आणि व्यक्ति यांना जगणें ही कांहीं फारशी महत्त्वाची गोष्ट नाहीं असें वाटतां कामा नये. सामाजिक सत्ता ही मनुष्यव्यक्तीच्या सत्तेपेक्षां जास्त विस्तृत असल्याकारणानें मनुष्याचा– मनुष्याचाच कशाला, यच्चयावत् सजीव आणि सेंद्रियप्राण्याचा– आद्य हेतु जो जीवन, तो सामाजिक परिस्थितीनें विकृत होतां कामा नये. ज्या समाजांतील व्यक्तींची जगण्याची इच्छा नष्ट होऊन त्या ठिकाणीं मरण्याची इच्छा बळावूं लागली, तो समाज वरवर जरी कितीही संघटित, सुखी आणि सुंदर दिसत असला तरीही मनुष्याच्या अंतःकरणाची अगदीं प्राथमिक देखील वासना पूर्ण करण्याला अपात्र आणि असमर्थ ठरला. थोडक्यांत सांगावयाचें तर, ज्या समाजामध्यें लोकसंख्यांच्या वाढीशीं तुलना करतां आत्महत्त्यांच्या वाढीचें प्रमाण जास्त पडत असेल, तो समाज अधोगतीच्या मार्गानें चालला आहे असें

खुशाल समजावें. वर सांगितलें हें प्रमाण मानवाची मूळ आशा बदलल्याचेंच लक्षण होईल. सृष्टींतील जी मुख्य शक्ति, ती शक्तीच उलट दिशेनें बदलल्यासारखें होईल.

येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, आत्महत्त्यांच्या वाढीचें प्रमाण हें कांहीं सर्वसाधारण समाजाची सुस्थिति अगर दुस्थिति मोजण्याचें गमक होऊं शकत नाहीं. कारण आत्महत्त्या हा एक व्यक्तीच्या वेडाच्या लहरीचा परिणाम आहे. या ठिकाणीं दोन गोष्टी सिद्ध कराव्या लागतील. ( १ ) आत्महत्त्या करणारे लोक वेडे म्हणून आत्महत्त्या करतात व दुसरी म्हणजे, ( २ ) समाजाच्या ज्या विशिष्ट खंडाबद्दल आपण बोलत असूं, त्या खंडामध्यें आत्महत्त्या आणि वेड यांची वाढ समांतर रेषेंत झालेली आहे. पहिली गोष्ट म्हणजे कार्यकारणभाव दाखविला पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे जेथें वेड लागण्याचें प्रमाण जास्त तेथें आत्महत्त्यांचें प्रमाण जास्त, आणि जेथें वेड लागण्याचें प्रमाण कमी तेथें आत्महत्त्यांचें प्रमाण कमी ( method of agreement ) असा समन्वय. उलट, जर असें दाखवितां आलें कीं, जेथें वेडाचें प्रमाण कमी तेथें आत्महत्त्येचें प्रमाण जास्त आणि जेथें वेडाचें प्रमाण जास्त तेथें आत्महत्त्येचें प्रमाण कमी तर असें स्पष्ट म्हणतां येईल कीं, वेडाचें आणि आत्महत्त्येचें जेथें सहावस्थान (coexistence) देखील सिद्ध होत नाहीं, तेथें कार्यकारणभाव ( causation ) तरी कसा उत्पन्न होईल ? अभ्यासकांना असें दिसून आलें कीं, ज्या राष्ट्रामध्यें वेड लागण्याचें प्रमाण जास्त त्या राष्ट्रामध्यें आत्महत्त्येचें प्रमाण कमी आहे.[१] जीं राष्ट्रें वेड लागण्याच्या प्रमाणांत पुढारलेलीं तीं आत्महत्त्येच्या प्रमाणांत मागासलेलीं. त्याप्रमाणेंच एकाच समाजांतील स्त्रीपुरुषांचा विचार केल्यास मुख्यतः वेड लागण्याचें प्रमाण स्त्रियांमध्यें जास्त तर आत्महत्त्येचें प्रमाण पुरुषांमध्यें जास्त अशी वाटणी होईल. म्हणजे पुन्हां जेथें आत्महत्त्या जास्त तेथें वेडाचें प्रमाण कमी, याच नियमाला दुजोरा मिळतो. म्हणून या दोहोंमध्यें कार्यकारणभाव जोडतां येणार नाहीं. त्यामुळें आत्महत्त्या ही वेडाची लहर असें म्हणतां येणार नाहीं.

ज्यांना सामाजिक प्रश्नाचा अभ्यास करण्याची पद्धति माहिती नाहीं

---

१ Heredity and selection in sociology by Chatterton Hill.

आणि तसा अभ्यास करण्याची संवय नाहीं, असे लोक अशी शंका घेतील कीं, आत्महत्त्या करणें अगर न करणें हा वैयक्तिक[1] खाजगी प्रश्न. समाज-स्थितीचा येथें काडीचाही संबंध पोहोंचत नाहीं. इतकेंच नव्हे तर, आत्म-हत्त्या करण्याचा, अर्थात् हें जग केव्हां सोडून जावयाचें तें ठरविण्याचा, प्रत्येक व्यक्तीला जन्मसिद्ध हक्क आहे. आत्महत्त्या करून गेलेल्याचें समाज काय करणार ? या दोन प्रश्नांचा विचार करावयास पाहिजे. पहिल्या प्रश्ना-संबंधीं सांगावयाचें तर व्यक्ति ज्या कारणाकरितां आत्महत्त्या करते, तीं कारणें व्यक्तीला ज्यावर नियंत्रण घालतां येणें शक्य नाहीं अशा सामाजिक स्थितींतच उत्पन्न होत असतात. विवक्षित काळची अगर विवक्षित स्थळींची परिस्थिति कांहीं ती व्यक्ति घडवून आणीत नाहीं. आत्महत्त्या करण्याला पोषक अशी स्थिति समाज निर्माण करतो आणि व्यक्ति त्या परिस्थितीला बळी पडत असते. समाजांत घडून येणारे सर्व[2] गुन्हे त्या नैतिक[3] मूल्यांना योग्य असेच असतात. हीं नैतिक मूल्यें ठरवितांनाच खरी काळजी घ्यावी लागते आणि ती हाडींमासीं खिळून जावी लागते. या सिद्धांताचें मुख्य गमक असें आहे कीं, समाजांतील जननमरणाची स्थिति गणिताच्या दृष्टीनें जितकी नियमित असेल, त्यापेक्षांही आत्महत्त्येच्या प्रमाणाची संख्या जास्त नियमित असते. या ठिकाणीं गणितागत पद्धतीचे पोलादी नियम ( iron laws ) अक्षरशः लागू पडतात. म्हणून आम्ही म्हणतों कीं, आत्महत्त्या हा सामाजिक ( mass statistics ) प्रश्न आहे, वैयक्तिक नव्हे. समाज हा जर जीविताचें रक्षण करण्याकरितां आहे, तर त्यांत मनुष्यामध्यें स्वतःचा नाश करून घेण्याची प्रवृत्ति कां उत्पन्न व्हावी ? हें एक कोडेंच नव्हे काय ? सर्व कृतीचा हेतु एक आणि त्या कृतीचा परिणाम साफ वेगळा!

दुसरा प्रश्न असा कीं, प्रत्येक व्यक्तीला आत्महत्त्या करण्याचा हक्क असतो असें कांहीं पंडित म्हणतात. या पंडितांना हा विषयच समजला नाहीं, असें स्पष्ट शब्दांत सांगितल्याशिवाय इलाज नाहीं. प्रश्न, काय

१ Criminal Sociology by Ferri; Modern theories of criminality by De Quiros.

२ Hymen or the future of marriage by Dr. Norman Haire.

३ Ibid.

हक्क असावा अगर काय हक्क नसावा हा नसून आत्महत्या करण्यासारखी परिस्थिति काय कारणानें उत्पन्न होते हा आहे. तशी परिस्थिति उत्पन्न न होण्यास काय केलें पाहिजे याचा समाजशास्त्रज्ञानें विचार करावयाचा असतो, हक्क देणें किंवा न देणें या गोष्टीचा नव्हे. अशाच तऱ्हेनें विचार करावयाचा तर गर्भपात ( Abortion ), बालहत्या, पुरुषहत्त्या याचाही प्रत्येकास हक्क असावयास पाहिजे. मीं आपल्या घरीं मुलाची हत्या केली तर समाजाला काय करावयाचें आहे ? लोक बालहत्त्या अगर आत्महत्त्या करीत नाहींत याचें कारण, त्यांना तसा हक्क नाहीं म्हणून असें मानणें हें मूर्खपणाचें द्योतक आहे. हक्क असो अगर नसो, आत्महत्त्या करणारी व्यक्ति कांहीं त्याकरितां वाट पहात नाहीं.[1]

आजपर्यंत समाजशास्त्रज्ञांचें लक्ष इकडे न जाण्याचें कारण, त्यांच्या मतानें समाज म्हणजे व्यक्तींचा[2] समुदाय, म्हणून समाजांच्या उत्क्रांतीचे नियम आणि व्यक्तींच्या उत्क्रांतीचे नियम हे एकच होते. एकाच्या अनेक व्यक्ति झाल्याबरोबर त्या संघाचें म्हणून एक नवीनच मत तयार होतें, याची त्यांना आणीच नव्हती. परंतु मानसशास्त्रदृष्ट्या एकटीच एक व्यक्ति आणि संघांत अंतर्भूत झालेली व्यक्ति या दोन्ही एकच नव्हेत; व्यक्ति आणि समाजांतर्गत व्यक्ति हा भेद ओळखावयास पाहिजे. जगांतील कोणतीही व्यक्ति एकटीच असतांना जो गुन्हा करील, तोच गुन्हा ती व्यक्ति संघांत सामील झाल्याबरोबर करील असें नाहीं, आणि एकटी असतांना जो गुन्हा करणार नाहीं तो गुन्हा संघांत अंतर्भूत झाल्यावर व्यक्ति करतेही. एक मनुष्य जाळपोळ करीत सुटेल असें नसतांना जनसंमर्द जमल्यावर जाळपोळ झालेली आपण पहातोंच. देवयात्रा, विवाह, यज्ञ, उत्सव वगैरे जनसमूह असतांना जे हक्क[2] व्यक्तींना देतां येतील, तेच इतर ठिकाणींही मागू लागल्यास देतां येतील असें नाहीं. व्यक्तींच्या उत्क्रांतीचे नियम समाजालाही लागू पडतील असें म्हणणाऱ्यांचा रोख असा दिसतो कीं, समाज हे कांहीं थोर व्यक्तींच्या अनुकरणानें[3] उद्भूत होत असतात. म्हणजे

१ Le Suicide by Emile Durkheim quoted by Chatterton Hill.

२ देवयात्रा विवाहेषु यज्ञ प्रकरणेषुच । उत्सवेषुच सर्वेषु स्पृष्टास्पृष्टिर्न विद्यते ॥

३ यद्यदाचरति श्रेष्ठः ॥ तत्तदेवेतरोजनः ।

सामाजिक स्थिति ही कांहीं थोर व्यक्तींच्या अनुकरणाची स्थिति; आणि म्हणून सामाजिक उत्क्रांतीचे नियम म्हणजे वैयक्तिक उत्क्रांतीचे नियम होत. येथें अशा तऱ्हेचे लेखक एक गोष्ट विसरतात ती अशी कीं, कोणत्याही समाजाची कोणत्याही स्थळकाळाची स्थिति एकाच एक व्यक्तीला उत्पन्न करतां आली नसती. नेपोलियन बोनापार्ट, मोहनदास गांधी, लेनिन किंवा आणखीही कोणी थोर पुरुष घेतला तरी, त्याच्या एकट्याच्यानें समाजाची सार्वत्रिक परिस्थिति उत्पन्न होणार नाहीं. समाज म्हणजे व्यक्तींच्या संघटनविघटनानें आणि त्यांच्या नियमानें उत्पन्न होणारी स्थिति नसून समाजाचे म्हणून उत्क्रांतीचे नियम वेगळे आहेत, ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं. म्हणून आम्ही म्हणतों कीं, समाजाची म्हणून एक गति असते आणि त्या गतीपुढें मनुष्यप्राण्याच्या इच्छाशक्तीचा टिकाव लागणें शक्य नसतें. समाज संघटित असेल आणि सुखी असेल तर अर्थात्‌च संघटितपणाच्या जबाबदारीनें आणि सुखाच्या अपेक्षेनें एकच एक व्यक्ति जीवितत्यागाला प्रवृत्त होणार नाहीं. म्हणून आत्महत्यांच्या वाढीचें प्रमाण हें संघटितपणाचें आणि सुखदुःखाचें निश्चित मापन होऊं शकतें.

प्राचीन वाङ्मयांत वर्णिलेलें कृतयुग अगर रामराज्य यांत असणाऱ्या निर्दुःख समाजाप्रमाणें आजचे समाज निर्दुःख करणें, हें व्यवहारदृष्ट्या अशक्य असल्याकारणानें आत्महत्या या समाजांतून सर्वथा नाहींशा करणें शक्य नाहीं. जितक्या प्रमाणांत आत्महत्या कमी तेवढ्या प्रमाणांत समाज जास्त संघटित आणि सुखी होत. पुन्हां जीवनाश हा सुखदुःखांची अगदीं आत्यंतिक स्थिति दाखवीत असल्याकारणानें आणि अगदीं ती स्थिति प्राप्त झाली नसली तरी तिच्या जवळजवळ स्थिति प्राप्त झालेले जीव समाजांत असल्याकारणानें, आत्मनाशाचें प्रमाण हें एकंदर समाजाच्या रोगी स्थितीचें निदर्शक मानावयास पाहिजे. औद्योगिक क्रांति म्हणून जी एक युरोपखंडामध्यें लाट उसळून गेली आणि जिचे पर्याय अजून देखील तेथें प्रतीत होतात तिच्या काळानंतरचे, म्हणजे सन १८५० नंतरचें, कोणत्याही सुधारलेल्या समाजाचें आकडे–शास्त्र वरवर चाळून पाहिल्यास असें दिसून येईल कीं, आत्महत्यांच्या वाढीचें प्रमाण अगदीं सरळ रेषेंत वाढतें चाललेलें आहे.

१ Heredity and Selection in sociology by George Chatterton Hill.

पूर्वेतिहासामध्यें देखील थोड्याफार प्रमाणांत हा प्रश्न उपस्थित होत असे. कारण, आम्हीं पूर्वींच सांगितलें आहे कीं, मानवाचें दुःख सर्वथा नाहींसें करणें कोणत्याच समाजसत्तेला अगर राजसत्तेला शक्य नाहीं. यावेळीं देखील धार्मिक आणि व्यावहारी लेखक असे विभाग पडून मत-मतांतरें होतींच. धर्माच्या दृष्टीनें विचार केल्यास असें दिसतें कीं, धर्म आत्महत्येला विरोधी आहेत. कांहीं धर्मामध्यें धार्मिक विधि म्हणून आत्म-हत्या सांगितली आहे, त्याचा प्रस्तुत विषयांशीं संबंध पोहोंचत नाहीं. कारण, ती धार्मिक आज्ञा आहे, समाजस्थितीचा परिणाम म्हणून आत्म-हत्या नाहीं. आज्ञा वाटेल ती करावी. परंतु तिचे परिणाम समाजशास्त्रांत घेतां येत नाहींत, नाहीं तर राजाज्ञेनें जीं युद्धें होतात, त्यांत होणारे सर्व मृत्यू खून म्हणून मोजावे लागतील ! यहुदी[१] धर्म कोणत्याही परिस्थितींत आत्महत्या योग्य मानीत नाहीं आणि मुसलमानी धर्म आत्महत्या म्हणजे अत्यंत निंद्य खून असें म्हणतो. ग्रीक नीतिशास्त्रज्ञ पायथागोरास, ॲरिस्टॉटल प्लेटो वगैरे आत्महत्येचा निषेधच करतात. रोमन लोकांचे तात्त्विक आणि नैतिक बाबतींतील गुरु नास्तिक, सुखवादी ( stoics ) चार्वाक असल्या-कारणानें त्यांच्यामध्यें मात्र या बाबतींत दोनही मतें प्रचलित असलेलीं दिसतात. ख्रिस्ती धर्म आत्महत्येचा निषेधच करतो. थॉमस ॲक्विनास म्हणतो, ‘ आत्महत्या सर्वांत वाईट पाप आहे. कारण, त्याचा पश्चात्ताप होण्याचा मुळींच संभव शिल्लक रहात नाहीं.’ हिंदूंच्या समाजरचनेंत हा प्रश्नच निघत नव्हता आणि त्यामुळें हिंदूंच्या धर्मग्रंथांत या विषयाचा विचार केलेला सांपडत नाहीं. आजही हिंदुसमाजामध्यें हा प्रश्न नाहीं. कारण आत्महत्यांची वाढ हा आजकालच्या सुधारणेचा जन्मसिद्ध हक्क आहे !

आज सुधारलेल्या समाजाकडे दृष्टि टाकल्यास हा रोग फार झपाट्यानें वाढत चालला आहे असें कोठलेही आकडे चाळल्यास दिसून येईल. आत्महत्त्या करण्याला कारणही फारसें महत्त्वाचें असावें लागतें असेंही नाहीं.[३]

---

१ हिंदूंतील सती, प्रायोपवेशन वगैरे चाली.

२ Origin and development of moral ideas by Westermarck.

३ पुढील सर्व उदाहरणें वेगवेगळ्या वर्तमानपत्रांतून घेतलीं आहेत.

कोणी विश्वविद्यालयाची परीक्षा नापास झाला, कोणाच्या प्रणयिनीनें दुसऱ्या गृहस्थाशीं विवाह केला, कोणाचें छायायंत्र ( camera ) वडील माणसानें लपवून ठेविलें कीं आत्महत्त्येला पुरेसें कारण होतें ! या रोगाचें सुखाशीं आणि संघटितपणाशीं साहचर्य असतें, ही गोष्ट पुढील कल्पना नजरेसमोर ठेविल्यास कळून येईल. हा रोग एकाच वयाच्या व्यक्तींची मोजदाद केल्यास विवाहितांपेक्षां अविवाहितांत जास्त दिसून येतो. विवाहितांमध्येंही संततियुक्त आणि संततिरहित अशी विभागणी केल्यास संततिरहित लोकांत संततियुक्त लोकांपेक्षां जास्त प्रमाणांत हा रोग पसरल्याचें दिसून येतें. पुन्हां वयाच्या दृष्टीनें विभागणी केल्यास मध्यम वयस्कांपेक्षां वृद्धांमध्यें हा रोग कमी प्रमाणांत आहे. एकंदरीनें पाहतां पुरुषांपेक्षां स्त्रियांमध्यें कमी प्रमाणांत आहे. आश्चर्याची गोष्ट अशी कीं,राष्ट्रावर ज्या वेळीं एखादी भयंकर आपत्ति कोसळली असेल त्या काळीं, राष्ट्राच्या सुस्थितींत ह्या रोगाचें जें प्रमाण असेल, त्यापेक्षां कमी प्रमाण पडतें. या सर्व भानगडीचा अर्थ कसा काय लागतो त्याचा आतां विचार करूं.

आम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, नीतीचें आद्यतत्त्व म्हणजे मनुष्यानें आपल्या बाहेरील कोणत्या तरी शक्तीपुढें मान लवविली पाहिजे हें आहे. म्हणजे व्यक्तीची क्रिया ही बाह्यनिष्ठ असावयास पाहिजे. व्यक्तीच्या अंतःकरणांत जी श्रद्धा असेल ती व्यक्ति ज्या संघाचा अवयव असेल त्या संघामध्यें सार्वत्रिक असावयास पाहिजे. चोरी करणें ही अनीति आहे, अशी समाजांतील एकूणएक व्यक्तींची श्रद्धा असल्यास त्या समाजांत अर्थसंरक्षणाची जरूरी उरणार नाहीं. परंतु कांहींची जर तशी श्रद्धा नसेल तर, तो समाज अधोगतीला जाईल. कारण, वैयक्तिक श्रद्धा तात्कालिक फायदा दिसत असल्यास अगदीं आयत्या वेळीं तावडतोब नष्ट होईल. हीच गोष्ट आम्हीं जी वर आत्महत्त्यांची विभागणी केली आहे तीवरून प्रत्यक्ष प्रमाणानें पुन्हां नजरेस येईल. विवाहितांमध्यें त्याच वयाच्या अविवाहितांपेक्षां आत्महत्त्येचें प्रमाण कमी पडतें याचा तरी अर्थ काय होतो ? व्यतिरेकानें ( method of difference ) असें दिसून येतें कीं, येथें विवाहितपणा हाच फक्त एक जास्त गुण आहे आणि त्मिहत्येचें प्रमाण कमी पडलें आहे. विवाहामध्यें एक नवीन बाह्यनिष्ठास्थान उत्पन्न झालें. त्यामुळें असें दिसून

येईल कीं, विवाह हें जीवितरक्षणाचें मोठें साधन आहे. हिंदुसमाजामध्यें विवाहसंस्कार अत्यंत महत्त्वाचा मानला गेला आहे, याचें हें मुख्य कारण आहे. परंतु विवाह जर जीवितरक्षणाचें साधन असेल तर विवाहनाशानें म्हणजे घटस्फोटानें जीवितनाशाकडे प्रवृत्ति वाढली पाहिजे आणि तसें होत असल्यास घटस्फोट करण्याची परवानगी समाजांतर्गत व्यक्तींना देणें इष्ट होणार नाहीं. जेथें घटस्फोटाची परवानगी आहे त्या समाजामध्यें असें दिसून आलें कीं, घटस्फोट करणाऱ्या प्रजेमध्यें आत्महत्त्येचें प्रमाण इतर प्रजेच्या मानानें दुपटीइतकें[१] पडतें. म्हणून आमच्याकडील जहाल सुधारकांना अशी विनंति आहे कीं, अविचारानें वाटेल ते कायदे करून भलभलतीं विषें समाजांत—म्हणजे श्रेष्ठ समाजांत, कनिष्ठ वर्गांत हे सर्व प्रकार चालूच आहेत!—पसरवूं नका. असो. विवाह हें जीवितरक्षणाचें एक प्रबल साधन आहे आणि हीच गोष्ट आमचे आधुनिक तरुण विद्यार्थी आणि वेळीं अवेळीं ब्रह्मचर्याचे गोडवे गाणारे महात्मे, या सर्वांना अजून समजावयाची आहे. याचप्रमाणें पुढें विचार करीत गेलें तर जसजशीं निष्ठास्थानें वाढवीत जावें, तसतशी जीवनाशाकडे प्रवृत्ति कमी होत जाते. संततियुक्त आणि संततिरहित, या दोन स्थितींमध्यें स्त्री हें बाह्यनिष्ठास्थान दोघांनाही समान आहे. परंतु संतति हें आणखी एक निष्ठास्थान उत्पन्न झाल्याबरोबर जीवनाशाकडील प्रवृत्ति आणखी कमी झाली. मग अविवाहित स्थितीपेक्षां विवाहित स्थिति श्रेष्ठ आणि त्या स्थितींतही संततियुक्त स्थिति श्रेष्ठ. यावरून दिसून येईल कीं, बाह्यनिष्ठास्थानें जसजशीं वाढवीत जावें तसतसें जीवाचें रक्षण जास्त जास्त प्रमाणांत होत जाईल. व्यक्ति जितकी आत्मनिष्ठ ( ego centric ) तितकी जीवनाशाकडे प्रवृत्ति जास्त. म्हणून जीवाचें रक्षण करावयाचें असल्यास समाजनेत्यानें समाजांतील प्रत्येक व्यक्तीभोंवतीं बाह्यनिष्ठास्थानांचें एक जाळें उत्पन्न करावयास पाहिजे. त्यामध्यें जितक्या मनुष्यप्राण्याच्या तऱ्हा त्या सर्वांना कोठें ना कोठें तरी निष्ठा वाटेल, इतके विषय असावयास पाहिजेत. तीं ज्या मानानें कमीअधिक प्रमाणांत असतील त्या मानानें कमीअधिक प्रमाणांत जीवरक्षणाचें कार्यही होईल.

समाजाच्या सुस्थितीचें आत्महत्त्येचें प्रमाण हें एक लक्षण मानतां

---

१ History of human marriage by Westermarcks.

येईल. कारण, आत्महत्त्या व्यक्तीला जीविताचें मूल्य मुळींच वाटत नाहीं असें दाखविते आणि समाजांतील व्यक्ति चांगल्या स्थितींत रहावयास पाहिजे असल्यास, जीवनार्थ कलह जितका जास्त तीव्र करतां येईल तितका तीव्र करावयास पाहिजे. त्याबरोबर जीवित ही मौल्यवान वस्तु आहे असेंही व्यक्तींना वाटूं लागलें पाहिजे. ज्या समाजामध्यें व्यक्तीला आपल्या जीविताचा इतका तिटकारा अगर वीट आलेला असतो कीं, (आध्यात्मिकदृष्टया खरोखरच वीट आणि तिटकारा वाटावयास पाहिजे. आमच्या समाजांत या गोष्टी हल्लीं बऱ्याच ऐकूं येऊं लागल्या आहेत, परंतु त्या प्रमाणांत आत्महत्त्येचें प्रमाण कांहीं वाढलेलें दिसून येत नाहीं!) स्वतःचा जीव एकाद्या कीडमुंगीप्रमाणें चिरडून टाकण्यास व्यक्ति प्रवृत्त होतात, तो समाज संघटित आणि समर्थ आहे असें म्हणण्याला वे. शा. सं. महादेवशास्त्री दिवेकर तयार आहेत काय? अशा तऱ्हेची स्थिति जे समाज सारखे अस्थिर स्थितींत (Dynamic state) आहेत, म्हणजे जेहेत्ते ज्या समाजांची प्रगति चाललेली आहे, म्हणजे जे समाज हिंदु समाजासारखे कट्टर सनातनी नाहींत, त्या समाजांत होत असते. परमेश्वर आहे किंवा नाहीं या खोल वादांत न पडतां, परमेश्वर हें एक अढळ असें बाह्यनिष्ठास्थान आहे किंवा नाहीं एवढाच प्रश्न विचारून तें असल्यास, नास्तिकपणा समाजांत पसरविणें ही चूक आहे असें आमचें स्पष्ट मत आहे. महदाश्चर्याची गोष्ट आहे कीं, ज्यांना प्रत्यक्ष समाजांत असलेल्या स्थितीचा अभ्यास काय पद्धतीनें करावा हें देखील समजत नाहीं, अशा तरुणांनीं परमेश्वराच्या अस्तित्वासारख्या गहन विषयाच्या भानगडींत पडावें! ज्याच्या अंतःकरणावर धार्मिक कल्पनांचा तावा आहे, जो स्वर्ग–नरकादि कल्पना मानावयास तयार आहे, ज्याचें मन बुद्धिगम्य इहलोकाबरोबरच पुरुषबुद्धीच्या पलीकडील परलोक ही कल्पना सत्य मानते, तो ऐहिक आपत्तीनें गांगरून जाणार नाहीं आणि जीवनाशही करणार नाहीं. त्याच्यापुढें मानवाला कर्मप्रवण करणारा आशा हा गुण अक्षय्य आहे. देशभक्ताचा देश निराशा उत्पन्न करील, राजनिष्ठाचें राजघराणें नष्ट होऊन अमात्य राक्षसाप्रमाणें, 'सैवेयं मम चित्रकर्मरचना भित्ति-

१ मुद्राराक्षस– विशाखदत्त.

विना वर्तते । ' असें म्हणण्याचा त्याच्यावर प्रसंग येईल, विनाशी अशा ऐहिक जगांतील प्रत्येक आशास्थान सदोष होईल, परंतु बुद्धीच्या पलीकडे असणारें आशास्थान केव्हांही नष्ट होणार नाहीं. म्हणून स्वर्गनरकादि कल्पना ( आम्हांला त्या सत्य वाटतात, परंतु वादाकरितां त्या निव्वळ कल्पना आहेत असें मानावयास आम्ही तयार आहों) समाजामध्यें रहाणें हें इष्ट आहे. स्वर्गनरकादि कल्पना, मोक्षाच्या कल्पना ज्याला आहेत, ज्याला आशा आहे, त्याला आत्म्याच्या आदिभौतिक सुखाची म्हणजे मोक्षाची किंमत ऐहिकापेक्षां फार जास्त वाटते. त्याला माहीत असतें कीं, आत्महन् लोक तमानें भरलेल्या लोकाला जातात. तो ऐहिक जग हें आत्म्याच्या हिताच्या दृष्टीनें गौण मानतो. त्याला मात्रास्पर्श, सुखदुःख बाधा करूं शकत नाहींत. अशा तऱ्हेचीं नैतिक मूल्यें डोळ्यांसमोर असल्याकारणानें पांडवांची माता कुंती ' विपदः संतु नः शश्वद्यत्र संकीर्त्यते हरिः । ' अशा तऱ्हेचा वर मागते. येथेंच मीमांसकांचें अलौकिक प्रतीत होऊं लागतें, ही गोष्ट लोणावळी तर्कतीर्थांनीं ध्यानांत धरावी. अलौकिक ( transcendental values ) मानण्याकडे पाश्चात्य विचारवंतांची प्रवृत्ति होत चालली आहे ही गोष्ट आम्हीं मागेंच नमूद केली आहे. अशा तऱ्हेनें जावत्कालपर्यंत समाज सामाजिक, आर्थिक, राजकीय, धार्मिक वगैरे व्यक्तिबाह्य अशा ध्येयानें प्रेरित झालेले असतील तोंपर्यंत त्या समाजांतील व्यक्ति जास्त सुरक्षित राहतील. परंतु पहिल्या तीन निष्ठा सतत राहणाऱ्या अशा अक्षय्य नसल्याकारणानें धर्मनिष्ठा हीच खरी रक्षण करील.

अशा तऱ्हेनें समाजांचा संघटितपणा मोजण्याचें एक प्रत्यक्ष साधन सांगितलें. आतां दुसरें एकादें साधन सांपडतें किंवा कसें तें पाहूं. मनुष्याच्या मनाच्या ज्या वेगवेगळ्या शक्ती, त्यांच्यामध्यें स्थायीभाव (Equilibrium) राहून, त्या मनाच्या हिंमतीप्रमाणें मनुष्याच्या हातून कार्य घडत रहावयास पाहिजे ही गोष्ट कोणीही नाकबूल करणार नाहीं. परंतु समजा समाजांची अशी परिस्थिति उत्पन्न झाली कीं, त्या परिस्थितींत व्यक्तींच्या मनाचा तोल जाऊन त्या व्यक्तींना वेडच लागूं लागलें आणि हें वेड लागण्याचें प्रमाण जर लोकसंख्येच्या वाढीच्या मानानें जास्त प्रमाणांत वाढूं लागलें तर त्या समाजाच्या मूलतत्त्वांत अगर घटनेंत कांहीं तरी चुकतें आहे असेंच मानाव-

यास पाहिजे. यावर अशी शंका येऊं शकेल कीं, वेड लागण्याचें जें मनो-दौर्बल्य ( Feeble mindedness ) आणि वेड, ( Insanitiy ) हे जे दोन प्रकार आहेत ते दोनही आनुवंशिक[1] असल्याकारणानें वेडाच्या वाढीचा संबंध समाजघटनेशीं पोहोंचत नाहीं. हे दोष आनुवंशिक आहेत असें मानलें तरी काय निष्पन्न होणार ? वेड्यांचें सर्वसाधारण लोकसंख्येशीं प्रमाण वाढत चाललें आहे याचा अर्थ असाच होतो कीं, या लोकसंख्येंत प्रकृष्टांची निवड आणि निकृष्टांचा नाश योग्य तऱ्हेनें होत नाहीं. या समाजामध्यें जे लोक जास्त जगावयास पाहिजेत ते जगत नाहींत आणि मरावयास पाहिजेत ते मरत नाहींत. म्हणून हा समाजरचनेचाच दोष ठरतो. एकाद्या समाजांत जर वेड लागणें आणि तत्सदृश इतर मानस रोग यांचें प्रमाण वाढत असेल तर तो समाज रोगी आहे असें म्हणणें भाग आहे. पूर्वीं मनोदौर्बल्य अगर वेड हा आधिभौतिक शक्तींचा परिणाम आहे असें मानून अशा लोकांशीं समाज निष्ठुरतेनें वागत असे आणि त्यामुळें त्यांची वाढ झपाट्यानें होत नव्हती. परंतु आतां, ' दया धरमका मूल ' झाल्याकारणानें, या व्यक्तींची जीवित-यात्रा थोडीशी हितावह झाल्याकारणानें, त्यांची वाढ झपाट्यानें होत आहे. सुव्यवस्थित प्रजेपेक्षां या प्रजेची उत्पादनशक्ति फारच जास्त असते ही गोष्ट अनेक ग्रंथकारांनीं[2] दाखविलेली आहे. या वाढीला आळा कसा घालावयाचा हा प्रश्नही समाजानें सोडवावयास पाहिजे.

सेंद्रिय प्राण्याचें चलनवलन म्हणजे त्याच्या शक्तीचा क्षय होय. त्या पिंडानें जेवढ्या शक्तीचा क्षय केला असेल, तेवढीच शक्ति पुन्हां मिळविली तर तो पिंड सुव्यवस्थित राहील. म्हणून प्रत्येक सजीव सेंद्रिय प्राण्यामध्यें व्यय आणि आय या दोनही शक्ति समप्रमणांत असावयास पाहिजेत. हाच नियम समाजालाही लागू आहे. समाजामध्यें देखील आय-व्यय सारखाच व्हावयास पाहिजे. समाजांची हालचाल जुन्या व्यक्तींचा नाश आणि नव्या व्यक्तींचें आगमन, या दोन प्रक्रियावरच अवलंबून रहाणार हा नियम त्रिकालाबाधित असल्यामुळें जीवनाश झाल्याशिवाय समाजाची गतीच चालू रहाणार नाहीं. परंतु तो जीवनाश निसर्गनियमानें

---

१ **Heredity and Eugenics by Gates.**

२ **Eugenics by Dean Inge.**

व्हावयास पाहिजे, अनैसर्गिक पद्धतीनें नव्हे. एक अनैसर्गिक पद्धति म्हणजे आत्मनाश ही मागेंच सांगितली. येथें निघून जाणारी व्यक्ति ही मागें रहाणाऱ्या समाजाला तरी भारभूत होत नाहीं. परंतु दुसरी, सामाजिक कार्यांत व्यक्ति निरुपयोगी होण्याची अतएव समाजाची विकृति दाखविणारी पद्धति जी व्यक्तींच्या वेडाचें प्रमाण वाढत जाणें, ती पहिल्या पद्धतीपेक्षां जास्त घातुक आहे. येथें व्यक्ति सामाजिक कार्य तर कांहीं करीत नाहीं, परंतु आपल्या पोषणाचा भार मात्र समाजावर टाकते. अशा तऱ्हेनें वेड लागणें हें बौद्धिक वाढ खुंटणें, मनोदौर्बल्य ( Feeble mindedness ), आणि प्रत्यक्ष वेड लागणें यांपैकीं कोणत्याही तऱ्हेचें असूं शकेल. या सर्वांचें प्रमाण वाढत जाणें समाजाची संचयशक्ति ही समाजाच्या क्षय-शक्तीच्या मानानें तोकडी पडत चालली आहे असाच याचा अर्थ आहे.

कोणी यावर असें म्हणेल कीं, एकाद्या काळीं अगर स्थळीं समाजामध्यें कार्याला निरुपयोगी परंतु पोषण मागण्याला तयार असे जे कांहीं पिंड असतील ते समाजाची संचय आणि क्षयशक्ति विषम आहे असें दाख-विणारें गमक होऊं शकणार नाहींत. कारण, समाजपुरुष तर हालचाल करतांना दिसतो आहे. तर त्यावर उत्तर इतकेंच द्यावयाचें कीं, शरीरांत रोग असून देखील कांहीं काळ पिंड हालचाल करतांना दिसतात. म्हणून ते पिंड निरोगी आहेत असें कोणालाही म्हणतां येणार नाहीं. समाजाची एका विवक्षित काळची हालचाल ही समाजाचा निरोगीपणा दर्शवीत नाहीं. सेंद्रिय पिंडामध्यें हालचालीमुळें जी मोडतोड अगर झीज होते ती झीज ते पिंड अन्नाचा सांटा घेऊन, त्याचें पचन करून भरून काढतात. समाज-शरीरामध्यें ज्या व्यक्ति असतील त्या जिवंत असूनही नालायक ठरल्यास, या समाजाची जीवनक्रिया निर्दोष चालली आहे असें म्हणतां येईल काय? जर पुरेसा आहार मिळाला नाहीं तर त्या पिंडाची शक्ति कमी होणार. त्याबरोबर पचनशक्तीपेक्षां जास्त आहार मिळाला तरीही पिंड क्षीण होणार. निसर्गानें सचेतन सेंद्रिय प्राण्याला एक कांहीं निश्चित अशी शक्ति दिलेली असते.

कोणत्याही पिंडामध्यें जरूरीपेक्षां जास्त क्षय होणें म्हणजे तो पिंड सारखा झिजत जाणें हाच त्याचा अर्थ होय. पिंडाची निसर्गतः काम कर-

ण्याची शक्ति आणि चालू गति यांच्यामध्यें वैषम्य उत्पन्न होऊं लागलें म्हणजे अर्थातच पिंडांत विकृति उत्पन्न होऊं लागते. कोणत्याही समाजामध्यें अगर संघामध्यें मृत्यु हा किंचित् मर्यादेपर्यंत हितकारक असतो. कारण, तो नैसर्गिक निवडीला मदत करीत असतो. परंतु तो विवक्षित मर्यादेच्या पलीकडे गेल्यास त्या संघाला हानिकारक होऊं लागतो. संघासंघांमधील जीवनार्थ कलहामध्यें आणि व्यक्तिव्यक्तींतील जीवनार्थ कलहांमध्यें निकृष्ट तेवढे नष्ट होऊन प्रकृष्टांची वाढ व्हावयास पाहिजे. हा नियम जर समाजांत बरोबर पाळला जाईल तर समाजांची सारखी सुधारणाच होत जाईल. परंतु आजचे सुधारलेले समाज पाहिले तर त्या सर्व समाजांमध्यें बरोबर त्याच्या उलट स्थिति असलेली दिसून येईल. कारण, समाजांत नालायक असे जे आम्हीं वर सांगितलेल्या सर्व प्रकारचे वेडे, त्या वेड्यांची अशा समाजांतून सारखी वाढ चाललेली आहे. म्हणून आम्ही म्हणतों कीं, मानसिक विकारांची वाढ— आणि त्या वाढीच्या आत्यंतिक स्थितीचें लक्षण जें वेड लागणें,— हीं दोनही समाजाच्या सुदृढतेच्या मापनाचीं गमकें धरावयास पाहिजेत.

मनुष्याला ज्याप्रमाणें जगणें— म्हणजे शारीरिक आणि मानसिक शक्तीनें युक्त असें जगणें — हें आद्य ध्येय आहे, त्याप्रमाणेंच आपला वंश पुढें राखणें— प्रजातंतु मागें राखणें (प्रजातंतुं माऽव्यवच्छेत्सीः ।) हेंही पण त्याच्या बरोबरीचें ध्येय आहे. म्हणून प्रजारक्षणाचें आदिकारण जो कामविकार त्याच्या व्यवस्थेंत कांहीं विकृति होते आहे किंवा काय या गोष्टीचाही विचार करावयास पाहिजे. परंतु एकाद्या समाजानें कामविकाराचें नियमन केलें आहे किंवा नाहीं याचें प्रत्यक्ष मापन कसें करावयाचें? आमच्या मतें त्या मापनाला खालील दोन उपलक्षणें सांगतां येतील. (१) ज्या समाजामध्यें वंशनाशक असे उपदंश, परमा वगैरे रोग लोकसंख्येच्या वाढीच्या मानानें जास्त प्रमाणांत वाढत असतील, तो समाज सदोष होय. (२) ज्या समाजामध्यें घटस्फोटांचें प्रमाण लोकसंख्येच्या मानानें जास्त वाढत असेल असे समाज सदोष होत. आम्हीं दिलेल्या पहिल्या लक्षणाबद्दल कोणाचा मतभेद होईल असें वाटत नाहीं. परंतु दुसऱ्याबद्दल मात्र बरेच विद्वान् मतभेद दर्शवितील. आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे कीं,

घटस्फोट केलेल्या प्रजेमध्यें आत्महत्त्येचें प्रमाण सर्वसाधारण प्रजेमध्यें असलेल्या आत्महत्त्येच्या प्रमाणाच्या दुप्पट असतें. कारणें अगदीं उघड आहेत. घटस्फोट अगर व्यभिचार हा सुखदुःख अगर भावना याकरितां होत नसून, त्याच्या मुळाशीं सूडबुद्धि असते.

पहिल्या लक्षणाबद्दल बोलावयाचें तर असें सांगावयाचें कीं, उपरिनिर्दिष्ट रोगांची वाढ होत जाणें म्हणजे त्या समाजांतर्गत व्यक्तींची कामपूर्ति वाममार्गानें चालली आहे याचें स्पष्ट निदर्शक चिन्ह आहे. ज्या समाजामध्यें किंवा गटामध्यें विवाहांचें स्थैर्य जास्त त्या समाजामध्यें या रोगांचा प्रादुर्भाव कमी. ज्या समाजामध्यें बालविवाहांची म्हणजे मानवी जीवितांतील सर्वांत जास्त प्रबल अशा दुर्धर शक्तीचें संतर्पण योग्य वेळीं होण्याची व्यवस्था केलेली असेल, त्या समाजांतही या रोगांचा प्रादुर्भाव कमी. या दोनही गोष्टी कोणत्याही समाजांतील आंकडेवारी गोळा केल्यास ताबडतोब नजरेस येतील. हा कार्यकारणभाव डोळ्यांपुढें असून, कारणें नाहींशीं न करतां झालेले रोग सुधारण्याची जी खटपट चाललेली आजच्या सुधारणेमध्यें दिसून येते ती पाहून मनाला आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं! नुसती[१] कामपूर्ति वाममार्गानें चालली असेल तर ती सर्वसाधारण नैतिक तत्त्वावर त्याज्यच ठरेल. परंतु त्याबरोबरच वंशाचा उच्छेद करणारे रोगही वाढीला लागले तर ते जास्त भयंकर नाहींत असें कोण म्हणेल? उपदंश हा रोग स्पर्शजन्य आणि आनुवंशिक असल्याकारणानें तो तात्कालिक पिढी आणि पुढच्या पिढ्या या दोहोंच्याही दृष्टीनें घातुक आहे. त्याबरोबरच उपदंशाचे रोग असलेल्या समाजामध्यें मज्जातंतूचे रोग फैलावतात. त्यामुळें हे रोग व्यक्तीलाही पण अत्यंत मारक आहेत.

या रोगांसंबंधीं ज्यांना कांहीं थोडीशी माहिती आहे ते लोक सांगतील कीं, उपदंश या रोगाची बाह्यस्फुर चिन्हें जरी बरीं झाल्यासारखीं वाटलीं तरीही या रोगापासून इतर अनंत रोगांच्या फांद्या फुटत असतात. त्या

---

१ 'In the name of science we revolutionize industry, undermine family morals, enslave coloured races and skilfully exterminate each other with poison gases,......' Scientific outlook by Bertrand Rusel.

फांद्या म्हणजे सर्वसाधारण अर्धांगवायू आणि तत्सदृश रोग, मज्जातंतूंच्या प्रक्रियेंत बिघाड होणें, मेंदूचे रोग वगैरे सर्व उपदंशापासून प्रादुर्भूत होत असतात. म्हणून हा रोग व्यक्तीला घातक आहे. एतज्जन्य किती रोग असतात आणि यानें मानवी शरीर कसें पोखरलें जातें याची ज्यांना माहिती पहावयाची असेल, त्यांनीं प्रोफेसर फोर्नियर, टार्नोस्की वगैरेंचे या विषयावरील ग्रंथ वाचून पहावे. म्हणजे आमच्या इकडील एका पंडितांनीं आम्हांला पाश्चात्यांमध्यें गरमी परमा वाढत असला तर आमच्याकडे मलेरिया वाढत आहे ! मिळून काय, दोनही समाज बिघडत आहेत असें जें उत्तर दिलें तशा तऱ्हेचें उत्तर समाजाबद्दल थोडा तरी आपलेपणा वाटत असलेली व्यक्ति देणार नाहीं; या रोगांचे वैयक्तिक आणि सामाजिक असे दोनही तऱ्हेचे परिणाम भयंकर आहेत. त्याबरोबरच त्या समाजांतील कामविकाराचें नियंत्रण काय स्वरूपांत चाललें आहे, तें दर्शविणारें निदर्शक यावरूनच कळून येईल.

कामवासनांचा विचार आजपर्यंत म्हणजे जगाच्या सुरुवातीपासून आज पर्यंत पुष्कळ महात्म्यांनीं केलेला आहे. परंतु, मानसशास्त्राच्या खोल सिद्धांतांचा विचार करून पद्धतशीर नियंत्रण केलेलें फक्त हिंदूंच्या जातिसंस्थेंतच आढळतें. या विषयावर आज पुष्कळच वाङ्मय उपलब्ध आहे. त्यांपैकीं बरेंचसें निव्वळ वस्तुस्थिति कशी आहे तें दर्शवितें, कशी असावी तें दर्शवीत नाहीं. पुन्हां या सर्व वाङ्मयामध्यें अशी चुकी केलेली आढळून येते कीं, जगाच्या एका भागामध्यें कोठें एकादी गोष्ट झालेली आढळली कीं, ती जगांत सार्वत्रिक तशीच आढळत असावी असें मानण्याकडे लेखकांची प्रवृत्ति झालेली दिसते. अमेरिकेमध्यें डेन्व्हरमध्यें[१] एकादी गोष्ट घडलेली दिसली कीं, हिंदुस्थानांत पुणें जिल्ह्यांत तशी घडत असली पाहिजे असें म्हणण्याकडे प्रवृत्ति दिसते. मूळ विकार हा सर्व स्त्रीपुरुषांत एकच असला तरी त्याचा प्रखरपणा सर्वांत सारखाच असतो असें नव्हे. ज्याप्रमाणें पचनशक्ति, सतेज दृष्टि, शरीरबल हीं प्रत्येक व्यक्तीच्या बाबतींत वेगवेगळीं असतात, त्याप्रमाणेंच कामशक्ति ही सर्वांची वेगवेगळी असते. वरील गुण

---

१ Revolt of Modern youth; Companionate marriage by Ben Lindsay.

ज्याप्रमाणें आनुवंशिक असतात त्याप्रमाणें कामशक्ति हीही पण आनुवंशिकच असते. त्याबरोबरच वेगवेगळ्या समाजांच्या अगर गटांच्या दृष्टीनें पाहिल्यास त्या गटांमध्यें जीं नैतिक मूल्यें प्रादुर्भूत झालेलीं असतील, त्यांच्या दृष्टीनें प्रत्येक मनामध्येंही वेगवेगळ्या नियंत्रक ( inhibition ) शक्ति उत्पन्न झालेल्या असतात. त्याबरोबरच प्रत्येक गटाच्या आहाराचाही विचार केल्यास गटागटांतील कामविकारामध्यें किती फरक पडत असेल, ही गोष्ट विद्वान लेखकांशिवाय कोणाच्याही सहज लक्षांत येईल. वेश्या आणि पतिव्रता या दोघींनाही काम ही समान भूमिका असली, तरी दोघींनाही सारख्या मापानें लेखावयास पाश्चात्य लेखक देखील तयार होतील असें आम्हांला वाटत नाहीं. म्हणून एका ठिकाणीं घडून येणाऱ्या कामुक प्रक्रिया दुसऱ्या ठिकाणींही घडून येतील असें नव्हे, ही गोष्ट हिंदुस्थानांतील तरुणांनीं विसरूं नये.

पातिव्रत्यापासून तों तहत कोणी भेटेल त्या पुरुषाशीं संबंध करणें, या सर्व प्रक्रिया समाजांत शक्य आहेत. परंतु सर्व इष्ट आणि नैतिक आहेत असें नव्हे. समाजरक्षण आणि तदंतर्गत व्यवस्था यांचा विचार पुढें ठेविल्यास मानवाला सरतेशेवटीं विजयी म्हणून निवडून येण्याला इंद्रियदमनाची[१] आत्यंतिक जरुरी आहे. त्यामुळें उत्पन्न झालेल्या वासनेचें तत्काल संतर्पण ही गोष्ट सामाजिक स्थितींत शक्य नाहीं. म्हणून आज कांहीं व्यक्तींकडून अनिर्बंध स्त्रीपुरुषसमागम ( Free love ) म्हणून जी एक पद्धति सांगितली जाते तिचा विचार करतों.

पाश्चात्य पद्धतीच्या समाजामध्यें स्त्रियांची कामपूर्ति होऊं शकत नाहीं, याचीं अनेक कारणें आहेत आणि त्यांचा आम्ही बालविवाह या प्रकरणीं पूर्णांशानें विचार करणार आहों. ती होत नाहीं ही गोष्ट आजचें पाश्चात्य वाङ्मय वाचलें तर कोणाच्याही सहज लक्षांत येईल. त्यावर कांहीं तरी मार्ग सुचविणें हें समाजशास्त्र सांगणाराचें पहिलें कार्य आहे. त्या युक्त्या वाचूं लागलें म्हणजे मात्र वेड्यांच्या इस्पितळामध्यें आपण गेलों आहोंत किंवा काय असा किंचित् भास होऊं लागतो. कारण, त्यांमध्यें

१ Back to Methusalch by Bernard Shaw; Nietzsche, Millownsky and others.

उद्दिष्ट आणि तें साध्य करून घेण्याची पद्धति यांमध्यें कार्यकारणभाव असलेला दिसून येत नाहीं. मानवी मनाची आणि नैतिक मूल्यांची जी सांगड असते ती पुष्कळांना पटलेली दिसते. परंतु नियंत्रण करण्याकरितां नैतिकमूल्यें उत्पन्न करावयास ते तयार मात्र होत नाहींत! बरट्रांड रसेल ही गोष्ट कबूल करील कीं, 'मानवी[१] मन हें वायूसारखें आहे. जसजसा त्यावरील दाब कमी होत जाईल, तसतसें तें जास्त जागा आक्रमण करील.' परंतु तोच रसेल, त्यांनीं कमी जागा आक्रमण्यास कांहीं नैतिक मूल्यें उत्पन्न करा असें म्हटल्यास, तसें करण्यास तयार होईल असें नाहीं. कामविकाराचें समाधान सर्वांनाच पाहिजे आहे. परंतु, प्रत्येकाचे मार्ग भिन्न आहेत. या विकाराचें नियंत्रण करूं इच्छिणाऱ्यांचे दोन गट पडतात. एक धार्मिक विचार करणारांचा व दुसरा धर्मलंड लोकांचा. धार्मिकांचा गट अंतःकरणावर अलौकिक ( Supra-rational ) विचारांची छाप पाडून त्याच्या तर्फे इंद्रियनियंत्रण करूं इच्छितो. व्यावहारिक विचाराचे लोक वासनानियंत्रणाची भाषा न बोलतां उपभोगानें इंद्रियांचें संतर्पण करूं इच्छितात. म्हणून पहिल्या तऱ्हेचे लोकांची विवाहसंस्था स्थिर करण्याकडे प्रवृत्ति असते. तर दुसऱ्या तऱ्हेच्या लोकांची इच्छासंभोगाकडे ( Free-love ) प्रवृत्ति असते. दुसऱ्या तऱ्हेचे लोक पहिल्या पद्धतीला[२] तुरुंगवास मानतात तर पहिल्या तऱ्हेचे लोक दुसऱ्या पद्धतीला छिनालपणा म्हणतात. अशा तऱ्हेनें सध्यां उभय पक्षांमध्यें धूळफेंक चालू आहे. आम्हांला विवाहांतील गुणदोष पूर्ण माहीत आहेत व आम्ही मुख्यतः त्याच पद्धतीचे पक्षपाती आहोंत. कारण, समाजशास्त्रामध्यें नेहमींच पूर्ण चांगले आणि पूर्ण वाईट एवढाच विकल्प नसून, पुष्कळ वेळां कमी वाईट आणि जास्त वाईट असे विकल्प[३] उद्भूत होतात.

विवाहसंस्था पूर्ण नसली तरी जास्त हितावह आहे, ही गोष्ट जाणून विवाहसंस्थेचे पुरस्कर्ते देखील अपवाद उत्पन्न करावयास तयार असतात. त्याप्रमाणें सर्वच ठिकाणीं कामविकार सारखाच प्रबळ असतो अशी खोटीच

---

१ Marriage and Morals by Russel.

२ Irrational Knot by Bernard Shaw.

३ Reflections on the revolution in France by Edmunde Burke.

कल्पना करून ऐहिक विचार करणारे लोक असलेले दिसत नाहींत.

**५२ विवाहसंस्थेवरील आक्षेप**

म्हणून कामपूर्तीकरतां इच्छासंभोगाचें तत्त्व पुढें करणाऱ्या लोकांच्या मताचा येथें विचार करणें आम्हांला जरूर वाटतें. येथें उद्देश पूर्णांशानें कामपूर्ति, मार्ग इच्छासंभोग. यामध्यें पुढील मुद्दे उत्पन्न होतात :

( १ ) कामवासनेचें स्वरूप, पूर्णांशानें समाधान होण्यासारखें आहे काय ?

( २ ) इच्छासंभोगाला स्थळकाळाची मर्यादा आहे किंवा नाहीं ?

( ३ ) वयनिरपेक्ष इच्छा उत्पन्न होते किंवा नाहीं ? म्हणजे वृद्धाला तरुणीची आणि वृद्धेला तरुणाची.

( ४ ) इच्छा कोणाची ? स्त्रीची अगर पुरुषाची ? एकाद्या वेळीं अनोळखी स्त्रीपुरुषाबद्दल इच्छा होते ती इच्छा आणि वर्षानुवर्षे संघटण घडून झालेली इच्छा, या दोनही एकाच मापानें मोजावयाच्या किंवा काय ?

पहिला मुद्दा असा कीं, मानवी वासनांचें स्वरूप पूर्णांशानें समाधान होण्यासारखें आहे काय ? तसें तें नसेल तर, म्हणजे जगांतच ती गोष्ट अशक्य असेल तर, ती गोष्ट घडून यावी असें प्रतिपादन करणारे लोक व्यावहारिक भाषा बोलत नसून आकाशांतील चांदोबा मागत आहेत असें म्हणणें भाग पडेल. जें शक्य असेल तेंच सांगावयाचें असतें अशी आमची कल्पना आहे. मानवी वासनांसंबंधीं प्राचीन काळापासून पुष्कळ अध्ययन झालेलें आहे आणि प्राचीनांनीं काढलेलेच सिद्धांत आज अर्वाचीन पंडीत पुढें मांडीत आहेत. मनु म्हणतो,[१]

"इन्द्रियाणां प्रसंगेण दोषमृच्छत्यसंशयम् ।
संनियम्य तु तान्येव ततः सिद्धिं नियच्छति ॥
न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥"

येथें उपभोगेन शमन न होणें, हा वासनांचा नैसर्गिक गुण आहे असें

१ मनुस्मृति.

सांगितलें आहे. हा सिद्धांत मानवी वासनांचें पूर्ण पृथक्करण करून सांगितलेला आहे. परंतु तो प्राचीनांचा आहे आणि आजच्या औद्धत्य[1] युगामध्यें तो प्राचीनांचा म्हणूनच दृष्टिआड करण्याकडे प्रवृत्ति आहे. परंतु या विषयाचा ज्यांनीं आधुनिक पद्धतीनें अभ्यास केला आहे, ते पंडित तरी काय म्हणतात तें पाहूं. डॉ. सिग्मंड फ्राईड म्हणतो,[2] 'सर्व मानवी विकारांमध्यें पूर्णत्वानें समाधान न होणें हाच गुण प्राधान्यानें दिसून येतो.' हा मानवी वासनांबद्दलचा सिद्धांत अशा तऱ्हेनें प्राचीन आणि अर्वाचीन अशा दोनही तऱ्हेच्या पंडितांना मान्य आहे. या दोनही पंडितांच्या मुद्यावर इंद्रियविज्ञान, मानसशास्त्र अगर कोणतेंही आधुनिक शास्त्र यांच्या दृष्टीनें आक्षेप घेणें शक्यच नाहीं. इंद्रियविज्ञानशास्त्र असेंच सांगतें कीं, एकदां केलेली प्रक्रिया तें तें इंद्रिय जास्त सफाईनें करूं शकतें. याचा अर्थ तरी काय होतो? वरील पंडितांचें म्हणणें खरें असेल तर प्रश्न असा येतो कीं, विवाहाच्या नियंत्रित स्थितींत कामपूर्ति होत नाहीं हें दाखविण्यापासून फायदा कोणता? अनिर्बंध कामपूर्ति ठेविली तरी पूर्ण तृप्ति ही शास्त्रज्ञांच्या मतानें अशक्य असलेली गोष्ट कोणता समाज सिद्ध करून दाखवील? या विषयाची चर्चा करावी तितकी तोकडीच पडेल, परंतु स्थलाभावास्तव तशी करतां येत नाहीं. तथापि डॉ. सिग्मंड फ्राईडनें दिलेला कबुलीजबाब[3] मात्र अत्यंत महत्त्वाचा आहे. "जर अत्यंत प्रेमाच्या आणि जिव्हाळ्याच्या चुंबनालिंगनांनीं खरोखरच समाधान होत नसेल, तर निर्बंध स्थिति असो अगर अनिर्बंध स्थिति असो, दोन्हींमध्येंही निराशाच ठेवलेली आहे." ही गोष्ट जर खरी असेल तर पूर्ण समाधान करण्याच्या हेतूनें एकामागून एक अनेक पुरुषांशीं अगर स्त्रियांशीं संबंध करण्यापासून पूर्णांशानें समाधान ही सृष्टींत अशक्य असलेली गोष्ट सिद्ध कशी करावयाची? परंतु या सर्व गौडबंगालाचा मुख्य हेतु तर तोच सांगितला जातो. व्यक्तीची पूर्णांशानें कामपूर्ति ही एकदां समाजशास्त्राच्या कक्षेंतून बाहेर पडल्यानंतर मग हितकारक तेवढीच कामपूर्ति व्यक्तीला घेऊं देणें एवढाच प्रश्न

---

१ Scienticfic outlook by Bertrand Russel.

२ Quoted by A. A. Roback in sex in civilization.

३ Ibid.

शिल्लक रहातो. हितकारक हा शब्द उच्चारल्याबरोबर तें हित व्यक्ति आणि समाज या दोघांचेंही समप्रमाणांत झालें पाहिजे. म्हणूनच हिंदु समाजशास्त्रज्ञ, 'धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ।' [1] धर्माला धरून असेल तितकेंच कामसंतर्पण व्यक्तीला घेऊं देणें एवढाच प्रश्न शिल्लक रहातो असें मानतात. यामध्यें यमनियम लावून देणाऱ्या हिंदु शास्त्रज्ञांचें कोठें चुकलें हें बारकाईनें पाहून देखील आम्हांला कळत नाहीं. असाच नियम दैवी होय आणि इतर सर्व आसुरी होत. हिंदूंचे धर्मशास्त्रज्ञ असें सांगतात इतकेंच नव्हे, तर हिंदूंचें कामशास्त्रज्ञही तीच गोष्ट सांगतात. 'एषां[2] समवाये पूर्वः पूर्वो गरीयान् ।' धर्म, अर्थ आणि काम यांचा समवाय उत्पन्न झाल्यास कामापेक्षां अर्थ श्रेष्ठ आणि अर्थापेक्षां धर्म श्रेष्ठ असें मानावें. या सूत्रावरील टीकाकार यशोधर म्हणतो, 'समवाये संनिपाते । तदुपायसंनिधानात् । पूर्वः पूर्व इति कामादर्थो गरीयान् । कामस्यार्थसाध्यत्वात् । ततोऽपि धर्मः । अमुत्राप्यर्थस्य धर्म साध्यत्वात् ।' अशा तऱ्हेची हिंदूंची प्रणाली आहे आणि ती पूर्ण शास्त्रीय आहे. ज्यांना सामाजिक निर्बंधाची जरूरी वाटत नाहीं, असे लोक कामपूर्तीचें नक्की स्थान कोणतें असें सांगतील तर आमच्यासारखे पुराणमतवादी देखील त्या सुखधामापर्यंत प्रवास करण्याला तयार होतील ! परंतु वासनांच्या ज्वालामुखीला अनिर्बंध वाव देण्याला सांगणारे लोक असें कांहीं नक्की स्थान दाखवावयास तयार आहेत असें आम्हांला वाटत नाहीं. जिकडे पहावें तिकडे गोल्डस्मिथ कवीनें म्हटल्याप्रमाणें,[3] 'मला अत्यंत सुख उत्पन्न करणारें स्थळ दाखवा. परंतु प्रत्येकजण जाणण्याचें ढोंग करीत आहे तेथें मला वाटाड्या कोठें मिळेल?' हें सर्वज्ञपणाचें ढोंग आजच्या जगाचा आणि संस्कृतीचा नाश करीत आहे !

'इच्छासंभोगाला स्थळकाळाची मर्यादा आहे किंवा नाहीं.' आलेला वेग आवरून धरला असतां शरीरप्रकृतीवर वाईट परिणाम होतात हा आधुनिक शोध कांहीं नवीन नाहीं. हिंदु-वैद्यक-ग्रंथ सांगतात, 'नवेगा-[4]

---

१ भगवद्गीता.

२ कामसूत्र— वात्स्यायन.

३ Traveller by Goldsmith.

४ अष्टांगहृदय— वाग्भट.

न्धारयद्धीमान् जातान् मूत्रपुरीषयोः। ' परंतु तेच ग्रंथकार पुढें जाऊन सांगतात, 'मनोवेगान् तु धारयेत्।' म्हणून आम्ही विचारतों कीं, इच्छासंभोगाचा पुरस्कार करणाऱ्यांच्या मतानें स्थळकाळादि मर्यादा आहेत किंवा नाहींत ! तशा असल्यास आणि त्या मर्यादा घालाव्या असें ठरल्यास मग अनंत प्रश्न उत्पन्न होतील. आणि जास्त जास्त मर्यादा आपोआप उत्पन्न होतील. आरबी भाषेंतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टींत अल्लाउद्दिनाचें राजकन्येवर मन गेल्याबरोबर त्यानें इच्छासंभोग कसा करावयाचा ? रस्त्यांत एकादी तरुणी चालली असतां अनेक पुरुषांच्या अंतःकरणांत इच्छा उत्पन्न होते त्या सर्वांना तिनें शरीरदान करावयास पाहिजे म्हणजे त्यापासून बहुतांचें बहुत सुख सिद्ध होईल. यावर आमचे सुधारक सांगतील कीं, इच्छा दोनहीं पक्षाची असावयास पाहिजे. फार उत्तम ! एकामध्यें[1] वासना उत्पन्न झाल्याबरोबर दुसऱ्यामध्यें तशी वासना नसल्यास ती जागृत करणें आणि मग दोघांचीही इच्छा होती असें म्हणणें हा प्रकार दोघांची इच्छा होती असें म्हणण्याच्या कक्षेंत येईल काय ? तरुणी मध्यमं[2] वयस्कापेक्षां पोक्त पुरुषावर प्रेम करतात असें म्हणतात मग अशा विवाहांना अलीकडचे सुशिक्षित तरुण विरोध कां करतात ? असें अनंत प्रश्न यांतून उत्पन्न होतील; परंतु त्यांची चर्चा करून जागा अडवीत नाहीं. वेडा, तत्त्ववेत्ता आणि छिनाल यांच्याशिवाय समाजांतील सर्व लोकांना मर्यादा घालणें इष्ट आहे ही गोष्ट नक्की समजते आणि समाजरक्षक आपापल्या हिंमतीप्रमाणें तशा मर्यादा घालीत असतातच. जबाबदारी त्या सर्वच मर्यादा काढून टाका असें म्हणणारावर पडते. मर्यादा घालणारावर नव्हे.

परंतु कोणच्याही विषयाचें ज्ञान नसून तें आहे असें सांगण्याची प्रवृत्ति या एकाच क्षेत्रांत आहे असें नव्हे तर, ती संस्कृतीच्या एकूण एक क्षेत्रांना व्यापून दशांगुळें उरलेली आहे. समाजाचें कोणतेंही अंग घ्या, तेथें आपल्याला अज्ञान आणि ढोंग याच दोन तत्त्वांचा प्रसार झालेला दिसून येईल.

मनुष्य परमेश्वरावर विश्वास असल्याचें ढोंग करील, पळ्या वाजवील,

---

१ Studies in psychology of sex-Vol. VII by Havalock Ellis.

२ Studies in psychology of sex-Vol. VI by Havalock Ellis.

संध्या करील, चर्चमध्यें जाईल, मशिदींत जाईल, सर्व कांहीं करील आणि सर्व आयुष्य सूक्तासूक्त मार्गानें अर्थार्जन करण्यांत खर्च करील. तत्त्ववेत्ते कांहींही सांगोत, मनुष्य तत्त्ववेत्यालाच मूर्खांच्या यादींत काढील. या प्रवृत्तीलाच हिंदु लोक आसुरी प्रवृत्ति असें म्हणतात, भगवद्गीताकार म्हणतात :

' काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ।
मोहात्गृहीत्वाऽसत्ग्राहान् प्रवर्ततेऽशुचिव्रताः ॥
चिंतामपरिमेयांच प्रलयान्तामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥
आशापाशशतैर्बद्धा कामक्रोधपरायणाः ।
ईहन्ते कामभोगार्थम् अन्यायेनार्थसंचयान् ॥ '

मानव आपलें स्वातंत्र्य या तत्त्वावर प्रेम आहे असें सांगत सुटेल, परंतु राष्ट्रांचीं स्वातंत्र्यें मिळविण्याकरितां जे कोणी महात्मे झटत असतील त्यांचे, अंगावर शहारे येण्याइतके हाल[1] करील. स्वातंत्र्य चांगलें परंतु तें मला पाहिजे तुला नको. यूरोपीय मानव खिस्तामध्यें श्रेष्ठत्व होते ही गोष्ट मान्य असल्याचें भासवील आणि मुसोलिनी, हिटलर वगैरेंच्या आज्ञा पाळील. अर्थातच प्रत्येक वेळीं कांहीं तरी तत्त्वाचा आश्रय घेतल्याचें भोळ्याभाबड्यांना दाखवील. सद्गुणावर प्रेम आहे असें दाखवील आणि वेश्यावृत्ति, उपदंश, परमा वगैरे रोगांचा फैलाव करील. बायका पळवून नेणें हा एक महत्त्वाचा पोटाचा[2] धंदा होऊन बसेल. आजची बंगाल प्रांताची स्थिति प्रसिद्धच आहे. मनुष्य हा विवाह ही संस्था सर्व संस्कृतीचा पाया आहे, ही गोष्ट तोंडानें सांगतो परंतु हस्तस्पर्श, गोष्टी सांगणें, आलिंगन, चुंबन, कुमारिकांवर रेतःसेक, आणि व्यभिचार वगैरे सर्व गोष्टी समाजाला न समजतील अशा तऱ्हेनें करून आणि शिवाय समाजांत उजळ माथ्यानें प्रतिष्ठित म्हणून वावरतो ! याशिवाय आणखी काय काय विकृत प्रक्रिया करतो त्यांची माहिती फ्रुड, यंग, स्टेकेल, ॲडलर, जोन्स, मीडर, हॅवे-

---

१ The house of dead by Dostoiewsky; Prisoner of Chillon by Byron. अंदमानांतील अनुभव – सावरकर.

२ Mrs. Warren's profession by Bernard Shaw; Lena or London girl; Why girls go wrong and other works.

लाक एलिस वगैरे लेखकांच्या ग्रंथांवरून जिज्ञासूंनीं समजावून घ्यावी. सत्याची स्तुतिस्तोत्रें ऐकूं येतात आणि लफंगे लोकांच्या हातांत समाज-नौकेचें सुकाणूं राहूं दिलें जातें. त्यांना घरचा उद्योग चांगलासा न करतां आल्याकारणानें, सार्वजनिक कामें डोक्यावर घेऊन, मुत्सद्दी लोक, वर्तमानपत्रकर्ते वगैरे किती खोटें बोलतात याची आंकडेवारी अमेरिकन लेखक डॉ. शफ्टसबरी यानें दिलेली आहे. उमदें वर्तन चांगलें असें प्रत्येक व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीला सांगेल परंतु स्वतः त्या दिशेनें कोणताच प्रयत्न करणार नाहीं. सर्व धरणी आज मानवी बंधुत्व या तत्त्वाच्या ध्वनीनें दुमदुमून गेलेली दिसते. परंतु अगदीं कामकऱ्यांची कड घेणारें रशियन सरकार आफ्रिकेंतील नीग्रो, बंटु, झुलु यांना, फार कशाला इंग्लंडमधील सरदार-वर्गाला बंधुत्वाचे हक्क द्यावयाला तयार होईल असें वाटत नाहीं. बंधुत्वाच्या गप्पा जर खऱ्या असतील तर देशभक्ति, राष्ट्रीयत्व,युद्ध वगैरे भपकेबाज नांवांखालीं जे अघोर अत्याचार चालतात आणि त्यांत सहभागी न झालेल्यांचा छळ झालेला आपण सर्वत्र पाहतों त्याला काय कारण असावें ? अशी ही सध्यांची संस्कृति आहे.

उलट, स्वतःची कांहींच श्रद्धा नसून दुसऱ्यांनीं एकादी गोष्ट करावी असें सांगणारेही महात्मे या जगतीतलावर सांपडतील. स्वतः[1] मूर्तिपूजा अगर देवळें यांचा संपर्क लावून न घेतला तरी इतरांनीं देवळांत प्रवेश करावा अगर नाहीं याची चर्चा चालू राहील. स्वतः परदेशी अन्न खाल्लें तर तें जरूर म्हणून आणि इतरांनीं परदेशी माल वापरल्यास तो मनुष्य देशद्रोही असेंही पण म्हटलेलें ऐकूं येईल.

अशा तऱ्हेनें जे मानवी ध्येयें प्रवर्तित करतात त्यांचा स्वतःच्या ध्येयांवर विश्वास नसतो. तीं ध्येयें चांगलीं आहेत आणि तीं दुसऱ्यानें पाहिजे तर आचरणांत आणावीं या बाबतींत मात्र चहूंकडे एकमत झालेलें दिसतें. ही जी मानवाची मनःप्रवृत्ति—विकृत मनःप्रवृत्ति—आज उत्पन्न झालेली दिसते त्या प्रवृत्तीवर आज हिंदुधर्माच्या आचारपद्धतीवांचून दुसरें कोणतेंही औषध आम्हांला तरी दिसत नाहीं.

---

१ रा. मोहनदास गांधी आणि मंदीरप्रवेशाचा कायदा कायदेमंडळांत आणणारे त्यांचे अनुयायी.

अशा तऱ्हेची जागतिक समाजाची स्थिति झालेली आहे. कोठेंही श्रद्धा नाहीं, कोणतेंही तत्त्व नाहीं, निघालों कोठून व जाणार कोठें याचा पत्ता नाहीं. अशा परिस्थितींत देखील ज्या समाजाला सनातनी या नांवानें संबोधिलें जातें त्या समाजाची आपली जातीय संस्कृति, आपल्या घरांत कुलाचार म्हणून चालत आलेले आचार, आपल्या वाडवडिलांनीं लावून दिलेले आचार इत्यादि गोष्टींवर श्रद्धा आहे. सनातनी समाजाला असेंच वाटतें कीं, अस्पृश्य मानलेल्या जातींचा स्पृश्य मानलेल्यांच्या देवळांत प्रवेश होऊं नये. त्यांचा त्यांच्या देवावर विश्वास आहे, धर्मावर श्रद्धा आहे, वाडवडिलांबद्दल आदर आहे. सुधारक म्हणविणाऱ्या वर्गाला जुन्या चालीरीतींना शिव्या देण्यापेक्षां हिंदुसमाजाला कांहीं सामाजिक तत्त्वें सांगण्यासारखीं आहेत असें दिसत नाहीं. जातिसंघटित समाजाचे खरे खोटे दोष दाखविणारांनीं जातिहीन समाज निर्दोष आहेत असें गुणदोषांचें मापन सांगून[1] सिद्ध केलें आहे काय ? बालविवाहाच्या नांवानें कोठल्याही शास्त्राचा विचार न करतां खडे फोडणारांनीं प्रौढ विवाहांत कोणते गुण दाखविले आहेत म्हणून यांचें ऐकावें ? खरी गोष्ट अशी आहे कीं, कोणत्याही समाजांमध्यें समाजसुधारक नांवाची जी एक चीज पैदा होत असते त्या वस्तूजवळ समाजाला वळण लावण्याचा म्हणून कांहींच कार्यक्रम नसतो. शिक्षणासारख्या वरवर झिलई देणाऱ्या गोष्टींनीं समाजांची गति बदलत असते ही कल्पनाच खुळ[1]चटपणाची आहे ! आज फ्रान्समध्यें प्रत्येक मुलाच्या शिक्षणावर जितका पैसा खर्च होतो त्याच्या पांचपट पैसा इंग्लंडमधील मुलाच्या शिक्षणावर[2] खर्च होतो असें असून इंग्रज मुलगा फ्रेंच मुलापेक्षां श्रेष्ठ कां उत्पन्न होत नाहीं ? किंवा जास्त पैसा खर्च करून देखील इंग्रज शिक्षकाला जास्त चांगला परिणाम दाखवितां येत नाहीं, म्हणून इंग्लंडचें स्थान शिक्षणकौशल्याचे बाबतींत मागें आहे असें कां मानावयाचें ? तसें असेल तर, इंग्लंडमध्यें शिक्षणशास्त्र शिकून आलेल्या इसमांना जो मान मिळतो तो मूर्खपणाचा परिणाम असेंच समजावयाचें ? प्राचीन ग्रीस देश आणि

---

१ The future of life C. C. Hurst, Nature and nuture by Pearson and Elderton.

२ Mending of mankind by George Whitehead.

प्राचीन चीन देश या दोनही देशांमध्यें शिक्षणपद्धति तंतोतंत[१] सारखी असून ग्रीस देशामध्यें शास्त्रें आणि प्रगति यांची उर्जितदशा कां झाली आणि चीनमध्यें धर्म आणि स्थायीसमाज यांची उत्पत्ति कां झाली हें एक कोडेंच आहे. तसेंच ग्रीक संस्कृतीचा नाश कां झाला आणि चीनची संस्कृति अजून कां जिवंत आहे, हेंही पण विशद करून सांगावयास पाहिजे. परंतु या गोष्टींचा विचार न करतां नुसतें शिक्षण असा जो कंठशोष चालला आहे त्याचा कोणाही विचारी मनुष्याला अर्थ कळणेंच शक्य नाहीं!

असो. अशी ही आजची संस्कृति—म्हणजे पाश्चात्य संस्कृति—आहे आणि आमची संस्कृति त्याच पद्धतीवर नेऊं इच्छिणारांचा सामाजिक कार्यक्रम असा आहे. म्हणून प्रस्तुत विषयाकडे वळणें हेंच बरें!

आम्हीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें कामोपभोगाची पूर्णाशानें पूर्णता होणें ही गोष्टच सृष्टींत नसेल तर तुझ्या स्थितींत—समाजयंत्रामध्यें मोडतोड न करतां—तुला जितकें सुख मिळणें शक्य आहे तितक्याचाच उपभोग घे; अशाच तऱ्हेची मनाची तयारी करून ठेव असाच उपदेश कोणाही समाजसुधारणेची इच्छा करणारानें करावयास पाहिजे. दुसरें कांहीं सांगतां येणें शक्य आहे असें आम्हांला वाटत नाहीं. नैतिक मूल्य अशाच तऱ्हेचें बनावयास पाहिजे कीं, त्यापासून हीच प्रवृत्ति त्या त्या गटांतील व्यक्तींच्या अंतःकरणावर ठसेल. जी गोष्ट भगवान शंकराचार्य अर्थोपार्जनाच्या बाबतींत सांगतात तीच कामोपभोगालाही लागू आहे :

> "मूढजहीहि[२] धनागमतृष्णां कुरुतनुबुद्धे मनसि वितृष्णाम् ।
> यल्लभसे निजकर्मोपात्तं वित्तं तेन विनोदय चित्तम् ॥
> अर्थमनर्थं भावय नित्यं नास्ति ततः सुखलेशः सत्यम् ।"

तसें न झाल्यास, एकदां असमाधान ही कामाची नैसर्गिक स्थिति मानल्यानंतर त्या कामाच्या पूर्तीची पद्धति त्या व्यक्तीच्या अनियंत्रित प्रवृत्तीवर अवलंबून ठेविल्यास, कोणताही समाज नाशाला प्रवृत्त झाला आहे असें मानणेंच भाग आहे.'

---

१ On education by Bertrand Russel.

२ मोहमुद्गर.

समाजांशीं आमचा कांहींही संबंध नाहीं असें[१] म्हणणारेही कांहीं हरीचे लाल सांपडतात. त्यांना इतकेंच सांगावयाचें कीं, तुम्ही रतिक्रीडा ज्या व्यक्तीबरोबर करणार ती व्यक्ति समाजांतीलच आहे आणि म्हणून आपणांलाही समाजाची जरूरी आहे इतकेंच उत्तर आज याला पुरें आहे. व्यक्तींच्या हक्काचें तुणतुणें वाजविणारांना काय म्हणावें हेंच कळत नाहीं. व्यक्तींना हक्क आहेत असें विधान करणाऱ्यांचें मत समाजाला हक्क नाहींत असें आहे असें वाटतें. व्यक्ति हा अवयव आणि त्याहून श्रेष्ठ अवयवी जो समाज, त्या दोहोंमध्यें व्यक्तीला हक्क असून समाजाला हक्क नसावेत ही फारच आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे. व्यक्तिस्वातंत्र्य हें कोठेंही आणि केव्हांही संघटित समाज उत्पन्न करूं शकत नाहीं ही गोष्ट आम्हीं मागें सांगितलीच आहे. व्यक्तीला स्वातंत्र्य पाहिजे हे शब्द आम्हांला तर कळत नाहींत. समाजाव्यतिरिक्त व्यक्तीचे हक्क ते कोणते ? व्यक्तीला पाहिजे तसें आपलें घर ठेवण्याचा हक्क देतां येईल का ? व्यक्तीला रस्त्यानें देखील वाटेल तेथून चालण्याचा तरी हक्क समाजांत उत्पन्न होऊं शकतो काय ? ही गोष्ट रशियाला देखील लागू आहे, ही गोष्ट आमच्या येथील जहाल समाजसत्तावाद्यांनीं विसरूं नये. या सर्व बाबतींत आम्हांला वाटेल तसें वागण्याचा हक्क आहे, असें यांपैकीं कोणीही म्हणणार नाहीं. आम्हांला तरी आज हिंदुसमाजांत—म्हणजे सुधारकचमूंत—हक्कासंबंधीं ज्या गप्पा चाललेल्या ऐकूं येतात त्या स्त्रीसंबंध आणि कांहीं धार्मिक चालीरीति यांच्याबद्दल ऐकूं आलेल्या दिसतात. असो.

पातिव्रत्य या गुणाला गुण म्हणून बरेंच वरचें स्थान देणें प्राप्त आहे. त्या गुणाला निव्वळ गुण म्हणून फारसें मोल नसलें तरी मानवी अंतःकरणांत रसरसणाऱ्या एकूणएक वासनांचा—शेवटीं असंतुष्ट रहाणाऱ्या वासनांचा—हल्ला परतविण्याचें हें एक अमूल्य साधन आहे. म्हणूनच आर्यवाङ्मयामध्यें—मग तें काव्य असो, नाटक असो, धार्मिक ग्रंथ असो—पातिव्रत्याची महती गायिलेली आढळते. नुसती महतीच नव्हे तर पतिशिवाय दुसऱ्या कोणत्याही पुरुषाचा विचारदेखील न करणाऱ्या स्त्रिया या समाजांत उत्पन्न झालेल्या आहेत. ' व्रजतु चरतु धर्मं भर्तृनाथाहि नार्यः ।', ' प्रमदाः

१ प्रतिमा– भास.

२ कालिदास.

पतिवर्त्मगाः[1] इति प्रतिपन्नं हि विचेतनैरपि।', 'स्त्रीणां भर्ता धर्मदाराश्च पुंसा-मित्यन्योन्यं वत्सयोर्ज्ञातमस्तु।', 'भर्तुर्विप्रकृता[2]ऽपि रोषणतया माऽस्म प्रतीपं गमः।' अशा तऱ्हेचीं वाक्यें शेकड्यांनीं मोजतां येण्याइतकीं दाखवितां येतील. धर्मशास्त्राबद्दल तर विचारावयासच नको. स्त्री ही पाजी लोकांना एक अत्यंत लोभनीय वस्तु आहे, ही गोष्ट माहीत असल्याकारणानें धर्मशास्त्र तिचें रक्षण करावयास सांगते :

'इमं[3] हि सर्व वर्णानां पश्यन्तो धर्ममुत्तमम्।
यतन्ते रक्षितुं भार्यां भर्तारो दुर्बला अपि॥'

कामशास्त्र तर त्याच्याही पुढें जाऊन स्त्रीला सुखी कसें करावें आणि पाजी लोक स्त्रियांना बिघडविण्याच्या काय युक्त्या योजतात आणि त्यांच्यापासून स्त्रीचें रक्षण कसें करावें याचाही उपदेश करतें. वात्स्यायन म्हणतो,

'संदृश्य[4] शास्त्रतो योगान्पारदारिकलक्षितान्।
न याति च्छलनां कश्चित्स्वदारान्प्रति शास्त्रवित्॥
पाक्षिकत्वात्प्रयोगाणामपायानां च दर्शनात्।
धर्मार्थयोश्च वै लोक्ष्म्यान्नाचरेत्पारदारिकम्॥
तदेतद्दाररक्षार्थं आरब्धं श्रेयसे नृणाम्।
प्रजानां दूषणायैव न विज्ञेयोऽस्य संविधिः॥'

पातिव्रत्य समाजहिताला आणि समाजरक्षणाला किती हितकारक आहे—स्वतः स्त्रीच्या सुखदुःखाच्या दृष्टीनें किती आवश्यक आहे—याची प्राचीन शास्त्रें अगर अर्वाचीन शास्त्रें यांच्या दृष्टीनें वाटेल तेवढी चर्चा करतां येणें शक्य आहे. मानसशास्त्र, इंद्रियविज्ञानशास्त्र, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, कामशास्त्र कोणतेंही शास्त्र प्रधान मानून चर्चा केली तरी पातिव्रत्य हा अत्यंत बहु-मोल गुण ठरतो ही गोष्ट सहज सिद्ध करतां येईल. म्हणून आमची सर्व तरुण स्त्रियांना हात जोडून विनंति आहे कीं, 'भगिनींनो! हा प्राचीन धर्म

---

१ मालतीमाधव– भवभूती.
२ कालिदास.
३ मनुस्मृति.
४ कामसूत्र– वात्स्यायन.

जतन करा. त्यांतच समाजाचें स्वास्थ्य आहे.' म्हणूनच महाभारतकार म्हणतो, 'वैषम्यपि संप्राप्ता गोपायन्ति कुलस्त्रियः।'

मानवी जीविताच्या सुखदुःखांची चर्चा करून त्यांचें मोजमाप सुचविलें. त्या चर्चेचा थोडक्यांत निष्कर्ष पुढीलप्रमाणें सांगतां येईल.

( १ ) जीवनाशाची म्हणजे आत्महत्त्येची प्रवृत्ति समाजांत वाढत जाणें हें समाजाच्या रोगीपणाचें लक्षण जाणावें. असा समाज अशीच परिस्थिति उत्पन्न करतो कीं, व्यक्तीला आपल्या जीविताचें मूल्य मुळींच वाटेनासें होतें. उत्क्रांतीच्या नियमाप्रमाणें जीवनार्थ कलह अत्यंत तीव्र व्हावयास पाहिजे आणि व्यक्तीची जीवनाची वासना, इच्छा (will to live) हींही पण जास्त वाढत गेलीं पाहिजेत, तरच समाज श्रेष्ठ स्थितींत जातील. परंतु या समाजांत सामर्थ्यसंपादनाची इच्छा ( will to power ), जीवनाची इच्छा ( will to live ) या सर्व नाहींशा होऊन त्यांच्या जागीं एकाद्या दमल्या भागलेल्या वृद्धाप्रमाणें मरणाची इच्छा ( will to die ) वाढत चाललेली आहे.

( २ ) मानवी मनाच्या अकर्तृत्वाची शेवटची स्थिति वेड लागणें, तत्सदृश परंतु स्पष्ट दिसून न येणारी स्थिति मनोदौर्बल्य ( Feeblemindedness ), इतर मज्जातंतूंचे रोग यांची वाढ होत जाणें हें समाज दुर्बल होत चालले आहेत, असें दाखविणारें स्फुट चिन्ह आहे.

( ३ ) स्त्रीपुरुषसंबंधाच्या बाबतींत वामता आणि सामाजिक हानि दर्शविणारे लैंगिक रोग उपदंश, परमा, मुष्टिमैथुन वगैरेंचें प्रमाण वाढत जाणें हेंही पण समाजांचें सदोपत्व दाखवितें.

( ४ ) घटस्फोट करणाऱ्या समाजांत आत्महत्त्येचें प्रमाण वाढत जातें याचा विचार करतां घटस्फोटाची वाढ हीही समाजाची सरोग स्थिति दर्शविते.

हीं सर्व गमकें सांगून आमच्या जातिसंघटित समाजाच्या दुःखांचीं भडक वर्णनें करणारे जे मिस मेयोसारखे[१] पाश्चात्य लेखक, सी. एफ. अँड्रयूज सारखे पोकळ मिशनरी, हिंदुसमाजाविषयीं खोट्या[२] कल्पना

१ Mother India by Miss Catherine Mayo.

२ Report on material and moral progress for any year.

पसरविणारे पाश्चात्य राज्यकर्ते, आमच्यांतील दुःखाचा कळवळा येतो असें दाखविणारे स्वयंमन्य[१] पुढारी, महात्मे, कर्मवीर, संचालक वगैरे सर्वांना आव्हान करून विचारतों कीं, शास्त्रीय पद्धतीनें दुःखाचें प्रमाण हिंदु समाजांत वाढत आहे हें सिद्ध करावयास आपण तयार आहांत काय ? अर्थशून्य पोकळ बडबडी नकोत, प्रत्यक्ष मोजमाप दाखवा. आम्ही येथें एवढेंच बजावून ठेवतों कीं, हीं तीनही अगर चारही प्रमाणें हिंदु, बुद्ध आणि रोमन कॅथालिक या तीनच धर्मांत कमी आहेत आणि म्हणून हे तीनच धर्म मानवाचें पूर्णत्वानें समाधान करण्यास पात्र आहेत, इतर नाहींत. आम्ही हें विधान कोणत्याही धर्माच्या तात्विक मतांबद्दल करीत नसून त्या धर्मांच्या समाजावर होणाऱ्या परिणामाच्या दृष्टीनें करीत आहों.

**५३ आचारधर्म.**

कोणाच्या परमेश्वरविषयक अगर परलोकविषयक कल्पना काय स्वरूपाच्या आहेत यासंबंधीं आमचें कांहींच म्हणणें नाहीं. परंतु, 'फलानुमेयाः प्रारंभाः संस्काराः प्राक्तना इव ।' या नियमानें मोजमाप देऊन आम्ही वरील विधान करीत आहोंत. हल्लीं वडाच्या साली पिंपळाला लावून दुःखांसंबंधीं आणि त्यांच्या कार्यकारणभावासंबंधीं वाटेल तीं विधानें करण्याची प्रवृत्ति इतकी पसरली आहे कीं, अशा व्यक्तींचें अभिनंदन केल्याशिवाय रहावत नाहीं ! हिंदुस्थानांत भूकंपाचे धक्के[२] कां बसतात तर म्हणे हिंदु समाजांत अस्पृश्यतेचें पातक फार झालें म्हणून ! आम्ही उलट असें म्हणतों कीं, आजपर्यंत अस्पृश्यता असून भूकंपाचे धक्के बसले नाहींत आणि आतां अस्पृश्यता-निवारण सुरू केल्यावर धक्के बसूं लागले म्हणून अस्पृश्यतानिवारण या पापाचा भूकंपाचे धक्के हा परिणाम आहे, ही गोष्ट अन्वय ( method of agreement ) आणि व्यतिरेक ( method of difference ) या दोनही पद्धतीनें सिद्ध होईल. मानसशास्त्रावरील ग्रंथकारांनीं कोणत्याही एका विवक्षित स्वप्नांतून[३] जागा न झालेला असा वेडा या शब्दाची व्याख्या केलेली आहे. ती असल्या व्यक्तींना लागू पडते किंवा काय या गोष्टीचा त्यांच्या अंध भक्तांनीं विचार करावा.

---

१ धर्मशास्त्रमंथन— वे. शा. सं. महादेवशास्त्री दिवेकर.
२ गांधी.
३ Psycho analysis by Ernest James.

सुखदुःखें हीं अंतःकरणाशीं निगडित आहेत. अंतःकरण मायक्रोस्कोपखालीं घालून पहातां येत नाहीं. बाह्य परिस्थिति आणि आंतरपरिस्थिति यांच्यामध्यें वैषम्य असतें, व्यक्तींचीं अंतःकरणें गटांतील नैतिक मूल्यांनीं तयार होतात इत्यादि सर्व गोष्टींचा विचार केल्यास सुखाची उत्पत्ति अगर दुःखाची अनुत्पत्ति हा समाजरचनेचा अगर धर्मरचनेचा पाया करावा असें कोणीही समंजस माणूस सांगणार नाहीं. परंतु तीच सुखदुःखाचीं तत्त्वें सांगून हिंदूंच्या चालीरीतींत फरक करणारे कायदे आज पुढें येत आहेत. अभिजात[१] समाजांतील विधवांनीं पुनर्विवाह करावा कां तर त्यांना सर्व जन्म दुःखांत कंठावा लागतो ! [२]अस्पृश्यतानिवारण करा कां तर अस्पृश्यांचें जीवन दुःखमय आहे ! हिंदुधर्माला[३] मीमांसकांनीं दिलेलीं प्रमाणें अपुरीं पडतात कां तर त्या प्रमाणांत आत्मतुष्टि या प्रमाणाला बरेंच खालचें स्थान दिलेलें आहे ! अशा तऱ्हेनें सुखदुःख हा आज समाजशास्त्राचा पाया होऊं पहात आहे. सुखदुःख हा समाजशास्त्राचा परिणाम होऊं शकेल, पाया नव्हे. सुखदुःखाची मीमांसा करून सुखोत्पादक जे नियम असतील आणि दुःखनिवारक जे निर्बंध असतील ते नियम आणि ते निर्बंध समाजशास्त्राला आधारभूत होऊं शकतील. अशा तऱ्हेच्या सर्व गोष्टींचा हिंदूंच्या गटमय अगर जातिमय समाजरचनेंत विचार केला आहे ही गोष्ट आम्हांला सप्रमाण दाखवावयाची आहे.

आमचें म्हणणें असें आहे कीं, संस्कृतीचें चिरंजीवित्व, सुप्रजांचें उत्पादन, लोकसंख्यांच्या अतोनात वाढीचें नियमन, अन्नाची यथाधिकार वाटणी, समाजावर कामविकाराचे वाईट परिणाम होऊं न देण्याची शक्यता, स्त्रीपुरुषांचें सुखदुःख, व्यक्तींचें उपदंश वगैरे विकारांपासून संरक्षण इत्यादि दृष्ट फलें आणि स्वर्गमोक्षादि अलौकिक फलें (कोणाला मान्य असल्यास) या सर्व दृष्टीनें हिंदूंची जातिप्रधान समाजरचना श्रेष्ट आहे. या समाजरचनेवर बाह्यांनीं आजपर्यंत पुष्कळ हल्ले केले तरी बाह्य, तिचीं पाळेंमुळें

---

१ Pandit Ishwarchandra Vidyasagar.

२ अस्पृष्टांचा प्रश्न- माटे.

३ धर्मस्वरूपनिर्णय- तर्कतीर्थ कोकजे.

खणून काढूं शकले नाहींत. कारण, या समाजांतील संस्कृति कोणत्याही एका वर्गाशीं निगडित नाहीं. त्यामुळें कोणताही एकादा वर्ग नष्ट झाला तरी, त्यानें संस्कृति उमलून पडत नाहीं. येथें प्रत्येक वर्गाला स्वतःची म्हणून संस्कृति आहे, नैतिक मूल्यें आहेत, देवदेवता आहेत, व्यापारउदीम आहे; थोडक्यांत सांगावयाचें तर, मनुष्यप्राण्याच्या सर्व वासना तृप्त करण्याचीं साधनें आहेत. प्रत्येक वर्गाचें ध्येय भिन्न असल्याकारणानें प्रत्येक वर्गाचीं नैतिक मूल्येंही तत्सदृश आहेत.

'असंतुष्टा[१] द्विजा नष्टा संतुष्टाः च नराधिपाः ।
सलज्जा गणिका नष्टा निर्लज्जा च कुलांगना ॥'

ब्राह्मणानें असंतुष्ट नसावें, राजानें संतुष्ट नसावें, गणिकेनें लज्जाशील नसावें आणि कुलस्त्रीनें निर्लज्ज होऊं नये. जें ज्याचें ध्येय तें त्याचें नैतिक मूल्य ! येथें जसा ज्याचा अधिकार तसाच त्याला उपदेश आणि तसेंच त्याला वळण.

हिंदूंची समाजस्थिति संस्कृतिप्रधान ( Cultural ) करावयाची असल्याकारणानें येथें ज्ञान क्रियेनें आहे, शब्दानें नव्हे. येथें स्वच्छतेचा उपदेश नाहीं, स्वच्छतेचा आचार आहे. येथें खरा हिंदु स्नानाशिवाय राहूं शकत नाहीं. येथें परोपकारावर व्याख्यानें नाहींत तर प्रत्यक्ष अतिथीधर्माचा आचार आहे. अशा तऱ्हेचे प्रत्यक्ष आचार सिद्ध होण्याकरितां, लहानपणापासूनच प्रत्यक्ष संस्कार आहेत. जुन्या तऱ्हेचा ब्राह्मण मुलगा दुसऱ्याचें उष्टें खात अगर पीत नाहीं आणि नव्या पिढींतील कॉलेजांत शिकणारा मुलगा तसें खाण्यापिण्यांत दोष मानीत नाहीं, हा प्रत्यक्ष आचार आणि त्यावरील व्याख्यानें यांच्या परिणामांतील फरक आहे. जुन्या पद्धतींतील संध्याशील मुलगा सूर्योदयापूर्वी प्रातःकर्म संपवून आपल्या कामकाजाला तयार असतो, आधुनिक सुशिक्षित कसा असतो या गोष्टीचा ज्याचा त्यानें विचार करावा. आचारानें निरलस उद्योगप्रियता आणि नियमितपणा उत्पन्न होतो तो नष्ट करून, आतां नियमितपणावर व्याख्यानें सुरू आहेत.

---

१ सुभाषित.

इतर धर्मांमध्यें अधिकारपरत्वें आचार, विचार, प्रार्थना वगैरे गोष्टींचा विचार झालेला दिसत नाहीं. एका कोणत्या तरी गुरूचा उपदेश मान्य असला म्हणजे ती व्यक्ति त्या संघाचा घटक होऊं शकते. अशा धर्मसंस्थांना गुरुप्रधान– व्यक्तिप्रधान (credal) धर्म असें म्हणतां येईल. मानव प्राण्याची भौतिक गुण आणि अतिभौतिक गुण अशी विभागणी केल्यास हिंदु समाजामध्यें भौतिक गुणांचें[१] रक्षण करण्यास प्रत्यक्ष आचार लावून दिलेले आहेत. अमोज आणि अनुमित अशी जी मनाची प्रक्रिया त्या बाबतींत स्वातंत्र्य आहे.

हिंदु समाजानें जे आचार लावून दिले आहेत त्या आचारावर आज आधुनिक पंडित आक्षेप घेत आहेत. ते पंडित कोठल्याही बाबतींत किती खोल विचार करतात हें पुढील साधें उदाहरण घेऊन दाखवितों.[२] 'प्रातःकालीं मलोत्सर्गानंतर निरनिराळे अवयव माती लावून धुवावे असें स्मृतिकारांनीं सांगितलें असून त्या त्या अवयवास किती माती लावावी हेंही कांहीं स्मृतिकारांनीं सांगितलें आहे.' असा उपन्यास करून एक शास्त्री प्राचीनांची पुढें हेटाळणी करतात. ते आणि त्यांचे दुसरे एक समानशील शास्त्री सांगतात कीं, घाण जाऊन स्वच्छता यावी एवढें सांगा म्हणजे झालें, त्या बाबतींत अमुक वेळां माती लावा, कमी जास्ती वेळां लावूं नका इत्यादि पांडित्य करण्याचा काय फायदा ? 'गंधलेपकरं शौचं कुर्यात् ।' (याज्ञ.) हा त्यांनीं उताराही दिला आहे. परंतु यांतही मानवी स्वभाव आणि मानवी इंद्रियें यांचा कांहीं संबंध नाहीं अशी या पंडितांची कल्पना दिसते, तेंच मुळांत खरें नाहीं. हे दोनही शास्त्री व आम्ही या दोघांच्याही स्वच्छतेची कल्पना एक नाहीं. आम्हांला ते उद्धट म्हणतील तरी आम्ही सांगतों कीं, या दोघांच्या कपड्यांना आम्ही स्वच्छ म्हणण्यास तयार नाहीं. म्हणून एक निश्चित मापन ठरविल्यास चुकलें काय ? पुन्हां ज्याची त्याची स्वच्छता व्यक्तीवर सोपवून द्यावी असें तत्त्व कबूल केल्यास, जो तो आपल्या कल्पनेप्रमाणें स्वच्छ रहातोच आहे; मग हे सर्व शास्त्री आणि त्यांचे परात्पर गुरु महात्मा गांधी यांनीं महारवाडे स्वच्छ करण्याकरितां जो अट्टाहास चाल-

१ या बाबतींत पहा : Lectures on conditioned reflexes by Pavlov.
२ धर्मस्वरूपनिर्णय– कोकजे ; धर्मशास्त्रमंथन– दिवेकर.

विला आहे तो कशाकरितां ? महारांना अगर अस्पृश्यांना गंध आणि लेप रहावा असें कां वाटत असतें ? तरी या सर्वांना अशी विनंति आहे कीं, त्यांनीं भंगीवाडे झाडण्याची ही मोहीम बंद करावी. असो.

हिंदु आचारांमध्यें मानवाच्या दोनही अंगांचा विचार केलेला आहे. दुसऱ्या तऱ्हेच्या धर्मसंस्थांमध्यें मन हें कोणत्या तरी गुरूच्या उपदेशानें बांधलें गेलेलें आहे तर प्रत्यक्ष आचारांच्या बाबतींत फारशीं कडक बंधनें नाहींत. हिंदूनें जातीय आचार आणि नैतिक मूल्यें बरोबर पाळल्यास आध्यात्मिक बाबतींत तो शंकर, रामानुज, मध्व, वल्लभ, येशू ख्रिस्त, महंमद, बुद्ध, महावीर, मस्करी गोशाल अगर जरदुष्ट्र यांपैकीं कोणाचाही अनुयायी असेल तरी तो हिंदूच रहातो. तो वेदांचें तत्त्वज्ञान मानील, ॲरिस्टॉटलच्या ग्रंथांचें परिशीलन करील, सांख्यांचा अनुयायी होईल अगर डार्विनवर विश्वास ठेवील, त्याचे वैशेषिक तत्त्वज्ञान आवडतें असेल. तो तत्त्वज्ञानांत प्लेटो, थॉमस ॲकिनास अगर आधुनिक काळांतील विल्हेल्म वुंट[१], ब्रॅडले, फुईली, गुया, नित्शे, रुडॉल्फ आयकेन अगर वुईल्यम जेम्स यांपैकीं कोणाचाही शिष्य मानून घेईल, परंतु आचारांचे बाबतींत जर समाजाचे नियम पाळील तर तो हिंदूच राहील. अशा तऱ्हेचें आध्यात्मिक स्वातंत्र्य दुसऱ्या कोणत्या धर्मांत आहे तें कोणींही आम्हांस दाखवावें अशी सर्व पंडितांना सप्रश्रय प्रार्थना आहे. इतर धर्मांचें तसें नाहीं. ख्रिस्त्याचा बायबलवर आणि मुसलमानाचा कुराणावर विश्वास असलाच पाहिजे.

हिंदु धर्म हा संस्कृतिप्रधान असल्याकारणानें, प्रत्येक व्यक्तीनें आपल्या हिंमतीप्रमाणें जी कांहीं परमेश्वरविषयक कल्पना असेल त्या कल्पनेला धरून परमेश्वराची उपासना करावी अशी प्रत्येक हिंदूला मुभा आहे. त्यानें परमेश्वर सगुण मानावा अगर निर्गुण मानावा, तूं

**५४ हिंदु उपासना**

अमुक स्वरूप मान असा आग्रह केलेला दिसत नाहीं. तत्त्वज्ञानावरील दोन्ही पक्षांचा पुरस्कार केलेला दिसतो, परंतु प्रत्येक ठिकाणीं अधिकाराचा मात्र विचार आहे. एके ठिकाणीं तत्त्ववेत्ता सांगेल, 'अव्यक्तं[२]

१ Modern philosophers by Hofding.

२ भगवद्गीता.

व्यक्तिमापन्नं मन्यन्त मामबुद्धयः।' तर तावडतोब अधिकारभेदानें 'क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्।' असेंही सांगेल. शेवटीं उपसंहार करतांना पुढील आश्वासन देईल.

'यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्॥

व्यक्ति ही त्रिगुणात्मक असल्याकारणानें आपल्या गुणाला अनुरूप अशाच देवकल्पनेची उपासना करणार. म्हणून सर्वच उपासना या योग्य होत.

'यजन्ते सात्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः।
प्रेतान् भूतगणान् चान्ये यजन्ते तामसाजनाः॥

ज्यू लोकांना त्यांच्याविरुद्ध असणाऱ्या लोकांना शिक्षा करणारा देव पाहिजे होता म्हणून ज्यू लोकांचा देव रागीट आहे. मुळांत खिस्ती धर्म हा जगांतील हलक्या लोकांचा असल्यामुळें खिस्ती देव हा प्रेममय आहे. परंतु या सर्वच कल्पना देवत्वामध्यें अंतर्भूत न झाल्यास त्या जगत्कर्त्याचें आणि जगन्नियंत्याचें स्वरूप एकांगी होईल; म्हणून देव हा या सर्व गुणांचा सांठा असावयास पाहिजे. नाहींतर दुसऱ्यांनीं केलेल्या पापाबद्दल आपला मुलगा बळी देण्याची अन्याय्य कल्पना धर्मांत अंतर्भूत करावी लागेल. हिंदूंचा देव हा सर्वगुणसंपन्न असल्याकारणानें व्यक्ति ज्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहील तो त्याच्यामधील गुण व्यक्तीला दिसूं लागतो.

ज्याप्रमाणें दैवत्व हें सर्वगुणयुक्तत्व आहे त्याप्रमाणेंच उपासनाही अधिकारपरत्वें लावलेली आहे. येथें सर्व व्यक्तींना सगुणाची उपासना नाहीं, त्याप्रमाणेंच सर्व व्यक्तींना निर्गुणाचीही उपासना नाहीं. येथें व्यक्तींचें वैधर्म्य लक्षांत घेऊन सांघिक उपासनाही नाहीं. येथें जगाचें आदिकारण जें ब्रह्म तें निराकार निर्गुण आहे, तरी व्यक्तिभेदानें उपास्यस्वरूपांत तें सगुण आहे आणि निर्गुण आहे. इतर धर्मांतील परमेश्वर गुणयुक्त असूनही आणि गुणद्रव्याश्रय[२] असूनही त्याचें स्वरूप प्रत्यक्ष नाहीं. येथें सर्वसाधारण मानवी मनाची प्रत्यक्षाकडे असलेली प्रवृत्ति आणि तत्त्ववेत्त्याची अव्यक्ताकडे अस-

१ Anti-christ by Nietzsche.

२ तर्कसंग्रह- अन्नंभट्ट.

लेली प्रवृत्ति या दोहोंचाही विचार केलेला दिसतो. अव्यक्तावर मनाचें एकीकरण करणें किती अवघड आहे ही गोष्ट माहिती असल्याकारणानें भगवद्गीताकार म्हणतो, 'क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसां । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥' अव्यक्त अथवा अमूर्त कल्पना ( Abstract ideas ) मानव प्राण्याला फार कष्टानें आकलन होऊं शकतात, हा त्रिकालाबाधित मानसशास्त्रीय सिद्धांत आहे आणि तो आधुनिकानांही मान्य आहे. ही गोष्ट खरी असूनही प्रतीकरूप मूर्तिपूजेची इतर धर्मीयांनीं थट्टा करावी, टर उडवावी आणि आमच्याकडील अर्धवटांनीं या गोष्टीची री ओढावी ही गोष्ट अत्यंत आश्चर्यकारक आहे असें आम्हांला वाटतें. इतर धर्मीयांमध्यें देखील ज्यांना मानसशास्त्राची थोडीशी तरी माहिती आहे, ते लोक मूर्तिपूजेची थट्टा करीत नाहींत. 'मूर्तिपूजेच्या विरुद्ध असलेला ज्यू लोकांचा अशास्त्रीय लोकभ्रम तसाच कायम राहिला; कारण कीं, मूर्तीची पूजा म्हणजे दगडाधोंड्याची पूजा ( felish worship ) असा ज्यू लोकांनीं आपला गैरसमज करून घेतला होता.' ख्रिस्ति आणि महंमदी हे ज्यू परंपरेंतलेच असल्याकारणानें त्यांच्यामध्येंही तो तसाच राहून गेला.

हिंदु समाजशास्त्रामध्यें देव कोणताही असो, त्याचें रूप कसेंही असो, तो एक असो अगर अनंतरूपानें प्रतीत होवो, उपासकाची आध्यात्मिक कल्पना कांहींही असो, उपासकानें आपल्या हिंमतीप्रमाणें केलेली उपासना, शेवटीं एकाच परमेश्वराला जाऊन पोहोंचते असे उल्लेख जागोजाग सांपडतात. परमेश्वराच्या स्वरूपासंबंधीं हट्ट धरून बसण्याची प्रवृत्ति हिंदु समाजांत नाहीं. हिंदूला सर्व ठिकाणीं परमेश्वराच्या विभूति आणि परमेश्वराचें रूप दिसतें.

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदुर्जितमेव वा ।[२]
तत्तदेवाऽवगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥

ळें कोणी कशीही उपासना करो—

'आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।[३]
सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति ॥

---

१ ethics and modern problems by Dean Inge.

२ भगवद्गीता.

३ संध्योपासनेच्या वेळीं म्हणावयाचा श्लोक.

किंवा ' त्रैयी सांख्यं योगः पशुपतिमतं वैष्णवमतं।
प्रभिन्ने प्रस्थाने पुनरिदमिदः पथ्यमितिच।
रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिलनानापथ जुषां।
नृणामेको गम्यः त्वमिव पयसामर्णव इव ॥[1]

अशा तऱ्हेचे स्पष्ट उल्लेख सांपडत असून, प्रत्येक थराला अधिकारभेदानें परमेश्वराचीं वेगवेगळीं रूपें उपास्य आहेत ही गोष्ट तितकीच खरी असून, अस्पृश्यांनीं स्पृश्यांच्या देवळांत प्रवेश केला तरच हिंदुधर्म सुधारला, नाहीं तर तो कलंकित राहातो अशा तऱ्हेच्या कल्पना पसरविणाऱ्या महात्म्यांना हिंदु धर्माचें स्वरूप मुळींच कळलें नाहीं असें स्पष्ट म्हणणें भाग आहे! अस्पृश्यांनीं केलेली मरीआईची उपासना, ब्राह्मणानें केलेली रामकृष्णाची उपासना, शैवांनीं केलेली शिवाची उपासना, योग्यानें केलेली आत्मोपासना ( आत्मा वा अरे मंतव्यो द्रष्टव्यो[2] ज्ञातव्यो निदिध्यासितव्यः।) वगैरे सर्वच उपासना जर एकाच परमेश्वराला पोहोंचावयाच्या असतील तर त्यामुळें समाजव्यवस्थेकरितां ऐहिक म्हणजे नश्वर बाबतींत जे भेद झालेले दिसतात ते भेद आध्यात्मिक बाबतींत नाहींसे करून सर्वांना जे सारखे अधिकार पाहिजे आहेत ते प्राप्त होत नाहींत काय?

कोणीं कितीही सांगितलें तरी ही गोष्ट सिद्ध आहे कीं, समाजांत सर्वांना सारखे अधिकार प्राप्त होणें इहलोकांत शक्य नाहीं. अधिकार अगर हक्क शब्दाचा अर्थच एखाद्याला एकादी गोष्ट करण्याची परवानगी असून इतरांना ती नसणें असा आहे. समान हक्क या शब्दांना कांहींच अर्थ नाहीं. हक्क हे विषमच असावयाचे. त्यामुळें हक्काचे बाबतींत विषमत्ता असणें हेंच मुळीं हक्काच्या अस्तित्वाचें लक्षण आहे. प्रत्येकाची लायकी सारखी नसल्याकारणानें हक्कही सारखे नाहींत. विषमतेमध्यें अन्याय नसतो तर विषमांना समान हक्क आहेत असें ढोंग करण्यांत असतो. बर्क म्हणतो,[3] ' सर्वांना समान हक्क असतील म्हणून कांहीं सर्वांना सर्व वस्तु मिळणार

१ महिम्नस्तोत्र. हें स्तोत्र रा. गांधींनीं वाचलें आहे असें ऐकतों म्हणून दिलें आहे.
२ बृहदारण्यकोपनिषद्.
३ Reflections on the French Revolution by Burke.

नाहींत.' अशीच ऐहिक स्थिति रहाणार आणि म्हणूनच आध्यात्मिकदृष्ट्या प्रत्येकाच्या हिंमतीप्रमाणें केलेली उपासना शेवटीं एकाच परमेश्वराप्रत पोहोंचते असा दंडक घालावा लागतो.

हिंदूंची देवताविषयक आणि उपासनाविषयक कल्पनाही एकच देव आहे, त्याला कोणींही कधींही न पाहिलेलें असें एकच रूप आहे अशा तऱ्हेची रानटी स्वरूपाची नसून प्रत्येकाच्या कल्पनेप्रमाणें देवत्व उत्पन्न करून प्रत्येकानें उपासना करावी अशी आहे. ही उपासना भक्तीनें केलेली असली म्हणजे सर्व शक्तिमान परमेश्वराला ती रुजूं आहे.

पत्रं[१] पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतं अश्नामि प्रयतात्मनः ॥

अशी हिंदु धर्माची व्यवस्था असल्याकारणानें अमक्यांनीं तमक्याच्या देवळांत प्रवेश केलाच पाहिजे अशासारख्या कल्पना क्षणमात्रदेखील टिकूं शकत नाहींत. मजा पहावी तो मंदिरप्रवेशाकरितां धडपड करणारे पुढारी पाहिले तर ते कोणचीही उपासना करीत असतीलसें वाटत नाहीं. मग ज्याप्रमाणें बाणभट्टाच्या काळीं 'सन्तिश्वान[२] इवासंख्या भ्रांतिभाजो गृहे गृहे ।' असे ज्याप्रमाणें घरोघर कवि झाले होते, त्याप्रमाणेंच आज जे घरोघर समाजशास्त्रज्ञांचें पीक फैलावलें आहे, त्याच्या पोटांत मंदिरप्रवेशाचा अव्यापारेषु व्यापारं करण्यामध्यें खरोखर कोणता कावा आणि हेतु आहे तो त्यांनीं स्पष्ट सांगावा. 'सत्यान्नास्ति परोधर्मः,' 'सहस्र[३] अश्वमेधांपेक्षां सत्य हें श्रेष्ठ आहे' इत्यादि नियम लक्षांत ठेवून महात्मेबाजी जरा दूर सारून तो हेतु स्पष्ट करून सांगावा म्हणजे समाजालाही त्या गोष्टीचा अर्थ कळेल. परंतु पोटांतील मुख्य हेतु न सांगतां दुसऱ्याच गोष्टी सांगत सुटून आपलें इच्छित प्राप्त करून घेणें हेंच तर शहाणपणाचें लक्षण आहे. म्हटलेलेंच आहे कीं,

जैनं[४] विद्वानेकः सकलमतिसंधाय कपटैः ।
तटस्थः स्वानर्थान्घटयति च मौनं च भजते ॥

---

१ भगवद्गीता.
२ हर्षचरित.
३ महाभारत.
४ मालतीमाधव.

शहाणा सर्व समाजाला कपटानें फसवून आपला हेतु सिद्ध करून घेतो आणि मौन धारण करतो. तो मौनाचा एकादा जाहीर दिवस ठेवतो किंवा नाहीं यासंबंधानें कांहीं माहिती कवीनें सांगितलेली नाहीं. ज्या राजकारणामध्यें दुसऱ्याला कसें फसवावें ही कला हस्तगत करून घ्यावी लागते—

'परातिसंधानमधीयते यैर्विद्येति ते सन्तु किलाप्तवाचः ।'[1]

त्या राजकारणांत वावरणाऱ्या गृहस्थानें सत्यासंबंधीं गप्पा मारीत सुटावें याचा अर्थ त्या गृहस्थाला सत्य आणि असत्य या दोनही शब्दांचा अर्थच कळला नाहीं असा आहे. अशा तऱ्हेनें या पुढारीवर्गानें आपल्या अधिकाराच्या बाहेर जाऊन भलत्याच पद्धति पाडल्या म्हणजे त्याच हितकारक आहेत असें समजून समाजशास्त्राच्या अनुकरणपद्धतीनें 'यद्यदाचरतिश्रेष्ठस्तत्तदेवेतरोजनः ।'[2] या न्यायानें समाजांत फैलावूं लागतात.

येथें एक प्रश्न उत्पन्न होतो आणि तो मानसशास्त्रदृष्ट्या फार विचार करण्यासारखा आहे. तो प्रश्न असा कीं कोणी एक व्यक्ति एकाद्या तत्त्वाकरितां आत्मयज्ञ करावयास लागली तरीही तें तत्त्व खरें मानूं नये काय ? एकाद्या व्यक्तीनें आत्मत्यागाला तयार होणें आणि सत्या सत्याचा निर्णय, या दोन गोष्टींचा अर्थाअर्थी संबंध काय तेंच कळत नाहीं. अशा तऱ्हेचा संबंध कोणीही जोडलेला पाहिला म्हणजे अशी जबरदस्त शंका येऊं लागते कीं, यांत कांहीं तरी लफंगेपणाचा भाग आहे खास ! ज्यावेळीं हा आत्मयज्ञ करूं इच्छिणारा आपलें लहानसें सत्याचें गाठोडें जगाच्या तोंडावर फेंकतो, त्यावेळीं सत्य शब्दाचा त्याला साधा अर्थ तरी कळला किंवा नाहीं याची शंका येऊं लागते. सत्य म्हणजे अशी गोष्ट नाहीं कीं, ती एकाजवळ असून दुसऱ्याला सांपडणार नाहीं. ज्याची बुद्धि जास्त प्रगल्भ झाली तो माणूस कोणत्याही बाबतींत अमर्याद बोलणार नाहीं. चार दोन गोष्टी जाणून इतर न जाणणें, त्यांच्याकडे कानाडोळा करणें म्हणजे कांहीं सत्य नव्हे. परंतु हीं जी सत्याची पताका घेऊन फिरणारी मंडळी त्यांचें तें सत्य पाहिलें म्हणजे यांना अणुरेणुइतकें देखील सत्य समजण्याला जी मनाची तयारी लागते, तेवढी देखील तयारी या व्यक्तींची झालेली नाहीं असें दिसून

१ शाकुंतल— कालिदास.
२ भगवद्गीता.

येईल. अशा तऱ्हेचें सत्य या महात्म्यांना सांपडूं लागलें म्हणजे सत्या-करितां अभ्यास आपोआपच थांबतो. एका महात्म्यानें आपलें सत्याचें गाठोडें जगाच्या तोंडावर फेकलें नसतें तर कविवर्य रविंद्रनाथ टागोर यांच्यावर पश्चात्तापाचा प्रसंग आला नसता. हे महात्मे सत्याचे वैरी आहेत !

आत्मयज्ञाचा आणि सत्याचा जर कांहीं अर्थाअर्थी संबंध असेल तर मोठी बिकट परिस्थिति उत्पन्न होईल; कारण परस्परविरुद्ध गोष्टींकरितां आत्म-यज्ञ केल्याची जगाच्या इतिहासांत उदाहरणें सांपडतील. परंतु त्या दोन सत्य आहेत असें कोणालाही म्हणतां येईल असें आम्हांला वाटत नाहीं. एकादा मनुष्य आत्मयज्ञ करावयास तयार झाला याचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं, तें एक त्या गृहस्थाचें वेड आहे. परंतु त्या वेडाचा सत्याच्या स्वरूपाच्या निर्णय करण्याशीं काडीचाही संबंध नाहीं.

याप्रमाणें हिंदु समाजानें ऐहिक आणि आध्यात्मिक बाबतींत व्यवस्था लावलेली आहे. ऐहिक बाबी या प्रत्यक्ष परीणामी असल्याकारणानें त्या बाबतींत सर्व बाजूनें नियंत्रण आहे. अशा तऱ्हेचें नियंत्रण घालणारे नियम दिलेले आहेत ते नियम कां केले त्याचीं कारणें आजच्या आमच्या सुधा-रक बंधूंना पाहिजे आहेत. परंतु कोणत्याही कायद्याच्या पुस्तकांत कोणताही नियम करण्याकरितां काय कारणें झालेलीं असतात तें द्यावयाचें नसतें ! इंडियन पीनल कोडामध्यें चोरीचा गुन्हा केल्यास शिक्षा करावी असें सांगितलेलें आहे; परंतु तशी शिक्षा कां करावी याची चर्चा केलेली नाहीं. त्यांच्या मतें चोरी हा गुन्हा नेहमींच शिक्षार्ह आहे. परंतु तेंही खरें[1] नाहीं. तर नियंत्रण लावून देणाऱ्या सर्व ग्रंथांचा हेतु आजपर्यंत जो मनुष्यप्राण्याला अनुभव आला, त्यावरून कोठें जपलें पाहिजे या बाबतींत जे कांहीं निर्णय झाले त्यांचा फायदा घ्यावयाचा आणि मनुष्यप्राण्याला हितकारक जीवन लावून द्यावयाचें एवढाच असतो.

परंतु आध्यात्मिक बाबतींत मात्र हिंदु धर्मांत पूर्ण स्वातंत्र्य आहे. शिवाय मनुष्याचे ज्याप्रमाणें आहारनिद्रामैथुनादि पशुसमान धर्म, त्याप्रमाणेंच त्याला अहंकारबुद्धि हाही धर्म आहे, त्या धर्माचेंही समाधान व्हावयास पाहिजे.

---

१ Les miserables by Victor Hugo.

तीहि व्यवस्था हिंदूंच्या समाजरचनेंत आहे. या समाजरचनेंत जातींना स्वतःचे असे अनन्यसामान्य हक्क आहेत. हेंच अहंकारबुद्धिचें समाधान करण्याचें मोठें साधन नाहीं काय ? संस्कृतिप्रधान हिंदु धर्मशास्त्र मानवाची सर्व दृष्टीनें व्यवस्था पहात असल्यामुळें हिंदु संस्कृति जगतीतलावरून नष्ट होत नाहीं. ती संस्कृति प्रयागच्या अक्षय वटवृक्षासारखी आहे. सिंधूच्या तुफान लहरी उत्पन्न झाल्या असतां त्यांच्यापुढें विनम्रभावानें मान लववून ती पुन्हां आपल्या अक्षय शोभेनें उभी रहाते. हा धर्म[१] आयुर्मर्यादेनें इतर सर्व धर्मांपेक्षां प्राचीन आहे ही गोष्ट त्याच्या प्रतिस्पर्ध्यांनाही कबूल करावी लागेल. नुसतें जगण्यांत काय अर्थ आहे असा प्रश्न उत्पन्न करणारांना इतकेंच उत्तर बस्स आहे कीं, नुसत्या जगण्यालाच केवढी जीवनशक्ति लागते याचा थोडासा विचार करून पहा. अशा तऱ्हेनें अत्यंत विचारपूर्वक बनविलेली समाजरचना बदलावयास पाहिजे, असा प्रश्न आज कां पुढें येऊं लागला आहे त्याचा विचार करावयास पाहिजे.

आम्हांला तर त्याचें कारण हेत्वाभास असावा असें वाटतें.

जे जे राज्यकर्ते असतील त्यांची समाजरचना श्रेष्ठ असते.

हिंदूंची समाजरचना ही राज्यकर्त्यांची समाजरचना नव्हे.

∴ हिंदूंची समाजरचना श्रेष्ठ नाहीं.

या सिद्धांतांत किती हेत्वाभास दडून बसले आहेत तें पूर्वीच सांगितलें आहे. याशिवाय दुसरें कारण असें कीं हिंदु समाज आज राजकीय पारतंत्र्यांत आहे. म्हणजे पूर्वी राजकीय पारतंत्र्यांत नव्हता असें नाहीं. त्या पारतंत्र्याचें दुःख हिंदु समाज आज भोगीत आहे. कवि, राजकारणी, पुढारी, वगैरे सर्व जमून 'बहुत बरी विलयगति परवशता शतगुणें करी जाच ।' असें आज कानीं कपाळीं ओरडत आहेत, त्यामुळें आपण दुःखानें वेडावून गेलों आहोंत. शोक-मोहांनीं अंतःकरण व्याप्त होऊन गेलें म्हणजे स्वतःचा धर्म टाकून दुसऱ्याचा धर्म कवटाळणें हा मानवी मनाचा धर्मच

१ Arctic home of the Vedas by B. G. Tilak. Rigvedic India by Avinaschandra Das; Indian home and Arctic colonies by N. B. Pavgi.

आहे. भगवान् शंकराचार्य म्हणतात, ' सर्व प्राणिनां शोकमोहादिदोषाविष्टचेतसां स्वभावतः एव स्वधर्म परित्यागः प्रतिषिद्ध सेवा च स्यात् ॥ '[1] सर्व प्राण्यांचा, शोक-मोहानें अंतःकरण व्याप्त झालें म्हणजे आपला धर्म टाकून दुसऱ्याचा धर्म अनुसरणें, हा स्वभावच आहे. शोक-मोहानें अंतःकरण व्याप्त झालें तरीही आणि दुःख सोसेनासें झालें तरीही आततायी मार्ग स्वीकारणें बरें नव्हे. दुःखी जीवाचा नाश करून टाकणें हाही पण दुःख नाहींसें करण्याचा[2] मार्गच आहे. म्हणून आम्ही म्हणतों कीं शोक-मोहांनीं अंतःकरण व्याप्त झालें तरीही नित्यानित्यत्वविवेक सोडून वर्तणें बरें नव्हे. एकदां नित्यानित्यविवेक सुटला म्हणजे आपल्या समाजाचें तारू वाऱ्याच्या प्रत्येक झुळेकबरोबर हेलकावे खाऊं लागेल. परंतु अलीकडच्या अर्थानें प्रगति होईल! मग दैववादी ज्याप्रमाणें जें घडेल तें नशीबीं होतेंच असें म्हणतो, त्याप्रमाणें जें जें कांहीं घडेल तें तें सर्व प्रगति आहे, सुधारणा आहे असा सिद्धांत प्रस्थापित होईल! असल्या सिद्धांताचा सर्वसाधारण परिणाम म्हणजे आपणांला प्राप्त होणाऱ्या सर्व दुःखांची जबाबदारी स्वतःशिवाय इतर कोणावर तरी टाकण्याकडे जास्त जास्त प्रवृत्ति वाढत जाईल आणि शेवटीं कोणत्याही गोष्टीचा कार्यकारण-संबंध देखील असण्याची जरूरी रहाणार नाहीं. मग कोठें तरी दुःख आणि त्याला कांहींतरी उपाय मग देवीमुळें जें दुःख होत असेल तें सर्व-साधारण व्यक्ति समाजसत्तावादाच्यां[3] माथीं मारील!

### ५५ विवाहाचे हेतु

सुप्रजांचें उत्पादन, संस्कृतीचें चिरंजीवित्व, मानवाचें ऐहिक हित (सुख नव्हे. आम्ही सुख आणि हित या दोहोंमध्यें फरक मानतों), मानवाचें आध्यात्मिक समाधान, थोडक्यांत सांगावयाचें तर, प्रत्येकाला आपला म्हणून असा कांहीं असाधारण हक्क मिळवून देण्याची शक्यता या सर्व दृष्टीनें विचार केला तर समाजरचना व्यक्तिप्रधान नसून गटप्रधान अथवा जातिप्रधान असावयास पाहिजे हाच निष्कर्ष

---

१ गीताभाष्य.

२ Childe Harold by Lord Byron.

३ Future of Science by J. B. Haldane.

निघतो. जातिमय समाजघटना असल्यास राखावयास पाहिजे आणि नसल्यास शहाण्यानें तयार करावयास[१] पाहिजे. अशा तऱ्हेची समाजरचना झाल्यानंतर त्या त्या ज्ञाति वर्णसंकरापासून अलित राखणारीं नैतिक मूल्यें उत्पन्न करून तीं प्रत्येक व्यक्तीच्या हाडींमासीं खिळून गेलीं पाहिजेत. संकर शास्त्रीयदृष्ट्या दोन तीन तऱ्हांनीं होतो. त्यांपैकीं स्त्रीपुरुषसंबंधानें उत्पन्न होणारा संकर जास्त हानिकारक आहे[२]. स्त्रीपुरुषांचा संबंध विवाहित आणि विवाहबाह्य अशा दोनही स्थितींत येऊं शकतो, म्हणून या दोनही स्थितींचा विचार करावयास पाहिजे. त्यांपैकीं प्रथम विवाहाच्या मर्यादांचा विचार करूं. विवाहामध्यें वधू आणि वर अशा दोन घटकांचा विचार करावयास पाहिजे. म्हणून यामध्यें अनेक गुंतागुंतीचे प्रश्न उत्पन्न होतील.

येथें विवाहाचा हेतु काय, हा पहिला प्रश्न उत्पन्न होईल. दुसरा प्रश्न विवाहाचा प्रकार कोणता असावा ? हेतु विभिन्न असल्यास त्याचे प्रकारही विभिन्न होतील. एकाच समाजाच्या वेगळाल्या थरांत भिन्न हेतु आणि भिन्न प्रकारही होणें शक्य आहे. या सर्व हेतूंची आणि प्रकारांची छाननी करून समाजाचें जें ध्येय असेल त्या ध्येयाला पोषक असा हेतु आणि प्रकार निवडून, तो प्रकार मुख्य ठरवून बाकी गौण प्रकारालाही अनुमति द्यावयास पाहिजे. कोठलाही समाज एका पातळींत केव्हांही आलेला नसतो. त्यामुळें विवाहाचा ध्येयात्मक अभिजात प्रकार जरी एकच मानला तरी इतर तऱ्हेचे व्यवहार चालूच असतात. परंतु इतर प्रकारांकडे बोट दाखवून ध्येयात्मक प्रकारावर शिंतोडे उडविणें हें शास्त्रीय तर नव्हेच, परंतु उलट पोरकटपणाचें लक्षण आहे. मनुष्यस्वभाव जीं नैतिक मूल्यें समाजांत ठरून गेलीं असतील त्यांना चिकटून रहाण्याचा अटोकाट प्रयत्न करतो ही गोष्ट आम्हीं मागें सांगितलीच आहे.

विवाहाच्या ध्येयाचा अनेक दृष्टीनें विचार केला जातो. तो इतका कीं, त्याच विषयावर एकादा ग्रंथ लिहिणें शक्य आहे. अशा तऱ्हेचे ग्रंथ उप-

१ Anti-christ by Nietzsche ; Outspoken essays by Dean Inge.

२ Future of life by Dr. C. C. Hurst; Heredity and Eugenics by Gates; Segration of the fit by R. Austen Freeman.

लब्ध आहेत.[१] त्या ग्रंथांचा भर मुख्यतः काय असावें या मुद्यावर नसून काय आहे या मुद्यावर आहे. परंतु काय असावें याचा विचार करावयाचा तर दोन प्रश्न डोळ्यांपुढें उभे रहातात. पहिला म्हणजे समाजाचें कल्याण. आणि दुसरा म्हणजे व्यक्तीचें हित. आम्ही व्यक्तीचें सुख म्हणत नाहीं; कारण व्यक्तीचें सुख आणि समाजाचें हित या दोन गोष्टींचा समन्वय असलेला सृष्टींत सांपडत नाहीं. पिअरसनें[२] म्हणतो, 'राष्ट्रें हीं व्यक्तीप्रमाणें दुःख आणि कष्ट यांच्या मार्गानें प्रगति करून घेऊं शकतात.' सामाजिक प्रगतीच्या पर्यायांची पूर्ण चर्चा आम्हीं पूर्वीं केलीच आहे; आणि त्यावेळीं मानवी नमुना सुधारत जाणें याला सुधारणा आणि प्रगति असें म्हटलेलें आहे. कांहीं अव्यवस्थित मेंदूचे लोक लिहितात, 'सृष्टीला जर हा मानवी नमुना पटला नाहीं तर ती या नमुन्याचा नाश करून दुसरा एकादा[३] नमुना उत्पन्न करील.' सृष्टि करील तेव्हां करो आज जे नमुने आहेत त्यांतील उत्तम नमुन्यांचें रक्षण करणें हेंच समाजनेत्याचें कार्य आहे. मग वासनाधीन उत्क्रांती (creative evolution) सारख्या कल्पना पसरविणारे लोक कांहींही म्हणोत. म्हणून आहेत हे श्रेष्ठ नमुने जास्त श्रेष्ठ करण्याचा प्रयत्न करणें आणि हीन नमुने नष्ट करणें या दृष्टीनेंच समाजाची उभारणी व्हावयास पाहिजे.

विवाह हा मुख्यतः पुढील पिढींतील नमुने उत्पन्न करण्याकरितां असतो. हीं सामाजिक दृष्टि झाली. व्यक्तीची दृष्टि व्यक्तीच्या ध्येयाला धरून त्रिविध रहाणार. आम्हीं मागें सांगितलेंच आहे कीं, समाजांतर्गत व्यक्तीचे स्वतः जगण्याकरितां अन्न अगर अर्थ, आपला वंश पुढें रहाण्याकरितां स्त्री अगर काम आणि प्रतिस्पर्ध्यावर विजय मिळविण्याकरितां स्पर्धा अगर धर्म असे तीन हेतू असतात. कांहीं व्यक्तींचा मोक्षरूप हेतु असूं शकेल, परंतु समाजरचनेमध्यें त्याचा विचार येऊं शकत नाहीं. मोक्षरूप धर्म हा सर्वांना सारखाच आहे. त्यामध्यें भेदाभेद होणें शक्य नाहीं कारण भेद करणारा करील,

---

१ Book of marriage by Keyserling; History of human marriage by Westermarck; Evolution of modern marriage by Muller-lyer.

२ National life from the standpoint of science by Pearson.

३ Back to methuselah by Bernard Shaw.

परंतु जीवशिवांच्या ऐक्याची भाषा जो बोलूं लागला तो तुमच्या भेदाभेदाकडे लक्ष देतो कशाला ?

निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ।

बाकीचे जे तीन हेतू सांगितले ते सर्व व्यक्तींच्या ठिकाणीं सारख्याच तीव्रतेनें असतील असें नव्हे. आपलें घराणें श्रेष्ठ आहे, त्याचा प्रजातंतु पुढें ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे असें मानणाऱ्या व्यक्तींचा दृष्टिकोन आणि जगाच्या उत्क्रांतींत आपण एक बेजबाबदार दुवा आहोंत, आपण जगांत असेंपर्यंत आपल्या इंद्रियांना ज्या ज्या वासना होतील त्या सर्वांचें तर्पण करणें एवढेंच आपलें कार्य आहे, आपल्या मृत्यूनंतर समाजाशीं आपला संबंध कोणता, जड देहाच्या मृत्यूबरोबरच मनुष्य मृत होतो वगैरे मानणाऱ्या व्यक्तींचा दृष्टिकोण हे कधींही एक व्हावयाचे नाहींत. ज्याच्या अंतःकरणामध्यें मनुष्याच्या मृत्यूनंतर देखील सुप्रजा मागें ठेवून पितरांचें ऋण फेडणें, मृत्यु हा कांहीं शेवट नव्हे तर परलोक आहे आणि तो इहलोकींच्या कर्मांचें फल आहे अशा कल्पना असतील, त्याच्या मनांत धर्म हा प्रधान हेतु राहून अर्थ आणि काम हे त्या दृष्टीनें गौण हेतू रहातील. आर्थिक सुख हें द्रव्याच्या बाहुल्यावर अवलंबून नसून व्यक्तींच्या मनःस्थितीवर अवलंबून आहे ही गोष्ट तो डोळ्यांपुढें ठेवील. त्याप्रमाणेंच रतिसुखाचेंही आहे, हीही गोष्ट तो विसरणार नाहीं. त्याची मनःप्रवृत्ति विवाहाचे बाबतींत 'कामोपभोगा'कडे न धावतां सुप्रजादि धार्मिक कल्पनांकडे वळेल. अशा लोकांचें वर्णन कविकुलगुरु कालिदास पुढील शब्दांत करतो : 'त्यागाय संभृतार्थानाम् प्रजायै गृहमेधिनाम्[२] ।'

उलट, आज जगांत आहोंत तोंपर्यंत उपभोग घेऊं अशा कल्पनांनीं ज्यांचें अंतःकरण भारलें असेल अशी व्यक्ति विवाहांत देखील कांहीं अर्थार्जन होतें किंवा कसें याची विवंचना करील. अशा व्यक्तींच्या बाबतींत विवाहसंस्था देखील अर्थप्रधान होऊन तेथें धर्म आणि काम यांना गौणत्व येईल. तो गृहस्थ स्त्रीचें सौंदर्य ( सौंदर्य म्हणून कांहीं मानवी मनाच्या

१ Heredity and Eugenics by Gates.

२ रघुवंश.

निरपेक्ष वस्तु असल्यास ), अगर तिच्या घराण्याचा आनुवंश, अगर तिची जाति याचा फारसा विचार करणार नाहीं. अशा तऱ्हेच्या व्यक्ती ज्या समाजांत वाढत जातील त्या समाजामध्यें अर्थप्रधान विवाहसंस्था सुरू होईल.

या दोन पद्धतींपैकीं पहिल्या पद्धतींत मुख्य कटाक्ष समाजाचें हित आणि तदनुषंगिक व्यक्तींचें सुख या दोन्हींचा; म्हणजे आजची पिढी आणि पुढील पिढी या दोहोंचाही तेथें विचार केलेला दिसतो. दुसऱ्या पद्धतीमध्यें आजची पिढी ऐश्वर्यांत कशी राहील, मग पुढची पिढी कशीही होवो एवढाच विचार केलेला दिसतो. यांतील कोणती तरी पद्धति प्रमाण मानून समाजरचना करावी असें म्हणणारे तत्त्ववेत्ते आजपर्यंत होऊन गेलेले आहेत आणि पुढेंही होतील.

जगाचा आजपर्यंतचा सर्व इतिहास आणि त्यांतील घडामोडी निव्वळ अर्थावर अवलंबून आहेत असें म्हणणारा वर्ग कार्ल मार्क्स आणि त्याचे रशियन अनुयायी यांचा होय. त्यांच्या मतानें काम हा गुण सृष्ट्युत्क्रांतींत फारसा प्रभावी नसल्यामुळें त्याची व्यवस्था लावणारी संस्था जी 'कुटुंब' तिची त्यांना जरूरी भासत नाहीं. त्यांच्या मतें संततीचें संवर्धन करण्याला सरकार हें खाजगी आईबापापेक्षां जास्त लायक आहे. अशा तऱ्हेच्या कल्पना आमच्या संस्कृतींत येऊन गेलेल्या आहेत. परंतु, त्या आर्थिक अर्थानें नव्हे.

'प्रजानां विनयाधानाद्रक्षणाद्भरणादपि ।
स पिता पितरस्तासां केवलं जन्महेतवः ॥'[१]

कामाचें आणि आनुवंशाचें मानवी उत्क्रांतींत कांहींच कार्य नाहीं हा सिद्धांत सृष्टींत खरा ठरल्यास त्यांची समाजरचना अर्थातच टिकाऊ आणि श्रेष्ठ होईल. परंतु कामाचा म्हणजे कुटुंबाचा विचार करावा लागतो ही गोष्ट सृष्टीवरूनच दिसून येत असल्याकारणानें आम्हांला अशा एकांगी तत्त्वज्ञान्यांचें आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाचें मत ग्राह्य मानतां येत नाहीं.

उलटपक्षीं, मानवाच्या हातून घडणाऱ्या प्रत्येक क्रियेचा हेतु प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें कामविकारांशीं निगडित होतो असें म्हणणारेही

---

१ रघुवंश.

पुष्कळ वजनदार तत्त्ववेत्ते आहेत. असे तत्त्ववेत्ते म्हणजे सिग्मंड फ्राईड, अॅडलर, जुंग आणि त्यांचे अनुयायी हे होत. जगाच्या इतिहासाला वळण लावणाऱ्या ज्या कांहीं व्यक्ती होऊन गेल्या त्या सर्वांमध्यें हा विकार प्रबल होता ही गोष्ट इतिहासज्ञांना ज्ञात आहे. त्याबरोबरच हा विकार अशा कांहीं कांहीं व्यक्तींमध्यें मुळींच नसतो. प्रत्यक्ष उदाहरणें इतिहासांत हवी तितकीं सांपडतील[१]. एकंदरीनें हा विकार प्रधान मानून समाज कुटुंबप्रधान करावयास पाहिजे असें मत सहज प्रस्थापित करितां येईल.

या दोनही पद्धतींची बरोबर यथायोग्य व्यवस्था ज्या समाजरचनेंत झाली असेल, ती समाजरचना युक्त होय असें आमचें मत आहे. म्हणजे समाजाचा पाया निव्वळ द्रव्यप्रधान असूं नये आणि निव्वळ कामप्रधान होऊं नये.

आज जो प्रकार सुशिक्षित समाजांत रूढ व्हावा अशा तऱ्हेची शिकवण एका विवक्षित तऱ्हेच्या वर्गाकडून दिली जात आहे, त्या तऱ्हेच्या विवाहप्रकारासंबंधीं थोडासा विचार करतों. तो प्रकार म्हणजे प्रेमविवाह ( marriage by inclination ) हा होय. या प्रेमविवाहवाद्यांचा मूळ हेतु हा प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांत असतोच. वरील सर्व तऱ्हेनें योग्य असा विवाह झाला परंतु त्या घरांत जर सुख नांदत नसेल तर, तशा तऱ्हेच्या दोन व्यक्तींना जन्मभर एकमेकांजवळ रहाण्याची सक्ती समाजानें कां करावी असा प्रश्न विचारून हे लोक सांगतात कीं, प्रेम असेल तरच विवाह करावा. अर्थातच प्रेम नष्ट झालें म्हणजे विवाहही मोडून टाकावा— अर्थात काडीमोड करण्याचा हक्क असावा. या पद्धतीचेंच पर्याय म्हणजे स्वैरसंभोग, प्रेमोत्तर[२] विवाह, काल निश्चित करून ठरविलेला विवाह, प्रायोगिक विवाह (trial marriage) हे होत. या सर्व प्रकारांमध्यें व्यक्तींचीं सुखदुःखें हीं प्रधान मानिलीं आहेत आणि सुखदुःख व्यक्ति सांगेल तेंच, असेंही गृहीत धरलेलें आहे. यामध्यें समाजाची आर्थिक घटना, सुप्रजात्मक घटना वगैरेंचा विवाहसंस्थेंत संबंध येतो ही गोष्ट या विवाहाच्या पुरस्कर्त्यांना मान्य नाहीं.

---

१ The men of genius by Lombroso.

२ Companionate marriage by B. B. Lindsay.

यांतील एक एक मुद्याचा विचार करूं. पहिला मुद्दा म्हणजे विवाह हा प्रेममूलक असावा. हा मुद्दा म्हणजे पूर्ण सबंध सिद्धांत नसून त्याचें एकच अंग आहे असें आम्हांला वाटते. विवाह हा प्रेमाकरितांच असावा असें सांगितल्याबरोबर त्याचाच पूरक भाग असा निष्पन्न होतो कीं, मग प्रेम हें विवाहाबाहेर नसावें. हा दुसरा भाग मान्य करण्याला हे प्रीतिशास्त्राचे पुरस्कर्ते कितपत तयार आहेत या गोष्टीचा त्यांच्याकडून बरोबर खुलासा व्हावयास पाहिजे. प्रेमाकरितां विवाह आणि विवाहांतच प्रेम या दोनही नियंत्रणांनीं युक्त अशी समाजरचना झाल्यास पुढें होणारी प्रजा सुप्रजा होईल किंवा कुप्रजा होईल ही गोष्ट ठरविणें जरी कठीण असलें तरी अशा समाजामधून उपदंशादि विकार, वेश्यावृत्ति वगैरे दुष्प्रवृत्तींचा नाश होईल यांत कांहीं शंका नाहीं. परंतु त्यांतील दुसरा भाग जेथें प्रेमोत्तर विवाह प्रचलित आहे त्या ठिकाणीं पाळला गेलेला दिसून येत नाहीं. अशा समाजामध्यें व्यक्ती ज्यावेळीं घटस्फोटाची याचना करतात त्यावेळीं त्या व्यक्ती एकमेकाला कंटाळलेल्या असतात अगर एकमेकांपासून मानव सृष्टीमध्यें त्यांना जितकें सुख मिळणें शक्य आहे तितकें मिळत नसतें असें नसून, आपल्या भागिदारापासून जें सुख प्राप्त होतें त्यापेक्षां दुसऱ्या एकाद्या व्यक्तीपासून जास्त सुख प्राप्त होईल असा त्यांचा अंदाज असतो. अर्थातच व्यभिचार केला नसल्यास जास्त सुख होईल किंवा नाहीं हें पुढें ठरावयाचें असतें आणि व्यभिचार केला असल्यास व्यभिचारजन्य सुख आणि विवाहजन्य सुख हीं सुखें मानसिक घटनेंत वेगवेगळें मौल्य धारण करीत असल्याकारणानें जो जार होता, तोच नवरा झाल्यास तेंच सुख मिळेल किंवा नाहीं हे अनिश्चितच[२] असते. या अंदाजाकरितां व्यक्ती एकमेकापासून विभक्त होऊं इच्छितात. मग अंदाज चुकल्यास पुन्हां घटस्फोट अशी ही प्रणाली[१] आहे.

दुसरें विवाहांत प्रेम असावें ही गोष्ट जरी किंचित्काळ मान्य केली तरी दुसरा प्रश्न उत्पन्न होतो तो असा कीं, विवाहसंस्कार होण्यापूर्वीं उत्पन्न

१ काव्यप्रकाश- मम्मट, my husband and I by Tolstoy, Vendatta by Maria Correli.

२ Science of living by Alfred Adler.

झालेल्या भावनेला प्रेम असें म्हणावें आणि तदनंतर उत्पन्न झालेल्या भावनेला प्रेम असें म्हणूं नये असा प्रेमशास्त्रांत कांहीं दंडक आहे किंवा काय याचा खुलासा व्हावयास पाहिजे. विवाहानें बांधून गेल्यानंतर आणि घटस्फोटाची सोय नसल्यास प्रेम जर उत्पन्न झालें नाहीं तर काय करावें असा ज्याप्रमाणें प्रश्न उत्पन्न करणें शक्य आहे, त्याप्रमाणेंच प्रेमोत्तर विवाह करून तें प्रेम ताबडतोब नष्ट झालें तर काय करावें असाही प्रश्न विचारतां येईल असें आम्हांला वाटतें. दोनही स्थितींत, नैतिक मूल्यें स्थिर नसल्यास आपत्तीच आहे हें विसरून चालणार नाहीं.

अशा तऱ्हेनें विवाह प्रेममूलक झाल्यास आणि घटस्फोटाची व्यवस्था करून ठेवल्यास विवाहाचा एक घटक जी स्त्री तिची आर्थिक स्थिति पूर्ण बदलून जावयास पाहिजे. स्त्री जोंपर्यंत आर्थिकदृष्ट्या पुरुषावर अवलंबून आहे तोंपर्यंत स्त्रीस्वातंत्र्याच्या कितीही गप्पा मारल्या तरी एक नवरा सोडून जातांना स्त्रीला फारच विचार करावा लागेल. कारण तिला नवऱ्याजवळ रहावयाचें नसले तरी आर्थिक अस्वतंत्रतेमुळें कोणा तरी पुरुषाचा आश्रय करणें भाग आहे. म्हणून मनुसारखे थोर समाजशास्त्रवेत्ते स्त्रीला आर्थिक स्वातंत्र्य द्यावयास तयार नसतात. परंतु या नवीन तऱ्हेची विवाह-संस्था उत्पन्न करावयाची तर स्त्रीस्वातंत्र्य उत्पन्न होऊन स्त्रियांना सर्व धंदे मोकळे ( Differentiation of women ) असावयास पाहिजेत. पुन्हां त्यांच्यामध्यें ते धंदे सांभाळण्याची लायकी पाहिजे. आज स्त्री कोणत्याही तऱ्हेच्या धंद्यांत पुरुषाच्या बरोबरीनें काम करूं शकते वगैरे जी भाषा ऐकूं येते ती अशास्त्रीय, असिद्ध आणि पोरकटपणाची आहे. प्रत्यक्ष पुरावा मागितल्याबरोबर हे स्त्रियांचे पक्षपाती कोणकोणत्या वेगळाल्या शकला लढवूं लागतात ही गोष्ट आमच्या पूर्ण परिचयाची आहे. असो. अशा तऱ्हेचे प्रेममूलक घटस्फोटयुक्त विवाह अनुमत करावयाचें तर आर्थिकदृष्ट्या पुढील व्यवस्था व्हावयास पाहिजे.

(१) स्त्रियांना अर्थोत्पादक अशा कोणत्याही धंद्यांत वाव मिळावयास पाहिजे आणि त्याबरोबरच गृहकृत्यें, बाळंतपण वगैरे जे धंदे आजपर्यंत स्त्रिया करीत आल्या आहेत त्या धंद्यांतून त्यांची मुक्तता व्हावयास पाहिजे.

१ Unfair sex by George Whitehead.

(२) गृहकृत्यांतून[१] मुक्तता व्हावयाची तर भोजनादि सर्व व्यवहार सामुदायिक तत्त्वावर (co-operative housekeeping) चालवयास पाहिजेत. दुसऱ्या धंद्यांतून मुक्तता व्हावयाची तर गर्भ स्त्रीच्या शरीराबाहेर वाढण्याची शास्त्रीय व्यवस्था व्हावयास पाहिजे.

(३) सर्व व्यक्तींना अशा तऱ्हेची रहाणी आवडेल असें शिक्षण देऊन समाज हा एक मोठा सैन्याचा तळ बनवावयास पाहिजे. ज्याप्रमाणें सैन्यामध्यें सैनिकाच्या अभिरुचीचा प्रश्न उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणेंच येथें वैयक्तिक अभिरुचीला फारशी जागा नाहीं.

( ४ ) मातांचे विमे (Mothers' insurance) उतरण्याची पद्धति सुरू व्हावयास पाहिजे.

अशा तऱ्हेची आर्थिक आणि वैवाहिक घटना केल्यास सर्वसाधारण समाजावर काय परिणाम होतात याचा विचार पुढें येईलच. तुलनेनें पाहिलें तर अशा तऱ्हेची समाजघटना आमच्या जुन्या समाजरचनेपेक्षां फारच हीन आहे ही गोष्ट सहज सिद्ध करतां येईल. येथें फक्त अशा पद्धतींत काय असावयास पाहिजे तेवढेंच सांगितलें.

विवाहामध्यें व्यक्तीचें सुख आणि समाजाचें हित या दोन्हींचाही यथाप्रमाण विचार व्हावयास पाहिजे आणि प्रेम नसेल तर साध्या रतिसुखाचा देखील पूर्णांशानें लाभ होत नाहीं म्हणून विवाहाला प्रेमाची जरूरी आहे असें कांहीं लोक प्रतिपादन करितात त्याचा विचार करूं. कोणत्याच सुखाचा पूर्णांशानें लाभ होत नाहीं ही मानसशास्त्रज्ञ फ्राईड याची कबूली आम्हीं पूर्वीं नमूद करून ठेविलीच आहेच. परंतु अशी अशक्य गोष्ट घडून येईल असें गृहीत धरलें तरी रतिसुखाचा प्रेमाशीं संबंध जोडतां येईल किंवा नाहीं ही गोष्ट संशयास्पदच रहाते. जेथें जेथें प्रेम तेथें तेथें रतिसुख किंवा जेथें जेथें रतिसुख तेथें तेथें प्रेम यांपैकीं कोणता सिद्धांत निश्चित खरा आहे हें सांगतां येईल काय ? दोन गोष्टींचे कधीं कधीं एका ठिकाणीं साहचर्य सांपडलें तर त्यांच्यामध्यें कार्यकारणभाव सिद्ध होतो असें नव्हे. हें असेल तर तें असतें, परंतु तें आहे म्हणून हें असावयास पाहिजे अशा तऱ्हेचा

---

१ Refer to the idea of octogenesis in the 'Future of science' by J. B. Haldane.

सिद्धांत एकादें न्यायशास्त्र शिकणारें पोर देखील मान्य करणार नाहीं. त्यामुळें येथें अविच्छिन्न साहचर्य देखील सिद्ध होत नाहीं मग कार्यकारण-भाव कसा सिद्ध होणार ! यासंबंधीं तच्छास्त्रप्रवीण लोक सांगतात, 'प्रेम नाहीं म्हणून रतिसुख नाहीं कां रतिसुख नाहीं म्हणून प्रेम नाहीं याचा कार्यकारणभाव सांगणें फारच धाडसाचें[1] होईल' यासंबंधीं जास्त चर्चा करीत नाहीं परंतु असल्या तऱ्हेचा कार्यकारणभावशून्य हेतु विवाहाचा पाया म्हणून सुचवूं नका एवढीच आमची सुधारकबंधूंना विनंति आहे. विवाहितांमध्यें अप्रेम उत्पन्न झालें म्हणजे व्यभिचार फैलावतात असें मत पुढें करून नीतीच्या नांवावर कांहीं लोक प्रेमाचें समर्थन करूं पहातात. त्या बाबतींतही मानसशास्त्राचें अज्ञान हेंच दिसून येईल. आल्फ्रेड ॲडलर म्हणतो, 'व्यभिचार हा नेहमींच सुडाच्या स्वरूपाचा असतो. व्यभिचार करणाऱ्या व्यक्ती प्रेम, भावना वगैरे कारणें सांगून आपल्या अनीतीचें समर्थन करूं पहातात ही गोष्ट खरी आहे. परंतु भावनांना काय किंमत द्यावी ही गोष्ट आपण जाणतों. भावना ह्या नेहमीं स्वतःकडे श्रेष्ठत्व (Superiority complex) घेणाऱ्या व्यक्तींमध्यें जास्त प्रबल असतात. म्हणून भावना ह्या कोणत्याही गोष्टीचें समर्थन करण्यास पुरेसें कारण होऊं शकत नाहींत[2].'

आतांपर्यंत विवाहाच्या प्रधान हेतूंची चर्चा केली. आतां त्या प्रधान हेतूंना धरून विवाहाचे किती प्रकार होऊं शकतात आणि त्यांचे इतिहासांत काय परीणाम झाले ते पहावयाचे. तत्पूर्वी विवाहांतील दोन घटक जे स्त्री आणि पुरुष त्यांची संख्या काय असावी याचा विचार करूं. येथें चार पर्याय होऊं शकतात.

(१) एका स्त्रीनें अगर पुरुषानें एकाच जीवितामध्यें एकाच पुरुषाशीं अगर स्त्रीशीं लैंगिक संबंध करावा. त्याचाच गौण पर्याय म्हणजे स्त्रीला वरील नियम लागू करून पुरुषाला त्यांतून मुक्त करणें.

(२) एकाच स्त्रीनें एकसमयावच्छेदेंकरून अनेक नवरे करणें.

(३) एकाच पुरुषानें एकसमयावच्छेदेंकरून अनेक स्त्रिया करणें.

---

१ Sex in civilization.

२ Science of living by Alfred Adler.

(४) एकाच व्यक्तीनें एकामागून एक असे अनेक भागीदार निवडणें (घटस्फोट, पुनर्विवाह वगैरे चाली).

जगाचा आजपर्यंतचा इतिहास पाहिल्यास यांपैकीं प्रत्येक प्रकार कोणत्या ना कोणत्या तरी स्थळीं अगर काळीं अस्तित्वांत असलेला दिसून येईल. त्यामुळें जगांत सांपडणाऱ्या परिस्थितीवरून विवाह-पद्धति ठरविण्याचा आधुनिक प्रयत्न हा पोरकटपणाचा आहे. कारण जगांत प्रत्येकच स्थिति सांपडत असल्याकारणानें प्रत्येक व्यक्ति आपापल्या प्रवृत्तीला धरून असेल तीच स्थिति नैसर्गिक आणि हितकारक अशी मानूं लागते. याचें एकच उदाहरण घ्यावयाचें तर मानवी स्वभाव हा निसर्गतः एकपत्नीक आहे किंवा बहुपत्नीक आहे हाच मुद्दा घेऊं. बहुपत्नीक आहे असें मानणाऱ्यांमध्यें पुढील नांवें सांपडतात: बॅचोफेन, मॉर्गन, मॅकलेनन, लबॉक, लिपर्ट, विल्कन, कोव्हर, पोस्ट, बर्नहॉफ्ट, हेलवाल्ड, स्पेन्सर, रॅटझेल, अॅचेलिस, लॅम्प्रेक्ट वगैरे. उलट, मनुष्य निसर्गतः एकपत्नीक आहे असें मानणाऱ्यांमध्यें पुढील नांवें सांपडतात: स्टार्क, वेस्टरमार्क, ग्रॉस, क्रॉले, अँड्रयू लँग, अॅटकिन्सन, नॉर्थकोट, थॉमस, वुंट, फोरेल, कुल्हेनबॅक वगैरे. यांतील खरी गोष्ट अशी आहे कीं, स्त्रीपुरुषांना कामविकार तेवढा निसर्गानें दिलेला आहे. त्याच्या पुढील व्यवस्था मानवानें नैतिक कल्पना उत्पन्न करून करावयाची आहे. ज्या तऱ्हेची नैतिक मूल्यें असतील त्या तऱ्हेचा समाज होईल.[१] हीं नैतिक मूल्यें नैसर्गिक परिस्थितीवरून मिळत नसतात[२] तर निसर्गाचा आधार घेऊन समाजांना वळण लावण्याकरितां आपण ठरवावयाचीं असतात. त्यामध्येंच विवाहसंस्था नांवाची एक संस्था उत्पन्न होत असते.

विवाहाचे जे प्रकार आजपर्यंत समाजांत दिसून आले त्यांचें[३] वर्गीकरण पुढीलप्रमाणें करणें शक्य आहे. तें वर्गीकरण आम्हीं मागें सांगितलेल्या

---

rick Nietzsche.
ıticfic outlook by Bertrand Russell.
ory of human marriage by Westermark; Evolution of marriage by Muller Lyer.

**५६ विवाहाचे प्रकार** त्रिविध हेतूंचा आश्रय करून सांगतों. प्रथमतः पाश्चात्यांनीं केलेली विभागणी सांगून, त्यांनीं केलेल्या विभागणीची छाननी करून, त्यांच्या पद्धतीचे समाजशास्त्र आपणांला कां घेतां येणार नाहीं याचा उहापोह करूं. पुढें आपल्या पद्धतीचा परामर्ष घेऊं.

**( १ ) अर्थप्रधान विवाहपद्धति.**

( अ ) मुलगी बंदीवान करून तिला पळवून नेणें. हा प्रकार धर्म, अर्थ, काम यांपैकीं कोणत्याही सदराखालीं येत नसून पशुवृत्ति या सदराखालीं येईल. हा अर्थातच समाजांच्या अत्यंत निकृष्ट अवस्थेंत घडत असला पाहिजे.

( आ ) एका स्त्रीबद्दल दुसऱ्या स्त्रीची अदलाबदल करणें. उदाहरणार्थ, वरानें आपली कोणी तरी नातलग स्त्री वधूच्या कोणातरी नातलग पुरुषाला देऊं करणें. ही पद्धत विनिमयाच्या स्वरूपाची आहे. यामध्यें दोघांही पुरुषांना स्त्री मिळून दोन कुटुंबें उत्पन्न होतात.

( इ ) वरानें वधूच्या पित्याला देज देऊन कन्या मिळविणें. हा उघड उघड आर्थिक व्यवहार आहे.

( ई ) वधूच्या पित्याकडे नोकरी करून वधू मिळविणें. हा प्रकारही आर्थिक स्वरूपाचाच असून अजून पुष्कळ ठिकाणीं दिसून येतो.

( उ ) वधूच्या पित्यानें वराला हुंडा देण्याची पद्धति.

**( २ ) सामाजिक आज्ञाप्रधान असलेल्या विवाहपद्धति.**

( अ ) मुलें अगदीं लहान असतांना त्यांच्या विवाहाची सुपारी करून ठेविणें.

( आ ) अमुक एका पुरुषानें अमुक स्त्रीशीं विवाह केलाच पाहिजे अशी धार्मिक आज्ञा असणें.

( ३ ) **काममूलक विवाह** — हाच अलीकडे अभिजात समाजांतील कांहीं व्यक्ती सर्वसाधारण विवाहप्रकार म्हणून रूढ व्हावा असें सांगूं लागल्या आहेत[१].

---

१ धर्मशास्त्रमंथन– दिवेकर; अलीकडील सर्व सुधारक.

या सर्व विवाहपद्धतींकडे पाहिलें असतां असें दिसून येईल कीं, बहुपतीक आणि अर्थमूलक रचनापद्धतीमध्यें एकंदरीनें स्त्रीची स्थिति समाधानकारक असते. रानटी गणले गेलेले ‘ तोड ’ वगैरे सारखे जे समाज आहेत आणि ज्यांच्यामध्यें बहुपतीकत्वाची चाल आहे, त्यांच्यामध्यें काबाडकष्टाचीं सर्व कामें पुरुषांवर पडतात. स्त्रिया पेलाभर पाणी देखील आणीत नाहींत. बहुपत्नीकत्व हे स्त्रीला अहितकारक, उलट एकपत्नीकत्व हितकारक. आजन्म विवाह हा, नवऱ्याला त्याची लहर लागेल त्या दिवशीं स्त्रीला हाकून देतां येत नाहीं या दृष्टीनें हितकारक तर एकाद्या स्त्रीला माथेफिरू नवऱ्याबरोबर काळ कंठावा लागेल या दृष्टीनें अहितकारक. परंतु यावर उपाय घटस्फोटाची व्यवस्था ठेवणें हा नसून नैतिक मूल्यें आणि शिक्षणपद्धति यांनीं माथेफिरूपणा आवरण्याचा प्रयत्न करणें हा आहे. साटेलोटे आणि देज या दोन स्थितींत नवऱ्याच्या कुटुंबाचाही संबंध येत असल्याकारणानें स्त्रीला किंचित् अहितकारक परंतु एकंदरीनें फायदेशीरच. कारण स्त्री घरांत आणण्याकरितां जो पैसा खर्च झाला तेवढें नुकसान सोसावयास मनुष्य तयार नसतो. म्हणून हा विवाहप्रकार गरीब लोकांमध्यें अतिशय उत्तम. एकंदरीनें विचार केला तर आजची समाजांची जी आर्थिक घटना आहे तिच्या दृष्टीनें प्रीतिविवाह हाच स्त्रीला अतिशय हानिकारक आहे आणि म्हणून तो समाजांत रूढ होऊं नये. विवाह झाल्यापासून दहा वर्षांनें प्रेम नाहींसें होऊं शकेल; परंतु कौटुंबिक व्यवहाराच्या दृष्टीनें अर्थार्जनाची लायकी वाढणार नाहीं. म्हणून आम्ही असें भाकित करतों कीं, विश्वविद्यालयाच्या शिक्षणानें मेंदू बिघडलेल्या कांहीं उल्लूंनीं या घातुक पद्धतीचा जरी पुरस्कार केला तरीही हा विवाहाचा प्रकार सर्वसाधारण समाजांत कधींही रूढ होणार नाहीं. जेवढ्या समाजांत रूढ होईल तेवढ्या समाजांचा नाश होईल. असो. परंतु या सर्व विवाहप्रकारांमध्यें, आपल्या बाहेरील कोणत्या तरी शक्तीपुढें मनुष्यानें मान वाकविणें हा जो नीतीचा पाया आम्हीं मागें सांगितला त्याचा एक दोन अपवाद सोडून दिल्यास मुळींच विचार केलेला दिसत नाहीं. म्हणून अशा तऱ्हेचे विवाह स्थिर स्वरूपाचें होणें बरेंच दुष्कर आहे. येथपर्यंत पाश्चात्य समाजशास्त्रज्ञांना विवाहसंस्थेचा कितपत

बोध झाला त्याचा विचार केला. त्यांच्या मतानें हे प्रकार कालदृष्ट्या एकामागून एक उद्‌भूत होत असतात. परंतु हा निव्वळ खुळचटपणा आहे. सर्व तऱ्हेचे विवाहप्रकार व्यक्तींच्या विविधतेमुळें सर्व स्थळीं सांपडतात, आणि त्यांपैकीं कांहीं सामाजिक ध्येयाला अनुसरून अभिजात मानले गेलेले असतात.

हिंदु समाजशास्त्रज्ञ उत्क्रांति वगैरे तत्त्वांनीं स्वतःला बांधून घेत नसल्या-कारणानें ते जरी वर सांगितलेल्या सर्व प्रकारांचा विचार करतात, तरी देखील ते कालदृष्ट्या एकापुढील एक पर्याय आहेत असें मानीत नाहींत, तर मानवाचे हेतु, समाजांचीं ध्येयें यांच्या समन्वयानें एकाच स्थळीं आणि काळीं समाजांतील वेगवेगळ्या घटकांना वेगवेगळे प्रकार उपयुक्त होत असें मानतात. मनु म्हणतो,[२]

चतुर्णामपि वर्णानां प्रेत्य चेह हिताहितान् ।
अष्टाविमान्समासेन स्त्रीविवाहान् निबोधत ॥

येथें विवाह इहलोकीं आणि परलोकीं हितकारक अगर अहितकारक कसे होतील हें जाण असा उपन्यास केला आहे. परंतु अलीकडे अलीकडे परलोक नाहींसाच झाल्याकारणानें हितकारकत्व अगर अहितकारकत्व ऐहि-कच पहावयास पाहिजे. पुढें मनु विवाहाचे प्रकार देऊन कोणत्या गटाला कोणता प्रकार हितकारक होईल तें सांगतो.

( १ ) ब्राह्म—विद्वानाला आपण स्वतः बोलावून पिता ज्यामध्यें कन्येचें दान करतो तो ब्राह्मविवाह होय.

( २ ) दैव — यज्ञामध्यें जो ऋत्विज धर्मकार्य करीत असेल त्याला अलंकृत केलेली कन्या देणें हा दैवविवाह.

( ३ ) आर्ष — धर्माच्या प्रणालीला अनुसरून वराकडून गाई घेऊन कन्यादान करणें हा आर्षविवाह.

( ४ ) प्राजापत्य — नुसता आशीर्वाद देउन कन्यादान करावयाचे हा प्राजापत्य विधी.

---

१ Evolution of Modern marriage by Muller Lyer; History of human marriage by Westermark.

२ मनुस्मृति.

(५) आसुर – आसुरविधीमध्यें अर्थप्रदान आहेच.

(६) गांधर्वविधि—कन्या आणि वर यांच्या इच्छेनें अगर प्रेमानें एकमेकांचा संबंध होणें म्हणजे गांधर्वविवाह होय.

(७) राक्षसविधि—मारहाण करून रडत असलेल्या कन्येचें जबरीनें हरण करणें हा राक्षस विधि होय.

(८) पैशाचविधि—झोंपलेल्या अगर मत्त झालेल्या स्त्रीशीं एकांतीं संभोग करणें ह्या पापिष्ठ प्रकाराला पैशाच विधि असें म्हणतात.

अशा तऱ्हेचे हे आठ प्रकार आहेत. परंतु हे सर्वच कांहीं सर्व समाजाला लागू नाहींत. समाजांच्या अगर गटांच्या सांस्कृतिक उन्नतीचा विचार करून अर्थातच त्या गटाच्या लायकीला आणि शक्यतेला धरूनच विवाह-प्रकार सांगावयास पाहिजे. अमकाच एक प्रकार चांगला आणि तो सर्व समाजांना रूढ व्हावयास पाहिजे ही वेडी पाश्चात्य दृष्टि आहे. हिंदु समाज-शास्त्रांत तिला जागा नाहीं. मनूनें दिलेल्या प्रकारांमध्यें पाश्चात्यांनीं दिलेले जवळ जवळ सर्व प्रकार आलेले आहेत. फरक एवढाच कीं, पाश्चात्य पंडित कालदृष्ट्या हे प्रकार एकामागून एक झाले असें समजतात आणि मनु तेच समकालीन असूं शकतात असें सांगतो. पाश्चात्यांच्या पद्धतींत कालभेद आहे. पौर्वात्य पद्धतींत अधिकारभेद आहे. शमप्रधान ब्राह्मण आणि युद्धप्रिय क्षत्रिय यांना विवाहाचा प्रकार एकच सांगून कसें चालेल ! म्हणून ब्राह्म-णाला जे पहिले चार प्रकार सांगितले आहेत त्या चारहीमध्यें वरानें स्वतः वधू मिळविण्याकरितां कांहींही प्रयत्न करावयाचे नाहींत. उलट क्षत्रिय हा देशोंदेशीं स्वाऱ्या करीत हिंडतो, त्याला राक्षसविवाह सांगितला आहे. त्या विधीमध्यें सांगितलेलें कन्याहरण हें क्षत्रियालाच इष्ट आहे ब्राह्मणाला नव्हे. त्याबरोबरच पैशाच आणि आसुर विधी कोणीं कधींच करूं नयेत असा दंडक सांगितलेला आहे. पाश्चात्य लेखकांनीं एकादी गोष्ट घडते सबब ती आहेच म्हणून तिला अनुमति दिली असती. परंतु पौर्वात्य लेखक नेहमीं कसें आहे याच्याबरोबर कसें असावें याचाही विचार करतात. वैश्य शूद्रांनीं अर्थप्रधान आसुरविवाह केला तरी हरकत नाहीं, अशीही पण शिफारस केली आहे. यामध्यें संस्कारप्रधान गट आणि अर्थप्रधान गट अशी स्पष्ट विभागणी केलेली दिसत नाहीं काय ? हें सर्व केल्यानंतर विवाहसंस्थेला धार्मिकपणा

आणून एक तऱ्हेचें अलौकिक मूल्य निर्माण केलें आहे. ही लैंगिक विषयाकडे पहाण्याची दृष्टि किती बरोबर आहे, हें हॅवेलाक एलिसच्या पुढील वाक्यांशीं तुलना करितां सहज लक्षांत येईल. एलिस[1] म्हणतोः "कामविकार ही कधींच नष्ट न होणारी ज्वाला आहे. ती ज्वाला म्हणजे होरेब पर्वतावर मोझेसनें जी ज्वाला पाहिली त्या ज्वालेच्या स्वरूपाची आहे. परंतु तो जेव्हां ज्वालेजवळ जाऊं लागला, तेव्हां त्याला असे शब्द ऐकूं आले कीं, ही पवित्र जागा आहे, येथें जोडा काढल्याशिवाय जाऊं नकोस." कामविकाराच्या बाबतींत जोडे काढून पवित्रपणा आणल्याशिवाय त्याचें रहस्य आपणांस कळणार नाहीं. म्हणून विवाहपद्धती-संबंधीं बोलतांना धार्मिक भावनांतील पवित्रपणा आणला पाहिजे हें पौर्वा-त्यांचें मत बरोबर नाहीं असें कोण म्हणेल ?

५७ विवाहाचे हेतु ( पुढें चालू )

मुख्यतः विवाहाचें स्वरूप निश्चित करावयाचें तर विवाहाचें ध्येय आधीं निश्चित करावयास पाहिजे. आम्हीं मागें सांगितलेंच आहे कीं, आजची पिढी, उद्याची पिढी आणि व्यक्तींचा कामविकार या तिहींचा यथाप्रमाण विचार ज्या पद्धतींत झाला असेल तीच पद्धति श्रेष्ठ होय. बाकीच्या कितीहि गोजिरवाण्या दिसल्या तरी त्याज्य होत. यांपैकीं शेवटचा घटक जो व्यक्तींचा कामविकार तो नैतिक मूल्यांनीं (subjective habits or conditioned[2] reflexes ) नियंत्रित करणें शक्य आहे. परंतु पहिल्या दोन घटकांचें तसें नाहीं. प्रजा उत्पन्न झाली पाहिजे; आणि ही गोष्ट कांहीं फारशी सामाजिक युक्त्यांनीं घडवून आणतां येणार नाहीं. प्रजा होत असेल तेथें ती संततिनियमनादि युक्त्यांनीं थांबविणें शक्य आहे. परंतु जेथें होत नसेल तेथें ती उत्पन्न कशी करावी यासंबंधीं कांहीं नियम कोठें सांगितलेले आमच्या वाचनांत नाहींत. दुसरा घटक जो प्रजा—सुप्रजा—झाली पाहिजे हा तर पहिल्यापेक्षांहि जास्त बिकट आहे. म्हणून येथें यावच्छक्य सृष्टीचे नियम जाणून घेऊनच पुढें पाऊल टाकलें पाहिजे. ती प्रजा आणि सुप्रजा झाल्यानंतर त्या प्रजेचे समाजकार्यांत भाग घेण्याला लायक होई-

१ Introduction to sex in civilization.

२ Lectures on conditioned reflexes by Pavlov.

पर्यंत संगोपन व्हावयास पाहिजे. तसें व्हावयाचें तर विवाहसंबंध वीस वर्षें तरी स्थिर रहावयास पाहिजे. म्हणजे विवाह हें कालावलंबी कार्य ( function of time ) आहे. विवाहसंबंधाची लायकी तो किती काळ टिकला यावरून ठरवावयास पाहिजे. तशी अट न ठरविल्यास होणाऱ्या बालकाच्या पोषणसंवर्धनाची व्यवस्था समाजानें आपल्या हातांत घ्यावयास पाहिजे. म्हणूनच आम्हीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें विवाहसंबंध स्थिर आणि शुद्ध असावयास पाहिजेत.

परंतु पुढल्या पिढीची काळजी हे शब्द उच्चारल्याबरोबर त्यांतून अनंत प्रश्न उत्पन्न होतात. फक्त एका पिढीचा पुढील पिढीशीं संख्येच्या दृष्टीनें संबंध पाहिला तरी देखील असें दिसून येईल कीं, एका पिढींतील फारच थोडा भाग पुढल्या पिढींतील लोकसंख्या भरून काढण्याचें काम करीत असतो. डॉ. पियर्सननें केलेलें गणीत जरी घेतलें तरी असें दिसतें कीं, आजच्या पिढींतील पंचवीस दांपत्यें पुढील पिढीची शेंकडा साठच्या वर लोकसंख्या भरून काढीत असतात. ही पंचवीस दांपत्यें कशीं असावयास पाहिजेत ? प्रथमतः त्यांची प्रजोत्पादक शक्ति उत्तम तऱ्हेची रहावयास पाहिजे आणि गुणदृष्ट्या हीं कुटुंबें उत्तम निवडावयास पाहिजेत. त्याच कुटुंबाची उत्पादक शक्ति कमी झाल्यास संख्येच्या दृष्टीनें हानि होईल. यांमध्यें गुणहीन कुटुंबें शिरल्यास लोकसंख्येची गुणदृष्ट्या हानि होईल. कोणतेंही बाह्य कारण दिसत नसतांना जे समाज नष्ट झाले, त्यांच्या नाशाचें बीज या मुद्यांत सांठविलेलें दिसून येईल. चांगले गोड दिसणारे समाज सृष्टींत गडप झाले आणि अजूनही होतील. लोकसंख्या सुव्यवस्थित रहावयाची असल्यास त्या समाजाची प्रजोत्पादनाची शक्ति ( reproductive value ) उत्तम स्वरूपांत रहावयास पाहिजे आणि गुणहीतांच्या प्रत्यक्ष प्रजोत्पादनावर नियंत्रण पडेल अशा चालीरीति उत्पन्न व्हावयास पाहिजेत. या दोनही गोष्टी ज्या समाजांत पाळल्या जातील त्या समाजावर कितीही आपत्ती आल्या तरीही नाशाचें भय नाहीं. कोणत्याही प्रजेची उत्पादनशक्ति कशी मोजावी याचें गणित बरेंच अवघड असल्यामुळें शक्य तर परिशिष्टांत देऊं. हा फक्त संख्येचा प्रश्न झाला. आज लाडक्या युरोपियन संस्कृतीमध्यें संख्येची स्थिति काय झाली आहे याचा जिज्ञासूंनीं जरूर अभ्यास करावा.

पुढें सुप्रजेचा प्रश्न येतो. म्हणजे चांगल्या ( येथें चांगला हा शब्द अलीकडील अर्थानें वापरलेला नाहीं तर सृष्टीच्या कचाट्यांत टिकून रहाणारा या अर्थी वापरला आहे ) प्रजेची वाढ आणि हलक्या प्रजेची घट होत गेली पाहिजे. सृष्टीच्या भाषेंत बोलावयाचें तर[१] ' काटकसरी, बुद्धिमान, निरोगी अशी स्त्री निवडून तिच्याशीं विवाह करणारा धनगर हा चांगला आणि वाटेल तेथील स्त्री घेऊन विवाह करणारा सम्राट हा देखील वाईट ! स्नायू आणि मेंदू हे जीवित आहे. पैसा आणि सामाजिक श्रेष्ठत्व हीं दुय्यम आहेत. विवाह करतांना त्या विवाहाचा हेतु लक्षांत ठेवावयास पाहिजे. प्रत्येक पिढीवर पुढली लायक पिढी उत्पन्न करण्याची जबाबदारी आहे. ' पुढें प्रसूतीच्या पाळ्यांचा मातेच्या प्रकृतीवर काय परिणाम होईल या गोष्टीचाही विचार व्हावयास पाहिजे. निरोगी प्रकृतीच्या स्त्रीवर प्रसूतीच्या पाळ्यांचा अहितकारक परिणाम होतो, ही गोष्टच मुळांत खोटी आहे. परंतु अलीकडे या गोष्टीचा उगीचच फार बभ्रा झाला आहे. कुटुंबांत मुलें थोडींच असलीं तर त्यांच्या मनोवृत्ती कशा बनत जातील आणि पुष्कळ असतील तर कशा बनत जातील हीही गोष्ट दृष्टीआड करतां यावयाची नाहीं. संततीपैकीं[१] पहिल्या दोन तीन मुलांमध्यें वेड लागणें, गुन्हेगारी, क्षयरोग, मनोवैकृत्य हीं जास्त प्रमाणांत असतात. या दृष्टीनेंही लहान कुटुंब आणि मोठें कुटुंब यांचा विचार व्हावयास पाहिजे ! दोषांचें प्रमाण प्रथम अपत्यांत जास्त असतें ही गोष्ट आंकडेवारीनें सहज सिद्ध करतां येईल. प्रत्येक माणशीं साधारण संपत्ति किती असावयास पाहिजे ? प्रथमतः संपत्ति तरी कशाला म्हणावें ? आज चहूंकडे जो जीवितांतील दुय्यम गोष्टींवर[२] बारेमाप खर्च चालला आहे, तो योग्य आहे काय ? जीवनयात्रा ( Standard of living ) म्हणजे काय ? जो गृहस्थ नाटक, सिनेमाटॉकीज पहात नाहीं, तंबाखू ओढीत नाहीं त्या गृहस्थाच्या मनाला करमणूक होत नाहीं असें म्हणण्याचा आपणाला काय अधिकार ? जीवनयात्रा

१ Darwinisim and race progress by J.B. Haycraft.

१ Scope and importance to the state of the science of national Eugenics by Karl Pearson.

२ Whither Mankind by Beard.

सर्व देशांत आणि सर्व वर्गांत सारख्याच स्वरूपाची असावी, असें आम्हांला वाटत नाहीं; त्याप्रमाणेंच अर्थशास्त्राचा गंध असणाऱ्या कोणासही वाटणार नाहीं. म्हणून विवक्षित काळीं, स्थळीं आणि वर्गांत जीवितयाला वेगवेगळीच ठरणार. मंडईत रुपया रोज मिळविणाऱ्या हमालाला दोन तीन आण्यांत सिनेमा दाखविणें म्हणजे कलेची वाढ नसून पाजीपणाचा कळस आहे. अमेरिकेंत किंवा युरोपांत ज्या गोष्टी घडतात त्या, बाकीचा विचार न करतां, जशाच्या तशा हिंदुस्थानांत आणणें म्हणजे कांहीं समाजसुधारणा नव्हे.

१ पुढील मुद्दा फारच महत्त्वाचा आहे. अलीकडे बालमृत्यूंचें प्रमाण आणि सर्वसाधारण आयुर्मर्यादा यांवरून समाजांची जीवनशक्ति मोजण्याची पद्धति पडून गेली आहे. परंतु ती पद्धति निर्दोष आहे किंवा काय याचाही विचार व्हावयास पाहिजे. म्हणजे समाजांच्या वाढीच्या दृष्टीनें बालमृत्यूंचें प्रमाण जास्त असणें चांगलें कीं कमी असणें चांगलें, याचा पद्धतशीर विचार व्हावयास पाहिजे. त्याबरोबरच पन्नास वर्षांच्यावर किती लोकसंख्या शिल्लक रहावी याचाही विचार व्हावयास पाहिजे. एकाद्या समाजांत पन्नाशीच्या पुढें जास्त लोक जगतात म्हणून तो समाज सुदृढ अशीं कांहीं जीं विधानें ऐकूं येतात, तीं अत्यंत पोरकटपणाचें द्योतक असतात. सुंडबर्गच्या नियमानुरूप पाहिलें तर कोणत्याही लोकसंख्येमध्यें शेंकडा पन्नास व्यक्ति पंधरा ते पन्नास या वयांतील असावयास पाहिजेत. उरलेल्यांपैकीं बालकांचें वृद्धांशीं जें प्रमाण पडेल त्यावर समाज प्रागतिक आहे कीं परागतिक आहे ही गोष्ट अवलंबून असते. जर लोकसंख्या मरूं नये असें वाटत असेल, तर बालकांची संख्या ही वृद्धांच्या संख्येच्या कमींत कमी दुप्पट असावयास पाहिजे. त्याहून कमी झाल्यास तो समाज घटत जाईल. तो समाज मात्र काळजी न घेतल्यास जगतीतलावरून नष्ट होईल. एकाद्या समाजांत जर पन्नाशीच्या वरील माणसें जास्त शिल्लक राहूं लागलीं तर त्यांच्या दुप्पट बालकांची संख्या त्या समाजांत उत्पन्न झाली पाहिजे. आतां आपण वेगवेगळ्या देशांत पन्नाशी उलटलेले किती लोक शिल्लक रहातात ते आंकडे घेऊन, लोकसंख्या कायम ठेवणें कोणाला शक्य आहे त्याचा विचार करूं.

---

१ Census of India 1931 Vol. I.

जन्मलेल्या एक लाख पुरुषांपैकीं पन्नाशीच्या वर किती रहातात[1] तें कंसांत दाखविले आहेत. आस्ट्रेलिया ( ६८,२२१ ); इंग्लंड ( ५९,९०३ ); फ्रान्स ( ५३,८१८ ); जर्मनी ( ५५,३४० ); जपान (५२,६२९); युनायटेड स्टेट्स् (५८,९६३); हिंदुस्थान (१८,६५८). आतां हे समाज सुदृढ रहावयाचे असतील तर पंधरा ते पन्नास वर्षांपर्यंतचे जे पुरुष त्यांना या संख्यांच्या दुप्पट तरी संतती व्हावयास पाहिजे. म्हणजे आस्ट्रेलियामध्यें १७,४०० पुरुषांना पंधरा वर्षांच्या आंतील १,३६,४४२ मुलें व्हावयास पाहिजेत. म्हणजे सर्वसाधारण, प्रत्येकीं आठ मुलें असावयास पाहिजेत. परंतु वीस वर्षांच्या पुरुषाला आठ मुलें होणें शक्य नाहीं. हेंच गणित इतर देशांनाही लावून पहावें. म्हणजे हिंदुस्थानाला आपली लोकसंख्या राखून ठेवणें किती सोपें आहे ही गोष्ट सहज लक्षांत येईल.

बालमृत्यूंच्या प्रमाणाचा प्रश्न हा अशाच तऱ्हेचा आहे. बालमृत्यूंचें प्रमाण जास्त असणें ही आपत्ति कशी तेंच कळत नाहीं. त्यामुळें नालायक पिंड समाजाची फारशी हानि न करतां इहलोकांतून निघून जातात. डॉ. रैनो यानें दाखविलें आहे कीं, बालमृत्यूंचें प्रमाण जितकें जास्त तितकें वरील वयांतील मृत्युसंख्येचें प्रमाण कमी पडतें. म्हणजे येथें देखील नैसर्गिक निवडीचें तत्त्व हें सर्रास लागू असतें.

त्याबरोबरच त्या समाजांतील वेगवेगळे थर आपआपल्या प्रमाणांत संतती उत्पन्न करीत आहेत किंवा नाहींत, याचाही विचार करावयास[2] पाहिजे. हें सर्व झाल्यानंतर परलोकाचाही विचार करावयास पाहिजे. आज भौतिकशास्त्रांच्या वाढीमुळें आणि शेजारानें परलोक पुष्कळांना वावडा झाला आहे. त्यांचें म्हणणें कीं, परलोकाचें अस्तित्व या लोकावरून सिद्ध करून द्या. शंका फारच उत्तम ! आम्हीही त्यांना विचारतों कीं, बिनतारांनीं होणारे ध्वनिवहन त्यांचीं उपकरणें घेतल्याशिवाय आम्हांला सिद्ध करून द्या. परलोक आहे किंवा नाहीं ही गोष्ट भौतिक शास्त्रानें कशी ठरवितां येईल ?

१ Darwinism, medical progress and eugenics by Karl Pearson.

२ Heredity and selection in Sociology by Chatterton Hill; Eugenics by Carr Saunders; The need for Eugenic reform by Major L. Darwin.

भौतिक शास्त्रापासून होणारें सर्वच ज्ञान मुळीं कच्च्या पायावर उभारलेलें आहे. परंतु आज तरी सर आलिव्हर लॉज म्हणतो, 'आधुनिक मनुष्य आपल्या पापाबद्दल मनाला रुखरुख मुळींच लावून घेत नाहीं' त्याप्रमाणें स्थिति झाली आहे खरी! पूर्वी ज्या प्रक्रियेला पाप म्हणत, ती प्रक्रिया करतांना शास्त्राचें नांव सांगितलें म्हणजे झालें. व्यभिचार पाप आहेना परंतु तो मानवाच्या अभिरुचीला पोषक आहे. भ्रूणहत्या पाप म्हणतां परंतु पुढील पिढीचें संगोपन चांगलें करावयाचें तर संतती कमी पाहिजे ना! कुमारीगमन हें पाप म्हणतां. ठीक! त्यांनाच संततिनियमन शिकवूं. तुम्ही जगांतील ज्या कोणत्याही गोष्टीला पाप म्हणाल त्या प्रक्रियेचें समर्थन करण्याला आमच्याजवळ शास्त्र[1] आहे. व्याख्या करण्याचा हक्क असल्यानंतर पातकाची शिल्लक रहाण्याची छातीच नाहीं. प्रो. वुईल्यम जेम्स यानेंही सर आलिव्हर लॉज सारखेंच मत दिलें आहे. आम्ही येथें एवढेंच सांगतों कीं, आधुनिक भौतिक शास्त्रांची पूर्ण माहिती असूनही आम्ही परलोक मानणारे आहोंत.

" गुरुरात्मवतां शास्ता राजा शास्ता दुरात्मनाम् ।
इह प्रच्छन्नपापानां शास्ता वैवस्वतो यमः ॥ "

ही गोष्ट आम्हांला सत्य वाटते. आम्ही परलोकाचें अस्तित्व सिद्ध करूं शकतों परंतु त्याला जरूर तीं उपकरणें घेऊन तसे प्रयोग करून पहाण्याला किती लोक तयार आहेत? आपणांला एकाद्या स्थितीचें ज्ञान होत नाहीं म्हणून त्या स्थितीचें अस्तित्वच नाहीं असें म्हणणें म्हणजे निव्वळ औद्धत्य आहे. असे जे कोणी सर्वज्ञ त्यांच्याकरितां या ग्रंथाची प्रवृत्तीच नाहीं:

" ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां ।
जानन्ति ते किमपि तान्प्रति नैष यत्नः ।
उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा ।
कालोह्ययं निरवधिर्विपुलाच पृथ्वी[2] ॥ "

परंतु पारलौकिक कल्पनांचे ऐहिक परिणाम जर चांगले होत असतील तर

१ Scientific outlook by Russell.

२ मालतीमाधव– भवभूति.

त्या कल्पना मानणें हेंच इष्ट. समजा कीं एकाद्या समाजामध्यें अशी कल्पना रूढ झाली कीं आपणांला पित्यानें जन्म दिला म्हणून तें पित्याचें अगर पितरांचें ऋण फेडण्याकरितां आपणालाही पुत्र मागें ठेविला पाहिजे; नाहीं तर आपण आणि पितर परलोकीं नरकांत जाऊं. तर त्या समाजामध्यें प्रजानाशक असे दुर्गुण प्रवेश करणार नाहींत. परलोक सत्य असो अगर नसो (हें वाक्य आम्ही सर्वज्ञ अशा आधुनिक सुशिक्षितांच्या समजुती-खातर लिहित आहोंत), परंतु त्यापासून उत्पन्न होणारी नैतिक मूल्येंच फक्त अभेद्य आणि अखंड राहूं शकतात.

या सर्व प्रश्नांची व्यवस्था लावावयाची तर व्यक्तींची प्रजोत्पादनाची लायकी (Reproductive value) कोणत्या वयांत श्रेष्ठ असते याचाही विचार करावा लागेल. त्यांतल्या त्यांत संतती स्त्रीला व्हावयाची असल्या-कारणानें स्त्रीच्या वयाचा या दृष्टीनें निर्णय व्हावयास पाहिजे. ज्यांची पुढल्या पिढींत भर घालण्याच्या दृष्टीनें लायकी कमी झाली असेल अशा व्यक्तींची समाजांत वाढ झाली असल्यास किंचित्काळ ती लोकसंख्या फुगल्यासारखी दिसेल. परंतु ती लोकसंख्या हळूहळू अधोगतीला लागणार! वासनानुसारी उत्क्रांतिबद्दल (Creative evolution) गप्पा मारल्या तरी पन्नास वर्षांपुढें वाटेल तेवढी वासना असून सुद्धां स्त्री गरोदर झाल्याचें ऐकिवांत[१] नाहीं. पुढें संतती कोणत्या वयांत झाली असतां श्रेष्ठ होण्याचा संभव आहे याही गोष्टीचा विचार व्हावयास पाहिजे. एकंदर आयुर्मानाच्या दृष्टीनें कोणत्या वयांत संतती झाली असल्यास तिचें शिक्षण पिता आपल्या उमेदीच्या काळांत करूं शकेल या दृष्टीनेंही या प्रश्नाकडे पहावें लागेल. विवाह हा कामसंतर्पण आणि प्रजोत्पादन या दोनही हेतूनें व्हावयाचा असल्याकारणानें कामपूर्तीची अस्थिर स्थिति दर्शविणारे उपदंशादि विकार कोणत्या वयांत सर्वसाधारण पुरुषाला झालेले दिसून येतात त्या वयाचाही तलास लावावयास पाहिजे.[२]

हे सर्व ठरल्यानंतर कोणत्या वयांत स्त्रीपुरुष प्रजोत्पादनाला समर्थ होतात ही गोष्ट इंद्रियविज्ञानशास्त्राच्या दृष्टीनें ठरवून घ्यावयास पाहिजे.

१ Balance of births and deaths by Kuzynski.

२ Sexual ethics by Robert Michel; Sexual question by Forel.

स्त्रीचें विवाहाचें वय या दृष्टीनें निश्चित झाल्यानंतर त्या स्त्रीचा काय वयाच्या पुरुषाशीं विवाह व्हावा हें ठरवावयास पाहिजे. हिंदुस्थानासारख्या ऊष्ण कटिबंधांतील देशांत स्त्रीचें ऋतुप्राप्तीचें वय साधारणतः तेरा इतकें पडतें आणि पंचेचाळीसच्या सुमारास त्या पिंडाचें उत्पादनकार्य संपतें. म्हणजे या पिंडाचें कार्य साधारणतः बत्तीस वर्षें चालतें. तर पुरुषामध्यें उत्पादनशक्ति सरासरी पन्नास वर्षें चालते.[१] या दृष्टीनें दोन्ही पिंडांची वाढीची गति वेगळी असल्याकारणानें सारख्या वयाचे स्त्रीपुरुष ' सहवीर्य ' म्हणजे सारखीच वाढ झालेले असत नाहींत. त्याच वयाचा पुरुष हा जास्त कोंवळा असतो. कोंवळ्या पुरुषानें निब्बर स्त्रीशीं लग्न केल्यास किंचित्काळ त्याला प्रौढ सुखाचा आस्वाद मिळेल यांत कांहीं शंका नाहीं; परंतु त्याच्याच उत्तरायुष्याचा त्यानें विचार केल्यास तो अशी चूक सहसा करणार नाहीं. पुन्हां स्त्रीपुरुष सारख्या वयाचीं असतील अगर पुरुष स्त्रीपेक्षां कोंवळा असेल तर पुढें होणाऱ्या प्रजेमध्यें स्त्रीप्रजा जास्त होते असें म्हणतात याचा पुढील लोकसंख्येच्या दृष्टीनेंही विचार व्हावयास पाहिजे. आमच्या आजच्या तरुणतरुणींना ह्या प्रश्नांचें कांहींच महत्त्व वाटत नाहीं काय ?

समाजांतील सर्व थरांत विवाहाचें वय एकच असणें इष्ट आहे काय याचाही पद्धतशीर अभ्यास करावयास पाहिजे. मनुष्यप्राणी[२] येथूनतेथून सारखाच; मानव हा समान आहे अशा तऱ्हेचीं विधानें करणारांना अर्थातच आमच्या म्हणण्याचा बोध व्हावयाचा नाहीं. परंतु मनुष्यप्राण्याच्या वेगवेगळ्या थरांमध्यें प्रजोत्पादनाची लायकी किती वेगवेगळी असते ही गोष्ट ज्यांना माहिती आहे आहे त्यांना हा मुद्दा अत्यंत महत्त्वाचा वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. परंतु मनुष्यप्राणी सर्व ठिकाणीं सारखाच मानल्यानंतर त्याची उत्पादनशक्तीही सारखी; मग सरकारी अहवालामध्यें जें वेगवेगळें जननांचें[३] प्रमाण दिलेलें असतें तें अर्थातच सरकारी अधिकाऱ्यांची दिशाभूल. आतां जवळजवळ सर्व समाजशास्त्रज्ञांना ही गोष्ट पटत चालली

१ Hopaceker and Sadler's law.
२ रा. मो. क. गांधींचे लेख बघा.
३ Census of India for 1931.

आहे कीं कोणत्याही संघाची सामाजिक लायकी जसजशी कमी, तसतशी त्या संघाची प्रजोत्पादक शक्ति श्रेष्ठ. जसजशी प्रजोत्पादक शक्ति श्रेष्ठ तस-तसें बालमृत्यूंचें प्रमाणही जास्त. परंतु जननसंख्या आणि मृत्युसंख्या या दोन्हींचाही विचार केल्यास ज्यांची सुपीकता जास्त त्यांचीच संख्या दर पिढीला जास्त वाढत जाणार. त्याबरोबरच ज्या वर्गांमध्यें सुपीकता कमी त्या वर्गांमध्येंच दूरदर्शीपणा, अभिमान वगैरे वंशवृद्धीला हानिकारक अशा सद्गुणांनीं प्रवेश केलेला असतो.

सुधारलेल्या समाजामध्यें कोणाही व्यक्तीला होणारी संतति ही त्या व्यक्तीच्या सुपीकतेबरोबरच इतर दुसऱ्या बऱ्याच गोष्टींवर अवलंबून असते. असंस्कृत समाजामध्यें या बाह्य कारणांचा सुपीकतेवर फारसा परिणाम होत नाहीं; परंतु सुधारलेल्या समाजांत मात्र यांचा फारच मोठा परिणाम झालेला दिसतो. मनुष्यामध्यें नैतिक गुण असल्याकारणानें ब्रह्मचर्य किती पाळावें, विवाह केव्हां करावा वगैरे गोष्टी त्याच्या मनाच्या घटनेवर अवलंबून अस-तात. ही मनाची घटना आणि नैतिक मूल्यें या दोहोंच्याही परिणामाचें फळ असतें. मनाच्या घटनेंत कामविकार असतो आणि नैतिक मूल्यांनीं त्याला वळण लागतें. यामध्यें डॉ. फ्राईडची मानसशास्त्रपद्धति आणि डॉ. वॉट-सनची पद्धति या दोहोंचाही विचार व्हावयास पाहिजे. बालविवाह रूढ असलेल्या समाजांत वाढलेल्या व्यक्तींना लहानपणीं कामविकार असतो, आणि तदितर समाजांतील व्यक्तींना नसतो असें थोडेंच आहे. परंतु जेथें ते अभिजात मानले जात नाहींत, तेथें लवकर विवाह करण्यास व्यक्ति तयार होत नाहींत. ह्याच कल्पनांतून संततिनियमन करावें किंवा नाहीं असे प्रश्न उत्पन्न होतात. संततिनियमन आणि त्याच्या पद्धति हा तर शहाण्या युरोप-अमेरिकमध्यें मोठा महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न झाला आहे. परंतु तो उत्पन्न कां होतो याचीं कारणें शोधून काढण्याचा कोणींच प्रयत्न केलेला दिसत नाहीं. स्त्रियांना साधारणतः संतति किती होईल याची सर्वसाधारण कल्पना

१ Eugenics by Carr Saunders; Heredity and selection in sociology by Chatterton Hill.

२ Heredity and Selection in sociology by Chatterton Hill.

३ Genetical theory of natural selection by R. A. Fischer.

त्यांच्या आयांना संतती किती झाली होती यावरून करतां येते. कारण सुपीकतेमध्यें देखील आनुवंश या गुणाला किंमत आहे. गणितच करून पाहिलें तर असें दिसून येतें कीं, सुपीकता नापीकता वगैरेना जीं कांहीं अनंत कारणें असतील त्या कारणांपैकीं पन्नास टक्के भाग आनुवंशाकडेच द्यावयास पाहिजे.[१] याचें कारण मुख्यतः आनुवंशानें येणाऱ्या मानसिक गुणांत सांपडतें. जसजशी मानसिक उन्नति जास्त तसतशी महत्त्वाकांक्षा जास्त; महत्त्वाकांक्षा जास्त झाली कीं, विवाहाचें वय उशीरा; विवाहाला उशीर म्हणजे सर्वसाधारण संतती कमी; पुन्हां संततीचें संगोपन करण्याच्या विचित्र कल्पनांनीं मनांत प्रवेश केला म्हणजे संततिनियमन– अशी ही सर्वसाधारण परंपरा आहे. म्हणून समाजांतील वेगवेगळ्या गटांतील विवाहांचें वय त्या त्या गटांतील व्यक्तींच्या मतावर सोंपवून देतां येणार नाहीं. तसें केल्यास वेगवेगळ्या गटांतील संख्यावाढीचें प्रमाण आपणांला नियंत्रित करतां येणार नाहीं. कारण कीं, लवकरच हलकें मानव्य श्रेष्ठ प्रजांना नुसत्या संख्येच्या जोरावर ग्रासून टाकील यांत तिळमात्र देखील शंका घेण्याचें कारण नाहीं. उत्तम समाज निर्माण करावयाचे असल्यास श्रेष्ठ प्रजा जास्त होत गेली पाहिजे, आणि कनिष्ठ प्रजा कमी होत गेली पाहिजे. परंतु आज कोणत्याही देशाचे खानेसुमारीचे अहवाल वरवर चाळले तरी वस्तुस्थिति या तत्त्वाच्या अगदीं बरोबर उलट चाललेली आहे ही गोष्ट कोणाच्याही सहज लक्षांत आल्याशिवाय रहाणार नाहीं. परंतु तीच सुधारणा असें कोणी म्हणूं लागल्यास त्याचें तोंड कोणीं धरावें ?

यावर अशी शंका येईल कीं, हें जरी खरें असलें तरीही या सर्व भानगडीचा विवाहाच्या वयाशीं संबंध काय ? त्यांत तर आम्हांला कांहींही कार्यकारणभाव दिसून येत नाहीं. तो कार्यकारणभाव शोधण्याकरितां एक सोपेंसें उदाहरण घेऊं. एक समाज अलीकडील पद्धतीनें सुशिक्षित आणि सुसंस्कृत झाला नसल्याकारणानें त्या समाजामध्यें स्त्रीविवाह 'प्रदानं प्राग्‌ऋतोः' या धर्मशास्त्राच्या नियमाला धरून युक्त काळीं होतो. मग साधारणतः पंधराव्या वर्षीं स्त्रीला संतति होऊं शकते. म्हणजे या समाजामध्यें पंधराव्या वर्षीं पिढी बदलते आणि नवीन भरती होऊं लागते. दुसरा

१ Marriage and morals by Russel.

समाज सुधारला आहे. त्यांतील कन्या कॉलेजांत जाऊन विश्वविद्यालयाची पदवी मिळविते, व नंतर नवरा मिळाल्यास विवाह करते. नवरा मिळाल्यास म्हणण्याचें कारण युरोप अमेरिकेंत देखील सुशिक्षित स्त्रियांत विवाहांचें प्रमाण फारच कमी पडतें ही गोष्ट[१] प्रसिद्ध आहे. म्हणजे या स्त्रीचा विवाह बाविसाव्या वर्षी होतो. त्यामुळें तिला तेविसाव्या वर्षी प्रथमापत्य होण्याचा संभव. म्हणजे या गटांत पिढी तेविसाव्या वर्षी बदलणार. याच चालीरीती आणि हींच नैतिक मूल्यें या गटांनीं दोनचार पिढ्या चालू ठेवल्यास काय प्रकार होतो, त्याचें आतां गणित मांडूं. दुसऱ्या पद्धतींतील समाजाच्या चार पिढ्या होण्याला ९२ वर्षें लागतील, परंतु तेवढ्याच काळांत पहिल्या समाजाच्या सहा पिढ्या होऊन जातील. त्या पिढ्यांच्या संख्येचें कोष्टक पुढीलप्रमाणें मांडतां येईल.

## वर्षांचा काळ.

| पहिलें घराणें | दुसरें घराणें | लोकसंख्या |
|---|---|---|
| १५ | २३ | ४ |
| ३० | ४६ | ८ |
| ४५ | ६९ | १६ |
| ६० | ९२ | ३२ |
| ७५ | | ६४ |
| ९० | | १२८ |

म्हणजे आज जर या घराण्यांची संख्या सारखी वाटली गेलेली असेल, तर शंभर वर्षांत तें प्रमाण ३२ : १२८ असें पडेल. म्हणजे आजच्या दृष्टीनें ज्याला आपण मागासलेला समाज म्हणतो, तो शेंकडा ८० आणि सुधारलेला समाज शेंकडा वीसच राहील. पुन्हां येथें एक गोष्ट गृहीत

१ Education of women by Goodsell; Outspoken essays by Dean Inge; Trend of races by Holmes; Mankind at cross roads by Edward East.

धरलेली आहे ती अशी कीं, या दोनही समाजांमध्यें स्त्रियांची सुपीकता सारखीच असते. परंतु ती गोष्ट खरी नाहीं. वयाच्या वाढीबरोबरच स्त्रियांची सुपीकताही कमी होत जाते. पंधरापासून ते वीसपर्यंत हाच आयुष्याचा टप्पा स्त्रीच्या बाबतींत जास्त फलप्रद असतो. म्हणजे मूलतःच उशीरां विवाह करणाऱ्या स्त्रिया जास्त नापीक असतात. रानटी युरोपिअन समाजांत बरेचसे स्त्रीपुरुष अविवाहित रहातात. जे लग्नें करतात ते बरेचसे उशीरां करतात. परंतु या वाढत्या वयाचा स्त्रीपिंडावर फारच वाईट परिणाम होतो. समजा, एकाद्या स्त्रीनें तिसाव्या वर्षी विवाह केला, तर गणित करून असें दिसून येतें कीं, तिनें विसाव्या वर्षी विवाह केला असता तर तिला जी संतती झाली असती त्याच्या अडतीस टक्के इतकीच संतती आतां तिला होऊं शकेल. तोच विवाह तिनें पसतिसाव्या वर्षी केला तर फक्त एकोणीस टक्केच संतती होईल. पुरुषांची प्रजोत्पादक शक्ति पुष्कळ काळपर्यंत रहाते. परंतु पुरुषाच्या विवाहकालाचा देखील लोकसंख्येवर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. कारण कीं, पुरुषाचें विवाहाचें वय वाढत चाललें म्हणजे स्त्रीचें विवाहाचें वय देखील वाढतें. साधारणतः चवतीस ते चव्वेचाळीस या वयाच्या उमरींतील पुरुष, प्रथम वर असल्यास साधारणतः आपल्याहून दहा वर्षें लहान अशा स्त्रीशीं विवाह करील, आणि त्यांच्या स्त्रियांचे वय धरून गणित केल्यास अशा पुरुषांना जी संतती होईल ती विसाव्या वर्षी लग्न करणाऱ्या पुरुषांच्या [2] होईल. हा विचार संख्येच्या दृष्टीनें झाला; गुणाच्या दृष्टीनें पुढें विचार करूं.

वरील चर्चेचा निष्कर्ष असा निघतो कीं, संख्याप्रमाण बिघडूं नये असें वाटत असल्यास, वेगवेगळ्या गटांची सुपीकता, स्त्रियांची वयानुरूप सुपीकता वगैरे गोष्टींचा विचार केल्यास, जसजशी कोणत्याही वर्गाची सामाजिक लायकी जास्त, तसतसें स्त्रीविवाहाचें वय कमी होत जावयास पाहिजे. सर्व वर्गांमध्यें जर सारखें वय ठेवलें, तर खालील वर्गांची संख्या प्रमाणाबाहेर वाढूं न देण्याला कांहीं तरी बाह्य सामाजिक युक्त्या योजल्या पाहिजेत. नाहीं. तर समाजामध्यें हीन आणि उत्तम अशा दोनही गटांच्या

१ Fecundity, fertility and sterility by Mathew Duncan.

२ Genetic theory of evolution by R. A. Fischer.

संख्यांच्या प्रमाणामध्यें वैषम्य उत्पन्न झाल्याशिवाय रहाणार नाहीं. 'दया धरमका मूल है' वगैरे सर्व गोष्टी खऱ्या असतील, परंतु त्यांचें समाजशास्त्रांत कोणतें कार्य आहे याचें दिग्दर्शन आम्हीं पूर्वींच केलें आहे. हिंदु समाजशास्त्रज्ञांनीं—म्हणजे स्मृतिकारांनीं—या भानगडीचा सर्वथा विचार केलेला दिसतो. म्हणून आज सुधारणा करावयाची ती स्मृतिग्रंथ जाळून नव्हे तर त्या तत्त्वांचें पुनरुज्जीवन करून होय !

त्रैवर्णिकांमध्यें उपनयनकाल आणि विवाहकाल या दोहोंमध्यें एक तऱ्हेची सांगड घालून दिलेली दिसते. उपनयनकालापासून कमींत कमी बारा वर्षांनीं विवाहकाल येतो. मनु म्हणतो,

वेदमधीत्य वेदौ वा वेदान् वाऽपि यथाक्रमम् ।
अविप्लुतब्रह्मचर्यो गृहस्थाश्रममाचरेत् ।[1]

उपनयनकालाची धर्मशास्त्रकार पुढीलप्रमाणें व्यवस्था करतात :

'गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत ब्राह्मणस्योपनायनम् ।
गर्भादेकादशे राज्ञः गर्भात्तु द्वादशे विशः ॥
ब्रह्मवर्चस कामस्य कार्यं विप्रस्य पंचमे ।
राज्ञो बलार्थिनः षष्ठे वैश्यस्येहार्थिनोऽष्टमे ॥
आषोडशाद्ब्राह्मणस्य सावित्री नातिवर्तते !
आद्वाविंशात्क्षत्रबंधोः आचतुर्विंशतेर्विशः ॥
अतऊर्ध्वं त्रयोऽप्येते यथाकालमसंस्कृताः ।
सावित्रीपतिताव्रात्या भवंत्यार्यविगर्हिताः ॥

या श्लोकांत ग्रथित केलेल्या तत्त्वांवर मानसशास्त्र, शिक्षणशास्त्र, समाजशास्त्र या दृष्टीनें भाष्य करावयाचें म्हटल्यास ग्रंथविस्तार जास्त होईल. परंतु थोडक्यांत त्याचा विचार करूं. मौंजीबंधनापासून ब्राह्मणाच्या मुलाच्या भक्ष्याभक्ष्य, स्पर्शास्पर्श्य वगैरे गोष्टींवर नियंत्रणें बसूं लागतात. ब्राह्मणाच्या मुलाची मुंज आठव्या वर्षी करावी आणि त्याला ब्राह्मणांतही श्रेष्ठ बनवावयाचा असल्यास त्याची मुंज पांचव्या वर्षी करावी. सर्वसाधारण क्षत्रियाची

---

१ मनुस्मृति.

मुंज अकराव्या वर्षीं करावी, परंतु त्यांतल्या त्यांत तेजस्वी होण्याची इच्छा करणाऱ्या क्षत्रियाची मुंज सहाव्या वर्षीं करावी. या वचनांशीं बरट्रांड रसेलच्या शास्त्रीय पद्धतीच्या समाजामध्यें शिक्षणाकरितां विद्यार्थ्यांची निवड कशी करणें इष्ट आहे त्या पद्धतीशीं तुलना करून पहावी. रसेल[१] म्हणतो, 'सत्ताधीश वर्गामध्यें ज्या विद्यार्थ्यांचा अंतर्भाव व्हावयाचा असेल, त्यांना अतिशय वेगळें शिक्षण दिलें जाईल. त्यांपैकीं कांहींची निवड जन्मापूर्वी, कांहींची जन्मापासून पहिल्या तीन वर्षांत आणि थोड्यांची तीन ते सहा वर्षेपर्यंत अशी तीन तऱ्हांनीं केली जाईल. त्यांचा आहार हा माता-पित्यांच्या अभिरुचीवर अवलंबून ठेवतां येणार नाहीं.' रसेलचें म्हणणें आणि स्मृतींच्या चालीरिती या इतक्या तंतोतंत कां जमतात ? येथें दोघेही शास्त्राला धरून बोलत आहेत. पुन्हां सर्व समाजाचें शिक्षण एकरूप असावें ही गोष्ट स्मृतिकारांनाही मान्य नाहीं. त्याप्रमाणेंच शास्त्रबुद्धि अशा रसेललाहि मान्य नाहीं. स्मृतिकारांनीं लौकिक ( secular ), वैदिक ( scientific ) आणि आध्यात्मिक ( spiritual ) असे शिक्षणाचे तीन विभाग केलेले आहेत[२]. पैकीं लौकिक शिक्षण सर्वांना, वैदिक शिक्षण थोड्यांना आणि आध्यात्मिक शिक्षण जो घेऊं शकेल त्याला अशी हिंदु समाजाची परंपरा आहे. रसेल[३] म्हणतो, 'शास्त्रीय समाजामध्यें बहुतेक सर्व शास्त्रीय ज्ञान बहुजनसमाजापासून गुप्त ठेविलें जाईल. शोधक असा जो भिक्षुकवर्ग ( priestly class ) त्याच्याकरितां हें ज्ञान राखून ठेवलें जाईल. या वर्गामध्यें बुद्धि आणि संघनिष्ठा ह्या दोन गुणांना मोठा मान मिळेल.' कोठल्याही शास्त्रीय तत्त्वावर उभारलेल्या समाजांत ज्ञानाची व्यवस्था अशीच करावयाची असते आणि तशीच ती मनुनें केली तर मनु शास्त्रज्ञ ठरतो किंवा पक्षपाती ठरतो हें पहावयास कांहीं कोणी पंडित नको.

असो. समाजशास्त्रदृष्ट्या शिक्षणाचें इतकें उत्तम वय आणि इतकी उत्तम पद्धति आज जे गाडीभर ग्रंथ त्या शास्त्रावर प्रसिद्ध होत आहेत त्यांमध्यें कोठें केलेली आमच्या आढळांत नाहीं. आपला मुख्य मुद्दा असा आहे

१ Scientific outlook by Bertrand Russel.

२ मनुस्मृति.

३ Scientific outlook by Bertrand Russel.

कीं, मौंजीबंधनाचें वय हें विवाहाच्या वयाशीं निगडित असतें. अध्ययन-काल कमींत कमी बारा वर्षें धरल्यास सर्व-साधारण ब्राह्मण मुलाचा विवाह वीस, क्षत्रियाचा तेवीस आणि वैश्याचा चोवीस या वर्षी होईल. अशा तऱ्हेनें पुरुषाचा विवाहकाल नियंत्रित केल्यानंतर कन्यांच्या विवाहाचा काल कोणता असावा या विचाराकडे स्मृतिकार वळले. पुरुषाच्या विवाहाचा किमान काल सांगितला, ज्यास्तींत जास्त मर्यादा सांगितली नाहीं; परंतु स्त्रीचे बाबतींत किमान काल न सांगतां जास्तींत जास्त मर्यादा सांगितली. दोन्ही पिंडांचा पद्धतशीर विचार करून ठरविलेली ही पद्धति देखील कांहीं आधुनिकांना पक्षपाताची वाटते हें स्मृतिकारांचें दुर्दैव होय.

**५८ स्त्रीविवाहाचें वय**

स्त्रीविवाहाचा प्रश्न स्मृतिकारांनीं निसर्गावर सोंपवून दिला आहे. आर्य शास्त्रकारांनीं या बाबतींत आपल्या विषयावर केवढें प्रभुत्व दाखविलें आहे ही गोष्ट पुढील चर्चेवरून सहज लक्षांत येईल. त्यांचा मुख्य दंडक म्हणजे ‘ प्रदानं प्रागृतोः ’ म्हणजे स्त्री ऋतुमति होण्याचे पूर्वी केव्हां तरी तिचा विवाह झाला पाहिजे. संमतिवय ( एज ऑफ कन्सेंट ) कमिटीनें आपल्या अहवाल्यांत ऋतुप्राप्ति ही कशाची निदर्शक आहे या बाबतींत जी अशास्त्रीय, भ्रामक आणि खोडसाळ विधानें केलीं आहेत त्या सर्वांचा परामर्ष येथें घेणें शक्य नाहीं. येथें एवढेंच सांगावयाचें कीं, ऋतुप्राप्ति ही स्त्रीचें उत्पादक पिंड ( glands ) कार्यक्षम झाले असें स्पष्ट दर्शविणारें चिन्ह निसर्गानें लावून दिलें आहे. त्याचा सुशिक्षित अर्थ कांहींही होत असला तरी इंद्रियशास्त्रीय अर्थ आम्हीं वर सांगितला तोच आहे. या बाबतींत वादविवादांत नर्गीनच्च मोठमोठीं नांवें दडपण्याचें कारण नाहीं. ब्लेचर बेल कांहीं म्हणो अगर फ्रेअर फेल कांहीं म्हणो. सृष्टी कांहीं तसें म्हणत नाहीं. सृष्टीचे नियम समाजाला मिळते करून घ्यावे, हा नियम ठाऊक असल्याकारणानें स्मृतिकारांनीं कांहीं ठिकाणीं अपवादही पण सांगितलेले आहेत. आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे कीं, पुरुषपिंडाची उत्पादनशक्ति स्त्रीपिंडाच्या उत्पादनशक्तीपेक्षां फार जास्त काळ रहाते. म्हणून पुरुषाला ब्रह्मचर्य सांगावयाचें;

१ Report of the Age of Consent Committee.

स्त्रीला नाहीं. याला इतरही दुसरीं कारणें आहेत त्यांचा खुलासा यथावकाश चर्चेत येईलच. स्त्रीला ऋतुप्राप्ति झाल्यापासून शक्य तितक्या लवकर जर तिची ऋतुशांती झाली नाहीं तर तिच्या शारीर आणि मानस पिंडांत न सुधारणाऱ्या विकृति होतात, असें डॉ. नॉर्मन[1] हेअर म्हणतो. स्त्रीपिंडांचे ऋतुप्राप्तीचें वय हिंदुस्थानसारख्या अफाट देशांत सांगणें शक्य नाहीं, आणि ऋतुप्राप्तीबरोबर तर ऋतुशांती झालीच पाहिजे; म्हणून विवाहाचें वय त्या कालापूर्वीं केव्हां तरी ठेवावयास पाहिजे. परंतु तत्पूर्वीं केव्हां तरी त्या मुलांचा सहवास ( आज सहवासोत्तर विवाहांत सहवास शब्द वापरतात त्या अर्थानें नव्हे ) व्हावयास पाहिजे. म्हणून वयपरत्वें

अष्टवर्षा भवेत्कन्या नववर्षातु रोहिणी ।
दशवर्षा भवेद्गौरी अत उर्ध्वं रजस्वला ॥

अशी व्यवस्था सांगितली. या नियमानें व्यवस्था झाल्यास अलौकिक शुभफळ आणि न झाल्यास अलौकिक अशुभफळ लावून दिलें.

यावरून दिसून येईल कीं, आर्य विवाहपद्धतींत उपभोगपूर्व सहवास आहे. आपण सुशिक्षित झाल्यामुळें, हिंदूंची मूळ पद्धति सोडून आणि दडपून दिलेली पद्धति हीच मूळ पद्धति आहे असें सांगून त्याची लालभडक आगरकरी वर्णनें सुरू झालीं. या ज्या टीका होऊं लागल्या त्यांमध्यें फ्राईडप्रणीत मानसशास्त्रीय पद्धति अगर पावलाव आणि डॉ. वॉटसनप्रणीत मानसशास्त्रीय पद्धति या दोहोंचाही कोठेंच गंध नव्हता. पूर्वीच्या ऋषींचे नियम पाहिले तर ते स्वतःचें वर्तन आचारप्रधान ( behaviourist ) पद्धतीनें नियंत्रित करीत आणि ज्यांच्यावर परिणाम घडवून आणावयाचा त्यांचा मनःपृथक्करण शास्त्रानें अभ्यास करीत. त्यांनीं दिलेले स्त्रीविवाहाचें वय सर्वदृष्ट्या कसें बरोबर आहे ते आतां दाखवावयाचें. हिंदु पद्धतीप्रमाणें उत्तमकाळीं विवाह केल्यास त्यांत पांच वर्षे तरी उपभोगपूर्व सहवास होतो. दोनही पद्धतींत जर सहवास आहे तर मग श्रेष्ठ पद्धति कोणती ? आज सुधारक म्हणतात तशी ऋतुप्राप्तीनंतर सहवासाची अगर ऋतुप्राप्तीपूर्व सहवासाची ? सुशिक्षित लोकांचें म्हणणें असें कीं, आठपासून बारा वर्षा-

---

१ Future of marriage by Norman Haire.

पर्यंत कन्येला विवाह या कल्पनेचें ज्ञान तें काय असतें ? रा. आगरकरांनीं उत्कट प्रेमानें एकमेकांकडे धांव घेणारीं वधूवरें आणि त्यांच्या काळीं विवाहित झालेलीं लहान हिंदु पोरें यांच्या भावनांत एक तऱ्हेचा दांडगा विरोध दाखविला आहे. असे विरोध दाखविणें हें वाङ्मयांत ठीक दिसेल. परंतु विवाहासारख्या सर्वच जीवजाताला व्यापून राहिलेल्या विषयामध्यें तो निव्वळ पोरकटपणा आहे, ही गोष्ट त्या महान् पंडिताच्या कधींही लक्षांत आली नाहीं. अशा तऱ्हेचीं वर्णनें करून अज्ञानयुक्त स्थितीपेक्षां ज्ञानयुक्त स्थिति बरी असें त्यांना दर्शवावयाचें होतें. आतां या सिद्धांतामध्यें मूळ जी गृहीत कृत्यें धरलीं आहेत तीं विशद करूं.

मनुष्यानें जी जी प्रक्रिया समाजांत करावयाची त्या त्या प्रक्रियेबद्दलचें ज्ञान त्या व्यक्तीस असावयास पाहिजे. हा सर्वसाधारण गृहीत धरलेला सिद्धांत तो आयुष्याच्या इतर अंगांना लावून पहावयास हेच पंडित तयार होतील असें आम्हांला वाटत नाहीं. परंतु हा सर्वसाधारण मुद्दा आम्ही प्रस्तुत ग्रंथांतून थोडासा दृष्टिआड ठेवतों आणि आठ ते बारा वर्षांपर्यंतच्या सहवासाचा विचार करतों. मानसशास्त्रज्ञ[१] आल्फ्रेड ॲडलर म्हणतो, 'सर्वसाधारण शिक्षणाबरोबर अगदीं बाळपणापासूनच (early childhood) कामविकाराच्या बाबतींत ध्येयात्मक शिक्षण द्यावयास पाहिजे. तें शिक्षण ऋतुकाळापर्यंत मिळावयास पाहिजे. त्या शिक्षणाचें ध्येय विवाह करून कुटुंब स्थापन करणें हेंच शुद्ध कामपूर्तीचें (normal satisfaction) लक्षण आहे असें असावयास पाहिजे. मानवाची काम आणि विवाह या बाबतींत सुख मिळविण्याची लायकी अगर नालायकी अगर प्रवृत्ति आयुष्याच्या या प्राथमिक काळांत आपल्या जोडीदाराबद्दलची ज्या तऱ्हेची कल्पना केली असेल त्या कल्पनेवर अवलंबून आहे असें दिसून येतें ' या जोडीदारविषयक कल्पना तयार होण्याच्या काळांतच प्रत्यक्ष जोडीदार जर दिला तर त्या जोडीदारावरच मनाचें एकीकरण[२] होऊन मनाच्या कल्पना आणि प्रत्यक्ष स्थिति यांच्यामध्यें कमी वैषम्य होण्याचा जास्त संभव आहे. ध्येय सिद्ध झाल्यानंतर तदाकार व्यक्ति सांपडणें तितकें सोपें नाहीं.

१ Science of living by Alfred Adler.

२ Lectures on conditioned reflexes by Pavlov.

'निज[१] हृदय निवासी काय बाहेर आला।
म्हणउनि दमयंती पाहतां हर्ष झाला।'

अशी व्यवस्था जर कोणत्याही समाजशास्त्र्याला उत्पन्न करतां आली तर तो समाज जास्त सुखी होणार नाहीं काय ? आज ज्या युरोपियन संस्कृतीची इतकीं स्तुतिस्तोत्रें ऐकूं येतात त्या संस्कृतीची स्थिति या बाबतींत फारशी चांगली नाहीं : 'बहुतेक[२] सर्व लोकांची कामपूर्ति असमाधानकारक आहे' तीच चुकीची समाजरचना आपल्याकडे उत्पन्न केल्यास तेच परिणाम होतील ही गोष्ट सांगण्याला कांहीं कोणा ज्योतिषाची जरूरी नाहीं.

म्हणून विवाहसंस्कार हा स्त्रीचा मौंजीबंधन संस्कार आहे म्हणजे विद्याग्रहणाचा काल आहे असें आमचें मत आहे, तें स्मृतिशास्त्रांना धरूनच आहे:

वैवाहिको[३] विधिः स्त्रीणां औपनायनिकः स्मृतः।
पतिसेवा गुरौ वासो गृहार्थोऽग्निपरिक्रिया ॥

स्त्रीचा विवाहविधि हाच उपनयनविधीचे जागीं जाणावा. म्हणजे उपनयनानंतर पुरुषानें जे जे आचार करावयाचे तत्सदृश आचार स्त्रीनेंही करावयास पाहिजेत. कारण 'पतिरेको गुरुः स्त्रीणां।' मुलगा गुरुशुश्रूषा करणार, मुलगी पतिशुश्रूषा करणार. मुलगा वेदाध्ययन करणार, मुलगी गृहकृत्यांमध्यें दक्ष होणार. मुलगा यज्ञप्रक्रिया शिकणार, मुलगी गृहकृत्यें शिकत रहाणार. या स्थितींत विवाहसंस्था स्थिर होईल असें आमचें मत आहे. येथें दोघांही व्यक्तींचे बाबतींत, मुख्यतः स्त्रीचे बाबतींत मनाचें एकीकरण, जो मनुष्य पति होणार त्याचे ठायीं केलें गेल्यामुळें आणि तिच्या अंतःकरणाचा ध्येयरूप पुरुष तोच ठरल्यामुळें आणि,

अपत्यं धर्मकार्याणि शुश्रूषा रतिरुत्तमा।
दाराधीनः तथा स्वर्गः पितृणामात्मनः च ह ॥

अशी स्थिति असल्याकारणानें बालविवाह हा सर्व सुखासमाधानाचें एकच एक साधन आहे असें दिसून येईल. मनुवाक्याचा विचार केल्यास पुढल्या

१ रघुनाथपंडित.
२ On education by Bertrand Russel.
३ मनुस्मृति.

पिढीची सुप्रजा, पारलौकिक धर्मकार्य, व्यावहारिक कामानें थकलेल्या मनाचें विनोदन, उत्तम रतिसुख, फार काय सांगावें, आपला आणि पितरांचा स्वर्ग हा देखील– या सर्व गोष्टी पत्नीच्या आधीन असतात. ही सर्व स्थिति मानसशास्त्रदृष्ट्या विचार करून आणि शारीरपिंडाचा विचार करून साधारणतः आठ ते बारा या वयांत स्त्रीविवाह केला असतां घडून येईल असें आमचें स्पष्ट मत आहे. आतां ही गोष्ट प्रसिद्ध आहे कीं, जगाच्या आरंभापासून असा कोणताही काळ दाखवितां येणार नाहीं कीं, ज्यामध्यें संस्कृति आणि कामविकार यांच्यामध्यें मुळींच संबंध नव्हता. संस्कृतीच्या मुळाशीं कामविषयक सुखदुःखेंच असतात. सामाजिक मनुष्याचीं सर्व कृत्यें कामविकाराशीं निगडित असतात असें म्हणणारे लेखक केम्प आणि श्रोडर यांचीं मतें एकान्तिक म्हणून सोडून दिलीं तरी कामविकाराचें प्रत्यक्षीकरण मनुष्याच्या प्रत्येक कृतींत होतें यांत शंका नाहीं. मग तो कामविकारच जर समाजामध्यें आवरला गेला, त्या कामाचीच जर समाजांत सुव्यवस्था लागली तर त्या समाजांतील व्यक्ती अर्थातच जास्त सुखी होतील. अलीकडे पुष्कळ पंडितांकडून कलेची आणि वाङ्मयाची वाढ होणें हें एक संस्कृतीच्या श्रेष्ठत्वाचें लक्षण सांगितलें जातें. असलीं विधानें ऐकलीं म्हणजे सर्व समाजाच्या मनोवृत्तीची पहाणी (psycho-analysis) करावयास पाहिजे किंवा काय अशी अंधुक शंका आमच्या मनाला येऊं लागते. कलाकौशल्य आणि वाङ्मय यांचा कामविकाराशीं असलेला संबंध लक्षांत घेतां कलाकौशल्याची वाढ होणें म्हणजे त्या समाजांत कामविकाराची ऐहिक पूर्ति होत नसल्याचें लक्षण आहे. ब्लॉक[1] म्हणतो, 'मनुष्याच्या नैसर्गिक कामविकाराच्या पूर्तीला अडथळा झाला म्हणजे त्या पूर्तीच्या ठिकाणीं कांहीं तरी बदला उत्पन्न करणें हेंच मनुष्य उत्पन्न करीत असलेल्या कल्पनामय जगाचें कार्य (phantasy life of mankind) आहे.' येथपर्यंत स्त्रीपुरुषांच्या वैयक्तिक सुखांचा विचार झाला. पुढें स्त्रीपुरुषांच्या सामाजिक नीतीच्या दृष्टीनें म्हणजे व्यभिचारफैलावाच्या दृष्टीनें वयाची कल्पना कशी काय बसते तें पाहूं.

आपण असें गृहीत धरूं कीं, आपण सर्व श्री. हरबिलास सारडा यांनीं

१ Sexual life of our own time by Bloch.

पास करून घेतलेला कायदा पाळावयास तयार आहोंत. म्हणजे अर्थातच हिंदुस्थानांत तरी विवाह ऋतुप्राप्तीनंतरच होणार. परंतु विवाहाचें वय कितीच्या पुढें असावें असा कांहीं निर्बंध नसल्यामुळें विवाह ऋतुप्राप्तीपासून तों विटाळ जाईपर्यंत कोणत्या तरी काळांत होणार. त्याचा—म्हणजे विवाहाच्या कालाचा—रतिसुखावर आणि म्हणून पुढें व्यभिचारावर काय परिणाम होतो तो पाहूं. हिंदुस्थानांतील गणित उपलब्ध नसल्याकारणानें अमेरिकेंतील गणिताचें या बाबतींत काय मत आहे तें पाहूं. आम्ही हा एक मुद्दा पुढें आणीत नसून अभ्यासाची पद्धति म्हणून त्याचा निर्देश करीत आहोंत असाच पाहिजे तर त्याचा अर्थ समजावा. लेखकांनीं स्त्रीच्या प्रथमसंभोगाच्या दृष्टीनें वयाची वर्गवारी केली आणि शेंकडेवारीनें रतिसुखाची प्राप्ति (रतिरुत्तमा) किती स्त्रियांना प्राप्त झाली हें दाखविलें आहे. ज्या स्त्रियांचा सोळा ते वीस या वयांत प्रथम पुरुषसंबंध झाला, त्यांपैकीं शेंकडा त्रेसष्ट स्त्रियांना रतिसुखाच्या आत्यंतिक आनंदाची (climax) प्राप्ति झालेली दिसून आली. ज्यांचा प्रथमसंबंध एकवीस ते पंचवीस या वयाच्या दरम्यान झाला, त्यांपैकीं शेंकडा बावन्न स्त्रियांना तो आनंद प्राप्त झाला. ज्यांचा प्रथमसंबंध सव्वीस ते तीस या वयोखंडांत झाला, त्यांपैकीं शेंकडा छप्पनांना ती स्थिति प्राप्त झाली आणि ज्यांचा तिशीच्या पुढें प्रथमसंबंध झाला त्यांच्यापैकीं शेंकडा त्रेचाळीसांच्याच नशीबीं तें सुख लिहिलेलें होतें. ऋतुप्राप्ति झाल्याबरोबर लवकरच म्हणजे हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें दोन आठवड्यांतच ज्यांचा संबंध झाला त्यांच्यामध्यें या सुखप्राप्तीचें प्रमाण काय पडतें हें सांगण्याचें साधन अमेरिकेंत सांपडत नाहीं. कारण अमेरिका सुधारलेली आहे. परंतु यावरून एक गोष्ट निष्पन्न होते ती अशी कीं, स्त्रीचा पिंड जसजसा निबर होत जाईल तसतशी त्या पिंडाची कामविकाराच्या पूर्तीची लायकीच कमी होत जाते. या असमाधानाच्या वृत्तींत, रक्ताच्या असंतुष्ट चळवळींत आणि मनाच्या खळबळींत समाजाच्या अस्थिर वृत्तीचा उदय होतो. हीच स्थिति म्हणजे सुखाची वाढ अशीही गोष्ट एकादा सांगूं लागेल, परंतु त्यानें आम्हीं मागें दिलेलीं गमकें लावून ती गोष्ट सिद्ध करावयास पाहिजे.

प्रजोत्पादनाला लायक झालेली स्त्री आणि पूर्ण वाढ झालेला पुरुष यांच्याबद्दलचा विचार करतां असें दिसून येतें कीं, स्त्रीपिंडावर बाह्य परिस्थितीचे परिणाम जास्त प्रमाणांत घडतात. जनावरें कांहीं सुशिक्षित नसतात व कामविकाराची पूर्ति समाजाच्या दृष्टीआड होऊन करावी वगैरे शोध त्यांना लागलेले नसतात. त्यामुळें त्यांचें कार्य कोठेंही चालू रहातें. त्या दृश्याचा मानवी मनावर पुढील परिणाम होतो : 'तें' असें रहस्य आहे कीं, त्याचें त्यांच्या अंतःकरणांत गूढ आणि गंभीर पडसाद उमटूं लागतात. अगदीं अज्ञान आणि परोक्षमन्मथ अशा मुलांमध्यें देखील अस्फुट अशी कामवासना उद्दीप्त होते. हा परिणाम मुलांच्यापेक्षां मुलींमध्यें जास्त प्रमाणांत होतो असें दिसून येतें. असें दृश्य पाहिलें असतां पूर्ण वाढ झालेल्या स्त्रियांमध्यें देखील तेच परिणाम घडून येतात असें दिसतें.' एकंदरींत सुखदुःखद अशा स्पर्शांचा ( stimulus ) स्त्रीपिंडावर जास्त परिणाम होतो असें दिसतें. हीच गोष्ट

पौंश्चल्यात् चलचित्तात् च नैस्नेह्यात् च विशेषतः ।
रक्षिता यत्नतोऽपीह भर्तृष्वेता विकुर्वते ॥
एवं स्वभावं ज्ञात्वाऽऽसां प्रजापतिनिसर्गजम् ।
परमं यत्नमातिष्ठेत् पुरुषो रक्षणं प्रति ॥

या श्लोकांत मनूनें सांगितली आहे. त्यांच्या शरीराचा आणि मनाचा असा गुणच असेल तर त्यांच्या स्वतःच्याच सुखाकरितां त्यांना शक्य तेवढें विकृत अशा बाह्य संस्कारापासून अलिप्त ठेवणेंच इष्ट आहे असें आम्हांला वाटतें. यांत कांहीं त्यांना अस्वतंत्रता नाहीं तर त्यांच्या निसर्गज स्वभावाला वळण लावण्याचाच प्रयत्न आहे. म्हणून मनु म्हणतो,

पुरुषस्य स्त्रियाश्चैव धर्मे वर्त्मनि तिष्ठतोः ।
संयोगे विप्रयोगे च धर्मान् वक्ष्यामि शाश्वतान् ॥
अस्वतंत्राः स्त्रियः कार्याः पुरुषैस्वैर्दिवानिशम् ।
विषयेषुज सज्जन्त्याः संस्थाप्या आत्मनो वशे ॥

---

१ Studies in psychology of sex–Vol. V by Havelock Ellis.
२ Short stories by Guy De Mauppassant.
३ मनुस्मृति.

पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।
रक्षन्ति स्थविरे पुत्राः न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥
कालेऽदाता पिता वाच्यो वाच्यश्चानुपयन् पतिः ।
मृते भर्तरि पुत्रस्तु वाच्यो मातुररक्षिता ॥

वरील चर्चेवरून दिसून येईल कीं, मनूनें स्त्रीरक्षणाची व्यवस्था अत्यंत शास्त्रीय पद्धतीनें केलेली आहे. उलट, आज पहावें तों पिंडाच्या लायकींत फरक असो, मानसिक घटनेंत फरक असो, कामविकाराच्या प्रत्यक्षीकरणांत फरक असो, सामाजिक कार्यांत फरक असो, कांहींही असो, स्त्रीपुरुष हे समान आहेत आणि त्यांना समान हक्क पाहिजेत असें म्हटलेलें ऐकूं येतें. समान हक्क म्हणजे तरी काय याचें वर्णन एक समाजशास्त्राचा अभ्यासक पुढीलप्रमाणें करतो : 'पत्नीचे हक्क–(१) पतीनें उदरभरण केलें पाहिजे, (२) पतीचीं मतें कशींही असलीं तरी त्यानें पत्नीला घराबाहेर कार्य करण्याची मोकळीक ठेविली पाहिजे, (३) आपलें निवासस्थान कोठें असावें हें ठरविण्याचा हक्क, (४) आपले मित्र, स्नेही, सोबती घरीं बोलावून नवऱ्याच्या खर्चानें त्यांची बरदास्त ठेवण्याचा हक्क, (५) प्रजा उत्पन्न करावी अगर करूं नये हें ठरविण्याचा हक्क, (६) घरकामें करण्याकरितां नवऱ्याच्या खर्चानें नोकर ठेवण्याचा हक्क, (७) स्वतःपुरती स्वतःची मालकी म्हणजे बहुशः कामपूर्ति हें विवाहाचें अंग नाहीं असें मानण्याचा हक्क आणि (८) सर्वसाधारण दृष्टीनें एकूणएक बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य. पतीचे हक्क—एकही नाहीं.[१] ' या बाबतींत आम्ही भाष्य करीत नाहीं. यालाच जर स्त्रीपुरुषांचे समान हक्क असें म्हणावयाचें असेल तर समान या शब्दाचा अर्थ तरी बदलावयास पाहिजे.[२] न्यायाधीश[३] सर एडवर्ड पॅरी म्हणतो, ' स्त्रियांना जर कायद्यांत सारखे हक्क मिळाले आहेत तर त्यांनीं निव्वळ स्त्री म्हणून पूर्वी दिल्या गेलेल्या सवलती आतां हक्क म्हणून तशाच राखून ठेवणें हें त्यांच्या दर्जाला लांछनास्पद आहे. ' आम्ही या स्थितीचें वर्णन पुढील समीकरणानें करीत असतों. सारखे हक्क+सर्व सवलती=स्त्रियांचे हक्क.

१ Women and society by Meyrick Booth.
२ Unfair sex by George Whitehead.
३ Christian ethics by Dean Inge.

वरील चर्चेवरून स्त्रियांना हिंदु समाजांत मिळणारे हक्क हे स्त्रिया पाश्चात्य समाजांत जे हक्क आज मागत आहेत त्यांपेक्षां समाजाला जास्त हितावह आहेत हें दिसून येईल.

लोकसंख्या आणि पुढील पिढी या दृष्टीनें विचार करूं. लोकसंख्या आहे इतकीच रहावयाची असल्यास आजच्या विवाहित दांपत्यानें निदान दोन तरी कार्यकर्ती, पूर्ण वाढलेलीं मुलें पुढील पिढींत ठेवावयास पाहिजेत. म्हणजे या दांपत्याचीं दोन मुलें तरी निदान वीस वर्षांच्या–अगर आजचे सुशिक्षितांचें प्रमाण मानल्यास तीस वर्षांच्या–तरी पुढें पर्यंत जगावयास पाहिजेत. नुसतें दोन मुलें जगलीं पाहिजेत असेंही म्हणून काम भागत नाहीं. दोन मुलगेच जगले तर पुढील पिढींत माता रहात नाहींत आणि मातेशिवाय प्रजा वाढविण्याची युक्ति अजून सांपडलेली नाहीं (या बाबतींत शास्त्रज्ञांच्या काय खटपटी चालल्या आहेत, ऑक्टोजेनेसिस म्हणजे काय वगैरे सर्व गोष्टींची जिज्ञासूंनीं जरूर माहिती करून[1] घ्यावी). म्हणून या पिढींतील एका मातेच्या ठिकाणीं पुढील पिढींत एक माता तरी शिल्लक रहावयास पाहिजे. त्या नव्या मातेची प्रजोत्पादनाची शक्ति तिच्या मातेच्या शक्ति इतकीच असावयास पाहिजे. तरच लोकसंख्या असेल तेथें स्थिर राहील. माता अगर त्यांची प्रजोत्पादक शक्ति यांपैकीं एकही यत्किंचित कमी झाल्यास लोकसंख्या घटूं लागेल. जास्त झाल्यास वाढूं लागेल. पुन्हां वेगवेगळ्या थरांची वेगवेगळी शक्ति विचारांत घ्यावयाची असल्याकारणानें एकंदर समाजाचा गटानें विचार करतां येणार नाहीं.

प्रथमतः सर्वसाधारण मनुष्यप्राण्यामध्यें संततीची संख्या तरी किती होते याचा विचार करूं. असें दिसून[2] आलें कीं, सेहेचाळीस वर्षेंपर्यंत जगलेल्या आणि लोकसंख्येची खेंचाखेंच नसलेल्या देशांत रहाणाऱ्या १०,२७६ स्त्रियांचा विचार केला असतां त्यांच्यामध्यें निसंतानापासून तों तीसपर्यंत संतती होण्याच्या सर्व तऱ्हा दिसून येतात. हिंदुस्थानासारख्या[3] आधींच खेंचाखेंच झालेल्या राष्ट्रांत जननसंख्या आपल्या मर्जीनुरूप वाढवितां येत

१ The science and Future by J. B. S. Haldane.
२ Genetical theory of natural selection by R. A. Fischer.
३ Population problem by Carr Saunders.

नाहीं. वर सांगितलेल्या स्त्रियांपैकीं दहा टक्के पूर्ण नापीक ठरल्या. हिंदुस्थानांत[१] सहा टक्के नापीक ठरतात. एकंदरीनें पहातां चवदाच्या वर कोणाही स्त्रीला संतती झाली नाहीं. एकीला एकवीस, एकीला बावीस, एकीला चोवीस आणि एकीला तीस इतकी संतती झाली. या चार स्त्रियांची प्रकृति बिघडली होती किंवा काय त्यासंबंधीं संततिनियमनवाल्यांनीं माहिती काढून जाहीर करावी. सर्वांत जास्त संख्या सात अगर आठ मुलें होणाऱ्या स्त्रियांची होती. म्हणजे सर्वसाधारण गणितागत पद्धतीची माहिती असलेला मनुष्य सहज सांगेल कीं, सरासरी संख्या कोठें तरी साताच्या जवळ पडेल. अगदीं बरोबर सरासरी ६·१९ बसली. यांपैकीं देखील ज्यांना सहा, सात, आठ, नऊ मुलें झालीं त्या तीस टक्के असून देखील त्यांनीं पन्नास टक्केच्या वर संतती पैदा केली. विवाहितांचें हें प्रमाण झालें. बरीच विवाहयोग्य लोकसंख्या जर अविवाहित राहील तर त्यांचीही जागा विवाहितांनींच भरून काढावयास पाहिजे म्हणून किती लोकसंख्या अविवाहित रहाते त्याचें प्रमाण काढलें पाहिजे. आतां युरोपांतील सुधारलेल्या देशांतील जीवनशक्ति पहावयाची तर सर्वसाधारणतः वीस वर्षांपर्यंत पाऊण हिस्सा संख्या शिल्लक रहाते. विवाहित पुरुष सर्वसाधारण ४८ टक्के असतात. हीं सर्व प्रमाणें घेतलीं असतां एवढ्याच संततीवर लोकसंख्या जगवून ठेवणें शक्य आहे काय याचा समाजसुधारकांनीं विचार करावयास पाहिजे. कोणती कन्या सुप्रज आणि कोणती अप्रज याची साधारण कल्पना असली तरीही नक्की कोणाचीच प्रजोत्पादनशक्ति सांगणें शक्य नसल्यामुळें सुधारणेच्या भानगडींत जर अर्धी प्रजा भरून काढणाऱ्या स्त्रियाच सांपडल्या तर लोकसंख्या कायम राहील काय? म्हणून लोकसंख्या या दृष्टीनेंच विचार केला तरी प्रत्येक विवाहयोग्य स्त्रीचा विवाह झालाच पाहिजे आणि आम्हीं वर दिलेल्या कारणाकरितां तो योग्य वेळीं व्हावयास पाहिजे.

प्रजोत्पादक शक्ति उत्तम कोणत्या काळांत असते याचा विचार गणितानें करण्याची पद्धति बरीच अवघड आहे. आम्हीं पुढें दिलेल्या सिद्धां-

---

१ Census of India 1931.

ताच्या पुष्टयर्थ करावयाच्या गणिताची पद्धति आम्ही गुरुवर्य र. पु. परांजपे अगर माझे मित्र गणपतराव महाजनी यांना देण्यास तयार आहोंत व ते गणित करून जें उत्तर काढतील तें उत्तर आम्हांला मान्य आहे. 'गणि[१]-तानें पाहिलें तर ज्या समाजामध्यें ऋतुप्राप्तीबरोबर अगर त्यानंतर थोडक्याच काळांत विवाह होतात त्या समाजांतील उत्कृष्ट प्रजोत्पादनाच्या लायकीचें वय ( Reproductive value )बाराच्या पुढें पडल्यास मला आश्चर्य वाटल्याशिवाय रहाणार नाहीं.' पुन्हा बारा या वयाचा इतर कांहीं गोष्टींशींही संबंध आहे. 'बारा[२] वर्षांच्या वयाच्या सुमारास स्त्रियांच्या मानस पिंडांत एकदम क्रांति झालेली दिसते; ती मुलांचे बाबतींत आणखी एकदोन वर्षे होत नाहीं' ह्यालाच ऋतुप्राक् ऋतुमतीत्व म्हणतात. 'अंतः-रजो भवति तेषां पनसोदुंबरादिवत् ', 'दशवर्षा भवेद्गौरी अत उर्ध्वं रजस्वला' वरील वाक्यावरून तीच गोष्ट प्रतीत होते. शारीरशास्त्र आणि मानसशास्त्रदृष्ट्या समाजव्यवस्था शुद्ध रहावयाची असल्यास कन्यांचे विवाह ऋतुप्राक्कालींच व्हावयास पाहिजेत असेंच दिसून येईल.

अलीकडे प्रवृत्त होत असलेली विवाहविषयक कल्पना पाहिली, तर प्रत्येक व्यक्ति, प्रत्येक कुटुंब, प्रत्येक जाति यांची बेजबाबदारपणाकडे जास्त जास्त प्रवृत्ति होत चालली आहे असें दिसून येईल. चुकी झाली तर सुधारूं नये काय ? असा प्रश्न कांहीं लोक विचारतात. चुकी झाल्यास सुधारावी याबद्दल शंकाच नाहीं. परंतु जास्त चुक्या कां होऊं लागल्या याचें कारण सांगावयास पाहिजे. आमच्या मतें बुद्धीपेक्षां भावनांना जास्त कौल दिला जातो हें आहे. मानवी भावनांचा परिपोष झाला पाहिजे, ही जर गोष्ट खरी तर अनेक गोष्टी विचारांत घेऊन त्यांचा निश्चय ठरविणाऱ्या बुद्धीचा परिपोष व्हावयास पाहिजे, हीही गोष्ट तितकीच खरी असें आम्हांला वाटतें. जगाच्या इतिहासाकडे पाहिलें असतां, भावनांनीं दिलेले निर्णय आणि बुद्धीनें दिलेले निर्णय, यांपैकीं कोणत्या निर्णयांनीं सर्वसाधारण समाजाचें कल्याण केलें आहे ही गोष्ट सहज समजेल. राजकारणासारख्या ज्या विषयामध्यें

१ Genetical theory of natural selection, by R. A. Fischer.

२ How people mentally differ by Laird – scientific American April 1939

स्वतःच्या आत्यंतिक भावनांचा पगडा बसण्याचें मुळींच कारण नाहीं, त्यामध्यें देखील सर्वसाधारण मनुष्य किती चुक्या करतो हें पाहिल्यानंतर ज्या बाबतींत मनुष्याच्या सर्व भावना आंधळेपणानें धांव घेण्याचा संभव जास्त, अशा विवाहासारख्या बाबतींत किती चुक्या होण्याचा संभव आहे, हें ज्याचें त्यानें मनाशीं ठरवावें. या प्रश्नामध्यें कांहीं तरी मार्गदर्शक निश्चित खुणा असल्याशिवाय निव्वळ व्यक्तीच्या मतावर हा प्रश्न सोंपविणें ही चूक आहे असें आम्हांला वाटतें. प्रेम—कोणीही कितीही गोडवे गाइले तरी—मानवी मनाचें एक वेड आहे म्हणून प्रेमावर विवाह अवलंबून ठेवतां येत नाहीं. पुढें तें उत्पन्न होतेंही आणि त्या वेळीं तें स्थिरस्वरूपाचें असतें. फोरेल म्हणतो, 'कामविकाराचा[१] पहिला तडाखा ओसरल्यावरच खरें ध्येयरूप प्रेम प्रतीत होत असतें.' परंतु कामसंतर्पणाची इच्छा, स्त्रीपुरुषविषयक आपलेपणाची भावना, मनुष्याची अधिकाराची अपेक्षा (कारण बारीक सारीक का असेना, कोंणत्या तरी बाबतींत अधिकार गाजविण्याची इच्छा असणें हा साधारण मानवधर्म आहे), कुटुंबें जीं संततिरूपानेंच या जगावर रहाणार तीं स्थापन करण्याची वासना, त्याकरितां आपला वारस असावा अशी उत्कट अपेक्षा, त्या कुटुंबाकरितां द्रव्यार्जन आणि अशा तऱ्हेनें शतकेंचीं शतकें आपली जाति मागें ठेवण्याचा आग्रह, हे सर्व गुण विवाहाचें अधिष्ठान होऊं शकतील. विवाह हें चंचल सृष्टीमध्यें समाजांना स्थिरीकरण देण्याचें एक प्रबल साधन आहे. तोच हेतु नष्ट केल्यानंतर विवाहाचें कारणच उरत नाहीं. म्हणून पूर्वकालच्या विवाहामध्यें जीवनार्थ कलहाची, धक्काधक्कीची, सर्व जबाबदारी पुरुषवर्गावर सोंपविली होती आणि अशा तऱ्हेनें स्त्रीपुरुषामध्यें समानता आणलेली होती. कारण कीं, स्त्रीही पुरुषाचें अर्थार्जनाचें काम करूं शकेल. परंतु, पुरुष हा स्त्रीचें प्रजोत्पादनाचें काम करूं शकणार नाहीं. स्त्री ही पुरुषाचा जर आर्थिक गुलाम असें मानलें, तर पुरुष हा स्त्रीचा कौटुंबिक गुलाम आहे. स्त्री जर पुरुषावर अन्नाकरितां अवलंबून असेल, तर पुरुष स्त्रीवर प्रजेकरितां अवलंबून नाहीं काय ? स्त्रीपुरुष हे असेच पूरक घटक रहाणार. म्हणून स्त्रीपुरुषांची समानता स्त्रियांनीं पुरुषांच्या धंद्यांत पडल्यानें उत्पन्न होणार नाहीं असें आम्हांला वाटतें. कारण

१ The sexual question by Forel.

कीं, स्त्रियांना पुरुषांचीं सर्व कामें आणि शिवाय एक काम हें नेहमींच रहाणार. म्हणून तर स्त्रियांना पुरुषाप्रमाणेंच निष्फळ खोडें बनविण्याचें आज प्रयत्न चाललेले आहेत.

विवाहाचें खरें स्वारस्य तो विवाह आमरण रहाण्यांतच आहे. कारण भावना, मनोविकार, तात्कालिक लहरी या सर्व अडचणींतून आपण हातांत घेतलेलें काम तडीस नेण्याची—वाटेल तेवढे कष्ट सोसून अगर दुःख भोगून तडीस नेण्याची—लायकी त्या दोन व्यक्तींत आहे असें सिद्ध होतें. या कारणाकरितांच स्थिर समाजामध्यें विवाहाला लायक अशा व्यक्ती निवडून त्यांचें बाळपणापासून पद्धतशीर शिक्षण करणें, हें कुटुंबांचें कार्य असून व्यक्तीकडे त्याचा संबंध पोहोंचत नसे. आज विवाह पुढें ढकलावा असें म्हणणारा फांकडा तरूण दूरदर्शी दिसत असेल, परंतु आयुष्यांतील या अत्यंत महत्त्वाच्या भागाला, जरूर असलेले जीवनार्थ कलहाचे कष्ट सोसण्यास आपण असमर्थ आहोंत, असा तो कबुलीजबाबच देत असतो. शिक्षणाचे काळांत विवाह करून देणारीं आईबापें, नातलग अगर इष्टमित्र कांहीं त्या वेळीं या गृहस्थाजवळ बायकोची पोटगी मागत नाहींत. परंतु पुढें तरी कितपत कष्ट करण्याची या सुशिक्षिताची तयारी असते ! आमच्या मतें विवाहाचें वय वाढत जाणें हें जीवनार्थ कलहांत समाजाची लायकी कमी होत जाण्याचें स्पष्ट द्योतक आहे. विवाह न करणारापेक्षां विवाह करून घटस्फोट मागणारा मनुष्य अगर मागणारी स्त्री हीं दोघेंही विवाह न करणारापेक्षां जास्तच तिरस्करणीय ! कारण विवाह न करणारा आपली नालायकी समजून स्वस्थ तरी बसतो, परंतु विवाह करणारा स्वतःला लायक समजून पुढें नालायक ठरतो. मग आपली नालायकी झांकण्याकरितां अभिरुचि, प्रेम, स्वभावांचा ना जुळतेपणा वगैरे अनंत कल्पना पुढें मांडूं लागतो. हेंच तें आधुनिक व्यक्तिस्वातंत्र्य. सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं, सर्व ठिकाणीं पाहिलें तर कोणत्याही ध्येयाला लागणारी हिंमत समाजांतून जात चालली आहे असाच याचा अर्थ आहे. ज्यामध्यें जबाबदारी आणि लायकी दिसून येईल तें ध्येयच नष्ट केल्यानंतर मग लायकीचा निकष ज्यामध्यें कधीं काळीं लागेल अगर लागणार नाहीं, अशीं पुष्कळ

**५९ आमरण विवाह**

पोकळ ध्येयें उत्पन्न करण्यांत आलेलीं आहेत. त्या सर्व ध्येयांचा व्यक्तींच्या जिव्हाळ्याच्या शक्तींच्या निर्णयाकडे मुळींच उपयोग होत नाहीं. कारण त्या सर्व ध्येयांमध्यें, मनुष्याच्या सर्व कर्तृत्वाला व्यापून राहिलेली मूळ जी कामशक्ति, तिचें नियंत्रण करून तिला वळण लावण्याचें मुळींच कारण नाहीं. विवाहाची प्रवृत्ति सृष्टीनें ठरविलेल्या योग्य वेळीं होणें हें समाजाचें श्रेष्ठत्व दर्शवितें, कनिष्ठत्व नव्हे. इतर ध्येयांमध्यें कामविकाराच्या नियंत्रणाची जरूरी नाहीं. विधवा अगर कुमारिका यांना भ्रष्ट करावयाच्या असल्यास संतति-नियमन, सुवासिनी स्त्रिया पाहिजे असल्यास संतति झाल्यास हरकत नाहीं. पुष्कळ स्त्रियांशीं रत होणारे पुरुष त्यांना या सर्व संबंधांची जरूरी असते म्हणून नव्हे, तर पुष्कळ स्त्रिया आपण वश करूं शकतो म्हणून आपण इतर पुरुषांपेक्षां कांहीं तरी श्रेष्ठ आहों अशी घमेंड मारणें, हीच कांहीं मनांची—समाजांतील पुष्कळ मनांची—प्रवृत्ति असते तिला अनुसरत असतात. येथें व्यक्तीला श्रेष्ठत्वाची बाधा झालेली असते ( superiority complex ) हा मानसशास्त्रीय सिद्धांत संततिनियमनवाल्यांनीं विसरूं नये.[1] संततिनियमन हा समाजशास्त्रदृष्ट्या विचारांत घेण्याच्या लायकीचा देखील प्रश्न नाहीं[2].

**६० बालविवाहाचें विरुद्ध सांगितलेलीं कारणें आणि त्यांचें खंडण**

बालवयांतच विवाह करणें इष्ट आहे. 'प्रदानं प्रागृतोः' हा नियम हितकारक, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकीच स्पष्ट आहे. मग आजच प्रौढ विवाहाकडे प्रवृत्ति कां, असा प्रश्न उत्पन्न होतो. त्या गोष्टीला पोकळ ध्येयोत्पन्न पुष्कळशीं कारणेंही सांगितलीं जातात. त्या कारणांचा विचार करूं.

( १ ) स्त्रियांवर अकालीं मातृपद लादलें ( १ ) जातें. ( २ ) कोंवळ्या स्त्रीला पूर्ण वाढ झाली नसल्यामुळें प्रसू-ना त्रास होतो. ( ३ ) कोंवळ्या आईच्या मुलांमध्यें जातमृतांचीच जास्त असतें—बालमृत्यूंचें प्रमाण जास्त असतें. ( ४ ) कोंवळ्या ामविकाराची फारशी कल्पना नसते. ( ५ ) स्त्रियांचें शिक्षण

---

१ मनोविश्लेषणशास्त्रवेत्ते अशा पुरुपाला हीनत्वाची बाधा ( Inferiority complex ) झालेली असते असें म्हणतात.

२ Types of economic theory by Othinar Spann.

पूर्ण होत नाहीं. अलीकडे शिक्षण शब्दाचा जीवनार्थ कलहांत उपयोगी पडणारे काटकपणा वगैरे गुण असा अर्थ होत नाहीं. नाहीं तर वाचक भलताच गैरसमज करून घेतील. शिक्षण शब्दानें मातृपदाला जरूर लागणारे गुण असाही अर्थ होत नाहीं. तर शिक्षण म्हणजे शिक्षण अथवा वाङ्मय. म्हणजे मनोमय मनोरे रचण्याकरितां ज्याची निर्मिति झालेली आहे असें जें ललितवाङ्मय तें. मग त्यांत प्रतीत होणारे खोटे सिद्धांत उराशीं बाळगून बसणें.

या सुधारकी मुद्यांचा पूर्ण विचार करण्यापूर्वी पाश्चात्य पंडितांबद्दल कांहीं सूचना देणें जरूर आहे. पाश्चात्य पंडित गोळा करतात तेवढी माहिती घ्यावी, परंतु त्यावरून त्यांनीं काढलेलीं अनुमानें घेऊं नयेत. याचें कारण असें कीं, स्वतःच गोळा केलेल्या माहितीच्या आधारें जे कांहीं समाजविषयक सिद्धांत प्रतीत होतील, ते छातीठोक मांडण्याची हिंमत त्यांच्यामध्यें आलेली नसते. आम्ही मागें लेनार्ड डार्विन यानें जातिविषयक सिद्धांतांत कशी मरसोड केली आहे, ती गोष्ट दाखविलीच आहे. येथें एक दोन उदाहरणें घेऊन आमचें म्हणणें जास्त विशद करूं. प्रथमतः चारी खंडांत कीर्ति झालेला लेखक हॅवेलॉक एलिस याचेंच उदाहरण घेऊं. प्रथमतः बाल्यपणींच मातृपद आल्यास तें आई, मूल आणि समाज या तीनही अंगांच्या दृष्टीनें किती हितकारक आहे, त्याचा पद्धतशीर विचार केल्यानंतर तो म्हणतो, ' अशा तऱ्हेची प्रजोत्पादनाची व्यवस्था अर्थात अपवाद म्हणून होईल, कारण पुष्कळशा स्त्रियांना ती सोयीवार होणार नाहीं. ' या एकाच वाक्यांत या गृहस्थाच्या मनाची ठेवण प्रतीत झाली आहे. आम्हीं मागें सांगितलेंच आहे कीं, समाजाकडे पहाण्याच्या शास्त्रीय पद्धति ( scientific method ) आणि मानवी पद्धति ( Human method ) अशा दोन पद्धती आहेत. हा गृहस्थ माहिती शास्त्रीय पद्धतीनें गोळा करतो, आणि पुढील अनुमानें मानवी पद्धतीनें काढतो. त्याच्या मतानें सोयी, गैरसोयी या शास्त्रावर अवलंबून नसून त्यांच्या सोयी-गैरसोयीकरितां, त्यानें स्वतःच सांगितलेले सिद्धांत बदलण्याला हरकत नाहीं. आमच्या मतानें जे कांहीं तुटपुंजें शास्त्रीय ज्ञान मनुष्याला होत असेल, त्यांच्यांशीं विरोधी वर्तन कर-

१ Studies in psychology of sex by Havelock Ellis, Vol. VI.

ण्याचा स्त्रीला अगर पुरुषाला मुळींच हक्क नाहीं. परंतु येथें तर सोय गैरसोय हा महत्त्वाचा मुद्दा होऊं पहात आहे. शास्त्र सांगणाऱ्यानें स्पष्ट सांगितले पाहिजे कीं, शास्त्र असें आहे आणि सृष्टि आपले नियम तुमच्या सोयीकरितां बदलील असें वाटत नाहीं. तो लेखक म्हणतो, 'प्रत्येक उदाहरणाचा त्या उदाहरणापुरताच विचार करावयास पाहिजे.' किती विद्वत्तापूर्ण वाक्य हें! प्रत्येक उदाहरण सर्वसाधारण नियमापासून किती दूर अगर किती जवळ आहे व त्याचा एकंदर नैतिक मूल्यावर किती परिणाम होईल, याचा विचार करावयास नको काय? नीतिशास्त्र व्यक्तिप्रधान झाल्यास समाज शिल्लकच रहात नाहीं, ही गोष्ट आम्हीं मागें दाखविलीच आहे. चॅटरटर्न हिल म्हणतो, 'पाश्चात्य संस्कृतीच्या मुळाशीं जीं व्यक्तिप्रधान नैतिक मूल्यें आहेत, तीं आजच्या समाजाच्या अनैतिक स्थितीचें मूळ आणि प्रधान कारण आहेत. समाजांचा इतिहास पाहिला, तर हें व्यक्तिप्राधान्य समाजांच्या नाशाची पूर्व तयारी करीत असतें.' जो जो संघटनात्मक वर्ग निर्माण करावा त्याचा त्याचा नाश करणें हेंच व्यक्तिप्राधान्याचें कार्य आहे. कुटुंबसंस्था निर्माण केली कीं, व्यक्ति तिचा नाश करावयास तयार! जाति निर्माण केली कीं, व्यक्ति त्या जातीचा नाश करावयास उद्युक्त! असा कोणताही संघटनाचा प्रकार दाखवितां येणार नाहीं कीं, व्यक्तींनीं त्याच्या नाशाचा प्रयत्न केला नाहीं. व्यक्तींचा अधिकार किती आणि समाजाचे नियंत्रण कोठपर्यंत हें निश्चित करणें, हाच तर समाजशास्त्राचा मुख्य प्रश्न आहे. पाश्चात्य शास्त्रज्ञ, मुत्सद्दी, सर्वसाधारण पुढारी, कोणत्याही मताचा असला तरी हा प्रश्न उत्पन्न झाला असतां, तो आपला निर्णय व्यक्तिप्राधान्याच्या बाजूनें देतो. मग मुद्दा कांहींहि असो! पुन्हां ते शास्त्रांचे निष्कर्ष म्हणून सांगतात. ते निष्कर्ष ते समाजांत उपयोगांत आणतील असेंही नाहीं. याचें कारण असें आहे कीं, ते सर्व ख्रिस्ती नैतिक मूल्यांच्या वातावरणांत वाढलेले असतात. बरट्रांड रसेल[३] म्हणतो, 'जुन्या आणि आज आशिया खंडांत हयांत असलेल्या संस्कृतीप्रमाणें कोणत्याही तऱ्हेचा ख्रिस्ती

१ Ethics and Modern world problems by McDougal.
२ Heredity and selection in sociology by Chatterton Hill.
३ Marriage and Morals by Bertrand Russell.

समाज जीवशास्त्राच्या पायावर उभारणें शक्य नाहीं.' शास्त्रांत त्यांना कांहींही दिसलें, तरी त्यांच्या ख्रिस्ती समजुती त्यांनीं दिलेल्या निर्णयांत आपला प्रवेश केल्याशिवाय रहाणारच नाहींत. अशा तऱ्हेनें ते जीं अनुमानें काढतील तीं त्यांनींच दिलेल्या शास्त्रीय नियमानें सिद्ध असोत अगर नसोत, ते लोक आपल्या ग्रंथांतून लिहिणार आणि आम्ही तीं डोळे मिटून वाचणार. आमच्या म्हणण्याचा अर्थ असा कीं, ते साधनसामुग्री अतिशय काटेकोरपणानें गोळा करतात म्हणून घ्यावी, परंतु अनुमानें काढतांना न्यायशास्त्राचे कडक नियम लावूनच अनुमानें काढावयास पाहिजेत.

एकंदरींत पाश्चात्य ग्रंथ कसे वाचावेत ह्या संबंधीं एक ग्रंथच लिहावा लागेल. आणखी एकच उदाहरण घेऊं. 'द्विलिंगी[1] प्रजेमध्यें असलेला कामविकार हा मुख्यतः प्रजोत्पादनाकरितां आहे असें नाहीं. जीवशास्त्राचा श्रीगणेशा शिकलेल्या कोणाही व्यक्तीला ही गोष्ट माहीत आहे कीं, कामविकाराशिवाय लाखों वर्षे एकलिंगी प्रजेचें उत्पादन चालू आहे. म्हणून सिद्ध झालें कीं, कामविकाराचा हेतु प्रजोत्पादन नव्हे.' इतक्या लहानशा उताऱ्यांत एकून एक सर्व शास्त्रांचा खून झालेला दुसरा कोठेंही आमच्या आटळांत नाहीं. ह्या सर्व उपद्व्यापाचा हेतू काय म्हणाल, तर कामपूर्ति आणि प्रजोत्पादन यांचें विभक्तीकरण करून दाखवावयाचें. त्यांचें तर्कशास्त्र खालीलप्रमाणें मांडून दाखवितां येईल.

कांहीं ठिकाणीं प्रजोत्पादन हा कामविकाराचा हेतू नाहीं.

.ˑ. सर्व ठिकाणीं प्रजोत्पादन हा कामविकाराचा हेतू नसावा.

कांहीं ठिकाणीं कामविकाराशिवाय उत्क्रांति चालू आहे.

.ˑ. सर्व ठिकाणीं कामविकाराशिवाय उत्क्रांति चालू असावी.

त्याच्या जोडीला त्यांच्या धर्तीवर बसविलेला आम्ही आपला एक सिद्धांत सांगतों.

सृष्टींत एकलिंगी प्रजेंत ( Parthenogentic ) कामविकार नाहीं.

.ˑ. द्विलिंगी प्रजेंतही कामविकार नसावा.

---

१ Sex and progress by C. P. Gilman – sex in civilization.

∴ कामविकाराच्या पूर्तीची कोठेंच जरूरी नसावी.

∴ आधुनिकांचें लैंगिक ज्ञानासंबंधीचें सर्व लिखाण हें एक थोतांड आहे.

एकाद्या महामूर्खांच्या हातांत शास्त्रें सांपडलीं म्हणजे असाच परिणाम व्हावयाचा. या बाईंना कार्यकारण भाव कळत नाहीं. द्विलिंगी[१] प्रजेच्या कामविकार हें कारण आणि उत्क्रांति हें त्याचें कार्य आहे. कारण-शब्दाची संस्कृत न्यायशास्त्रांत[२] 'असाधारणं कारणं करणं' अशी व्याख्या करतात. पाश्चात्य न्यायशास्त्रांत 'जगाच्या व्यापारामध्यें जी गोष्ट घडली असतां एकादा परिणाम घडून येतो, व जी गोष्ट न घडल्यास तसा परिणाम घडून येत नाहीं, ती गोष्ट त्या परिणामाचें कारण असें जाणावें.' अशी व्याख्या[३] करतात. मग द्विलिंगी प्रजेमध्यें कामविकाराशिवाय आणि रतिक्रियेशिवाय प्रजोत्पादन होऊं शकतें असें बाईंनीं दाखविल्यास रतिक्रिया आणि प्रजोत्पादन यांचा कार्यकारण संबंध सुटेल, तोपर्यंत नाहीं...म्हणून आम्हीं म्हणतों कीं, प्रजोत्पादन हाच रतिक्रीडेचा हेतु आहे आणि रतिक्रीडेशीं संलग्न असलेलें सुख हें प्ररोचक म्हणून दुय्यम हेतू होऊं शकेल. येथें आम्ही वर दाखविल्याप्रमाणें एकलिंगी प्रजेचीं उदाहरणें देत बसणें हे गैर लागू आहे. रतिक्रीडेशिवाय प्रजा उत्पन्न करण्याची कला[४] ( octogenesis ) लवकर हस्तगत करून घ्यावी अशी पाश्चात्यांना आमची नम्र सूचना आहे. पौर्वात्यांनीं मात्र त्या भानगडींत पडूं नये अशी त्यांना प्रेमाची सूचना आहे.

आतां पाश्चात्यांच्या नादानें अलीकडील सुशिक्षितांनीं बालविवाहाच्या विरुद्ध जे मुद्दे आणले आहेत, त्यांचें क्रमशः परीक्षण करूं. हे मुद्दे प्रथमतः एज ऑफ कन्सेंट कमेटीनें पुढें आणले आणि तेच पुढें १९३१ च्या खानेसुमारीच्या अहवालामध्यें जसेच्या तसे घेतले गेले. त्यांचें आम्ही व्याख्यानांतून अनेकदां खंडन केलेलें आहे. परंतु अशास्त्रीय आणि असिद्ध मुद्दे अज्ञजनापुढें फिरून फिरून मांडावयाचें हेंच तर विद्वत्तेचें मुख्य लक्षण

---

[१] ...lution by J. P. Lotsy.

[२] तर्कसंग्रह- अन्नंभट्ट.

[३] A Text-book of Logic by S. H. Mellone.

[४] The science and future by J. B. S. Heldane.

असल्याकारणानें त्यांचें पुन्हा पुन्हा खंडण करणेंही पण जरूरच आहे. येथें स्पष्ट सांगून ठेवावयाचें कीं, लेखक हा फांकडा समाजसुधारक असो, अगर हजारों रुपये पगार खाणारा सरकारी अधिकारी असो, त्यांना कार्यकारण-भाव कशाशीं खातात ही गोष्ट देखील समजत नाहीं. न्यायशास्त्रामध्यें सिद्धांत अन्वय ( method of agreement ), व्यतिरेक ( method of difference ) दाखवून सिद्ध करावा लागतो; दोन स्थितींचें नुसतें साहचर्य दाखवून नव्हे.

( १ ) स्त्रियांमध्यें वय पंधरापासून तीसपर्यंत मृत्युसंख्येचें प्रमाण जास्त दिसून येतें. हें प्रमाण पुरुषांतील मृत्युसंख्येच्या प्रमाणापेक्षां जास्त आहे. हा परिणाम बालविवाहाचा असावा. त्रावणकोर संस्थानांतील खानेसुमारीवरील अधिकारी[1] म्हणतो, 'वय पंधरापासून स्त्रियांतील मृत्युसंख्येचें प्रमाण पुरुषांतील मृत्युसंख्येच्या प्रमाणापेक्षां हजारीं साठ इतकें जास्त पडतें. हा परिणाम बालविवाह आणि अकालीं मातृपद प्राप्त होणें या दोन कारणामुळें घडून येत असला पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे.' 'मुख्यतः वीस पासून तीस वर्षांपर्यंत स्त्रियांमध्यें जी मृत्युसंख्येची वाढ झालेली आहे, ती बालपणीं मातृपद आल्यानें जो शारीरिक ऱ्हास होतो, त्याचा परिणाम असला पाहिजे'. ' अशा तऱ्हेच्या पांडित्यप्रचुर विधानांनीं तो सर्व ग्रंथच भरून गेला आहे. आतां या पांडित्याचा शास्त्रीय पद्धतीनें विचार करूं.

कारणाच्या व्याख्येचा विचार केल्यास जेथें बालविवाह नाहीं तेथें मृत्युसंख्याही नाहीं ( Concomitant variation ) असें दिसून यावयास पाहिजे. यूरोप, अमेरिकेमध्यें बालविवाह आणि अकालीं मातृपदही नाहीं आणि त्यामुळें आमच्या खानेसुमारीच्या लेखकाच्या मताप्रमाणें शारीरिक ऱ्हासही होत नाहीं. परंतु 'ऋतुप्राप्तीच्या[3] कालापासून पहिला आयुष्यखंड जो पंधरा ते वीस त्यामध्यें स्त्रियांची मृत्युसंख्या फारच जास्त असते. ही

१ Census of India, Vol. I.

२ Census of India for 1931, Vol. I.

३ Man and woman by Havelock Ellis; Old age by Sir George Humphrey; Studies in statistics by Longstaff; Aspects of age, disease and death by Humphrey Rolleston.

स्थिति पुढील वयांतही रहाते. वय तीसपासून स्त्रियांची मृत्युसंख्या कमी होऊं लागते.' मग बालविवाह असो अगर नसो, जी गोष्ट सर्व मानवसृष्टींतच घडतांना दिसून येते, त्या स्थितीचा बालविवाहाशीं कार्यकारणभाव जोडणें निर्विवाद कसें असणार? परंतु आमचे खानेसुमारीचे अधिकारी तर दडपून देतात कीं, असा कार्यकारणभाव निर्विवाद आहे. सरकारी पगार खाऊन खोटे सिद्धांत प्रसृत करण्याकरितां हिंदुस्थानसरकार त्यांना नेमीत असेल असें वाटत नाहीं.

( २ ) 'बालविवाहानें[1] बाळंतपणाच्या पाळ्या फार भराभर येतात. बालविवाहाचे वाईट परिणाम वाचूं लागले म्हणजे मेंदू मोठ्याच कष्टानें शांत ठेवतां येतो. बालविवाहानें बाळंतपणाच्या खेपा फार भराभर येतात.' आतां त्याच खानेसुमारीच्या ग्रंथांतील पाळ्यांचें गणित घेऊं म्हणजे या लेखकांचा पाजीपणा तावडतोब लक्षांत येईल. १९३१ सेन्सस रिपोर्टाच्या पान २०८ पॅरा ८७ मध्यें आपणांला पुढील आंकडे सांपडतात. 'दहा पासून एकोणीस वर्षेंपर्यंत जीं कुटुंबें विवाहित स्थितींत होतीं, त्यांच्या मुलांची सरासरी चार मुलें अशी पडते. म्हणजे यांतील खालची मर्यादा घेतल्यास सरासरी प्रत्येक खेपेंतील अंतर ( spacing ) अडीच वर्षें इतकें पडतें आणि वरची मर्यादा घेतल्यास प्रत्येक खेपेंतील अंतर पावणेपांच वर्षें म्हणजे सर्वसाधारण सरासरीनें प्रत्येकीं तीन वर्षें दहा महिने इतक्या वर्षांनीं एक खेप असें प्रमाण बसतें.' पावणेचार वर्षांनीं खेप येणें म्हणजे लवकर खेप येणें हा शोध कोठें लागला, तें कळणें बरेंच कठीण आहे. पुढें त्याच ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, 'तेहेतीस वर्षें जीं कुटुंबें विवाहित स्थितींत राहिलीं त्यांच्यामध्यें मुलांची सरासरी ५·८ इतकी पडते.' म्हणजे एका स्त्रीची खेप सरासरी सहा वर्षांनें पडते. सहा वर्षांनीं एक खेप म्हणजे भराभर खेपा ! केवढा अलौकिक शोध हा ! मग आपल्याच आंकड्यावरून असिद्ध ठरणारीं विधानें ग्रंथकार कां करतात? हिंदुस्थानांतील आजचा पुढारीवर्ग फार बुद्धिमान असल्याकारणानें वाटेल तें पचतें म्हणून ! या बाबतींत ( पान २०९ ) त्यांनीं दिलेले कोष्टक फारच बोधप्रद आहे. लोकसंख्यांचा अभ्यास कशाशीं खातात ह्याचा ज्यांना पत्ता नाहीं, अशा लोकांनीं

१ Census of India, Vol. I, 1931.

खानेसुमारीच्या अहवालांत वाटेल तें लिहावें आणि तें आमच्या बुद्धिमान पुढाऱ्यांनीं प्रमाण म्हणून सांगत सुटावें असा काळ आला आहे खरा ! त्यावरोबरच या सद्गृहस्थांनीं सर्व जातींची जीवनशक्ति (Survival rate) वेगवेगळी दिली असती, तर या प्रकरणावर जरासा जास्तच प्रकाश पडला असता. आपण एकूण विवाहांची त्यांनीं दिलेली ज्यास्तींत जास्त मर्यादा तेहेतीस वर्षें ती घेऊं. म्हणजे एकूण एक कुटुंबांत ५·८ मुलें होतील असें गृहीत धरूं. मग पान १७३-१७४ वर जी मृत्युसंख्या दिलेली आहे, तिचा विचार करतां असें दिसून येते कीं, झालेल्या सर्व मुलांपैकीं विसाव्या वर्षी शेंकडा ५१·५ मुलेंच शिल्लक रहातात. म्हणजे प्रत्येक कुटुंबांत विसाव्या वर्षापर्यंत सरासरी तीन मुलें शिल्लक रहातील. पुन्हां समाजांतील अविवाहितांची जागा याच कुटुंबांना भरून काढावयाची आहे, आणि प्रत्येक विवाह तेहेतीस वर्षे टिकूं शकत नाहीं. या सर्व गोष्टींचा विचार करतां असें दिसून येईल कीं, या लोकसंख्येच्या वाढीची गति फारशी असणार[१] नाहीं. आपणाला सुपीकता वाढवितां येणार नाहीं. परंतु ती कमी करणें आणि त्याकरितां संततिनियमनाच्या रीति वापरणें हें अनिष्ट आहे. कोणत्याही समाजामध्यें संतति हें दारिद्र्याचें कारण नाहीं, परंतु कमी संतति झाली तर श्रीमंती येते एवढेंच. परंतु जगांत श्रीमंतांचा वर्ग नेहमींच नष्ट होतो, ही गोष्ट लक्षांत ठेवून संततिनियमन करण्याचे प्रयत्न करूं नयेत. आपणाला करतां येईल तें एवढेंच कीं, मृत्युसंख्या फार तर कमी करतां येईल. परंतु नैसर्गिक निवडीचा विचार करतां, बालमृत्यूंची संख्या कमी झाल्यास समाज सुधारतो कीं बिघडतो ही गोष्ट विवाद्यच आहे. बालविवाहानें स्त्रियांतील मृत्युसंख्या वाढते, त्यांना बाळंतपणाच्या खेपा लवकर येतात, लोकसंख्या फार झपाट्यानें वाढते वगैरे सर्व आक्षेप साफ खोटे आहेत, ही गोष्ट वरील चर्चेवरून कोणाच्याही लक्षांत येईल.

( ३ ) शारीरशास्त्रीय आक्षेपः—

( अ ) अकालीं स्त्रियांवर मातृपद लादलें कसें जाईल तें कळणें बरेंच कठीण आहे. हिंदुस्थानांतदेखील ऋतुप्राप्ति झाल्याशिवाय मातृपद येत असेल असें वाटत नाहीं. तसें येत असेल तर अर्थातच त्याचा विचार झाला

---

१ Article on family in Times of India by Findlay Shirass.

पाहिजे. (आ) बाळपणीं मातृपद आल्यानें प्रकृति बिघडते. (इ) कोंवळ्या वयांत बाळंतपणाचा त्रास होईल. (ई) बालवयी मातांची संतति सुदृढ असणार नाहीं. या बाबतींत आम्हीं युरोपियन ग्रंथकारांनीं केलेले शोध पुढें मांडतों. येथें युरोपांतील बालवय शब्दाचा अर्थ आणि हिंदुस्थानांतील बालवय शब्दाचा अर्थ वेगळा केला पाहिजे, असा आक्षेप कांहीं पंडित आणतील तर त्यांना इतकेंच सांगावयाचें कीं, हॅवलॉक एलिस बालवयी माता म्हणजे सोळा वर्षांच्या आंतील माता असा अर्थ करतो. युरोपांतील सोळा म्हणजे हिंदुस्थानांतील पंधरा. कारण या दोन खंडांत ऋतुप्राप्तीच्या वयांत एक वर्षांचें अंतर आहे. पंधरा जर मातृपद यावयाचें तर स्त्रीला विवाहकालीं बारावें किंवा तेरावें वर्ष असणार. तेराच्या आंत ज्यांचे विवाह झाले, अशा शेंकडा सातच स्त्रिया हिंदुस्थानांत[1] आहेत. युरोपांतील अनुभव पुढीलप्रमाणें दिसतो. ‘ही[2] गोष्ट स्पष्ट आहे कीं, बालवयी माता मातृपद फारच सहज रीतीनें घेऊं शकतात आणि त्यांना खरोखर फारच उत्तम संतति होते;’ ‘एकवीस वर्षांच्या आंत ज्यांना मातृपद प्राप्त झालें अशा स्त्रियांची संतति, त्या वयापेक्षां उशीरां ज्यांना मातृपद प्राप्त झालें, त्या स्त्रियांच्या संततीपेक्षां सर्वसाधारण वर्तन आणि बुद्धि या दोनही बाबतींत जास्त श्रेष्ठ असते;’ ‘बालवयी मातांचीं शरीरें मृदुल असल्याकारणानें त्यांना बाळंतपणाचे कष्ट पडत नाहींत, किंवा बाळंतपणांत त्रासही होत नाहीं आणि एकाद्या स्त्रीला त्रास झालाच तर जास्त वयाच्या स्त्रीला जितके कष्ट पडतील, तितके कष्ट पडत नाहींत;’ ‘बालवयी मातेची प्रकृति गरोदरपणांत उत्तम रहाते आणि प्रसूतिनंतरही तिची प्रकृति फार झपाट्यानें मूळ स्थितीवर येऊं लागते.’ पुढें तोच ग्रंथकार म्हणतो, ‘बालवयांत होणाऱ्या प्रसूती, जन्म पावणारें बालक आणि जन्म देणारी माता या दोघांनाही हितकारक असतात;’ ‘या प्रसूतिशास्त्रज्ञांनीं पुढें आणलेल्या मुद्यांकडे समाजाचें लक्ष जावें तितकें गलेलें नाहीं. पंधरा ते वीस वर्षांपर्यंतच्या मातांमध्यें गर्भपाताचे आणि विकृत प्रसूतीचें प्रमाण इतर कोणत्याही वयांतील मातांपेक्षां कमी असतें,

---

१ Census of India, 1931.

२ Studies in psychology of sex–Vol. VI by Havelock Ellis.

ही गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे. वयाच्या वाढीबरोबर स्त्रियांची नापीकता वाढत जाते ही गोष्ट डॉ. मॅथ्यू डंकनें[1] यानें पूर्वींच सिद्ध केलेली आहे. पुन्हा फिशर म्हणतो त्याप्रमाणें बालवयी स्त्री हीच प्रजोत्पादनाला ज्यास्त लायक आहे. बालवयी मातांच्या संततीमध्यें स्त्रीपुरुष संततीचें प्रमाण सम रहातें. ( आणि भलभलते नैतिक प्रश्न उत्पन्न होत नाहींत ! ) ती घडी वयाचे वाढीबरोबर बिघडूं लागते. ज्याप्रमाणें बालवयांत सुलभ प्रसूति असते त्याप्रमाणेंच बालवयांत सुलभ संभोगही असतो. तेरा चवदा वर्षांच्या मुलींना प्रथम संभोग इतर वयांतील स्त्रीपेक्षां जास्त सुलभ जातो, ही गोष्ट लक्षांत धरावयास पाहिजे. आज पहावें तर बालवयांत मातृपद प्राप्त होणें वाईट असा खोटाच लोकभ्रम पसरलेला आहे. मुलाला आणि मातेला माता बालवयीं असल्यास शारीरिक फायदे होतात, इतकेंच नव्हे तर बाल-वयी माता असणें हें मुलांच्याही दृष्टीनें फारच हितकारक आहे. कारण मातेचें लक्ष इतर दुसऱ्या कोणत्याही बाबतींत गढून गेलें नसल्यामुळें, ती आपल्या मुलाकडे सहानुभूतिपूर्वक लक्ष देऊं शकते. नाहींतर सर्व वर्तनाला वळण लागून गेलेल्या मध्यम वयस्क मातांची आपल्या मुलांच्या बाबतींत कशी हेळसांड चाललेली असते, तो करुणास्पद देखावा आपल्या नजरे-समोर येतो. पुन्हां ज्या स्त्रीला समाजांत कांहीं कार्य करावयाचें असेल, तिनें देखील पंचवीस वर्षांपर्यंत प्रजोत्पादनांत आपलें आयुष्य खर्च करावें आणि मग पुढें पाहिजे तर समाजकार्य करावें[2].'

'कोणाही[3] मनुष्याची जी कांहीं संतति शिल्लक रहाते त्यांमध्यें आधीं झालेल्यांची जीवनशक्ति पुढें झालेल्या मुलांच्या जीवनशक्तीपेक्षां जास्त असते. असेंही दिसून येतें कीं, आधीं झालेल्या संततिची संततिही पुढें झालेल्या संततीच्या संततीपेक्षां जास्त सुदृढ असते.'

येथपर्यंत बालविवाहापासून होणाऱ्या फायद्यांचें दिग्दर्शन केलें. आतां

१ Fecundity, fertility and sterility by Mathew Duncan; Genetical theory of natural selection by R. A. Fischer.

२ Studies in psychology of sex, Vol. VI by Havelock Ellis.

३ Contraception, its theory, history and practice by Maria Stopes.

वय वाढण्यानें होणाऱ्या तोट्यांची चर्चा करूं. उपदंश, परमा वगैरे रोग समाजाला अतीशय घातुक आहेत, ही गोष्ट आम्ही मागें दाखविलीच आहे. ते रोग विवाहाचें वय वाढल्यास कमी होतात किंवा जास्त होतात ते पहावयास पाहिजे. ते होऊं नयेत म्हणून वैद्यकीय युक्त्या वापराव्यात असें कांहीं लोक सुचवितात. परंतु त्या युक्त्या विनामूल्य वापरतां येतील असें वाटत नाहीं. सर्वसाधारण दृष्ट्या पाहिलें तर, हे रोग पुरुषाला वीस या वयाच्या असपास कोठें तरी जडतात. समाज नीतिप्रधान असेल, तर हें वय थोडेंसें जास्त होईल इतकेंच. म्हणून या वयाचे अविवाहित तरूण ज्या समाजांत जास्त त्या समाजांत वेश्यांचें प्रमाणही जास्त, आणि व्यभिचाराचें प्रमाणही जास्त. म्हणजे संततिनियमन-वाल्यांचे अनुयायी समाजांत फार न झाल्यास वेश्यावृत्ति वाढेल, आणि त्यांचे अनुयायी पुष्कळ झाल्यास, गरती आणि सभ्य स्त्रियांत व्यभिचार फैलावेल. ब्रिटिश राज्य परमेश्वराच्या कृपेनें हिंदुस्थानांत आल्यापासून दुसरे हिंदुस्थानाला काय फायदे झाले असतील, तें सांगणें कठीण आहे. परंतु त्यापासून हिंदुस्थानांत पूर्वीं नसलेली वेश्यावृत्ति मात्र फैलावली एवढा नक्की फायदा झाला ! 'इंग्लिशांनीं प्रथम वेश्यावृत्ति हिंदुस्थानांत आणली. मिशनरी लोकांनीं तिचा फैलाव केला. एक ब्राह्मण ज्यूल्स बॉईसला म्हणाला, हा कांहीं इंग्लिशांचा दोष नसून त्यांच्या संस्कृतीचा दोष आहे. वेश्या शब्दाचा हल्लीं कोणाही जाणाऱ्या येणाऱ्या मनुष्याच्या पाशवी वासना पूर्ण करण्याकरितां घेतलेला गुलाम, असा जो अर्थ होतो त्या अर्थानें वेश्यावृत्ति हिंदुस्थानांत केव्हांच नव्हती. आमच्याकडे उपभोग्य स्त्रियांच्या जातीच असत, आणि अजूनही कांहीं आहेत. त्या जातींतील स्त्रिया, जो पुरुष प्रेम करील त्याच्याजवळ रहातही असत. त्या श्रीमंतांच्या रखेल्या, आणि सर्व कलाकौशल्यांचें निधानही असत.' याच जातींतील स्त्रिया रंगभूमीवर कामेंही करीत. परंतु सभ्य स्त्रियांनीं तशींच कामें करावीं हा शोध विसाव्या शतकांत लागला आहे. म्हणून साहेबी भाषा समजणाऱ्या

**६१ वयाच्या वाढीचे परिणाम**

---

१ Studies in psychology of sex, Vol. VI by Havelock Ellis.

आमच्या सुशिक्षितांच्या करतां बोलवयाचें तर पूर्वीं हिंदुस्थानांत रखेल्या ( concubines ) होत्या, वेश्या ( prostitutes ) नव्हत्या !

या जुन्या उपभोग्य स्त्रियांपैकीं आतां देवदासी, मुरळ्या वगैरे शिल्लक राहिल्या आहेत आणि त्या चाली बंद कराव्यात अशीं कायदेकौन्सिलांत बिलें येऊं लागलेलीं आहेत. 'जेजुरी वगैरे हिंदुस्थानांतील कांहीं ठिकाणीं पहिल्या मुलीचें देवांशीं लग्न करण्याची चाल असून, त्या मुलींना मुरळ्या असें म्हणतात. त्या देवळांत झाडणें, सारवणें वगैरे सेवा करतात. तेथील पुजेचीं उपकरणीं घासतात, नाचतात, गातात आणि वेश्यावृत्ति करतात. त्यांचे विवाह होत नाहींत, परंतु त्या आपल्या मातापित्यांच्या घरींच रहातात. त्या परमेश्वराची सेवा करतात आणि त्यामुळें त्यांना वेश्यावृत्तीचें पाप लागत नाहीं, अशी त्यांची कल्पना असते. परंतु अलीकडे सुधारणा आणि शास्त्र यांच्या नांवाखालीं हिंदी समाजसुधारक तुम्ही पापाच्या गर्तेंत पिचत आहांत असें त्यांच्या मनावर विंबविण्याचा प्रयत्न करीत आहेत. लवकरच हे समाजसुधारक त्यांना त्यांचीं देवळें आणि मातापित्यांच्या घराचा आश्रय यांतून बाहेर ओढून काढतील. त्यांचा स्वाभिमान नाहींसा करून लवकरच सुधारणा आणि शास्त्र, या गोंडस पांघरुणाखालीं त्यांना वर सांगितलेल्या अर्थानें हीन वेश्या [1]बनवितील.' सुधारणा कीं जय ! असो. वयाच्या वाढीबरोबर समाजांत धार्मिक आणि नैतिक कल्पना नसल्यास वेश्यावृत्ति आणि व्यभिचार यांची नक्की वाढ होणार. आतां व्यभिचार वाढणें म्हणजेच समाजसुधारणा[2] असेंही सुधारक म्हणूं शकतील, या बाबतींत आम्हांला तिळमात्रही शंका नाहीं. व्यभिचार कां वाढूं नये याची नैतिक आणि सामाजिक कारणें आम्हीं मागें सांगितलींच आहेत.

वेश्यावृत्तीच्या वाढीबरोबर उपदंशादि विकार वाढतात. आम्ही मागें सांगितलेच आहे कीं, उपदंशादि विकार पुरुषाला साधारणतः वीस या वयाच्या आसपास होतात. या गोष्टीचे कुटुंबावर काय परिणाम होतात ते पाहूं.

---

१ Studies in psychology of sex, Vol. VI by Havelock Ellis.

२ समाजस्वास्थ्य मासिक– संपादक र. धों. कर्वे, एम्. ए.

( १ ) उपदंश झालेला पुरुष आपल्या स्वभावमुग्ध विवाहित स्त्रीच्या ठायीं तो विकार संक्रांत करतो.

( २ ) दोनही विकृत झाल्यीं म्हणजे सर्व कुटुंबच विकृत होतें.

( ३ ) हा विकार बरा झाल्यासारखा वाटला तरी, तज्जन्य इतर बरेच विकार उत्पन्न होतात आणि त्यामुळें कुटुंबाचें पोषण करणारा जो पुरुष त्याची कुटुंब भरणाची शक्ति अकालींच नष्ट होऊन कुटुंबाची आर्थिक-दृष्ट्या दाणादाण होते. कुटुंबाचा आर्थिक आधार नष्ट झाल्यास उदर-भरणाकरितां स्त्रियांना कामकाज अगर अनिष्ट वेश्यावृत्ति यांना आश्रय करावा लागतो आणि मुलांना शिक्षण वगैरे सुद्धां देखील मिळूं शकत नाहींत. म्हणून आम्ही पुन्हां म्हणतों कीं, लैंगिक विकार वाढण्याचें मुख्य कारण जें विवाहाचें वय वाढणें तें समाजाला फारच भयंकर आहे.

आतांपर्यंत बालविवाहाच्या पद्धतीवर येणाऱ्या बहुतेक आक्षेपांचा विचार केला. आतां उरलेल्या सामाजिक आक्षेपांचा विचार करूं. तो आक्षेप म्हणजे स्त्रियांचें शिक्षण पुरें होत नाहीं हा होय. स्त्रीशिक्षणाचे स्त्रियांवर काय परिणाम होतात, ही गोष्ट पुष्कळांना

## ६२ स्त्रीशिक्षण

माहित असते. परंतु त्याचे समाजावर आणि वंशावर परिणाम काय होतात ही गोष्ट पुष्कळांना अवगत नसते. म्हणून पुष्कळ वर्षें ज्या देशांना आणि समाजांना स्त्रीशिक्षणाच्या रोगाची व्यथा जडलेली आहे, त्या समाजावर आणि त्या देशावर या रोगाचा काय परिणाम झाला, त्याची माहिती देऊं. 'मिस मर्फी हिनें असें दाखविलें आहे कीं, सन १८८९ पासून सन १९०० पर्यंत वाशिंग्टन, वेलस्ले, ब्राउन मावर, स्मिथ वगैरे विश्वविद्या-लयांतून ज्या स्त्रिया पदव्या घेऊन गेल्या, त्यांच्यामध्यें बहुशः विवाह आणि प्रजोत्पादन या बाबतींत नाखुषीच दर्शविली गेली.'[१] 'सर्वसाधारणतः पाहिलें तर पदवीधर पुरुषांमध्यें पदवीधर स्त्रियांपेक्षां विवाहाचें प्रमाण जास्त पडतें. परंतु येथें देखील असें दिसून येईल कीं, या कुटुंबांमध्यें

१ Heredity and selection in sociology by Chatterton Hill.

२ Mankind at cross-roads by Edward East.

३ A study of birth-rate of Harward and yalo graduates by Phillips.

देखील विवाहाची संख्या, विवाहाचें वय, जननसंख्या वगैरे गोष्टी ज्या प्रमाणांत दिसून येतात, त्यावरून विचार केला तर या वर्गाचा समाजांतून नक्की विनाश ठेवलेलाच आहे.' अगदीं नक्की आंकडे देऊनच बोलावयाचें तर 'पदवीधर स्त्रियांपैकीं शेंकडा चाळीसांचे विवाह झाले आणि त्यांना सर्वसाधारणतः $\frac{४}{५०}$ इतकीं मुलें झालीं.'

प्रो. होम्स म्हणतो : 'कॉलेजांत शिक्षण घेणाऱ्या स्त्रियांपैकीं शेंकडा पन्नास अविवाहितच रहातात. समाजाचा अभ्यास करितां असें दिसून येईल कीं, ज्यास्त बुद्धिमान आणि कर्तृत्ववान स्त्रियांवरच बहुधा अविवाहित रहाण्याचा प्रसंग येतो. आज सामाजिक कार्य करण्याच्या हेतूनें ज्या स्त्रिया विवाह करीत नाहींत, खरोखर त्याच स्त्रियांची संतति समाजांत जास्त रहावयास पाहिजे. स्त्रीस्वातंत्र्य या तत्त्वापासून काय फायदे होत असतील ते होवोत, परंतु वांशिकदृष्ट्या त्यापासून अतिशय नुकसान होतें, असें आमचें मत आहे. आजपर्यंत सामाजिक प्रगतीच्या नांवाखालीं त्यानें वंशांची जी अधोगति चालविली आहे, त्या अधोगतीचा शेवट परिणाम वांशिक नाश हाच होणार' (पान २४२). या विषयाचा ज्या ज्या विद्वानांनीं अभ्यास केलेला आहे, त्यांनीं अशींच मतें दिलेलीं आहेत. याचा आमच्या इकडील समाजसुधारकांनीं जरूर अभ्यास करावयास पाहिजे, असें वाटतें. आतांपर्यंत सर्वसाधारणतः जगांतील कोणताही समाज घेतला, तर विवाहाच्या वयाची वाढ व स्त्रीशिक्षण यांचा परिणाम काय होतो, याचा विचार झाला. पुढें मानवसमाजाचा घटक जो हिंदुसमाज त्याच्या दृष्टीनें या प्रश्नाचा विचार करूं.

पहिली गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे ती अशी कीं, हिंदुसमाजरचना जातिनिबद्ध आहे आणि तीमध्यें आनुवंशाच्या सर्व नियमांचा विचार झालेला आहे. आम्हीं मागें दाखविलेंच आहे कीं, समाज जगाच्या धक्काधक्कीच्या मामल्यांत जगून रहावयाचा असल्यास, समाजाची रचना जातिबद्ध

१ Education of women by Goodsell; Article by Paul Popenoe – Journal of heredity 1917; Co-education and Eugenics by – Banker Journal of heredity.

२ The trend of race by S. J. Holmes.

असावयास पाहिजे[१]. सर्व जगामध्यें गट पडण्याची प्रवृत्ति दिसून येते. परंतु तेथें जे थर पडतात त्यांचा पाया आर्थिक तत्त्व अगर धंदा यांवर उभारलेला असतो. हिंदुस्थानाच्या बाहेर जर एकाद्या व्यक्तीनें धंद्यामध्यें म्हणजे द्रव्यार्जनामध्यें कौशल्य दाखविलें, तर ती व्यक्ति विवाहादिसुद्धां सर्व दृष्टीनें वरच्या थरांत प्रविष्ट होते. परंतु हिंदुस्थानांतील विभागणीचें मूलतत्त्व हें अर्थार्जन नसल्याकारणानें मनुष्य श्रीमंत होऊं शकतो, परंतु त्याला विवाहादि बाबतींत आपला गट सोडतां येत नाहीं आणि आम्ही मागें दाखविल्याप्रमाणें शास्त्रीयदृष्ट्या तेंच बरोबर आहे. या पद्धतीनें जातीय संकर ( cross ) होऊं शकत नाहीं. कालपरवांपर्यंतही हिंदुसमाजामध्यें धंद्याच्या बाबतींत कोणत्याही जातींनीं फारसा फरक केला नव्हता. अलीकडे कोणताही धंदा निसर्गतः हलका नाहीं ( सृष्टीनें अर्थातच इष्ट धंदे, अनिष्ट धंदे, पोषक धंदे, मारक धंदे असा फरक केलेला आहे आणि कोणीही संस्कृतीची इच्छा करणारा मनुष्य धंद्यामध्यें तसा फरक करणारच.) अशा अलौकिक मताचा प्रसार होऊं लागल्यापासून मात्र धंद्याच्या बाबतींत सुशिक्षित लोकामध्यें थोडीशी उलटापालट झालेली दिसते. मनूचा काळ कोणताही धरला तरी मनूच्या काळीं जे धंदे ब्राम्हणादि वर्ग मुख्यतः करीत असत, ते धंदे आजही करतात असें दिसून येईल. ते धंदे केल्यामुळें धर्महानि होत नाहीं, ही गोष्ट आम्ही मागें दाखविलीच आहे. धंद्यांत जी उलटापालट झालेली दिसते, ती फक्त सुधारलेल्या आणि सुशिक्षित लोकांत झालेली दिसते; बाकी सर्व ठीक आहे त्यामुळें अजून देखील हिंदुसमाजाला या वरवर होत असलेल्या सुधारणेला भिण्याचें मुळींच कारण नाहीं.

अशा तऱ्हेनें जन्म आणि धंदा या दोन तत्त्वानें जाति बांधली गेली असल्यामुळें आणि मुख्य भर आनुवंशावर असल्यामुळें, स्त्रीनें आपल्या जातिबाहेरील पुरुषाकडून प्रजोत्पत्ति करून घेऊं नये, अशी समाजशास्त्रज्ञांची इच्छा असणें साहजिक आहे. ही जाति स्थिर ठेवण्याकरितां बालविवाह आणि अस्पृश्यता ( नित्य आणि नैमित्तिक ) या दोनही तत्त्वांचा फार

१ Outspoken essays by Dean Inge; Segragation of the fit by R. Austin Freeman.

उपयोग आहे. स्त्रीचें मन फांकण्याच्या सुमारालाच, जर आल्फ्रेड ॲडलॆरच्या पूर्वी सांगितलेल्या मतालाच धरून, तिला सहचर निवडून दिला तर जातिसंकराकडे कमी प्रवृत्ति होईल, असें हिंदुसमाजशास्त्रज्ञांचें मत आहे. सुप्रजाशास्त्राचा मुख्य हेतु होतकरू सहचरांची संख्या मर्यादित करणें हा आहे. तो हेतु डोळ्यापुढें ठेवला असतां, पूर्ण वाढ झालेली स्त्री समाजांत वावरूं लागली, तिला पूर्ण स्वातंत्र्य असलें, तर ती आपल्या जातींतच विवाह करील या गोष्टीची हमी कोण देऊं शकेल? सुप्रजाशास्त्र कांहीं वाढलेल्या प्रत्येक स्त्रीला कळण्याइतकें सोपें नाहीं. प्रौढविवाह, स्त्रीशिक्षण, अस्पृश्यतानिवारण वगैरे वरवर गोंडस दिसणारीं, परंतु अंतीं नाशक अशीं तत्त्वें सांगणें म्हणजे हिंदूंनीं ज्या तत्त्वांवर समाजरचना केली आहे, त्या तत्त्वांनाच हरताळ फासण्यासारखें आहे. अशा तऱ्हेचीं मूळ रचनेशीं विसंगत नैतिक मूल्यें पसरविणें म्हणजे समाजसुधारणा नव्हे आणि तीं पसरविणारे समाजसुधारकही नव्हेत.

अस्पृश्यता ( नित्य अगर नैमित्तिक ) ही समाज शुद्ध स्थितींत राखण्याचें एक साधन आहे. आमच्या या विधानावर असा आक्षेप घेतला गेला कीं, अस्पृश्यतानिवारण झाल्याबरोबर सर्व जातींतील स्त्रीपुरुष व्यभिचार करूं लागतील असें आमचें म्हणणें आहे. परंतु आज ज्या जाति स्पृश्य मानल्या गेलेल्या आहेत, त्यांच्यामध्यें आपसांत असा व्यभिचार झालेला दिसत नाहीं, अर्थातच आमचें म्हणणें चूक आहे. त्याही मुद्याचा येथें विचार करावयास पाहिजे.

**६२ संकर आणि अस्पृश्यता**

हजारों वर्षे समाज नीतिनियमांनीं बांधला गेल्यानंतर त्या समाजांत काय होतें अगर होईल हें येथें पहावयाचें नसून, समाजाला नीतिनियम लावून देणाऱ्यांनीं काय तत्त्वाचा अंगिकार केला होता, हें पहावयाचें आहे.

१ Science of living by Alfred Adler.

२ Studies in psychology of sex, Vol. VI by Havelock Ellis.

३ Essay by Rabindranath Tagore in Book of marriage by Keyserling.

म्हणून आज एकादें तत्त्व समाजांतून नष्ट झाल्यास काय परिणाम होईल तें ताबडतोब कळत नसतें. म्हणून ज्या समाजांत तें तत्त्व प्रचारांत नसेल, तेथें काय घडतें तें पहावयास पाहिजे. परंतु पुढील मुद्यांचा तत्पूर्वी विचार व्हावयास पाहिजे.

( १ ) अस्पृश्यतेनें ( Segregation ), ती नित्य असो अगर नैमित्तिक असो, व्यक्तींची असो अगर गटांची असो, समाजांच्या उत्क्रांतींत त्याप्रमाणेंच जीवांच्या उत्क्रांतींत कांहीं कार्य केलें आहे किंवा नाहीं ?

( २ ) समाजाची विभागणी मूळ कोणत्या तत्त्वावर झालेली आहे आपण जीं नैतिक मूल्यें प्रचलित करणार त्यांचा या मूल तत्त्वांशीं विरोध आहे काय ?

( ३ ) हिंदुसमाजाची विभागणी मूळ कोणत्या तत्त्वांवर झालेली आहे आणि तीं तत्त्वें शक्य तेवढीं पाळण्याकरितां हिंदुसमाजशास्त्रज्ञांनीं कोणत्या युक्त्या केल्या ? त्या युक्त्यांपैकींच हीही पण एक युक्ती आहे किंवा काय ?

आतां या तिनही तत्त्वांचें क्रमशः परीक्षण करूं. अस्पृश्यता म्हणजे विभक्तीकरण ( isolation or segregation ). हिंदु समाजाची पद्धति पाहिली तर पशुपक्षांपासून तो मनुष्यापर्यंत ज्या ज्या कोणाचा सामाजिक उत्क्रांतींत संबंध येतो, त्या सर्वांची प्रतवारी लावून अधिकार ठरवून दिले गेलेले आहेत असें दिसून येईल. परंतु या विभक्तीकरणाची आवश्यकताच कोणती हा प्रश्न आज विचारला जात आहे, म्हणून विभक्तीकरणाचें समाजांच्या जीवनांतील कार्य कोणतें त्याचा विचार करूं. आम्ही मागें आधुनिक शास्त्रज्ञांनीं केलेली मानवाची गुणदृष्ट्या पडणारी विभागणी सांगितलीच आहे. त्यामध्यें सर्वश्रेष्ठ दहा टक्के, सर्वांत कनिष्ठ दहा टक्के वगैरे विभागणी पडते असें दिसून आलें. त्यांपैकीं सर्वांत श्रेष्ठ वरचे जे दहा टक्के त्यांना इतर समाजापासून विभक्त करणें हितकारक होईल, असें मत सर्वच[१] प्राणिशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ आतां द्यावयास लागले आहेत. जसें वरच्या वर्गांचें विभक्तीकरण करावयास पाहिजे, त्याप्रमाणेंच खालच्या वर्गांचे-

१ Segragation of the fit by R. Austin Freeman; National welfare and National decay by McDougal; Need for Eugenic reform by L. Darwin.

ही पण विभक्तीकरण व्हावयास पाहिजे, असेंही मत आतां प्रचलित होऊं लागलें आहे. म्हणजे उच्च प्रजांची वाढ होण्याकरितां आणि कनिष्ठ प्रजेचा नाश होण्याकरितां दोनही ठिकाणीं अस्पृश्यता उत्पन्न करावयास पाहिजे. उच्चवर्णीयांच्या अस्पृश्यतेला सोवळें असें नांव पडतें आणि कनिष्ठ वर्गांच्या अस्पृश्यतेचें नांव तेंच रहातें. परंतु मुदलांत तत्त्व एकच आहे. एकंदरींत महात्मा आणि मंडळी म्हणतात त्याप्रमाणें अस्पृश्यता हा धर्मावर कलंक नसून सुप्रजा वाढविण्याचें आणि कुप्रजा कमी करण्याचें एक साधन आहे असें दिसतें. सर्व ठिकाणीं सर्वच विभक्तीकरण त्याज्य नाहीं, इतकी गोष्ट तरी खरी. पुढें तें सर्व ठिकाणीं कसें ग्राह्य आहे याचा विचार करूं.

( समाजाची विभागणी मूळ कोणत्या तत्त्वांवर झालेली आहे? हिंदुसमाजशास्त्रज्ञांना या मुद्यांतील अडचणी बरोबर माहिती होत्या. त्यांनीं समाजांत त्यांच्यापुढें जे गट पडलेले दिसत होते, तेच गट घेऊन त्यांची सुप्रजाशास्त्राच्या दृष्टीनें व्यवस्था लाविली. परंतु ते जातिउपजातींच्या व्याख्या करण्याच्या भानगडींत पडले नाहींत. यालाच पर्यायानें पाहिजे तर 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं' असें म्हणावें. उपजातींची व्याख्या करणें आणि व्याप्ति ठरविणें आमच्या इकडील आधुनिक पंडितांना वाटते तितकें सोपें नाहीं. डार्विन म्हणतो : 'मी येथें जाति या शब्दाचा ज्या वेगवेगळया व्याख्या दिल्या गेल्या आहेत त्यांची चर्चा करीत नाहीं. कोणत्याही एका व्याख्येनें सर्व प्राणिशास्त्रज्ञांचें समाधान होणार नाहीं; तरी देखील प्रत्येक प्राणिशास्त्रज्ञाला जाति (Species) कशाला म्हणतात, या गोष्टीचा बोध[२] असतो.' अशाच तऱ्हेचें मत दुसरा प्रसिद्ध प्राणिशास्त्रवेत्ता हेकेल यानेंही दिलें आहे[३]. म्हणून आम्ही म्हणतों कीं, हे गट ज्याअर्थीं आज वेगळे वेगळे म्हणून समाजांत रहातात, त्या अर्थीं त्या उपजातीच (sub-species) आहेत. त्या उपजाति नाहींत असें म्हणणारांनीं उपजातींचें लक्षण प्रमाण सांगून (लक्षणप्रमाणाभ्याम् वस्तुसिद्धिः) त्या उपजाति कशा नाहींत, हें

---

१ Darwinism and race progress by J. B. Haycraft; Edwards Jukes families by R. G. Dugdale.

२ Origin of the species by Charles Darwin.

३ Morphology by Haeckel.

दाखवावयास पाहिजे. गट पडलेले आहेत आणि त्यांची विवाहाचे नियम आणि अन्नाचे नियम यांनीं सिद्धि झालेली आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर हिंदुसमाजशास्त्रज्ञांनीं विभागणी मुख्यतः जन्म या तत्त्वावर केलेली आहे. धंदा अगर शिक्षण इत्यादि बाह्य तत्त्वांवर केलेली नाहीं. नियम पाळले जावे म्हणून धंद्याबद्दल जें कोठें पातित्य सांगितलें गेलें आहे, त्याचा स्पृश्यास्पृश्यत्वांशीं कांहींही संबंध नाहीं. जन्म हा मूळ पाया असल्या-कारणानें एतद्विषयक नैतिक मूल्यें जन्म या तत्त्वावरच उभारलीं गेलीं पाहिजेत, स्वच्छतेच्या अगर साबण लावण्याच्या नव्हे.

गटांची विभागणी जन्माच्या तत्त्वावर करून, तिचें रक्षण करण्याकरितां ज्या कांहीं अनेक युक्त्या योजल्या गेल्या, त्यांपैकींच अस्पृश्यता ही एक युक्ति आहे व ती जावयास पाहिजे, अस्पृश्यतानिवारण झालेंच पाहिजे, असें मत आज प्रचलित होऊं लागलें आहे.

अस्पृश्यता ( Segregation ) या तत्त्वाचीं पाळेंमुळें समाजांत किती खोल गेलेलीं आहेत, ही गोष्ट महात्मा आणि मंडळीच्या लक्षांत आलेली दिसत नाहीं. समाजरचना विभागणी ( classification ) च्या तत्त्वावरच असली म्हणजे तें तत्त्व सर्व ठिकाणीं पसरणारच. विभक्तीकरणा-करितां पहिली मोठी विभागणी स्त्री आणि पुरुष अशी झालेली दिसते. हिंदुसमाजांतील अभिजात पुरुष हा आपल्या जातीचाच नव्हे, तर घराण्यां-तीलही स्त्रीला स्पर्श करण्याला नाखूष असतो. परंतु ही अस्पृश्यता मनो-मय असून चालीरीतींनीं अंगांत खिळून गेली आहे. ( It has become a taboo ) याचें कारण

स्वस्रा मात्रा दुहित्रा वा न विविक्तासनो भवेत्।
बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति ॥ असें मनु सांगतो.

या मताचीच सुधारून वाढविलेली आवृत्ति ‘ येकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं साचार। प्राण गेल्या जाण बोलूं नये ’ असें तुकाराम देतो. हें तुकाराम आणि मनु यांचें म्हणणें खरें आहे किंवा नाहीं, या गोष्टीचा ज्याचा त्यानें

१ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न, वि. रा. शिंदे; अस्पृष्टांचा प्रश्न— श्री. म. माटे.

मनाशीं विचार करून पहावा. येथें विभक्तीकरणाचा हेतु काय दिसतो? यावच्छक्य योनिसंकर होऊं नये. मनु म्हणतो,

कुले मुख्येऽपि जातस्य यस्य स्याद्योनिसंकरः ।
संश्रयत्येव तच्छीलं नरोऽल्पमपि वा बहु ॥

यत्र त्वेते परिध्वंसाज्जायन्ते वर्णदूषकाः ।
राष्ट्रिकैः सह तद्राष्ट्रं क्षिप्रमेव विनश्यति ॥

मनूच्या या मताशीं पुढील मत ताडून पहावें. 'हा योनिसंकर रोमन साम्राज्याच्या नाशाच्या अनेक कारणांपैकीं फार महत्त्वाचें कारण आहे.'[1] अगदीं अलीकडे एतद्विषयक जास्त निश्चित मत डॉ० सी. सी. हर्स्ट[2] यानें दिलेलें आहे. अशा तऱ्हेनें विभक्तीकरणाचें तत्त्व सर्व ठिकाणीं लावून दिलेलें दिसतें. अगदीं पशुपक्ष्यांची देखील प्रतवारी करून त्यांतही कांहीं स्पृश्य, कांहीं अस्पृश्य, अशी व्यवस्था केलेली आहे. यांतील बीज काय आहे त्याची चर्चा आम्ही येथें करीत नाहीं.

अशा तऱ्हेनें वेगवेगळे गट समाजांत आल्यानंतर त्यांची व्यवस्था कशी लावावी हा प्रश्न समाजशास्त्रज्ञांच्या पुढें दत्त म्हणून उभा राहिला. हे वर्ग मूलतः तर फार वेगळे दिसतात. त्यांची व्यवस्था कशी लावावी? येथेंच प्रथमतः अशा तऱ्हेचे नियम ज्या समाजांत नाहींत त्या समाजांत काय परिणाम घडले हें पाहून नियम ठरवावे लागतात. १९२१ च्या खानेसुमारीमध्यें अँग्लो-इंडियन म्हणून एका वर्गाची परिगणना केलेली आहे. तो वर्ग युरोपियनामध्यें अस्पृश्यतेच्या कल्पना दृढमूल झालेल्या असत्या, तर उत्पन्न झाला नसता असें मत आहे. हा वर्ग तो ज्या बापजाद्यांचीं नांवें सांगतो, त्यांनीं ग्रामबहिष्कृतच नव्हे तर खंडबहिष्कृत केलेला आहे. अशा तऱ्हेनें दोन वेगळाले वर्ग एकाच ठिकाणीं रहावयास आले, तर काय परिणाम होतो? 'जर असे दोन वर्ग एका ठिकाणीं राहूं लागले तर श्रेष्ठ प्रजा उत्पन्न होण्याला जरूर असा जो जीवनार्थ कलह तो किंचित्काल थांबतो. श्रेष्ठ आणि कनिष्ठ वर्ग एकाच ठिकाणीं राहूं लागले, तर दोघांचीही

१ Heredity and Eugenics by Gates.
२ Future of life by Dr. Hurst.

नैतिक अधोगति होते. त्यांच्यामध्यें लवकरच सेव्यसेवकभाव उत्पन्न होतो, आणि तें नातें जरी उघड म्हटलें नाहीं, तरी गुलाम आणि गुलामाचे मालक अशा तऱ्हेनें प्रतीत होऊं लागतें. पुष्कळ वेळां त्यांच्यामध्यें संकर होतो. युरेशियन लोकांमध्यें जरी कांहीं मानसिकदृष्ट्या सुदृढ व्यक्ति सांपडतात, तरी माझ्या मनाला ते जर शुद्ध एशिॲटिक किंवा शुद्ध युरोपियन असते तर जास्त बरें झालें असतें असेंच वाटतें (हेच वर सांगितलेले ॲंग्लो-इंडियन होत). अशा तऱ्हेनें दोन जातींमधील जीवनार्थ कलह कमी झाला म्हणजे जे सामाजिक प्रश्न सुटावयास पाहिजेत ते सुटत नाहींत. ते प्रश्न सृष्टीच्या नियमानें सुटण्याच्या ऐवजीं, त्यांतून भविष्यत्काळाकरितां मोठ-मोठ्या उत्पातांची पूर्वतयारी होते.[१] ' दोन जाति एकाच ठिकाणीं राहिल्या-तर संकर व्हावयास रहात नाहीं. हिंदूंच्या पुढें तर अनेक जातींच्या संकरा-पासून सांभाळ करण्याचा प्रश्न होता. त्याकरितां प्रथमच त्यांनीं नगररचना शास्त्राकडे लक्ष दिलें. जुन्या नगररचनाशास्त्रांत शहराचे वेगवेगळे मोहोले वेगवेगळ्या जातींना दिलेले दिसतात.[२]

अशा तऱ्हेनें मुख्य जातींना आणि त्यांतील उपजातींना वेगवेगळे भाग शहरांत वाटून दिल्यानंतर म्हणजे त्यांना वेगवेगळ्या गांवठाणांत ठेवल्या-नंतर त्यांचे जे काय संबंध यावयाचे, ते घराबाहेरील व्यवहाराचे बाबतींतच होय. प्रत्येकाचें उदरंभरणाचें साधन वेगळें असल्याकारणानें व अन्नाच्या पुरवठ्यापेक्षां लोकसंख्या जास्त वाढविणें म्हणजे सुधारणा हा आधुनिक शोध लागला नसल्याकारणानें, स्त्रीपुरुषांचा म्हणजे भिन्नजातीय स्त्रीपुरुषांचा सहवासच कमी येत असे. अशा तऱ्हेनें गांवाच्या वेगवेगळ्या मोहोल्यांत वेगवेगळ्या जातींची वस्ति असून त्या त्या जातींचीं अशीं देवळेंही असत. मग एका वस्तींतील व्यक्ति उठून दुसऱ्या वस्तींतील देवळांत कशाला जाईल आणि जाण्यापासून फायदा तरी कोणता? आज देखील महाराष्ट्रां-तील खेड्यांची व्यवस्था पाहिली तर जातींचीं गांवठाणें पूर्वीप्रमाणेंच विभक्त असलेलीं दिसून येतात (हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत कशी काय व्यवस्था आहे याची आम्हांला पूर्णांशानें माहिती नाहीं). पुन्हां देवळा-

१ National life from the standpoint of science by Karl Pearson.
२ Aryan rule in India by E. B. Havel.

संबंधीं असें दिसतें कीं, भैरवनाथ, मारुति, शिव, राम, कृष्ण वगैरे देवतांचीं देवालयें बहुतेक सर्व गांवांतून असतात. अशा तऱ्हेनें व्यवस्था असल्याकारणानें व्यवहार कमी म्हणून योनिसंकराचा संभव कमी, अशी वांटणी झाली. परंतु कांहीं थोडासा व्यवहार एकत्र होणारच. त्याकरितां प्रतवारी लावून नित्य अगर नैमित्तिक अस्पृश्यता ( Segregation ) उत्पन्न करावी लागली. एकाच जातीच्या अगर एकाच घराण्यांत जन्म झाला असूनही आणि एकाच घरांत रहात असूनही, व्यक्तींव्यक्तींमध्यें नैमित्तिक अस्पृश्यता असलेली दिसून येते. उच्चवर्णीयांमध्यें देवपूजा आणि भोजन या दोन निमित्तानें सोंवळें नांवाची अस्पृश्यता पाळली जाते. देवपूजा हे निमित्तच गेलें कीं, या ठिकाणीं पोंचण्याची जरूरीही नष्ट झाली. देवपूजा न करण्याचीं कारणें पुढील असूं शकतील. ( १ ) देवाचें अस्तित्वच नाकारणें[१]; ( २ ) देव असला तरी तो मूर्तींत अगर प्रतीकांत अवतीर्ण होणें शक्य नाहीं अशी कल्पना मानणें; ( ३ ) देव असेल तो प्रतीकांत अवतीर्ण होत असेल परंतु आमचा त्याच्याशीं कांहींही संबंध नाहीं असे मानणें; ( ४ ) आम्हीं मानसपूजा करतों अशी एक लोणकढी थाप देणें; ( ५ ) अगर आधुनिक पद्धतीनें प्रार्थना करणें[२]. पूजा करावयाची तर त्याला सोंवळ्याची जरूरी काय, असा प्रश्न परिस्थितिजन्य[३]मानसशास्त्राची ज्याला थोडीशी माहिती असा कोणी मनुष्य उत्पन्न करील असें आम्हांला वाटत नाहीं. देवपूजेसारख्या वेळीं जर सोंवळ्याच्या कल्पना पाळल्या तर त्यापासून कोणतें नुकसान होईल, ही गोष्ट एक परमेश्वर अगर सुशिक्षितांना मान्य असलेला परमाणूच जाणें. यामध्यें यमनियम हे पाळावयास पाहिजेत असें आमचें स्पष्ट मत आहे.

त्याप्रमाणेंच भोजनप्रसंगींहि जें सोंवळें, ओवळें अगर अस्पृश्यता आम्ही पाळतों त्यामध्यें काय चूक आहे तेंच आमच्या मठ्ठ मेंदूला कळत नाहीं. अन्नाचा तावडतोब रक्तांत प्रवेश व्हावयाचा असतो म्हणून त्या वेळीं शक्य

१ असत्यं अप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् । अपरस्परसंभूतम् किमन्यत्कामहैतुकम् ॥ भगवद्गीता.

२ यजन्ते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम्— भगवद्गीता.

३ Conditioned complexes by Pavlov.

तेवढी काळजी घेणें जरूर आहे असें आम्हांला वाटते. या बाबतींत वरून गोरेगोमटे दिसणारे आणि सभ्य भासणारे लोक किती तऱ्हेच्या संचारी रोगांचा फैलाव करतात, ही गोष्ट पौर्वात्य अगर पाश्चात्य वैद्यकावरील कोणताही ग्रंथ चाळून पाहिल्यास कळण्यासारखी आहे. 'प्रसंगाद्गात्र संस्पर्शात् निश्वासात्सहभोजनात् सहशय्यासनाच्चापि गंधमाल्यानुलेपनात् ॥ औपसर्गिक रोगाश्च संक्रामंति नरान्नरं[१] ॥ या विषयाची पूर्ण चर्चा करावयाची, तर एक वेगळा ग्रंथच लिहावा लागेल. येथें इतकेंच सांगावयाचें कीं, भोजनासंबंधीं स्पृश्यास्पृश्याचे नियम आजच्या सुशिक्षितामध्यें सुटत चाललेले दिसतात, ही गोष्ट समाजाला हितकारक नाहीं. कांहीं असें म्हणतात कीं, या तत्त्वाचा अतिरेक करूं नये. ही गोष्ट जितकी खरी तितकीच एकदां अपवाद सांगण्याला सुरुवात झाली म्हणजे आचारधर्म मोडूं इच्छीणारी कोणतीच व्यक्ति स्वतःला कांहींना कांहीं कारण दाखवून अपवादामध्यें बसवूं शकते हीही गोष्ट तितकीच खरी आहे.

याशिवाय कुटुंबांतील अस्पृश्यता म्हणजे मृताशौच, सूतक आणि रजस्वलात्व वगैरे पासून उत्पन्न होणारी. या बाबतींत एक आधुनिक सुधारक पंडित म्हणतात, 'सोयेर, सुतक, रजोदर्शन, सांसर्गिक रोग इत्यादि वैयक्तिक, कौटुंबिक आणि प्रासंगिक बाबीसंबंधीं हल्लीं देखील हिंदुस्थानांत, तशीच बाहेरील राष्ट्रांतही, पाळलेली पुष्कळ ठिकाणीं आढळते. फरक इतकाच कीं, पहिल्या तीन बाबी जंगली लोकांत व चौथी सुधारलेल्या देशांतील रुग्णालयांतच आढळते.[२]' म्हणजे या पंडितांच्या मतानें रजोदर्शनाची अस्पृश्यता पाळणारे लोक—म्हणजे ब्राह्मणादि वर्ग हे रानटी होत. रजस्वला स्थितींत स्त्रियांची मानसिक आणि शारीरिक स्थिति काय होते याचा अभ्यास[३] करून (नुसता विचार नव्हे) एक पाश्चात्य पंडित पुढीलप्रमाणें आपलें मत सांगतो. 'फक्त श्वेतवर्णीयामध्येंच स्त्रियांमध्यें लैंगिक विकारांचे (sexual invalidism) प्रमाण जास्त दिसून येते. याच

---

१ माधवनिदान.

२ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न – वि. रा. शिंदे.

३ Man and woman by Havelock Ellis.

४ Studies in psychology of sex by Havolock Ellis, Vol. VI.

लोकांनीं धार्मिक कल्पना सोडून, त्या कल्पनाबरोबर असलेली स्त्रियांच्या रजोदर्शनांतील अस्पृश्यतेची हितकारक कल्पनाही टाकून दिली. म्हणजे असें करतांना त्यांनीं नथेबरोबर नाकही टाकून दिलें, असा त्याचा अर्थ आहे.' एक पंडित रजोदर्शनांतील अस्पृश्यता ( seclusoin ) टाकून देणें अहितकारक आहे असें म्हणतो; तर दुसरा पंडितम्रुव ती चाल पाळणाऱ्या लोकांना जंगली म्हणतो. यावरून आमची सुधारणा करूं इच्छिणाऱ्यांची लायकी काय स्वरूपाची आहे या गोष्टीचा ज्याचा त्यानें मनाशीं विचार करावा.

आर्तवकालांत स्त्रियांची शारीरिक आणि मानसिक स्थिति काय होते, याचा हॅवेलॉक एलिसनें केलेला अभ्यास मननीय नाहीं असें कोण म्हणेल? सर्व सारांशरूपानें येथें दिल्यास ग्रंथविस्तार फार होईल म्हणून जिज्ञासूंनीं मूळ ग्रंथच वाचून पहावयास पाहिजे.

अशा तऱ्हेनें पद्धतशीर अभ्यास केल्यास हिंदुसमाजांत जी अस्पृश्यता नैमित्तिक स्वरूपाची आहे ती सर्वत्र ठिकाणीं साधारण आहे, ही गोष्ट अभ्यासकाच्या लक्षांत येईल. परंतु ही सहेतुक नैमित्तिक अस्पृश्यताही हिंदुधर्मानें सांगितलेली मुख्य अस्पृश्यता नव्हे. हे आणि इतर पुष्कळ शौचाचार आहेत. हे एका जातींतील इतकेंच नव्हे, तर एका कुटुंबांतील देखील व्यक्तींनीं एकमेकांशीं वर्तन करतांना पाळावयाचे नियम आहेत. प्रत्येक ठिकाणीं कांहीं तरी निश्चित आचारप्रणाली असावयास पाहिजे, ही गोष्ट कोणीही कबूल करील. म्हणून वरील हितकारक नियम पाळूं नयेत असें कोणीही विचारी पुरुष म्हणेल असें आम्हांला वाटत नाहीं. अशाच तऱ्हेचे खाद्यपेयादिसंबंधीं देखील अनेक शौचाचार सांगितलेले आहेत आणि तेंही हितकारक आहेत. शेवटीं या अस्पृश्यतेनें दुसऱ्याचें मन दुखावेल म्हणून माझें शरीर अपवित्र आहे आणि तूं विटाळशील अशीही अत्यंत उदार कल्पना याच शौचाचारांत उत्पन्न झाली. 'शौचात्स्वांगजुगुप्सा[२] परैरसंसर्गः' या अस्पृश्यतेविरुद्ध कांहीं सुशिक्षित लोक ओरडा करीत असले, तरी आज मुख्यतः ज्या अस्पृश्यतेविरुद्ध चळवळ चालू आहे ती ही नव्हे. ती

१ Man and woman by Ellis.

२ पातंजल योगसूत्र.

म्हणजे जन्मानें उत्पन्न होणारी अस्पृश्यता, म्हणजे अमुक मनुष्य अमक्या जातींत उत्पन्न झाला म्हणून अस्पृश्य होय, असें मानणें आणि अशा तऱ्हेची अस्पृश्यता पाळणें हा हिंदुधर्मावर कलंक आहे, अशा तऱ्हेची भाषा आज ऐकूं येऊं लागली आहे त्याचा विचार करूं.

येथें हिंदुसमाजाची रचना कोणत्या स्वरूपाची आहे, याचा विचार केलेला दिसत नाहीं. आजच्या रशियन[१] समाजासकट जगांतील कोणताही समाज घेतला, तरी त्या समाजाला त्याची कांहीं ना कांहीं तरी रचना असतेच. सर्व समाजांची रचना एकच तऱ्हेची नसल्याकारणानें अर्थातच त्यामध्यें कांहीं फरक असणारच. त्यामुळें एका रचनेंतील तत्त्व दुसरींत सांपडत नाहीं म्हणून त्या रचनेवर आक्षेप आणणें, हें अत्यंत उथळपणाचें लक्षण आहे. हिंदूंच्या समाजरचनेचा आद्य घटक जाति आहे. या जातींची एकावर एक अशी प्रणाली[२] आहे. या पद्धतींत हक्क जातींना आहेत व्यक्तींना नव्हे. जो ज्या जातींत जन्मला त्या जातीचे सर्व हक्क त्या व्यक्तींना आहेत आणि त्याबरोबरच तदितर जातीय व्यक्तींना नाहींत. महार जातीला जे कोणते हक्क असतील त्यावर इतर कोणालाही हक्क सांगतां येणार नाहीं. दशग्रंथी ब्राह्मण, मोठा पंडित, शूर क्षत्रिय, धनाढ्य वैश्य, सच्छील शूद्र यांपैकीं कोणालाही खळे अगर बलुते यांचा हक्क कधींही येऊं शकणार नाहीं. यांपैकीं कोणीही हाडवळ्याची जमीन घेऊं शकेल, परंतु त्याला खळ्याचा हक्क केव्हांही मिळणार नाहीं. या सर्व भानगडीचें कारण काय असावें ?

हिंदुसमाजशास्त्रज्ञांच्या पुढें अतिशय बिकट प्रश्न होते. जेथें समान-वंशीय ( Homogeneous ) अगर फार दूरच्या वंशांतील नव्हेत अशा लोकांचा विचार करावयाचा असतो तेथें ही गोष्ट फारशी कठीण नसते. परंतु जेथें विविध वंश, त्यांचे उपवंश आणि संस्कृतींचे विविध थर या सर्वांचा विचार करून समाजव्यवस्था करावयाची असते, तेथें हा प्रश्न सोपा नसतो. असे प्रश्न कॉलेजांत शिकलेल्यां[३] तत्त्वज्ञानानें सुटत नाहींत. प्रथमतः समाजाची विभागणी करावी लागते आणि मग ते विभाग आम्ही मागें

१ An intelligent man's guide through the world chaos by Cole.
२ The need for Eugenic reform by L. Darwin.
३ Reflections on the revolution in France by Burke.

सांगितलेल्या कारणास्तव विभक्तच ठेवावे लागतात. हिंदु समाजामध्यें चार अगर पांच थर म्हणजे ढोबळ मानानें वर्ण अशी प्रथमतः विभागणी झालेली दिसते. हे विभाग आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणें मुख्यतः संस्कार-निदर्शक ( Cultural ) आहेत. परंतु या आध्यात्मिक प्रणालीबरोबरच दुसरी जातीय म्हणजे आनुवंशिक प्रणालीही आहे. अगदीं न्यायशास्त्राच्या काटेकोर प्रणालींत बोलावयाचें तर वर्ण हा प्रधान विभाग ( genus ) आणि जाती हे तदंतर्गत गट ( species ), पुढें कर्ती प्रजा, नाकर्ती प्रजा आणि सर्वसाधारण लोकसंख्या असें विभाग पडतात. येथें एका वंशांत ज्याप्रमाणें हे तीन विभाग पडतात, त्याप्रमाणेंच वंशावंशांमध्यें देखील हें त्रैविध्य प्रतीत होतें[1]. म्हणून प्रथमतः वंशोपवंशांची संस्कारदर्शक वर्णांमध्यें व्यवस्था व्हावयास पाहिजे. म्हणून कर्तें वंश विभक्त[2] करून त्यांना त्रैवर्णिक ठरविले आणि त्यांच्यावरच समाजाचा सर्व गाडा हांकण्याची जबाबदारी टाकिली. इतर सर्वसाधारण जे वंश राहिले त्यांच्यावर समाजाबद्दलची कोणतीहि महत्त्वाची जबाबदारी टाकल्याचें दिसत[3] नाहीं.

विप्राणां ज्ञानतो ज्यैष्ठ्यं क्षत्रियाणां तु वीर्यतः ।
वैश्यानां धान्यधनतः शूद्राणां एव जन्मतः ।

या चारहि वर्गांवर अधिकारभेदानें संस्कार करावयाचे असतात. समाजांतील सर्व व्यक्तींवर सारखेच संस्कार करून, एकाच पद्धतीची संस्कृति निर्माण करण्याचा प्रयत्न करणें, ही गोष्ट अनिष्ट आहे असें आजचे प्राणिशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ फार काय सांगावें शिक्षणशास्त्रज्ञ देखील सांगूं लागले[4] आहेत. येथें एक जाति पुरोहित व्हावयाची आहे, दुसरी जाति लढवय्यांची आहे, तिसरी जाति व्यापारी व्हावयाची आहे आणि चवथी जाति सर्व-साधारण कार्यांचा गाडा हांकणार आहे. या सर्वांची एकच शाळा काढून

---

१ Sir Arthur Keith quoted before.

२ Segregation of the fit by R. Austin Freeman.

३ मनुस्मृति.

४ Scientific outlook by Bertrand Russel.

त्यांना एकच तऱ्हेचें शिक्षण द्यावयास पाहिजे, असें कसें म्हणतां[१] येईल? परंतु आज सुधारलेल्या काळांत तरी सर्व शाळांत सर्व विषय शिकवितात काय? इंग्लंडमध्यें संढर्स्ट, वुलविच, चॅथम येथें ज्या लष्करी शाळा आहेत तेथें परमेश्वराचें स्वरूप, आत्मानात्म विचार, अलंकार शास्त्र वगैरे शिकवीत नाहींत आणि ऑक्सफर्ड, केंब्रिजमध्यें लष्करी हालचालीही पण शिकवीत नाहींत. पुणें शहर शाळांनीं बुजबुजलें असून शिवाजी महाराजांच्या नांवानें सुरू केलेल्या लष्करी शाळेची जरूरी कोणती? येथें चार अगर पांच वर्गा-वर संस्कार करावयाचा आहे. येथें संस्कृति टिकावी म्हणून समाजांतील सर्वांत मोठा म्हणजे ८० टक्के जो सर्वसाधारण वर्ग तो कह्यांत ठेवावयाचा आहे. नाहीं तर जग हें सर्वसाधारण लोकांच्या अंकित असल्याकारणानें कोणतीहि शास्त्रीय पद्धतीची सुधरणा[२] करणें अशक्य आहे, असे दुःखो-द्गार काढण्याचा प्रसंग आल्याशिवाय रहाणार नाहीं. येथें सर्व मानव जाति त्या हलक्या वर्गांच्या जोडीला आणून बसवावयाच्या नाहींत आणि हा जो मोठा अप्रबुद्ध वर्ग तो समाजरचनेचा नाश करण्याला उद्युक्त होणार नाहीं, अशा तऱ्हेनें त्याचा वर्तनक्रम लावून द्यावयाचा आहे. येथें एक गोष्ट दिसून येईल कीं, हल्लीं जी सार्वत्रिक शिक्षणानें समाज उन्नत करण्याची अशास्त्रीय[३] आणि असिद्ध कल्पना पसरलेली आहे, त्या पद्धतीचा येथें गंधही नाहीं. अशा चार तऱ्हेच्या वर्गांची सुप्रजाशास्त्राच्या दृष्टीनें आंखणी कर-णाऱ्या मनुष्याची बुद्धि केवढी विशाल असेल, त्याचा विचार करणेंच बरें! येथें सुप्रजा आणि साधारण प्रजा म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि इतर सर्व बहुसंख्य यांच्यामध्यें स्थितिस्थापकता राखावयाची आहे. येथें कोणाही समाजरक्षकानें काय करावें? आज ज्याप्रमाणें जगतीतलावर बहुसंख्य सामान्य जनांच्या रेट्यापुढें अल्पसंख्याक श्रेष्ठांचा सर्व देशांत नाश चाललेला

१ Scientific outlook by Russel; Mending of Mankind by Whitehead.

२ The future of life by C. C. Hurst.

३ Nature and Nurture by Pearson; The future of life by Hurst and a host of writers.

४ Marriage and Morals by Bertrand Russel; Need for Eugenic reform by L. Darwin; Heredity and selection in sociology by Chatterton Hill; Eugenics by Carr Saunders.

आहे, त्या तऱ्हेच्या व्यवस्थेचा स्वीकार करावयाचा काय ?

समाजांतील बहुजनांचा वर्ग बहुशः अप्रबुद्ध असतो, म्हणून त्या वर्गाला एक निश्चित आयुष्यप्रणाली लावून द्यावी लागते. म्हणून येथें धर्माची व्याख्या ' आचारप्रभवो धर्मः ' अशीच करावी लागते. त्याच आचारामध्यें त्या वर्गानें आणि वंशानें आत्यंतिक हित असतें.

मनु म्हणतो ' आचारः परमोधर्मः स्मृत्युक्तः स्मार्त एवच ।
तस्मादस्मिन्सदा युक्तो नित्यं स्यादात्मवान् द्विजः ॥
आचाराद्विच्युतो विप्रः न वेदफलमश्नुते ।
आचारेण तु संयुक्तः संपूर्णफलभाग्भवेत् ॥
एवमाचरतो दृष्ट्वा धर्मस्य मुनयो गतिम् ।
सर्वस्य तपसो मूलं आचारं जगृहुः परम् ॥[1]

हे संस्कार एकदां मनुष्यस्वभावांतील लकबा जाणून घेऊन लावून दिले म्हणजे पुन्हां त्यांत बदल करण्याची जरूरी पडत नाहीं. कारण मनुष्यांचा मूळ स्वभाव हा त्यांचा सदैव तसाच रहातो.

आतां हे सर्व वर्ग निरनिराळे ठेवावयाचे व त्यांचा तर व्यवहारांत संबंध येणार. स्त्रीपुरुष एकमेकांशीं, लोकांशीं भेटणार बोलणार, घराबाहेर काम करणाऱ्या स्त्रियांना तर हा रोजचा प्रसंग. कामविकार तर प्रबल ( आतां अलीकडील नाट्यात्मक शिक्षणानें तो कमी प्रबल होणार आहे असें ऐकतों ), संकराची भीति दांडगी, तेव्हां त्या वर्गांनीं एकमेकांचा स्पर्श होऊं देणें हें देखील पातक, अशा तऱ्हेच्या प्रखर कल्पना पसरविल्या तरच एवढ्या जबरदस्त विकाराला नियंत्रण घालणें शक्य आहे. म्हणून जातिजातींच्या अधिकारभेदानें स्पृश्यास्पृश्यतेच्या चढउतार पायऱ्या लावलेल्या दिसतात. आज देखील ब्राह्मण आणि मराठा ( आम्हीं हें विधान महाराष्ट्रापुरतेंच करीत आहोंत ) यांच्या व्यवहारांमध्यें ब्राह्मण पुरुष मराठा पुरुषाला शिवतो, परंतु ब्राह्मण स्त्री मराठा पुरुषाला शिवत नाहीं. विटाळ काळ्या लुगड्याला आहे पांढऱ्या धोतराला नाहीं. हे वर्ग मूलतः[2] वेगळे

---

१ मनुस्मृति.
२ Indian philisophy Vol. I, by Radha Krishna.

असून देखील, समाजाला अपाय होऊं न देतां एका ठिकाणीं कसे नांदतील याचा विचार करावयाचा होता आणि ते घडून येण्याला त्यांना अधिकार-भेदानें अस्पृश्यता ( isolation ) हाच नियम दिसला व तो त्यांनीं[1] सांगितला.

येथें कांहीं लोकांकडून असा प्रश्न उत्पन्न केला जातो कीं, मूळ वैदिक धर्मांत अस्पृश्यता नव्हती व ती पुढें घुसडून देण्यांत आली. याचाच पर्याय रा. गांधी यांनीं ' आज ज्या तऱ्हेची अस्पृश्यता[2] आपण पाळतों ' अशी शब्दरचना करून स्विकारला आहे. दुसरा असा मुद्दा आहे कीं, ज्यांना जुन्या ग्रंथांत अस्पृश्य म्हणून संबोधिलें आहे, तेच लोक आजची अस्पृश्य आहेत असें निश्चित विधान करतां येणार नाहीं. तिसरा मुद्दा असा आणला जातो कीं, इतर धर्मीयांना जितपत स्पृश्य मानलें जातें तितपत स्वधर्मीयांनाही पण मानावयास नको काय ? तसें जर आपण न केलें तर ते धर्मांतर करतील. या मुद्यांची क्रमशः पहाणी करूं.

मूळ वैदिक धर्मांत अस्पृश्यता नव्हती हें विधान केल्याबरोबर पुढील प्रश्न उत्पन्न होतात. धर्माचे मूळ आचार ( १ ) कोणत्या स्थळींचे, ( २ ) कोणत्या काळींचे, ( ३ ) कोणत्या लोकांचे आणि ( ४ ) तेच वैदिक आचार आहेत असें दर्शविणारीं प्रमाणें कोणतीं मानावयाचीं ? या चारही प्रश्नांचा बरोबर निर्णय झाल्याशिवाय मूळ आचारांची निश्चिती कशी करावयाची ? मूळ वैदिक आचार म्हणजे ज्या पंचनददेशामध्यें संहितांचें एकीकरण झालें असें म्हणतात, त्या पंजाबांतील त्या काळचा आचार असा अर्थ मानावयाचा काय ? तसा अर्थ होत असेल तर मनुस्मृति हा वैदिकधर्माचा ग्रंथ होऊं शकत नाहीं. कारण मनु ज्यांना सदाचार म्हणतो, ते त्या स्थळांतील नाहींत. मनु[3] म्हणतो, ' सरस्वती दृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् । तं देवनिर्मितं देवं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ।। तस्मिन्देशे य आचारः पारंपर्यक्रमागतः । वर्णानां सांतरालान्तं स सदाचार उच्यते ' म्हणून पूर्वीचा जो कोणता वैदिक धर्म त्याचें स्थळ आणि त्याचा काळ निश्चित सांगावयास पाहिजे.

---

१ अस्पृष्टांचा प्रश्न- श्री. म. माटे; भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न- वि. रा. शिंदे.

२ आम्हाला आलेलें खाजगी पत्र, येरवड्यांतून काढलेला जाहिरनामा.

३ मनुस्मृति.

समकालीन संस्कृतीबद्दल विधान करावयाचें, तर स्थल निर्देश करावा लागतो आणि प्राचीन संस्कृतीबद्दल विधान करावयाचें, तर स्थल आणि काल या दोहोंचाही निर्देश करावा लागतो. म्हणून आम्हीं म्हणतों कीं, पूर्वी अमुक होतें आणि अमुक नव्हतें अशा तऱ्हेचीं विधानें अर्थशून्य आहेत. पूर्वीच्या स्थळकाळाचा निर्देश करतां न आल्यास, आपणाला कोणतें वाङ्मय प्रमाण आहे व त्या वाङ्मयाचा अर्थ कोणत्या पद्धतीनें लावावयाचा या बाबतींत तरी निर्णय व्हावयास पाहिजे. तसें न झाल्यास वाङ्मय एक असूनही त्याचा अर्थ आणि तदुद्भूत आचारप्रणाली विभिन्न होऊं लागेल. त्याबरोबरच वादीप्रतिवादी पक्षांचें ध्येय एकरूप असावयास पाहिजे. नाहीं तर एकाचें ध्येय संस्कृतीचें अनंतकालपर्यंत रक्षण आणि त्याकरितां अनंत कष्ट सोसण्याची तयारी आणि दुसऱ्याचें ध्येय तात्कालिक स्वराज्य आणि त्याकरितां वाटेल त्या इष्ट अगर अनिष्ट आचारांचा त्याग करण्याची उत्सुकता. अशीं भिन्न ध्येयें ठरल्यास ते दोन्ही समाज एकरूप आहेत असें कसें मानतां येईल? त्यांच्यामध्यें एकरूपता उत्पन्न करण्याची भूमिका तरी कोणती आणि मग त्यांच्यामधील वादविवादाची जरूरी तरी काय? परंतु दोनही पक्ष एकाच धर्माचें नांव घेऊन बोलतात. धर्मासारख्या विषयामध्यें स्वराज्य आणि संस्कृति हे दोनही विषय येणार आणि दोघांनाही आपआपल्या प्रमेयाला थोडथोडा आधार सांपडणार.

वाङ्मयप्रामाण्य मानावयाचें तर तें सर्व वाङ्मय कोणत्या पद्धतीनें निश्चय करीत असें तें आधीं ठरवावयास पाहिजे. कोणत्याही तत्त्वाचा निश्चय करण्याच्या दोन पद्धति आहेत. एक निर्णायक ( Deductive ) आणि दुसरी अनुनायक ( Inductive )। पहिल्या पद्धतींत सर्वसाधारण सिद्धांत घेऊन त्यावरून सिद्धांत काढतात. दुसऱ्या पद्धतींत पुष्कळशीं उदाहरणें गोळा करून त्यावरून सिद्धांत बसवितात. आपण ज्या वाङ्मयखंडाचा अर्थ लावीत असूं, ते खंड यांपैकीं कोणती पद्धति अनुसरितें त्याचाहि निश्चय व्हावयास पाहिजे.

वाङ्मयप्रामाण्य मानतांना जुन्या धर्मशास्त्राच्या दृष्टीनें अनेक प्रमाणें मानलीं जातात. आम्हीं मनुस्मृति हा ग्रंथ धर्मप्रमाणांपैकीं एक आहे, असें मानीत असल्याकारणानें त्याचें या बाबतींतील मत सांगतों.

'श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वैस्मृतिः ।
ते सर्वार्थेष्वमीमांस्ये ताभ्याम् धर्मोहि निर्बभौ ॥
योऽमन्येत ते मूले हेतुशास्त्राश्रयात् द्विजः ।
स साधुभिर्बहिष्कार्यो नास्तिको वेद निंदकः ॥
वेदः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।
एतच्चतुर्विधं प्राहुः साक्षाद्धर्मस्य लक्षणं ॥
श्रुतिद्वैधं तु यत्र स्यात् तत्र धर्मौ उभौ स्थितौ ।
उभावपि हि तौ धर्मौ सम्यगुक्तौ मनीषिभिः[1] ॥'

परंपरागत इतर दृष्टीनें 'श्रुतिस्मृति पुराण' हें वाङ्मय प्रमाण मानतात. प्रमाणभूत वाङ्मयाच्या बाबतींत एकमत झालें, तरी त्या वाङ्मयाचा अर्थ कोणत्या पद्धतीनें लावावयाचा हा प्रश्न शिल्लक रहातोच. अर्थ लावतांना मूळ लेखकाच्या हेतूचा तरी आपणांकडून विपर्यास होणार नाहीं, इतपत काळजी घ्यावयास पाहिजे. तसें न झाल्यास कोणत्याही वाक्याचा कांहीं अर्थ लावणें शक्य आहे. सदाचार हें प्रमाण अर्थातच तितकें प्रबळ असणार नाहीं. कारण येथें आपण अर्थ लावण्याची निर्णायक पद्धति सोडून अनुनायक पद्धतीचा आश्रय करतों असें होईल. म्हणजे न्यायशास्त्राच्या भाषेंत बोलावयाचें, तर प्रतिज्ञा गौण ठरून उदाहरण प्रधान ठरूं लागेल. या ग्रंथांचा अर्थ लावतांना किती काळजी घ्यावयास पाहिजे, यासंबंधीं मनुस्मृतीवरील टीकाकार कुल्लुकभट्ट म्हणतो, 'विरोधिबौद्धादिकैर्न हंतव्यानि । मिमांसादितर्कः प्रवर्तनीयः एव ।' बौद्धांचें ध्येय आणि हिंदूंचें ध्येय हीं एकरूप नसल्यामुळें बौद्धांचे हेतु लाऊं नयेत. मीमांसादिकांमध्यें सांगितलेले हिंदूंचे हेतु सांगावेत. मनु म्हणतो, 'आर्षं शास्त्रोपदेशं च वेदशास्त्राऽविरोधिना । यस्तर्केणानुसंधत्ते स धर्मं वेद नेतरः[2]' मीमांसाच कां लावावी ? दुसरी कोणती पद्धति कां लाऊं नये ? सुरेंद्रनाथ दासगुप्त म्हणतो, 'शब्दांचा आणि वाक्यांचा बरोबर अर्थ लावण्याकरितां मीमांसकांनीं जीं कांहीं तत्त्वें आणि गृहीतकृत्यें प्रवर्तित केलीं, त्यांना आजतागायत देखील कायद्याचा अर्थ लावण्याच्या

१ मनुस्मृति.
२ मनुस्मृति.

दृष्टीनें फार किंमत आहे.' ही मीमांसा पद्धतीच त्याज्य ठरविण्याचा कित्येकांकडून हल्लीं प्रयत्न चालू आहे. त्या मताचें खंडण आम्ही स्वतंत्र ग्रंथ लिहून करणार आहों. म्हणून धार्मिक ग्रंथांचा अर्थ लावतांना मीमांसा-पद्धति अवश्य घेतली पाहिजे. समजा आर्यसमाजाच्या अनुयायांप्रमाणें एकाद्याचें मत असें पडतें कीं, फक्त संहिता हेंच धर्मशास्त्राचें प्रमाण ग्रंथ होत, इतर कोणतेही नाहींत. मग श्रुतीमध्यें असेल तेवढाच धर्म. यांचें गृहीत कृत्य असें आहे कीं, हिंदुधर्माच्या सर्व आज्ञा, सर्व विधिनिषेध श्रुति-वाङ्मयामध्यें चालले आहेत. परंतु एकाद्या ग्रंथामध्यें सर्व आज्ञा यावयाच्या, तर तो ग्रंथ आचार, व्यवहार वगैरे सांगण्याकरितां लिहिला गेलेला असावयास पाहिजे. एकाद्या ग्रंथांत सर्व आचारांचें बीज आहे, असें म्हणणें वेगळें, आणि सर्व विधिनिषेध सांगितले आहेत असें म्हणणें वेगळें! म्हणून येथें प्रश्न येतो, तो वेदांत अस्पृश्यता सांगितली आहे किंवा नाहीं, हा नसून वेदामध्यें मानवसमाजाच्या विभक्तीकरणाचें तत्त्व सांगितलें आहे, किंवा नाहीं हा आहे. तें विभक्तीकरणाचें बीज जर वेदांत सांगितलें असेल, तर वेदांत अमुक आहे आणि तमुक नाहीं हें सांगण्यापासून फायदा कोणता? कोणत्याही वाङ्मयामध्यें अमुक एका व्यावहारिक गोष्टीचा उल्लेख नाहीं म्हणून ती गोष्ट घडतच नव्हती, असें अनुमान काढणें हेंहीपण अशास्त्रीयच आहे. उदाहरणार्थ, वैदिक वाङ्मयामध्यें मिठाचा उल्लेख कोठेंही आढळला नाहीं, म्हणून वेदकालीन लोक मीठच खात नसत असें अनुमान काढल्यास तें तर्कशुद्ध होईल काय?

बहुतेक हिंदुधर्मशास्त्रज्ञांचे वेद हे धर्माला बीजभूत आहेत, परंतु हिंदूंच्या सर्व धार्मिक आज्ञा सांगत नाहीं असेंच मत आहे. जैमिनी म्हणतो, 'विरोधेत्वनपेक्ष्यं स्यादसति हि अनुमानं' वेदांशीं स्मृति विरुद्ध असल्यास स्मृतीची अपेक्षा नाहीं, म्हणजे स्मृति अप्रमाण मानावी. विरोध नसल्यास स्मृतीवरून वेदवचनाचें तें अनुपलब्ध असलें तरी अनुमान करावें, अर्थात ती स्मृति प्रमाण मानावी. जैमिनीच्या म्हणण्याचा असा अर्थ होत नाहीं काय कीं पुष्कळशा हिंदुधर्माच्या आज्ञा वेदवचनांवरून अनुपलब्ध आहेत? असें असल्यामुळें पूर्वीच्या हिंदुधर्मग्रंथांत अस्पृश्यताविषयक वचनें सांपडत

१ A History of Indian philosophy by Dasgupta.

नाहींत, हें म्हणण्यापासून फायदा काय ? प्रत्यक्ष अस्पृश्यता दिसत असून व त्याप्रमाणें समाजाचे व्यवहार चालले असून, अस्पृश्य मानल्या गेलेल्या समाजांची मोजदाद १९३१ च्या खानेसुमारीच्या अहवालांत दिलेली असून अस्पृश्यता नव्हतीच, असें मानणें हें सुधारकी सत्य आहे. खरें सत्य नव्हे. जर पूर्वी अस्पृश्यता नव्हती, तर ही अस्पृश्यता कोणत्या काळीं काय कारणानें उत्पन्न झाली आणि तीं कारणें आज नष्ट झालीं आहेत काय ? ही गोष्ट अस्पृश्यतानिवारणार्थ ज्या विभूतींनीं आज चंग बांधला आहे, त्या विभूतींनीं सांगावयास पाहिजे. परंतु आधुनिक ज्या खिस्तीधर्माच्या पद्धतीवर हिंदूंचीं नैतिक मूल्यें नेण्याचा प्रयत्न करीत आहेत, त्या खिस्ती धर्माला तर इतिहास आणि प्रत्यक्ष सृष्टी यांचें पूर्ण वावडें ! मग हे आधुनिक तरी इतिहास कसा लावून दाखविणार ? एकदां या आधुनिक महात्म्यांना परमेश्वरानें अनुज्ञा दिली, परमेश्वरानें कौल दिला मग इतिहासाची काय जरूरी ? परंतु इतिहासच सांगावयाचा तर धर्मशास्त्राची पूर्ण माहिती पाहिजे, आणि तेवढाच तर येथें अभाव. आधुनिक पक्षांतील एक शास्त्रीबोवा, एका ब्राह्मण-वैश्य विवाहाचें समर्थन करतांना पैठीनसी – याज्ञवल्क्य – आपस्तंब अशी ऐतिहासिक परंपरा देऊन हे ग्रंथकार एकामागून एक फरक करीत गेले, असें विधान करते झाले. परंतु धर्मशास्त्राचा इतिहास पाहिल्यास ही परंपरा बरोबर उलटी आहे. म्हणजे आपस्तंब, याज्ञवल्क्य, पैठीनसी अशी ही कालदृष्ट्या प्रणाली आहे. मग चार दोनशें वर्षे आधीं होऊन गेलेला ग्रंथकार पुढें सुधारणा कशा करूं शकेल, हें कोडें महात्म्यांशिवाय कोणाला उलगडेल ? थोरांच्या घरचें सर्व कांहीं वेगळेंच असतें. नाथांच्या घरीं नसे कां वळचणीचें पाणी आढ्याला जात ? दुसरे एक शास्त्रीबोवा लिहितात कीं, 'ही गोष्ट[2] विद्वन्मान्य आहे कीं, शतपथ ब्राह्मण आणि याज्ञवल्क्यस्मृति या दोघांचे प्रणेते याज्ञवल्क्य महर्षिच आहेत.' अशा तऱ्हेचा इतिहास लावल्यानंतर त्यापुढें काय बोलावें. सर्व चर्चेचा निष्कर्ष असा कीं, पूर्वी, अलीकडे वगैरे अर्थशून्य शब्द असल्या प्रश्नांचे निर्णयामध्यें टिकत नसतात, म्हणून ते पुढें आणूं नयेत.

---

१ Antichrist by Nietzsche.

२ म. म. पाठक यांची धर्मग्रंथमाला, प्रस्तावना.

दुसरा मुद्दा कीं, ज्या लोकांना पूर्वींच्या स्मृतिग्रंथांतून अस्पृश्य मानलेले आहेत ते लोक हे नव्हेत, या मुद्यामध्यें अस्पृश्यतेचें तत्त्व मान्य केलेलें आहे, परंतु अस्पृश्यतेचीं जीं कारणें स्मृतिकार सांगतात, तीं आज नाहींत म्हणून आज अस्पृश्यता मानण्याची जरूरी नाहीं, असें म्हणण्याचा रोख दिसतो. या मुद्याचा अंगीकार केल्यास कोणत्या आपत्ति येतात, या गोष्टींचा हा मुद्दा पुढें आणतांना विचार झालेला दिसत नाहीं. हल्लीं असलेले अस्पृश्य जर ते नव्हेत, तर ते लोक कोठें गेले ? व आज जे अस्पृश्य म्हणून मानले गेलेले आहेत ते कोठून आले ? याचा खुलासा शास्त्रीय पद्धतीनें व्हावयास पाहिजे. एक संबंध लोकसंख्या नाहींशी होते, आणि तिच्या जागीं त्याच नांवाची दुसरी एक मोठी लोकसंख्या उत्पन्न होते; परंतु पहिलीचा आणि दुसरीचा अर्थाअर्थीं कांहींही संबंध नाहीं, हें म्हणणें थोडेंसें विचित्रच आहे. त्यांचें मुख्यतः म्हणणें असें कीं, पूर्वीं चांडाळ जातीची जी उत्पत्ति सांगितलेली आहे—तशा तऱ्हेनें उत्पन्न झालेली प्रजा आज कोठें निर्माण होते ? मग तुमचें अस्पृश्यतेचें तत्त्व आजच्या लोकांना कां लागू करावें ? स्मृतिमध्यें चांडाळ आणि श्वपच् हे अस्पृश्य सांगितलेले आहेत, आणि त्यांच्या उत्पत्ति पुढीलप्रमाणें दिलेल्या आहेत.

‘ शूद्रादायोगवः क्षत्ता चांडालश्चाधमो नृणाम् ।
वैश्यराजन्यविप्रासु जायन्ते वर्णसंकराः ॥

क्षत्तुर्जातः तथोग्रायां श्वपाक इति कीर्त्यते ।
वैदेहकेन त्वंबष्ठयां उत्पन्नो वेण उच्यते ॥ ’

त्याप्रमाणेंच ‘ कारावारो निषदात्तु चर्मकारः प्रसूयते । वैदेहिकादन्ध्रमेधौ बहिर्ग्रामप्रतिश्रयौ ’ या सर्वांना ग्रामबहिष्कृत केलें होतें. त्यांच्या बाबतींत स्पृश्यास्पृश्यतेचे प्रश्न फार क्वचित् उत्पन्न होत असतील, ही साधी गोष्ट सांगण्याचें कांहीं फारसें कारण नाहीं. जे ग्रामबहिष्कृत नव्हते, ज्यांचा कामाधंद्यामुळें त्रैवर्णिकांशीं व्यवहार होणार, त्यांच्याबद्दलच स्मृतिवचनें असणार, ही सरळ आणि साधी गोष्ट आहे. पहिली गोष्ट फक्त चांडाळच अस्पृष्ट होता आणि इतर अधिकारभेदानें कमी अधिक स्वरूपांत अस्पृष्ट नव्हते, असे स्मृतिग्रंथांच्या रचनेवरून दिसत नाहीं. पुढें जातीय विभाग-

णीच्या पद्धतीनें हे जे अस्पृष्ट त्यांची प्रजा परंपरेनें त्याच अधिकृत स्थलीं राहील आणि म्हणून ती लोकसंख्याही अस्पृष्टच राहील. कांहीं अगदीं ग्रामबहिष्कृत ठरविलें तरीही इतर वर्ण स्मृतिकारांनीं हीन मानले नव्हते असें नाहीं. मनु म्हणतो, 'प्रतिकूलं वर्तमाना बाह्या बाह्यतरान्पुनः । हीना-न्हीनान्प्रसूयन्ते वर्णान्पंचदशैव तु ।।'

आतां हे सर्व वर्ग त्याच नामरूपानें अस्तित्वांत आहेत किंवा नाहींत? असा प्रश्न विचारल्याबरोबर दुसरा प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, ज्या जातींना स्मृतिकारांनीं स्पृश्य मानले आहे, त्या जाति तरी आज त्याच नामरूपानें अस्तित्वांत आहेत किंवा कसें ! उदाहरणार्थ अम्बष्ठ, निषाद, उग्र, सूत, मागध, वैदेह, आयोगव, क्षत्ता वगैरे या जातींचीं नांवें तरी आज खाने-सुमारीच्या अहवालांत सांपडत नाहींत, म्हणून जर स्मृतिग्रंथांत सांपड-णाऱ्या जाती त्याच नामरूपानें आज मिळत नसल्या, तर सर्वच स्मृतिग्रंथ आजच्या हिंदू समाजाला गैरलागू आहेत असाच निष्कर्ष निघेल. ज्या जाति परंपरेनें जशा चालत आलेल्या आहेत, तशाच त्या मानानें हा पक्षच येथें शिल्लक रहातो. येथें ऐतिहासिक अनिश्चितता हा पक्ष आश्रय करण्याला योग्य नव्हे. 'स्थितस्य गतिः चिंतनीया' या न्यायानें आहे तें घेऊनच त्यांत वाट काढावयाची आहे, ही गोष्ट जहाल सुधारकांनीं विसरूं नये. स्मृतिग्रंथ प्रमाण मानावयाचे म्हणजे त्या ग्रंथांतील नांवेंही प्रमाण मानावयाचीं असा अर्थ नव्हे असें आम्हांला वाटतें. स्मृतींत जर विभक्तीकरणाचें तत्त्व असेल तर स्मृतीमध्यें सर्व जातींची यादी दिलेली नाहीं, म्हणून अस्पृश्यता स्मृतींत नव्हती हें म्हणणें चूक आहे. स्मृतिग्रंथ म्हणजे कांहीं सर हरबर्ट रिस्ले, सर एडवर्ड गेटस् अगर रसेल वगैरे ग्रंथकारांनीं घेतलेल्या खानेसुमाऱ्यांचें अहवाल नव्हेत. या चर्चेवरून दिसून येईल कीं, हाही मुद्दा फारसा विचार-पूर्वक पुढें आणलेला दिसत नाहीं.

तिसरा मुद्दा आपण इतर धर्मीयांना जितपत स्पृश्य मानतों आणि जितपत अधिकार देतों, तितपत तरी स्वधर्मीयांना स्पृश्य मानावयास पाहिजे. नाहीं तर ते धर्मांतर करतील व मग त्यांची अस्पृश्यता नष्ट होईल. तर आधींच आपण ती नष्ट केल्यास हरकत कोणती? यापैकीं धर्मांतर केलें याच कार-णाकरितां अस्पृश्यांची अस्पृश्यता नष्ट होते, हा मुद्दा तितकासा बरोबर नाहीं.

रा. शिंदे म्हणतात, ' जातीय अस्पृश्यता, सार्वत्रिक बहिष्कार आणि कायद्यानें सार्वकालिन निराश्रितपणा हीं तीन लक्षणें भारतीय अस्पृश्यतेचीं आज तागायत तरी कायम आहेत. मुसलमानी अमदानींत ही अस्पृश्यता धर्मांतरानें नष्ट होत असे. कारण मुसलमानी कायदा हिंदू रूढीला मुळींच जुमानीत नसे. पण ब्रिटिश हिंदी सरकार हें अधिक कावेबाज आणि अधिक भित्रें आहे आणि ख्रिस्ती धर्मही महंमदी धर्मापेक्षां अधिक लवचिक आहे. ख्रिस्ती झालेल्यांची अस्पृश्यता नष्ट होत नसून केवळ बेपत्ता होते. म्हणजे तिचा नेमका पत्ता न लागल्यामुळें बहिष्काराची कुऱ्हाड तिच्यावर नेमकी उगारणें कठीण जातें. पण जर कां पत्ता लागला, तर ह्या कुऱ्हाडीच्या उलट आश्रय देण्याचें सामर्थ्य ब्रिटीश कायद्यांतही नाहीं, ख्रिस्ती धर्मांत तर नाहींच नाहीं हें उघड आहे. पुण्याच्या शेजारच्या अहमदनगर जिल्ह्यांत—अहमदनगर शहराला लागूनही—ख्रिस्ती झालेल्यांचे महारवाडे आणि मांगवाडे ख्रिस्ती न झालेल्यांच्या प्रमाणेंच बहिष्कृत स्थितींत आहेत. ज्यांना या विधानाविषयीं शंका येत असेल, त्यांनीं मद्रास इलाख्यांतील मागसलेल्या ख्रिस्ती समाजाची आणि मुंबई इलाख्यांतील अहमदाबाद, गुजराथ, काठेवाड कडील ख्रिस्ती अस्पृश्यांची स्थिति किती ग्रामब्राह्य व हलाखीची आहे, हें जाऊन पहावें.[1] ' या लांबलचक उताऱ्यावरून अनेक अनुमानें निघतात : ( १ ) निव्वळ धर्मांतरानें अस्पृश्यता नष्ट होत नाहीं, ( २ ) मुसलमानी अंमलांत धर्मांतरानें अस्पृश्यता नष्ट होत असे, ( ३ ) तरी देखील निव्वळ अस्पृश्यता घालविण्याकरितां पंजाब, बंगाल वगैरे प्रांतांतील सर्व अस्पृश्य मुसलमान झाले नाहींत, ( ४ ) म्हणून आज अस्पृश्यता निवारण न झाल्यास अस्पृश्य धर्मांतर करतील असें म्हणणें ही एक जुन्या समाजाला भेवडवण्याची युक्ती आहे. ( ५ ) मुसलमानी कायदा हिंदू रूढींना मुळींच मान देत नसे, ( ६ ) त्या प्रमाणेंच आजच्या सरकारनें कावेबाजी आणि भित्रेपणा सोडून करूं लागावें.

असो. धर्मांतरानें अस्पृश्यता नष्ट होत नाहीं, असें ग्रंथकार सांगतात. हे गृहस्थ तर अस्पृश्यता हा हिंदुधर्मावरील डाग आहे, असें म्हणणाऱ्या पंथाचे

---

१ भारतीय अस्पृश्तेचा प्रश्न— वि. रा. शिंदे.

आहेत. ग्रंथकार पुढें म्हणतो[१], ' पूर्वेकडे चीनांत आणि जपानांत अस्पृश्यता अद्यापि रेंगाळत आहे. ब्रह्मदेशांत तर मी स्वतः शोधून स्पष्ट पाहिली आहे. पश्चिमेकडे सामान्यतः भूमध्य समुद्राच्या पूर्वेकडील राष्ट्रांत विशेषतः इस्रायल लोकांत ही संस्था होती. जेथें जेथें देवपूजकांची आणि पुरोहितांची एक निराळी जात आणि वृत्ति स्थापित झाली आणि अशी वार्तिकानें राज्यकर्त्यांच्या आणि त्यांच्या प्रभावळींतील उच्चवर्णीयांच्या रक्ताला, जेथें जेथें सोंवळेंपणा उत्पन्न झाला, तेथें तेथें ही संस्था नव्या जुन्या जगाच्या इतिहासांत उदयास आली. म्हणून ही संस्था आर्यांचेंच अगर कोणा एका मानववंशाचें विशिष्ट कृत्य आहे, असें मानण्याचें कारण नाहीं. ' या उताऱ्यांतील संदर्भ लक्षांत घेतां, ग्रंथकाराच्या मतानें आर्य हे एक वंश असावा असा ध्वनि निघाल्यासारखा दिसतो. तर हाच ग्रंथकार त्याच ग्रंथांत आर्य हा एक मानववंश नव्हता असें मत देतो आणि तेंच मत बरोबर[२] आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, अस्पृश्यतेची संस्था वर्णशुद्ध राखण्याकरितां म्हणजे संकर टाळण्याकरितां उत्पन्न केली गेली, हें आमचें मत या ग्रंथकाराला मान्य आहेसें दिसतें. हें मत इतर ग्रंथकारांनींही मान्य केलें आहे[३]. ग्रंथकार ' रक्ताला जेथें जेथें सोंवळेंपणा आला ' हा शब्दसमुच्चय ज्या आवेशानें लिहीत आहे, त्यावरून हें वाक्य अत्यंत प्रेमानें उच्चारीत असला पाहिजे, ही गोष्ट कोणाच्याही सहज लक्षांत येईल. रक्त सोंवळें केलें तर त्यांत चुकी काय झाली ? रक्त सोंवळें ठेवावें किंवा ठेवूं नये, जातिसंकर टाळावा किंवा टाळूं नये, या प्रश्नाच्या उत्तरावरच ही संस्था रहावी किंवा नष्ट व्हावी हा प्रश्न अवलंबून राहील. परंतु हा प्रश्न कोणी सोडवावयाचा ? या प्रश्नाचें उत्तर ज्यांचें ज्ञान वाङ्मयाच्या पलीकडे फारसें गेलेलें दिसत नाहीं, अशा स्वयंभू समाजसुधारकांनीं सोडवावयाचा नसून संकरशास्त्राचा अभ्यास केलेले सर फ्रॅन्सिस गॅल्टन, डॉ. हॅर्स्ट, डॉ. गेट्स्,

१ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न– वि. रा. शिंदे.

२ Origin of the Aryans by Taylor, National welfare and National decay by McDougal.

३ अस्पृष्टांचा प्रश्न– श्री. म. माटे.

४ Hereditary genius, an enquiry into human understanding.

५ Future of life.

६ Heredity and Eugenics.

डॉ. डेव्हनपोर्ट[१], डॉ. जेनिंग्ज[२], प्रो. इस्ट[३], प्रो. जोन्स[३], डॉ. बेटसन[४], डॉ. लोटसी[५], मनु, याज्ञवल्क्य वगैरेंनीं द्यावयाचें आहे. या लेखकांनीं आपलीं मतें बरींच निःसंदिग्ध भाषेंत दिलीं आहेत. कोणत्याही तऱ्हेचे प्रत्यक्ष प्रयोग करून अगर आपोआपच होत असलेल्या प्रयोगांचा अभ्यास करून मतें बनवावीं लागतात. नुसत्या शब्दसिद्धीवरून नव्हे. हें मत मान्य नसलेल्या आमच्याही कडील पुढाऱ्यांना तीं मतें पटतीलच असें नाहीं. आमच्याकडील पुढारी कांहीं महात्मे आहेत, कांहीं कर्मवीर आहेत अशी स्थिति आहे. तरी पण सर्वसामान्य वाचकांकरितां तीं मतें देतों. 'नैसर्गिक निवड अनेक पिढ्या चालल्यानें त्यांच्यामध्यें जें एक शारीरिक आणि मानसिक गुणांचें यथाप्रमाण मिश्रण झालें असेल, त्याचा नाश करणें याशिवाय कांहीं एक फायदा संकरानें होणार नाहीं. म्हणून असें एकीकरण करण्याला आमचा विरोध आहे.[६]' 'आमच्याजवळ जे नियम आहेत त्यावरून कोणत्याही तऱ्हेच्या दंपतीची संतति काय तऱ्हेची होईल हें आम्हांला निश्चित तऱ्हेनें सांगतां येईल. उच्चवर्णीयांतच विवाह घडवून आणून उच्चवर्णीय प्रजा वाढवितां येईल आणि अवरवर्णीय प्रजेचें उत्पादन टाळतां येईल. परंतु आज जग अवरवर्णीयांच्या आधीन असल्यामुळें, पुढें कांहीं शतकें तरी लोक विवाहाचे बाबतींत शासनसंस्थेला हात घालूं देणार नाहींत असें वाटतें. मग हा प्रश्न कधीं काळीं सुटणार आहे किंवा फक्त शास्त्रज्ञांच्या दप्तरींच रहाणार[७] !' ज्या निबंधांतून वरील उतारा घेतला आहे, तो निबंध जिज्ञासूंनीं जरूर वाचून पहावा. पुढें तोच लेखक म्हणतो, 'माझ्या मतें सरकारनें श्रेष्ठ कुटुंबांना देणग्या देण्यास सुरवात करावी. म्हणजे श्रेष्ठ स्त्रीपुरुषांमध्यें विवाह घडवून आणण्याची शासनसंस्थेनें खटपट करावयास पाहिजे आणि

---

१ Heredity in relation to Eugenics.

२ Biological basis of human nature.

३ Inbreeding and outbreeding.

४ Mendel's principles of heredity.

५ Evolution by Hybridization.

६ Inbreeding and outbreeding by East and Jones.

७ The future of life by C. C. Hurst—Times of India 24th July 1933.

त्या कुटुंबांमध्यें जन्म पावणाऱ्या प्रत्येक मुलागणिक कांहीं तरी आर्थिक मदत त्या कुटुंबांना राजसत्तेकडून मिळावयास पाहिजे. अशा मुलांना विश्वविद्यालयामध्यें पाठवून त्यांना भरपूर द्रव्य देऊन त्यांचें शिक्षण करण्याचीही जबाबदारी राष्ट्रावर राहील. अशा तऱ्हेनें नवीन वर्णव्यवस्था ( aristocracy ) उत्पन्न होईल.' शास्त्रज्ञांचा श्रेष्ठांची प्रजा वाढविण्याचा प्रयत्न, आणि हिंदुस्थानांतील ब्राह्मणांना दडपून टाकून अस्पृश्योद्धार करण्याचा प्रयत्न हे दोनही पाहिलें म्हणजे मनुष्याची मति गुंग झाल्याशिवाय रहात नाहीं. असो. डॉ. हर्स्ट सोंवळ्या रक्ताचा होता खरा.

आज ज्या अमेरिकेंतील सुधारणेचा आमच्या इकडे बराच गाजावाजा होतो, त्या अमेरिकेंत सर्व वस्ति श्वेतवर्णीयांचीच आहे. परंतु विवाहाच्या दृष्टीनें ते एकवर्णीय नाहींत. त्यांच्यामध्यें देखील रक्तें सोंवळीं ठेवण्याची जरूरी आहे. आपणांकडे तर मुळांतच विविध वंश आणि विविध उपजाति आहेत मग आपल्या इकडे रक्ताला सोंवळेंपणा आणावयास नको काय ? श्वेतवर्णीय विवाहाच्या बाबतींत एकजातीय आहेत किंवा नाहींत या बाबतींत डॉ. बेटसन् म्हणतो, 'ज्या संकरापासून मुलॅटो ही जाति उत्पन्न होते, ते निग्रो विविध जातीय आहेत, इतकेंच नव्हे तर त्यांच्याशीं संगत होणारे श्वेतवर्णीय देखील विविध जातीय आहेत, हा मुद्दा विसरून चालणार नाहीं.' म्हणजे निग्रोंतही विवाहाच्या दृष्टीनें अनेक जाति आणि श्वेतवर्णीयांतही अनेक जाति. हें आहे तरी काय ? परंतु तसें आहे असें दिसतें खरें. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतही स्थिति आहे आणि म्हणून रक्तें सोंवळीं ठेवण्याची जरूरीही पण आहे आणि त्याकरितांच जर अस्पृश्यता या तत्त्वाचा अवतार असेल, तर त्या तत्त्वाचीहि समाजाला जरूरी आहे. रक्तें सोंवळीं न ठेवल्यास त्याचे सार्वत्रिक समाजावर काय परिणाम होतात, यासंबंधीं आणखी एक मत देतों. 'संकरानें बहुशः एकाच व्यक्तीच्या पिंडामध्यें शारीरिक, मानसिक आणि भावनात्मक बाबतीमध्यें एक तऱ्हेची अस्थिरता उत्पन्न होते. त्यामुळें संकरप्रजा भोंवतालच्या परिस्थितीशीं कधींही समरस होत नाहीं. त्याचा परिणाम दुःखाची वाढ हा ठेवलेलाच समजावा. संकरानें उत्पन्न होणाऱ्या प्रजेमध्यें अस्थिरता आणि असंतोष हे गुण निसर्गतःच

१ Mendle's principles of heredity.

असतात. अशा तऱ्हेनें सुस्थित नसलेल्या ज्या मानसशक्ति आणि भावना यांच्यापासून गुन्हेगारी आणि वेड लागणें या तत्त्वांची पैदास होते. अशा तऱ्हेच्या संकरापासून कांहीं सामाजिक फायदे होऊं शकतील असें म्हणणारांना इतकेंच उत्तर आहे कीं, त्यापासून होणारे वाईट परिणाम हे त्यापासून होणाऱ्या फायद्यापेक्षां शतपटीनें जास्त आहेत. रक्तें सोंवळीं न ठेवतां उत्पन्न झालेल्या प्रजेंत श्रेष्ठ गुणयुक्त प्रजा निर्माण होतील असें मानणें म्हणजे मूर्खपणाचा कळस आहे. ' हा गृहस्थ इतके कडकडून कां लिहितो ? त्यानें आनुवंश शास्त्राचा पूर्ण अभ्यास करून वरील मत दिलेलें आहे. त्याच्या मतानें रक्तें सोंवळीं ठेवणें इष्ट आहे. कर्मवीर आण्णासाहेब शिंद्यांना रक्तें सोंवळीं ठेवण्याची इतकी चीड कां येते हेंच मला समजत नाहीं. ' जातिसंकरानें शारीर आणि मानस पिंडांत अधोगति होते. एकंदर जगांतील सुप्रजेसंबंधीं बोलावयाचें, तर फार दूरचीं रक्तें असल्यास व्यक्तींनीं एकमेकाचा विटाळच मानला पाहिजे. असें म्हणतात कीं, जवळच्या रक्तांनीं विवाह केल्यास एकादी पिढी चांगली निर्माण होईल. परंतु वेगवेगळ्या तऱ्हेनें वाढत गेलेल्या वंशांमध्यें मोठ्या प्रमाणावर संकर केल्यास ( म्हणजे जातिभेद नष्ट केल्यास ) जरूर नसलेले निरर्थक प्रश्न उत्पन्न होतील, अशा तऱ्हेचा संकर सर्वथा त्याज्य आहे. श्रेष्ठ वंश कनिष्ठपणाला जातात आणि अवरवर्णीयांतील हलके मानासिक आणि भावनात्मक गुण, चोरट्या वाटेनें थोर गुणांच्या शेजारीं जागा पटकावतात. अशा तऱ्हेचे संकर जर थांबविले नाहींत, तर लवकरच हलके गुण सबंध समाजामध्यें पसरतात. असो. अशा तऱ्हेची हवीं तेवढीं शास्त्रीय मतें देतां येतील आणि आनुवंशाचा अभ्यास करणाऱ्या पंडितांपैकीं कोणीही संकराला उचलून धरणार नाहीं. मग आनुवंशाच्या कल्पनेवर रक्तें सोंवळीं ठेवावयास सांगणारे हे ग्रंथकार इकडील दुष्ट ब्राह्मण मरून तिकडे जन्माला तर आले नसतील ना !

या अस्पृश्यतानिवारक वीरांच्या लेखनांतून आणि व्याख्यानांतून दुसरी एक कल्पना नेहमीं प्रतीत होत असते. ती म्हणजे सामाजिक न्याय आणि

---

१ Dr. C. B. Davenport.

२ Heredity and Eugenic by Gates.

अन्याय. हिंदूंनीं अस्पृश्यांवर अघोर अन्याय[1] केला, असेंहि कित्येक ठिकाणीं विधान आढळतें. डॉ. बेटसन् म्हणतो, 'आनुवंशाच्या तत्त्वानें आपल्या न्याय व अन्याय या बाबतींतील कल्पनामध्यें पुष्कळच फरक करावयास [2]पाहिजे.' न्याय आणि अन्याय हे दोनही कोणाच्याही मेंदूतून निघणाऱ्या विचाररूप गोंधळावरून ठरवावयाचे नसतात, एवढीच गोष्ट येथें नमूद करतों. 'जातींचे ( types ) विभक्तीकरण हें श्रेष्ठ संस्कृतीचें लक्षण आहे. कोणतीही श्रेष्ठ संस्कृति अशा तऱ्हेच्या जाति उत्पन्न केल्याशिवाय टिकणें शक्य नाहीं. जुन्या संस्कृतीमध्यें दिसून येणारे सामाजिक थर हे निसर्गामध्येंच उत्पन्न झालेले दिसतात. पुढें या नैसर्गिक जाति मनुष्यानें जातिव्यवस्थेनें स्थिर[3] केल्या. वंशाचे बाबतींत शुद्ध कशाला म्हणतात आणि अशुद्ध कशाला म्हणतात, या बाबतींत हिंदुस्थानामध्यें बरेच गैरसमज पसरलेले दिसतात.

एवंच धर्मांतरानें अस्पृश्यांची अस्पृश्यता नष्ट होते, हा मुद्दाच जेथें विवाद्य आहे आणि निव्वळ धर्मांतर केल्याबरोबर त्यांना स्पृश्यांचे हक्क प्राप्त होतात, ही गोष्ट जर खरीच नाहीं तर इतर धर्मीयांना जे हक्क दिले जातात, ते हक्क अस्पृश्यांना मिळावेत या विधानाचा अर्थ तरी काय करावयाचा? अस्पृश्य धर्मांतरानें स्पृश्य होत नाहींत, जे कांहीं मुसलमान चुकून माकून स्पृश्य झालेले दिसतात, ते कांहीं धर्मशास्त्रानें स्पृश्य मानलेले नाहींत. ते कांहीं तऱ्हेच्या व्यावहारिक कारणामुळें स्पृश्य झाले असतील. धार्मिक आचार मोडण्याची मानवी मनाची प्रवृत्तीच आहे, म्हणजे व्यक्तीच्या कृतीला धर्मशास्त्र कांहीं अनुज्ञा देत नसते. व्यक्तीनें एक अधर्म केला म्हणून त्याबरोबर दुसराही अधर्म करावा, हें अनुमान कसें निघतें हेंच कळत नाहीं. परंतु अशाच तऱ्हेच्या कल्पना समाजाचे नायकच आज पुढें मांडूं लागले आहेत, हें आश्चर्यच नव्हे काय?

पुन्हां धर्मांतरानें अस्पृश्यता नष्ट होत असेल तर तेही बरोबरच आहे.

---

१ अस्पृष्टांचा प्रश्न– श्री. म. माटे.
२ Mendel's principles of heredity.
३ Heredity and Eugenics by Gates.

अस्पृश्यता ही हिंदुसमाजरचनेंतील पद्धति आहे. ख्रिस्ती अगर मुसलमानी नव्हे. ज्याप्रमाणें मुसलमान अगर ख्रिस्ती समाजांत रूढ असलेले आचार हिंदु मनुष्याला लागूं करतां येत नाहींत, त्याप्रमाणेंच हिंदूंचे रूढ आचार मुसलमान अगर ख्रिस्ती मनुष्याला लागूं होणें शक्य नाहीं. आज पाहिजे तर हिंदुसमाजानें म्हणजे परिस्थित्यनुरूप आचारांत परिवर्तन करावयास पाहिजे, असें म्हणणाऱ्या समाजनेत्यांनीं मुसलमान अगर ख्रिस्ती हा देखील अस्पृश्य मानावयास पाहिजे, असा पाहिजे तर नवीन दंडक पाडावा. परंतु आज असलेला कायदा आणि आचार, यांचा विचार करतां असेंच दिसतें कीं, धर्मांतरिताला हिंदूंचा रूढ आचार लागूं करणें शक्य नाहीं.

अमुक आचार असावा त्याणि अमुक आचार नसावा हें ठरवितांना, प्रमाण व प्रमेय यांची निश्चिती व्हावयास पाहिजे. कारण धर्म म्हणजे एक व्यक्तींना पद्धतशीर आचार लाऊन देण्याचा पंथ आहे. इतर ध्येयवादी शास्त्राप्रमाणेंच धर्माला ध्येय आणि मार्ग या दोनही गोष्टींचा खल करावयाचा असतो. नाहींतर वेगवेगळीं ध्येयें आणि वेगवेगळी प्रमाणपद्धति स्वीकारल्यास ज्याप्रमाणें तत्त्वज्ञानाच्या वेगवेगळ्या पद्धति उत्पन्न होतात, त्याप्रमाणें आचारपद्धतीहि वेगवेगळ्या उत्पन्न होऊं लागतील. 'प्रत्यक्षमेकं इतिचार्वाकाः, प्रत्यक्षानुमाने द्वेप्रमाणे इति काणादाः, प्रत्यक्षानुमानशब्दाः त्रयः प्रमाणानीति सांख्यकापिलाः, प्रत्यक्षानुमानोपमानशब्दाः चत्वारि प्रमाणानि इति नैय्यायिकाः, प्रत्यक्षानुमानोपमानशब्दार्थापत्यनुमलब्धयः षट् प्रमाणानीति मीमांसकाः,' अशा तऱ्हेनें वेगवेगळी प्रमाणसंख्या मानणारे लोक जगाचें चित्र अर्थातच वेगवेगळ्या तऱ्हेचें रंगविणार. अर्थातच यांच्यामध्यें आचारप्रणाली एकच कशी उत्पन्न होऊं शकेल ? 'त्रयो वेदस्य कर्तारः धूर्तभांडनिशाचराः' असें म्हणणारे चार्वाक आणि 'धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः' असें म्हणणारा हिंदुसमाज यांच्यामध्यें आचारांचें साम्य होऊं शकेल काय ? म्हणून जगाचा अध्यक्ष ईश्वर आहे, असें

१ Six systems by Max Muller; A history of Indian Philosophy by Dasgupta.

२ सर्वदर्शनसंग्रह.

३ मनुस्मृति

मानणारे आणि ईश्वराचें अस्तित्व न मानणारे, यांच्या जगाकडे पहाण्याच्या दृष्टिकोनांत जगांतील आचार ठरविण्याचें बाबतींत फरक पडणारच. जगत् आणि मानव या दोघांचा स्वभाव आणि परस्परांशीं साहचर्य या दोन बाबतींत जर दोन व्यक्तींत मतभिन्नता असेल, तर त्यांच्या नैतिक मूल्यामध्यें आणि तदुद्भुत आचारप्रणालीमध्यें फरक पडणारच. या दोहोंमध्यें अधरोत्तर व्यक्ति कशी ठरवावयाची ? कारण प्रत्यक्ष प्रमाणवादीनें जगत्-स्वरूप आणि ध्येयस्वरूप मानील त्यालाच धरून तो आपले आचार ठरविणार.

आजच्या समाजांत पाहिलें तर प्रत्यक्ष प्रमाणावर भर देण्याची प्रवृत्ति झालेली दिसते. म्हणून शुद्ध प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे काय, निव्वळ प्रत्यक्ष प्रमाण मानल्यास काय काय अडचणी उत्पन्न होतात, या सर्व गोष्टींचा हे प्रत्यक्ष प्रमाणवादी विचार करतात किंवा कसें, या गोष्टींचा थोडासा विचार करूं. प्रत्यक्ष ( इंद्रियार्थसंनिकर्षजन्यं ज्ञानं ) प्रमाण शब्दाचा शास्त्रीय अर्थ असा होईल कीं, बाह्यजगताचे पंचेंद्रियावर झालेले परिणाम म्हणजे प्रत्यक्ष. ह्या परिणामाचे बरोबरच हे परिणाम मोजण्याकरितां आपण जे मोजमापाचे नियम ठरविले असतील, तेही पण घ्यावे लागतील. एवढीच गोष्ट करून जर मानव व्यक्ति स्वस्थ बसेल, तर ती प्रत्यक्ष प्रमाणवादी आहे असें म्हणतां येईल. या प्रत्यक्ष प्रमाणवाद्यांचें कार्य इतकेंच कीं, त्यांनीं जगांतील सर्व अनुभवांची जंत्री करून ठेवावी. इतकेंच करून हा प्रत्यक्ष प्रमाणवादी स्वस्थ बसेल, तर त्याला कोणतेही प्रश्न सोडवावयाचे नाहींत किंवा जगत् हें कोडेंही नाहीं. कारण जें जें पंचेंद्रियांना भासतें तें तें तो अनुभवितच आहे. परंतु हा अनुभव शब्दांमध्यें आल्याबरोबर गैरसमज उत्पन्न होऊं लागतात. आपण ज्यावेळीं बाह्य जगांतील खुर्ची हा शब्द उच्चारतों, त्या वेळीं आपण बाह्य जगांतील खुर्चीबद्दल बोलत नसून, आपल्या इंद्रियांनीं ग्रहण केलेल्या संवेदनाबद्दल बोलत असतों. त्या संवेदना काढून टाकल्यास खुर्चीसंबंधीं काय शिल्लक रहातें म्हणून सांगतां येईल ? हीच गोष्ट एकून एक सर्व प्रत्यक्ष प्रमाणावरून येणाऱ्या कल्पनांना लागू आहे.

---

१ Where is science going by **Max Plank**; **The nature of the physical world by Arthur Eddington.**

प्रत्यक्ष प्रमाण मानणारांना हें जगत् म्हणजे त्यांच्या पंचेंद्रियांना येईल तेवढा अनुभव. याच्यापुढें जाऊन सत्य जग म्हणजे काय, हें सांगणें हें त्यांचें कार्य नव्हे आणि तो त्यांचा अधिकारही नव्हे. जगांतील एकादा कोणता अनुभव जर या पंचेंद्रियांच्या संवेदनांत बसत नसेल, तर तो प्रत्यक्ष प्रमाणवाद्याला गृहीत धरतां येत नाहीं व त्यामुळें त्या पद्धतीमध्यें कोणत्याही तत्त्वज्ञानाला जागा उरत नाहीं. आपण जुने ज्योतिषी म्हणत असत त्याप्रमाणें पृथ्वी हा जगताचा मध्यबिंदू मानला, अगर नवीन ज्योतिषी म्हणतात त्याप्रमाणें पृथ्वी ही अस्थिर मानली, तरी हे दोनही सिद्धांत प्रत्यक्ष प्रमाणाच्या बाहेर जातात. म्हणजे या दोनही बाबतींत आपण प्रत्यक्ष अनुभविलेल्या स्थितीवरून कांहीं अनुमान काढीत आहोंत. पण अनुमान म्हणजे कांहीं प्रत्यक्ष प्रमाण नव्हे. कोपर्निकसानें[1] शोध असा कांहींच लाविला नाहीं, तर त्यानें आपल्या आलेल्या अनुभवाचा एका विवक्षित पद्धतीनें अर्थ लावून दाखविला. परंतु असा अर्थ लावणें म्हणजे साधुत्व आणि सौंदर्य या दोन नवीन कल्पनांचा प्रमाणांत समावेश करणें आहे. आमच्या सारख्यांना या कल्पना जरूर मान्य आहेत, परंतु प्रत्यक्ष प्रमाणांच्या गप्पा झोंकणारांना त्यांचा आश्रय करतां येणार नाहीं.

पंचेंद्रियांनीं प्रतीत होणारें ज्ञान तें प्रत्यक्ष अशी व्याख्या केल्याबरोबर इंद्रियद्वारें होणारें ज्ञान बरोबर अगर चूक हा प्रश्नच[2] उत्पन्न होत नाहीं. कारण इंद्रियगोचर ज्ञान चूक आहे, असें म्हटल्याबरोबर कोठें तरी हें ज्ञान ज्यांच्यांशीं पडताळून पहावें असें कांहीं तरी सत्य ज्ञान आहे, असा सिद्धांत ग्रहीत धरावा लागतो. परंतु हें ज्ञान कोठून आलें ? तें ज्ञान व्यक्तीच्या पंचेंद्रियांना होत नसल्यामुळें, म्हणजे त्यांना तें गोचर नसल्यामुळें त्या व्यक्तीला तें प्रत्यक्ष नव्हे. पंचेंद्रियांना होतात त्या संवेदना अर्थातच बरोबर आहेत, त्यापासून जीं अनुमानें आपण काढतों तीं अनधिकृत असतात. ‘ तद्वति[3] तत्प्रकारकोऽनुभवो यथार्थानुभवः। सा एव प्रमेति उच्यते। ’ परंतु येथें

---

१ Where is science going by Max Plank.

२ स्वतः प्रमाण मानणारे मीमांसक आणि परतः प्रमाण मानणारे नैय्यायिक यांच्यामधील वाद पहावा.

३ तर्कसंग्रह– अन्नंभट्ट.

तद्वत्व आधीं ठरवून मग त्यांशीं अनुभवाची तुलना केली. परंतु हें तद्वत्व कसें ठरविलें ? ज्ञानाची अशी स्थिति असतांना, कांहीं व्यक्तींच्या पंचेंद्रियांनीं ग्रहण केलेल्या संवेदना जगांत प्रमाण कां मानल्या जातात, याचा विचार करतां असें दिसून येतें कीं, त्या व्यक्ति आप्त मानल्या गेलेल्या असतात. त्या व्यक्तींना समाजाला फसविण्यापासून कांहीं फायदा नाहीं आणि कांहीं थोडासा फायदा होत असला, तरी तेवढ्याशा फायद्याकरितां त्या समाजाला फसविणार नाहींत, अशी खात्री असते. म्हणून वरील चर्चेवरून दिसून येईल कीं, प्रत्यक्ष प्रमाणवादी हा देखील अनुमान आणि आप्तवाक्य हीं प्रमाणें मानीतच असतो. प्रतिपक्षाला मात्र तींच प्रमाणें वापरण्याची मोकळीक ठेवण्यास तो तयार नसतो एवढेंच. 'आप्तस्तु यथार्थवक्ता' शाब्द प्रमाण मानावयाचेंच तर कोणाचा शब्द प्रमाण ? हर्बर्ट स्पेन्सर किंवा अर्न्स्ट हेकेल यांच्या शब्दाला जर शब्द म्हणून किंमत, तर मनु आणि शंकर यांच्या शब्दांना निदान तितकें तरी प्रामाण्य कां नसावें ? येथें दोन अडचणी उत्पन्न होतात. एक म्हणजे मूळ वक्त्यानें आपणाला झालेलें ज्ञान, शब्दांमध्यें बरोबर प्रतीत केलें आहे असें ग्रहीत धरावें लागतें आणि दुसरें म्हणजे तो शब्द आणि त्या शब्दाधिष्ठित कल्पना अगर प्रक्रिया, आपणाला बरोबर कळली हेंही पण ग्रहीत धरावें लागतें. परंतु आज पहावें तर या दोनही बाबतींत आपणाला कांहीं निश्चय केलेला दिसत नाहीं, त्यामुळें प्रामाण्याचे बाबतींत अनेक चमत्कार प्रतीत होऊं लागतात. एकाच ग्रंथांत एक स्मृति अप्रमाण ठरते, तर त्याच ग्रंथांत कांहीं पानें गेल्यानंतर तीच स्मृति प्रमाण मानली जाते. आज प्रत्यक्ष समाजांत वावरत असलेली अस्पृश्यता शब्द प्रमाणांनीं खोडण्याचा प्रयत्न केला जातो म्हणजे प्रत्यक्ष प्रमाणापेक्षां शाब्द प्रमाण येथें जास्त महत्त्वाचें ठरतें. अशा तऱ्हेनें एकदां चर्चा सुरू केली कीं, जगांतील एकही सिद्धांत स्थिर राहूं शकणार नाहीं, या बाबतींत आमची पूर्ण खात्री आहे. जिकडे पहावें तिकडे अशाच तऱ्हेचें अनाधिकृत प्रामाण्य पुढें करून बुद्धिभेद केला जात आहे, त्याचें कारण काय असेल तें एक परमेश्वरच जाणें !

---

१ धर्मरहस्य– के. ल. दप्तरी.

उदाहरणानें बोलावयाचें तर आज कांहीं लेखकांकडून वर्णांतराचें समर्थन केलें जात आहे. त्याला प्रत्यक्ष शास्त्रांचा आधार आहे असें दाखविण्याकरितां अगर भासविण्याकरितां ते सिद्धांत सांगतांना, जननशास्त्रांतले कांहीं फुटकळ शब्दही वापरले जातात. ज्या जननशास्त्रीय सिद्धांताच्या अनुरोधानें आधुनिक लेखक वर्णांतराचें समर्थन करतात ते पुढीलप्रमाणें.

**६४ वर्णांतर अगर वर्गांतर हानिकारक**

( १ ) स्त्रीपुरुषांत व्यक्ताव्यक्त गुण असतात, पुढें संततीमध्यें कांहीं अव्यक्त गुण व्यक्त होतात आणि कांहीं व्यक्त गुण अव्यक्त होतात. कांहीं ठिकाणीं व्यक्ताव्यक्त गुणांचें मिश्रण ( blending ) मिश्रित गुण उत्पन्न होतात.

(२) संततीमध्यें कांहीं थोडे थोडे फरक (variation) आपोआप होतात.

(३) एकाच परिस्थितींत एकादी जाति ठेवल्यास, ती जाति त्या परिस्थितींत जगण्याला लायक अशी होते. कोणा एका जातीनें बौद्धिक काम करूनच त्यावर निर्वाह करावा इतर काम करूं नये, केल्यास त्या व्यक्तीला जातींतून हांकलून द्यावे, असा नियम केल्यास ती जाति बुद्धिहीन असल्यास कालांतरानें बुद्धिवान होईल. बुद्धीचें काम करण्यास अत्यंत लायक होईल.

आतां या तीनही सिद्धांतांचें प्राणिशास्त्रीय ज्ञानाच्या अनुरोधानें परीक्षण करूं. प्रथमतः त्यांचें म्हणणें असें कीं, कांहीं अव्यक्त गुण व्यक्त होतात. हे शब्द शास्त्रीय अर्थानें वापरले आहेत असें मानल्यास, त्यांच्या वाक्याचें इंग्रजींत ‘ Recessive becomes dominant ’ असें भाषांतर होईल. अव्यक्ताचा व्यक्त, अगर व्यक्ताचा अव्यक्त गुण एकाच पिढींत कसा होऊं शकेल, ही गोष्ट कळणें फारच कठीण आहे. ही गुणांची उलटापालट काय पद्धतीनें होते, त्याची शास्त्रीय प्रक्रिया या लेखकांनीं सांगितल्यास प्राणिशास्त्र त्यांचे सदैव ऋणी राहील. ‘ अव्यक्त गुण ( Recessive ) हे व्यक्त गुणापासून उत्पन्न झाले असें मानणें ही चूक आहे. अव्यक्त गुण हे व्यक्त गुणापासून कधींही उत्पन्न होत नसतात. ते संकर प्रजेमध्यें तिरोहितरूपानें

त्रावरत असल्यामुळें ओळखूं येत नाहींत इतकेंच.[१] ' तरी देखील आमच्या इकडील शाब्द पंडित सांगणारच कीं, एका पिढीमध्यें व्यक्त गुण अव्यक्त होतात आणि अव्यक्त गुण व्यक्त होतात. पुढें मिश्रणयुक्त आनुवंश आणि फरक यांचा विचार करूं. येथें फरक या शब्दाचा आधुनिक समाजसुधारक काय अर्थ घेतात तो कळावयास पाहिजे. फरक शब्दाचे ( १ ) पूर्वी नसलेले गुण कोणत्याही तऱ्हेचा संकर न होतां उत्पन्न होणें अगर ( २ ) आईबापांच्या पिंडामध्यें जे गुण असतील त्याच गुणांची संततीमध्यें कमी अधिक भेदानें वेगवेगळी मांडणी होणें, असे दोन अर्थ होतात. पहिला अर्थ घेतला तर पिंडामध्यें पूर्वी नसलेले गुण थोडथोडे उत्पन्न होत जाण्याची प्रक्रिया सृष्टींत होत आहे आणि हे जे कांहीं फरक म्हणून सांगितले, त्यांच्या[२] गतीचा उत्क्रांतीवर परिणाम होतो, या दोन गोष्टी सिद्ध व्हावयास पाहिजेत. पहिल्या मुद्यासंबंधीं डॉ. लोटझी म्हणतो[३], ' डार्विनच्या मनामध्यें या बाबतींत गोंधळ झालेला दिसतो. याचें कारण माझ्यामतें आनुवंशानें संचारी होणारा फरक ही गोष्ट या सृष्टींत अस्तित्वांतच नाहीं. ' या गृहस्थानें ह्युगो डीव्राईस याचाही प्रयोगांचा पूर्णतः परामर्ष घेऊन, फरकांचें अस्तित्वच नाहीं असाच निष्कर्ष काढला आहे. अशा तऱ्हेनें असिद्ध अशा सिद्धांतांच्या जोरावर वर्णांतरासारखे सर्व समाजांत भयंकर खळबळ उडवून देणारे सिद्धांत मांडावयाचे असतील, तर मग समाजशास्त्र हें शास्त्र नसून अभिरुचीवर अवलंबून रहाणारा एक प्रश्न आहे असें ठरूं लागेल.

पुढें त्यांनीं मांडलेल्या मिश्रणात्मक आनुवंशाची तीच स्थिति आहे. त्या बाबतींत आधुनिक शास्त्रज्ञांचा काय निष्कर्ष आहे तो पुढें देतों. ' असिद्ध अशी मिश्रणाची कल्पना गृहीत धरल्यामुळें, दोन पिढ्यांमध्यें वरवर जे फरक भासमान होतात, त्या बाबतींत डार्विननें पुष्कळच कल्पना पुढें मांडल्या आणि ते फरक उत्क्रांतीचें कारण म्हणून सांगितलें. मुख्यतः या मिश्रणपद्धतीनें फरकांची गति म्हणजे उत्क्रांतीचें साधन या मताला फारच जोराचा पाठिंबा मिळाला. परंतु आतां आनुवंश कोणत्या प्रक्रियेनें

१ Evolution by means of hybridization by J. P. Lotsy.
२ Rate of variations affects the line of evolution.
३ Evolution by means of hybridization by J. P. Lotsy.

प्रतीत होतो, ती प्रक्रिया सांपडली आहे आणि त्यामुळें उत्क्रांतीमध्यें या फरकांचें कार्य कांहींही राहिलें नाहीं. शुद्ध वंशावर जे प्रयोग करून पाहिले, त्यांच्या अनुरोधानें मिश्रणात्मक आनुवंशाला उत्क्रांतीमध्यें दुय्यम देखील स्थान देतां येणार नाहीं. जे फरक म्हणून मानले जातात, ते उत्क्रांतीला मदत करीत नाहींत आणि ते ज्या गतीनें सृष्टींत उत्पन्न होतात त्या गतीनें त्यांचा उत्क्रांतीच्या रेषेवर कांहींही परिणाम होत नाहीं, म्हणून मिश्रणात्मक आनुवंश हा उत्क्रांतीचें साधन मानतां येत नाहीं, कारण तो अस्तित्वांतच नाहीं. या शतकाच्या सुरवातीला अशा पुष्कळ गोष्टी आढळांत आल्या होत्या कीं, त्यावेळीं मिश्रणात्मक आनुवंश मान्य करणें भागच होतें. परंतु जास्त शोधानें असें दिसून आलें आहे कीं, ते सर्व परिणाम मेंडेलच्या आनुवंश पद्धतीचींच उदाहरणें आहेत. श्वेतवर्णीय आणि नीग्रो यांच्या प्रजेंत भासमान होणारें वर्णाचें मिश्रण, हें मेंडेलच्या नियमांना सोडून नाहीं. मुलाटोच्या मुलांत जे फरक दिसतात, त्यांचा अर्थ मेंडेलच्या पद्धतीनेंच लावणें शक्य आहे. अशा तऱ्हेनें आनुवंशाच्या सर्व पद्धति त्याज्य ठरतात आणि नैसर्गिक निवडीची पद्धतीच फक्त सत्य म्हणून शिल्लक उरते.[१] अशा तऱ्हेनें मेंडेलचा आनुवंश आणि नैसर्गिक निवडीची पद्धति हीच सृष्टींत अस्तित्वांत आहे, अशीं मतें अनेक अभ्यासकांनीं दिलेलीं आढळतात. तरी देखील फरक आणि मिश्रणात्मक आनुवंशाची पद्धति यांनीं वर्णांतर होतें, ही कांहींची भुणभुण चालूच आहे. वर्णांतरवाद्यांचा तिसरा सिद्धांत असा कीं, एकादी जाति जर सारखी बुद्धिप्रधान गुणांचे बाबतींत निवड करीत गेली, तर ती जाति कालांतरानें अत्यंत बुद्धिमान होईल. नैसर्गिक निवडीच्या तत्त्वावर हा सिद्धांत अत्यंत बरोबर आहे. परंतु मुळांतच बुद्धि किंवा इतर कोणताही गुण नसलेल्या जातींत त्याच गुणांची निवड करावयाची असें ठरविल्यास, जातींत तो गुण उत्पन्न होण्याच्या ऐवजीं ती जातीच नष्ट होण्याचा संभव जास्त. डॉ. हर्स्टच्या मतानें जे शेंकडा ८० सर्वसाधारण लोक, ज्यांच्यापासून श्रेष्ठ प्रजा उत्पन्न होणें अशक्य आहे असें तो म्हणतो, त्या प्रजेमध्यें निवड करीत गेल्यास देखील श्रेष्ठ प्रजा उत्पन्न होईल असें मानणें धाडसाचें आहे. निवडीनें नसलेले

१ Genetical theory of selection by R. A. Fisher.

गुण उत्पन्न होत नाहींत, तर असलेले गुण शुद्ध होत जातात. अशा तऱ्हेनें आधुनिक समाजसुधारणावाद्यांनीं आनुवंशासंबंधीं गृहीत धरलेले सर्वच सिद्धांत चूक आहेत आणि या उपटसुंभ सिद्धांताच्या आधारावर हिंदूंची जातिरचना आज बदलावयाची आहे. या चुकीच्या गृहीत कृत्यावर उभारलेले सिद्धांत बरोबर कसे येणार ती गोष्ट आम्हां प्राकृत जनांना कळत नाहीं. 'परंतु[१] संततीमध्यें ज्याअर्थीं थोडेफार फरक होतात, त्याअर्थीं क्वचित् प्रसंगीं जन्मामुळें असवर्ण परंतु गुणामुळें सवर्ण, अशा स्त्रीपुरुषांचा विवाह अनिष्ट नाहीं' अशीं जीं विद्वत्ताप्रचुर वाक्यें विखुरलेलीं सांपडतात, त्यांचा अर्थ कसा करावयाचा ? परंतु संततीमध्यें ज्याअर्थीं थोडे थोडे फरक पडत जातात, हा सिद्धांत जर मुळांत चूक आहे, तर तो सिद्धांत गृहीत धरून काढलेलीं अनुमानें, अर्थातच अग्राह्य आहेत व त्या पद्धतीनें केलेली समाजरचना हा एक लेखकांच्या कल्पनांचा खेळ आहे. पुढें तेच लेखक म्हणतात, 'म्हणून त्या विवाहास—असवर्ण विवाहास—जरा हलक्या दर्जाचा मानणें जरूर आहे.' परंतु असें कां ? जर हलक्या दर्जाचा विवाह मानावयाचा, तर अशा हलक्या विवाहांना अनुमती आपण होऊन कां द्यावी ? परंतु मनुष्य एकदां तर्कट रचूं लागला म्हणजे तो काय अनुमानें काढील तें सांगतांच येणार नाहीं. पुढें तेच ग्रंथकार सांगतात कीं, अशा तऱ्हेचा विवाह म्हणजे असवर्ण विवाह नव्हेच मुळीं, कारण वधुवर हे गुणानें मुळीं एकच वर्णाचे आहेत. परंतु सर्वांत फारच मोठा चमत्कार त्यांनीं यापुढेंच केलेला आहे. 'परस्पराभिलाष हाही एक सदृशत्वाचा पुरावा आहे.' कारण 'समानशीले व्यसनेषु सख्यम्' हा नियम प्रसिद्धच आहे. मात्र अभिलाष शुद्ध पाहिजे. म्हणजे केवळ द्रव्यामुळें अगर सौंदर्यामुळें उत्पन्न झालेला अभिलाष नसावा तर तो केवळ चारित्र्यामुळेंच उत्पन्न झालेला असावा. 'परंतु चारित्र्य आणि अभिलाष समजण्यास वराचें आणि वधूचें वय मोठें असलें पाहिजे.' हा उतारा अव्वलपासून अखेरपर्यंत मूर्खपणानें भरलेला आहे एवढी टीका यावर पुरे आहे.

हिंदुधर्मशास्त्रकारांनीं सांस्कृतिक वर्णव्यवस्था आणि आनुवंशिक जातीय व्यवस्था यांचा समन्वय घालून, समाजरचना उत्पन्न करण्याकरितां कोण-

---

१ धर्मरहस्य— के. ल. दप्तरी.

**६५ सवर्ण आणि सजाति** कोणत्या गोष्टी विचारांत घेतल्या होत्या, आणि त्या आधुनिक शास्त्रांच्या चौकटींत कितपत बसूं शकतात, याचा आतां विचार करूं. हिंदुसमाज या दोनही पद्धतींची व्यवस्था म्हणजे मानवप्राण्याच्या विभागणीचें तत्त्व गृहीत धरूनच आपल्या कार्याला प्रवृत्त झाला आहे. सर्व मानव कांहीं समान नाहींत. अशा तऱ्हेची विभागणी होऊं शकते, ही गोष्ट आधुनिक शास्त्रांना मान्य आहे, हें आम्हीं पूर्वींच दाखविलें आहे. अशा तऱ्हेनें एकवंशीय लोकांमध्यें देखील अधरोत्तर व्यक्ति असते आणि हिंदुस्थानांत तर विविधवंशीय लोक अस्तित्वांत होते आणि आहेत ! त्यामुळें हिंदुसमाजशास्त्रज्ञांपुढें अत्यंत विकट प्रश्न होता. म्हणून हिंदूंना द्विविध विभागणी करावी लागली. संस्कारानें वर्णव्यवस्था करावी लागली आणि वंशानें जातिव्यवस्था करावी लागली. अशा रीतीनें वेगवेगळ्या वंशांमध्यें ही जातिव्यवस्था आणि वर्णव्यवस्था फैलावली. वर्ण हे संस्कारावरून ठरले तर जाति या जन्मावरून ठरल्या. उदाहरणार्थ, बंगाल्यांतील ब्राह्मण आणि महाराष्ट्रांतील ब्राह्मण हे वर्णानें एक परंतु जातीनें एक नव्हेत. कोणताही भूमिखंड घेतला तरी तेथें संस्कारयुक्त ब्राह्मण असणारच. परंतु त्यांची जातीय विभिन्नता ओळखावयास पाहिजे म्हणून ती तशी ओळखली गेली. अशी व्यवस्था झाल्यानंतर पुढें सुप्रजेच्या दृष्टीनें त्या रचनेचा विचार करावा लागला. परंतु सुप्रजेचा विचार म्हणजे प्राणिशास्त्रीयदृष्ट्या विवाहित अगर अविवाहित स्त्रीपुरुषांच्या संततीचा विचार.

आम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, कुटुंबव्यवस्था ही काळदृष्ट्या मानवाशीं समव्याप्त आहे. परंतु वाङ्मयाचा आणि सामाजिक चालीरीतींचा अभ्यास करणारे पंडीत असें सांगतात कीं, एक काळ असा होता कीं, त्यावेळीं मानवामध्यें विवाह ही संस्था अस्तित्वांतच नव्हती. तें बंधन आर्यवाङ्मयावरून पहातां असें दिसतें कीं, श्वेतकेतू नांवाच्या कोणा सद्‍गृहस्थानें उत्पन्न केलें आणि खुळा समाज त्या पोराचें ऐकूं लागला. परंतु सर्वसाधारण मनुष्यसमाज अशा स्थितींत कधींच नसावा, ही गोष्ट आम्हीं मागें सांगितलीच आहे. येथें विवाह शब्दाच्या अर्थांत गोंधळ होतो असें आम्हांला वाटतें. विवाहसंस्था नव्हती याचा अर्थ कोणीही वयांत आलेली स्त्री कोणाही प्रौढ पुरुषाशीं

अनियंत्रित तऱ्हेनें संगत होत असे असा[१] अर्थ होतो. तसा अर्थ होतो असें म्हणणारांचा मुख्य मुद्दा असा कीं, मुख्यतः मनुष्य हा समाजप्रिय प्राणी आहे. तो तसा नसता तर संस्कृति आणि प्रगति या दोन स्थितींची शक्यताच उत्पन्न होत नाहीं. कारण या दोनही स्थिति अनेक लोकांच्या मेंदूतून उत्पन्न होणाऱ्या कल्पनांचें एकीकरण झाल्याशिवाय प्रतीत होऊं शकत नाहींत. या सर्व गोष्टी गृहीत धरल्या तरी स्त्रीपुरुषसंबंधांचे बाबतींत नियंत्रण ठेवल्यानें संस्कृति अगर प्रगति यांना अडथळा येण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. ऐतिहासिक काळांत तर कुटुंबें निश्चित होतीं आणि आजही आहेत, परंतु त्यामुळें संस्कृतीची गति थांबल्याचें आढळून येत नाहीं.

खरी गोष्ट अशी आहे कीं, लाखों वर्षांचा मनुष्यप्राण्याचा इतिहास आपणांस अज्ञात आहे. त्या काळासंबंधीं कांहीं कल्पना गृहीत धरून आपण अनुमानें काढीत असतों. परंतु त्या कल्पनाच मुळांत खऱ्या नसल्या, तर आपलीं अनुमानें अर्थातच असिद्ध ठरणार. येथें गृहीत कृत्य असें आहे कीं, समाज अविवाहाच्या स्थितींतून विवाहाच्या स्थितीला जातात. परंतु आजच्या युरोपकडे जर बारकाईनें पाहिलें, तर ते समाज —हे समाज शीरसलामत बाहेर पडल्यास —वैवाहिक निर्बंधाच्या स्थितींतून अविवाहाच्या स्थितींत गेले असें नाहीं का म्हणतां येणार ? मुख्य मुद्दा समाज कोणत्या स्थितींत होता हा नसून, राष्ट्रांच्या अगर समाजांच्या रक्षणाकरितां तो कोणत्या स्थितींत असावा हा आहे.

पृष्ठवंशयुक्त[२] प्राण्यांमध्यें मनुष्यप्राण्याची गणना होते. त्या वर्गांत मनुष्य हा एकटाच प्राणी असा आहे कीं, ज्याची संतति जन्मापासून पुढें कांहीं वर्षेंपर्यंत दुर्बल स्थितींत असते. या दुर्बल आणि परावलंबी संततीला, सबल आणि स्वावलंबी करावयाचे तर कांहीं कालपर्यंत त्या संततीची जोपासना करण्याकडे मातेचें पूर्ण लक्ष असावयास पाहिजे. हें लक्ष द्यावयाचें तर अन्नोत्पादनाची कांहीं तरी नियमित व्यवस्था असावयास पाहिजे. म्हणून त्यांचें भरणपोषण करणारा एकादा नियमित पुरुष ठरून गेला असला पाहिजे.

---

१ Bachofen and Morgan quoted by Muller Hyer; Evolution of marriage.

२ New Evolution by Clarke.

समाजांत होणाऱ्या सर्व मुलांचें संगोपन करण्याची जबाबदारी मध्यवर्ति शासनसंस्थेवरच रहावी, ही शक्कल विसाव्या शतकांतील आहे आणि त्या पद्धतीचे समाजावर होणारे परिणाम अजून दिसावयाचे आहेत. मानव-प्राण्याची ही दुर्बल संतति एकाखालीं एक वाढत जाणारी रोपीटोपी मिळून होत असते. या सर्वांचें रक्षण संवर्धन व्हावयाचें तर त्याची कांहीं तरी स्थायि व्यवस्था असावयास पाहिजे. या सर्वांच्या रक्षणपोषणाचा भार वाह-णारी स्त्री ही शक्य तेवढी एका स्थानाला जखडलेली असून द्रव्यार्जनाच्या कष्टांतून मोकळी असावयास पाहिजे. तशी स्थिति येण्यास स्त्रीपुरुषसंबंधांचें कांहीं तरी नियंत्रण असावयास पाहिजे. म्हणून आम्ही म्हणतों कीं, कुटुंब-युक्त समाज नव्हते ही स्थिति मानवकोटींत अशक्य आहे.

विवाह आपण समजतों त्या अर्थानें नसला, तरी स्त्रीपुरुषसंबंधांचे नियम सर्वकाळीं आणि सर्व ठिकाणींच असलेले दिसून येतात. एकाद्या समाजा-मध्यें एकादी स्त्री सर्व भावांशीं लग्न करील, तर दुसऱ्या समाजामध्यें एक पुरुष सर्व बहीणींशीं लग्न करील. परंतु या सर्व स्थिति कांहींतरी नियमांना धरूनच आहेत. येथें स्त्रीपुरुषसंभोग कांहीं अनिर्बंध आणि अनियंत्रित नाहीं. स्त्रीपुरुषसंबंधाला एकाद्या गटानें नियम लाऊन देणें म्हणजेच विवाहसंस्था उत्पन्न करणें होय. आर्यांनीं ही पद्धति, मनुष्यप्राण्याच्या दुर्बल व परावलंबी संततीचा विचार करतां, अत्यंत हितकारक आहे असें गृहीत धरूनच समाजरचनेला सुरुवात केली आणि विवाहाचे नियम आणि मर्यादा घातल्या.

प्रथमतः सवर्ण आणि सजाति हा विचार डोळ्यापुढें येऊं लागला. येथें सवर्ण आणि सजाति हे शब्द समव्यास नाहींत. वर्ण हा शब्द genus आहे आणि जाति या त्यांतील species आहेत. सजाति म्हणजे जन्माच्या तत्त्वावर बनविलेल्या संघांचे घटक जेथें जेथें सवर्ण मातापित्यांपासून झालेली संतति असें म्हटलें आहे, तेथें तेथें त्याच वसतिस्थानांतील सवर्ण असा अर्थ घ्यावयाचा आहे. सवर्ण मातापित्यांपासून झालेली जी संतति त्या संत-तीस त्या जातीचें असें म्हणावें ( सर्व वर्णेषु तुल्यासु पत्नीष्वक्षतयोनिषु । आनूलोम्येन संभूता ज्ञात्या ज्ञेयास्त एव ते ॥ मनु. सवर्णेभ्यः सवर्णासुजा-यंतेहि सजातयः । अनिंद्येषु विवाहेषु पुत्राः संतानवर्धनाः ॥ याज्ञवल्क्य ).

मातापिता तुल्य वर्ण असल्यास संतति त्या जातीची. एकाद्या पुरुषानें आपल्याशीं सवर्ण नसलेली, परंतु त्या वर्णाच्या शेजारच्याच खालच्या वर्णाची स्त्री केल्यास त्या दांपत्याला जी संतति होईल, ती पित्याच्या सदृश मानावी, सजाति नव्हे. म्हणजे येथें कांहीं सदृश ब्राह्मण, सदृश क्षत्रिय वगैरे उत्पन्न होतील व त्यांच्या नांवांनीं समाजांत ओळखले जातील. परंतु ते आनुवंशाच्या दृष्टीनें पित्यांशीं सजाति नव्हेत. परंतु एकादा पुरुष जर दोन वर्णांच्या अंतरानें विवाह करील, तर त्या दांपत्याला झालेली संतति ही सजातीही नव्हे, आणि सदृशही नव्हे; तर संकर मानावी आणि त्या प्रजेला वेगळीं नांवें देणेंच इष्ट. समाजशास्त्रज्ञांना समाजामध्यें फार मोठा आणि प्राणिशास्त्रदृष्ट्या हीन असा जो वर्ग, ज्यांच्यापासून श्रेष्ठ प्रजा उत्पन्न होणें शक्य नाहीं असें डॉ. हर्स्ट म्हणतो, आणि ज्याला आपण समुच्चयानें शूद्र असें नांव दिलेलें आहे, त्या वर्गापासून श्रेष्ठांचें रक्त सोंवळें ठेवावयाचें होतें. त्याकरितां शूद्राविवाह त्यांनीं निषिद्ध मानला ( न ब्राह्मणक्षत्रिययोरापद्यपिहि वर्ततोः । कस्मिंश्चिदपि वृत्तान्ते शूद्रा भार्योपदिश्यते ॥ हीन जातिस्त्रियं मोहादुद्वहन्तो द्विजातयः । कुलान्येव नयंत्याशु ससंतानानि शूद्रताम् ॥ शूद्रावेदी पतत्यत्रेरुतथ्यतनयस्यच । शौनकस्य सुतोत्पत्त्यातदपत्यतया भृगोः ॥ शूद्रांशयनमारोप्य ब्राह्मणो यात्यधोगतिं । जनयित्वा सुतं तस्यां ब्राह्मण्यादेव हीयते ॥ दैवपित्र्यातिथेयानि तत्प्रधानानि यस्यतु । नाश्नंति पितृदेवास्तन्नच स्वर्गं स गच्छति ॥ वृषली फेनपीतस्य निःश्वासोपहतस्यच । तस्यां चैव प्रसूतस्य निष्कृतिर्नविधीयते ॥ मनु. यदुच्यते द्विजातीनां शूद्राद्दारोपसंग्रहः नैतन्मम मतं । याज्ञवल्क्य ). यांत ब्राह्मण क्षत्रियांनीं शूद्र स्त्रीचें ठिकाणीं संतति उत्पन्न करूं नये असें सांगितलेलें आहे. त्या नियमांना कठोरपणा येण्याकरितां ‘ ब्राह्मण अधोगतीला जाईल, तो ब्राह्मण्यापासून पतित होईल, तो स्वर्गाला जाणार नाहीं ’ वगैरे एकाहून एक कडक शिक्षा सांगितलेल्या ...न्हेत. द्येकान्तरवर्णांचे विवाह मान्य केल्यास क्षत्रियापासून खालील सर्व ...द्रप्राय होईल. म्हणून मुख्यतः ब्राह्मण क्षत्रियांना शूद्र स्त्रीविवाहाच्या आपात्तपासून मोकळे ठेवावयास पाहिजे. परंतु एका जरी त्रैवर्णिकाला शूद्र-

१ स्त्रीष्वनन्तरजातासु द्विजैरुत्पादितान्सुतान् । सदृशान् एव तान् आहुः मातृदोषविगर्हितान् ॥ मनुस्मृति.

विवाहाची परवानगी ठेवली, तरी शूद्रप्राय गुण उगीचच श्रेष्ठ प्रजेंत मिसळूं लागतील. म्हणून त्रैवर्णिकांचे शूद्रास्त्रियांशीं विवाह बंद करणेंच हितकारक होय. आणि म्हणूनच समाजशास्त्रज्ञांना तसा दंडक घालणें भाग पडलें. ही सर्व अनुलोम विवाहपद्धति म्हणजे वरच्या थरांतील पुरुषानें खालच्या थरांतील स्त्रीशीं विवाह केला तरी हरकत नाहीं अशी होय. मनु म्हणतो, ' सवर्णाग्रे द्विजातीनां प्रशस्ता दारकर्मणि । कामतः तु प्रवृत्तानां इमाः स्युः क्रमशो वराः ॥ शूद्रैव भार्या शूद्रस्य साच स्वाच विशः स्मृते । तेच स्वा न्चैव राज्ञः च ताः च स्वा चाग्रजन्मनः ॥ )

या पुढें संततीची व्यवस्था कशी होत जाईल याचा विचार करूं. स्मृतिकारांनीं जो विचार सांगितलेला आहे, तो ' विन्नास्वेष विधिः स्मृतः ' म्हणजे विवाहित स्त्रीपुरुषांच्या संततीसंबंधीं सांगितलेला आहे. अविवाहितापासून होणारी संतति समाजांत शेंकडे वारीनें किती होती त्यासंबंधीं माहिती सांपडत नाहीं म्हणून त्यासंबंधीं फारसा विचार नको. विवाहितांत व्यभिचार होऊन फार मोठ्या प्रमाणावर संकर होत असतील, ही कल्पना देखील बालविवाह ज्या समाजांत रूढ होते, धर्माची ज्या समाजावर सत्ता होती, आणि ज्या समाजांतील कामशास्त्रावरील लेखकदेखील 'एषां समवाये पूर्वः पूर्वो[1] गरीयान् ' धर्म, अर्थ आणि काम हे उतरत्या प्रणालीनें एकमेकाहून कनिष्ठ मानीत जावे असें सांगतात, त्या समाजामध्यें मानवी नैतिकमूल्यांचा विचार करतां टिकूं शकत नाहीं. म्हणून सर्व संततीचा विचार करावयाचा तो विवाहिताच्या संततीचा करावयास पाहिजे. आतां आपण असें समजूं कीं, एकाद्या काळीं शंभर ब्राह्मण असे होते कीं, त्यांनीं चारही वर्णाच्या स्त्रिया केल्या. म्हणजे येथें एका ब्राह्मण वर्णापासून क्षत्रिय स्त्रियांना होणारी शंभर कुटुंबें उत्पन्न झालीं आणि तीं जातीतः कोण होतीं हें मातापितरांना माहीत आहेच. पुढें त्यांचें वांशिकसामर्थ्य घेऊन विवाहादि संस्कार त्यांच्यांतच नियमित केल्यास पहिल्या पिढीचा हा संकर कांहीं पिढ्यांत प्राणिशास्त्राच्या[2] नियमानें एक वेगळाच गट होऊन जातिस्वरूप

१ कामसूत्र– वात्स्यायन.

२ Evolution by means of hybridization by J. P. Lotsy.

बनला. हा गट सहजच वेगळा ओळखतां येईल. रा. विठ्ठल रामजी शिंदे[१] म्हणतात त्याप्रमाणें सर्वच आज दिसणारे गट संकरजाति नसतील, परंतु आम्ही वर सांगितल्याप्रमाणें जर समाजव्यवस्था राखिली गेली, तर जातींचा म्हणजे गटांचा पसारा किती वाढूं शकेल त्याचें गणित करून पाहिलें तर कांहीं वाईट नाहीं. तें गणित आम्ही पुढें देणार आहोंत. अशा तऱ्हेनें पहिल्या पिढीला अर्थात स्त्रिया मिळाल्यास एकंदर बारा जाति उत्पन्न होणें शक्य आहे. म्हणजे सहा अनुलोम संकर आणि सहा प्रतिलोम संकर ! परंतु यांतील सहा अनुलोम संकरच हिंदू लोक संस्काराला लायक समजत असत. प्रतिलोम संकर असंस्कृतच म्हणजे पर्यायानें शूद्र रहात. परंतु ते मूळच्या शुद्ध शूद्र गटांत अंतर्भूत करणें शक्यच नव्हतें. 'सजातिजातन्तरजाः षट्सुता द्विजधर्मिणः । शूद्राणां तु सधर्माणः सर्वेऽपध्वंसजाः स्मृताः॥'[२] प्रतिलोम संकर सामाजिकदृष्ट्या अग्राह्य कां मानावेत याचीं कारणें आम्ही पूर्वीं दिलींच आहे. प्रतिलोम संकर हिंदुशास्त्रकार हलके मानीत याला कारण ते संतति पुरुषप्रधान मानीत हें असावें असें 'अनार्यायां[३] समुत्पन्नो ब्राह्मणात्तु यदृच्छया । ब्राह्मण्यामप्यनार्यात्तु श्रेयस्त्वं केचिच्चेत् भवेत् ॥ जातो नार्यामनार्यायां आर्यादार्यो भवेद्गुणैः । जातोऽप्यनार्यादार्यायामनार्य इति निश्चयः । मनु ). त्यांच्या या मानण्याला सत्यसृष्टींत अगदींच पुरावा सांपडत नाहीं असें नाहीं. या बाबतींत खालील प्रयोग करून पहातां येईल. एक कोणता तरी मेंडेलच्या पद्धतीनें संक्रांत होणारा गुण निवडून तो गुण असलेला नर आणि नसलेली मादी यांना होणाऱ्या संततीची तो गुण असणारी मादी आणि नसणारा नर, यांच्या संततीशीं तुलना करून गुणसंक्रांति पुरुष प्रधान आहे किंवा स्त्री प्रधान आहे तें ठरवावयास पाहिजे. अशा तऱ्हेचा एक प्रयोग पुढें दिल्याप्रमाणें सांपडतो. "एका बिन कानाच्या मेंढ्याच्या कान असलेल्या मेंढीपासून झालेल्या संततीमध्यें पांच मेंढरें आंखुड कानाची झालीं तर बिनकानाच्या मेंढीला कर्णयुक्त मेंढ्या-

१ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न.

२ मनुस्मृति.

३ मनुस्मृति.

४ Prepotency of the male, in Genetics by Babcock and Clausen.

पासून झालेल्या संततीमध्यें फक्त एक मेंढरूं आंखुड कानाचें झालें.[1]"

अशा तऱ्हेनें नव्या बारा आणि पूर्वीच्या चार अशा एकंदर सोळा जाति झाल्या. पैकीं सहा जाति सुरवातीलाच संस्कारहीन ठरल्या. या जातींच्या लोकसंख्या अर्थातच अशा तऱ्हेचे विवाह जितके होतील त्या प्रमाणावर अवलंबून रहातील. अशा तऱ्हेनें या वैदिक सोळा जाति आणि इतर अवैदिक गट हे हिंदुस्थानच्या भूमींत प्रतीत होऊं लागले. हा जन्माला धरून विचार झाला. त्याबरोबरच संस्कारहेतुक विचार होणेंही आवश्यकच आहे. एकाच घराण्यांतील दोन पुरुषांची प्रजोत्पादक घटक म्हणून लायकी सारखी असते, परंतु समाजामध्यें सुसंस्कृत आणि असंस्कृत या दोघांनाही समानस्थान प्राप्त होणें शक्य नाहीं. अगदीं विश्वविद्यालयाची पदवी हें संस्कारांचें ओबडधोबड स्वरूप मानलें, तरी पदवीधर असलेल्या आणि नसलेल्या सख्या भावांना देखील समाजांत सारखें स्थान कोणीही देणार नाहीं. म्हणून ज्या संस्कारांनीं आणि आचारांनीं व्यक्तीचें शील बनविण्याचा प्रयत्न करीत असत, ते जे पाळीत आणि जे पाळीत नसत त्या दोघांना शास्त्रकारांनीं समान मानले नाहींत, तर त्यांची कांहीं चूक नव्हे. जे चुकून किंवा अडचणीमुळें असंस्कृत राहिले, त्यांना संस्कार लावून पुन्हां समाजांत घेण्याची व्यवस्था होती. परंतु जे संस्काराला जाणून बुजून तयार होत नसत, त्यांना विभक्त करणेंच इष्ट होतें. अशा लोकांच्या संततीची देखील वेगळीं नांवें देऊन व्यवस्था केलेली आढळते. चार चार हजार वर्षांचे देखील संस्कार किती लवकर नष्ट होतात, याचें सृष्टींतील एक उदाहरण आम्हीं पूर्वीं दिलेलेंच आहे 'द्विजातयः[2] सवर्णासु जनयन्त्यव्रतांस्तुतान्। तान् सावित्रिपरिभ्रष्टान्व्रात्यानिति विनिर्दिशेत्॥ व्रात्याचु जायते विप्रात्पापात्मा भूर्जकंटकः। आवन्त्यवाटधानौच पुष्पधः शैख एवच॥ मनु. अशा तऱ्हेनें हेंही पण वेगळे गट पडले.

कांहीं पिढ्या जरी ही व्यवस्था टिकली, तरी हे गट आपआपल्या सुपीकतेच्या प्रमाणांत कमी जास्त होत जातील. आतां कांहीं काळानें ही व्यवस्था त्यावेळीं तर्कतीर्थ, महात्मा वगैरे समाजसुधारक नांवाच्या प्राणि-

---

१ Breeding earless sheep by Journal of heredity 1921.

२ मनुस्मृति.

वर्गाला नापसंत होऊन त्यांनीं आंतरजातीय विवाह सुरू केले, परंतु जातिज्ञान कांहीं सुटलें नाहीं, तर या पंधरा जातींपासून साध्या व्यवस्थेनें $15\,P_2$ म्हणजे १५ × १४ = २१० इतक्या जाति तयार होतील. या सर्वांची परिगणना करणें कोणाही स्मृतिकाराला शक्य नव्हतें. पुढें या जाति जर आपले विवाहसंबंध '[1]व्यवहारो मिथस्तेषां विवाहः सदृशैःसह' असें ठेवतील तर त्यापासून आम्ही मागें दिलेल्या जे. पी. लोटझी यांच्या प्राणिशास्त्रीय नियमानुसार त्या रोटीबंद, बेटीबंद, चिरेबंद जाति तयार होतील आणि त्यामध्यें सुप्रजाशास्त्राच्या दृष्टीनें वाईट असें कांहींच नाहीं. त्यांचें रक्षण करणें हेंच कार्य होतें. जातिधर्म तयार झाल्यावर त्यांचें मिश्रण करणें यालाच वर्णसंकराः असें म्हणतात. संकराची कल्पना मनु पुढीलप्रमाणें देतो : 'व्यभिचारेण वर्णानां अवेद्या वेदनेन च। स्वकर्मणश्च त्यागेन जायन्ते वर्णसंकराः ॥' म्हणजे पहिला वर्ण व्यभिचार म्हणजे Cross अथवा hybridization, दुसरा अवेद्यावेदन म्हणजे Consanguinity आणि तिसरा कर्मत्याग असें तीन तऱ्हेचे संकर आहेत. सकर्म त्यागरूप वृत्तिसंकराचे समाजावर काय परिणाम होतात, त्यांचें वर्णन आम्ही पूर्वींच केलें आहे. त्याप्रमाणेंच इतर संकर त्याज्य हेंही दर्शविलेंच आहे. परंतु येथें हिंदुसमाजशास्त्रदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो. तो म्हणजे वर्णसंकर या व्यक्ति आहेत कीं कल्पना आहे.

वर दिलेल्या मनूच्या श्लोकांमध्यें वर्णसंकर या व्यक्ति म्हणजे प्रत्यक्ष प्रजा आहेत. परंतु

'दोषैरेतैः[2] कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माः च शाश्वताः ॥'

येथें वर्णसंकर ही कल्पना दिसते. म्हणजे स्त्रीपुरुष संबंध झाल्याबरोबर संतति होवो अगर न होवो, त्या स्त्रीच्या रक्तांत फरक पडलाच ! म्हणजे पुरुष पिंडाचा स्त्रीपिंडावर अत्यंत जबरदस्त परिणाम होतो असें मानावयास पाहिजे. तसें ते हिंदुसमाजशास्त्रकारांनीं मानलें असावें असें दिसतें. 'यादृ-

---

१ मनुस्मृति.

२ भगवद्गीता.

ग्गुणेन भर्त्रा स्त्री संयुज्येत यथाविधि तादृग्गुणा सा भवति समुद्रेणेव निम्नगा ॥ मनु. यासंबंधीं पुढील चर्चा फार उद्बोधक आहे. 'मनुष्याचें रेत स्त्रीपिंडामध्यें प्रवेश करतें आणि त्या पिंडामध्येंच फरक घडवून आणतें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. स्त्रिया पुरुषांच्या रेतांतून होर्मोन म्हणा, कांहीं जीवनप्रद उत्तेजक द्रव्य म्हणा घेतात आणि त्यापासून त्यांच्या पिंडाला पोषक अशीं द्रव्यें मिळतात.'[१] आमच्याकडे अलीकडे जाति आणि संकर यांची बरीच चर्चा केलेली दिसते. परंतु त्यामध्यें संकर शब्दाचा नक्की अर्थ काय मानतात याचा कोणीही खुलासा केलेला दिसत नाहीं. रा. मोहनदास करमचंद गांधी यांनीं केसरीपत्राच्या संपादक वर्गांपैकीं एका गृहस्थाला दिलेल्या मुलाखतींत संकर शब्दाची जी व्याख्या केली, ती कोणत्याही ज्ञात शास्त्राला मान्य नाहीं. ही व्याख्या प्रसिद्ध झाल्याबरोबर आनुवंशाचा अभ्यास करण्याच्या ज्या ज्ञात अशा चार पद्धति ( त्या आम्ही मागें दिल्याच आहेत ) त्यांपैकीं कोणत्या पद्धतीला धरून ही व्याख्या आपण करतां अशी आम्ही त्यांना पत्र पाठवून पृच्छा केली. बायबलमय अंतःकरण झालेल्या त्या जीवात्म्यानें अर्थातच कांहींही उत्तर दिलें नाहीं. बरोबरच आहे ज्या मुक्त जीवाचें प्रत्यक्ष परमेश्वरांशीं संभाषण, त्याला प्राकृत अशा शास्त्रांची जरूरीच काय ( निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ) अगर ( भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यते सर्व संशयः । )

अशा तऱ्हेनें विविध कारणांनीं जाति नांवाचे गट पडत गेले आणि आज दिसणारा जातियुक्त पसारा उत्पन्न झाला. आज दिसणाऱ्या गटांची नांवें वेगवेगळ्या कारणावरून आलेलीं दिसतात. कांहीं धंद्यावरून आलेलीं दिसतात जसें चांभार, रंगारी, सुतार वगैरे. परंतु येथें देखील तो गट आधींच अस्तित्वांत असून पुढें धंद्यावरून त्यांचें नामाभिधान पडलें. कांहीं भौगोलिक परिस्थितीवरून आलेली दिसते जसें पठाणी, कोंकणस्थ, देशस्थ वगैरे. परंतु या नांवांचा देखील अर्थ लावतांना फार काळजी घ्यावयास पाहिजे. नाहींतर कोंकणस्थ म्हणजे जर कोंकणांत रहाणारा तर त्या नियमानें कायस्थ शब्दाचा अर्थ काय लावावा ? कांहीं वंशपरंपरेनें चालत

१ Problems involved with congress of sexes in man by British medical Journal 1922; Contraception by Maria Stopes.

आलेलीं दिसतात जसें[1] ' मूर्धावसिक्त उर्फ ब्राह्मणजातीय या जातीला सध्यां खानदेशांत ब्राह्मणजाई या प्राकृत नांवानें ओळखतात. आणि ब्राह्मण व शूद्रा यांच्यापासून झालेल्या पारशव जातीला खानदेशांत पारसई हें प्राकृत नांव आहे. बाणभट्टानें आपल्या हर्षचरित्रांत आपल्या पारशव भ्रात्याचा केलेला उल्लेख सर्व प्रसिद्धच आहे ' दक्षिणेंतील द्रवीड जातीमध्यें कांहीं त्या त्या जातींच्या देवकावरून आलेलीं आहेत. अशा तऱ्हेनें या जाति हिंदु-समाजांत दिसतात आणि त्यांचें एकीकरण झालें तर हिंदुसमाज समर्थ होईल असें कित्येकांचें म्हणणें आहे त्याचा विचार करूं.

हिंदूंनीं जी समाजरचना केली, तिचें ध्येय हिंसाप्रिय सृष्टीमध्यें भोंव-तालीं पसरलेले समाज आणि संस्कृति जितका काळ टिकाव धरूं शकतात, त्यापेक्षां जास्त काळ त्याच नामरूपानें शिल्लक रहावयाचें हें होतें आणि आहे. कांहीं लोक पुनः पुनः सांगतात कीं, अशा तऱ्हेनें जगणें हें मरण्या-सारखेंच आहे. परंतु येथें उत्तर इतकेंच कीं, आपल्या कल्पना म्हणजे कांहीं सृष्टीचे नियम नव्हेत. सृष्टीमध्यें यावच्छक्य जगण्याचा प्रयत्न करणें हेंच ध्येय प्रतीत झालेलें दिसतें. येथें अशा तऱ्हेनें जगणें, तशा तऱ्हेनें जगणें असे प्रश्न घुसडणें हा वैयक्तिक अभिरुचीचा प्रश्न आहे आणि वैय-क्तिक अभिरुचीला धरून वैयक्तिक ध्येयें ठरविणें, ही गोष्ट गैरलागू आहे. कासवापेक्षां ससा होणें हें ध्येय श्रेष्ठ असेल, परंतु मृतसशापेक्षां जिवंत कासवच श्रेष्ठ. मनु[2] म्हणतो,

' सर्वस्थास्यतु सर्गस्य गुप्त्यर्थं स महाद्युतिः ।
मुख बाहूरुपजानां पृथक्कर्माण्य कल्पयत् ॥ '

त्याप्रमाणें व्यवस्था चाललीही होती. समुद्राच्या तळाशीं असून देखील व सर्व बाजूंनीं लाटा आदळत असून देखील, आपला स्वभावधर्म न सोड-णाऱ्या मैनाकपर्वताप्रमाणें हिंदुसमाज हजारों वर्षें अढळ असा उभा होता. तो समाज असंघटित आहे, हीन आहे, दुर्बल आहे अशा तऱ्हेच्या शंका कोणालाही येत नव्हत्या. परंतु अशा तऱ्हेच्या शंका आतां येऊं लागल्या

१ राधामाधवविलासचंपू– वि. का. राजवाडे.
२ मनुस्मृति.

आहेत. हिंदुसमाज असंघटित आहे. कशावरून तर मुसलमान समाज त्या समाजावर आक्रमण करतो. आक्रमण करतो म्हणजे काय तर देवळें फोडतो आणि स्त्रिया पळवून नेतो. परंतु नऊशें वर्षें मुसलमान समाज हेच सद्उद्योग करीत असून, हिंदुसमाज त्या समाजापुढें वांकला नाहीं, हें जर ऐतिहासिक सत्य आहे, तर इतका चिवटपणा आणणारें कोणतें तत्त्व हिंदूंच्या समाजरचनेंत आहे तें शोधून काढावयास पाहिजे. हिंदुसमाज दुर्बल आहे. कशावरून अहो हिंदूंच्या दारिद्र्याकडे पहा, त्यांच्यांतील बालमृत्यूंचें प्रमाणाकडे पहा, त्यांच्यातील कोंवळ्या वयाच्या मातांकडे पहा, अशा तऱ्हेची अर्थशून्य टीका कानावर येऊं लागते. परंतु या सर्व भानगडीचा आणि समाजाच्या दुर्बलत्वाचा अर्थाअर्थी संबंध काय, त्याचा फारसा बोध होत नाहीं. या सर्व स्थितींच्या व्याख्या करून त्याचा अन्वय ( Method of agreement ) व्यतिरेकानें ( Method of difference ) सिद्धि करून दाखविल्यास मग कांहीं तरी विचार करतां येईल. आज पाहिलें तर सुधारणेच्या नांवानें ज्या लोकांनीं जपमाळ घेतली आहे, त्यांच्यापुढें कोणतेंही तत्त्व नाहीं, शास्त्र नाहीं फक्त स्वराज्य हा शब्द आहे आणि कोणतीही तिरस्करणीय गोष्ट व्यक्तींकडून करून घ्यावयाची असल्यास तो शब्द उच्चारणें पुरें आहे.

राजकीय स्वातंत्र्य समाजरक्षणाला लागणारीं इतर साधनें नसल्यास कितपत हितावह होईल, याचाही पूर्ण विचार व्हावयास पाहिजे. राजकीय स्वातंत्र्य हेंच ध्येय असावें असें देशभक्त लोक देखील म्हणतील असें आम्हांला वाटत नाहीं. राजकीय स्वातंत्र्य हें दुसऱ्या कोणत्या तरी एकाद्या ध्येयाचें साधन असणार. पारतंत्र्यांतही तें ध्येय सिद्ध होत असेल तर! परंतु हें ध्येय तरी कोणतें ? प्रगति ! या शब्दांतून काय अर्थ निघतो त्याची सांगोपांग चर्चा आम्ही पूर्वीं केलीच आहे. छाननी करीत आपण गेलों म्हणजे हिंसाप्रिय सृष्टीमध्यें संस्कृतीचें म्हणजे धर्माचें रक्षण करणें, हेंच ध्येय फक्त शिल्लक रहातें. मग ज्यावेळीं समाज समर्थ करण्याकरितां अनेकांकडून अनेक युक्त्या सुचविल्या जातात, त्यावेळीं त्या युक्त्या जेथें जेथें उपयोगांत आणल्या गेल्या, तेथें तेथें समाज समर्थ झाला, ही गोष्ट सिद्ध व्हावयास पाहिजे. नाहीं तर कालच्या स्थितीपेक्षां आजची स्थिति बरी असें

म्हणण्याला आपल्या कल्पनेच्या बाहेर पुरावाच रहाणार नाहीं. म्हणून शास्त्रीय पद्धतीनें बोलणाराला कोठून निघालों, कोठें जावयाचें आणि त्या दोन बिंदूंमधील गति मोजण्याचा मानदंड कोणता या गोष्टी आधीं निश्चित कराव्या लागतात, आणि मग सुधारणेची भाषा बोलावयाची असते.

आमचें म्हणणें एक अत्यंत सोपें उदाहरण घेऊन विशद करूं. समजा अशी स्थिति आढळून आली कीं, गिरणीमध्यें काम करणाऱ्या स्त्रियांच्या मुलांमध्यें बालमृत्यूंची संख्या जास्त प्रमाणांत असते, तर आमच्या इकडील सुधारकांच्या मतानें विवाहित स्त्रियांना कामाची बंदी करावी लागेल. परंतु बालमृत्यूंचें प्रमाण आणि काम करणें यांचें साहचर्य, त्या दोहोंत कार्यकारण भाव दर्शवीत असेलच असें नव्हे. जर कार्यकारणभावच नसेल, तर या स्थितींत सुधारणा केल्यानें परिणामांत फरक कसा पडणार? आतां अशा स्थितींचा गणितागत पद्धतीनें अभ्यास करण्याचा रीति शोधल्या गेल्या आहेत. या पद्धतीनें अभ्यास करावयाचा तर एकादी स्थिति दुसऱ्या एकाद्या स्थितीवर पूर्णांशानें अवलंबून असेल, तर त्या स्थितीला १०० मार्क द्यावयाचे. त्यांना कोइफिशन्ट ऑफ कोरिलेशन्स असें म्हणतात. हे वेगवेगळे कोइफिशन्टस् काढून त्यावरून कारणांच्या अधरोत्तर व्यक्तींची मीमांसा करावयाची असते. हे सर्व कोइफिशन्टस् काढून त्यांची नुसती बेरीज करून ती शंभर होत नाहीं, कारण ते व्हेक्टर क्वांटिटीज् असतात. अशा तऱ्हेनें अभ्यास करतां असें दिसून आलें कीं, बालमृत्यूंचा आयांच्या गिरणींत काम करण्याशीं संबंध फक्त शेंकडा दहा इतकाच असतो. पुढें असें दिसून येतें कीं, बालमृत्यूंचा संबंध मातांच्या वयांशीं शेंकडा पंधरा इतक्या प्रमाणांत असतो. मग स्त्रियांना कोणत्या वयांत संतति व्हावी? त्याच्यापूर्वी अगर पुढें होऊं नये, असा निर्बंध घालून तो कायद्याच्या जोरावर अमलांत आणणें इष्ट होईल, असें समाजसुधारकांना वाटतें काय? पुढें असें दिसून येतें कीं, बापाचा धंदा कोणताही असो, त्याचा बालमृत्यूंशीं प्रमाण शेंकडा वीस इतका असतो, तर कायद्यानें धंदे बांधून द्यावयास पाहिजेत. परंतु हीच हितकारक गोष्ट जातिभेद आणि लोकमत यांनीं घडवून आणल्याबरोबर त्याच जातिभेदाविरुद्ध गवगवा करण्यास आमचे समाज-

१ Pamphlets by Karl Pearson.

सुधारक तयारच ! पुढें सांगावयाचें तर आई बाहेर जाऊन धंदा करते किंवा नाहीं, ही गोष्ट बहुतांशीं बापाच्या धंद्यावर अवलंबून असते. पुढें आईच्या अन्नाचा बालमृत्यूंच्या प्रमाणांशीं शेंकडा वीस असा संबंध असतो. त्या-बरोबरच आयांची दारुबाजीची संवय वगैरे गोष्टींचा बालमृत्यूंशीं संबंध असतो. आयांच्या अन्नापेक्षांही मुलाचें अन्न या बाबतींत जास्त महत्त्वाचें आहे. आईच्या कामापेक्षां घराचा स्वच्छपणा हाही जास्त महत्त्वाचा आहे. पुन्हां मूल अंगावर पितें किंवा बाटलीनें पितें हेंही पहावयास पाहिजे. या शिवाय अशा पुष्कळ गोष्टी आहेत कीं, ज्या बालमृत्यूंचें कारण म्हणून सांगणें शक्य आहे.

परंतु हीं सर्वच कारणें—प्रधान कारणें—म्हणून सांगणें शक्य आहे काय ! मिस् एल्डरटन हीनें केलेल्या अभ्यासावरून असें दिसून आलें कीं, बाल-मृत्यूंच्या अनेक कारणांपैकीं मुख्य कारण वंश हें आहे. बापाला पुरेसें द्रव्य मिळविण्याची लायकी असेल, तर मातेला थोडीही भर घालण्याकरितां घराबाहेर काम करण्याकरितां जाण्याची कांहीं जरूर भासणार नाहीं. असले प्रश्न कांहीं व्यक्तींनीं दिलेलीं मतें सरकारी अहवालांत गोळा करून, त्यांच्या आधारावर कायदे करून सुटणें शक्य नाहीं असें आम्हाला वाटतें. आम्हीं पुढें मांडलेल्या प्रश्नाइतका वरून सोपा दिसणारा दुसरा कोणताही प्रश्न दाख-वितां येणें शक्य नाहीं. मग ते प्रश्न तरी मतांची जंत्री करून कसे सुटतील ? अशा तऱ्हेचे सामाजिक प्रश्न वादविवाद पद्धतीनें सोडवावयाचे नसतात. दोन स्थितींचें साहचर्य कांहीं त्यांच्यामधील कार्यकारण भाव दाखवीत नाहीं. आणि ‘ कारणं यज्ञात्वा अनारंभः प्रतीकारस्य ’ आमचा मुद्दा असा आहे कीं, कार्यकारण भाव शोधून काढल्या शिवाय केलेली कोणतीहि सुधारणा टिकाऊ होत नाहीं. कारण शोधून काढल्यानंतर मग आपण आपला उत्साह, बुद्धिमत्ता, शक्ति, द्रव्य वगैरेंचा उपयोग ती गोष्ट घडवून आणण्याकडे जरूर करावा, तरच समाजाचें कल्याण होईल.

वेगवेगळ्या जातींच्या एकीकरणाचा जो प्रश्न पुढें येतो, त्याचा आतां विचार करूं. पहिली पद्धति म्हणजे वेगवेगळे जे जातींचे गट पडलेले आहेत, त्या सर्वांची एकाच गटांत परिगणना करून एकंदर समाजांत जाति-भेद कमी आहेत असें दाखविणें. ह्या पद्धतीचा अवलंब पूर्वींच्या समाज-

नेत्यांनीं आणि आजचे खानेसुमारीचे अहवाल लिहिणारे जे लेखक त्यांनीं केलेला आहे. त्यामुळें समाजांतील संघांची संख्या कमी झालेली दिसेल यांत कांहीं शंका नाहीं, परंतु नंतर उपसंघ जर आहेत, तेवढेच राहिले तर एकंदर समाजशास्त्राच्या दृष्टीनें फरक काय पडला, तें सांगणेंच कठीण आहे. समजा उद्यां हिंदू म्हणून मानलेल्या यच्चयावत् स्त्रीपुरुषांना यज्ञोपवीतें देऊन ब्राह्मण केले म्हणजे हिंदुसमाज एक नामधारण करणारा झाला आणि सर्वांची परिगणना खानेसुमारींत ब्राह्मण या नांवानेंच झाली, तरीही आमच्या समाजसुधारकांच्या पुढें असलेला प्रश्न सुटला असें आम्हाला वाटत नाहीं. नुसतें नामाभिधान बदलल्यानें समाजांतील लोकसंख्येची लायकी अगर नालायकी या दोन्हींहीमध्यें फरक मुळींच पडणार नाहीं आणि आज दिसतात तसेच वर्गही पुढें रहातील. ब्राह्मण हें एकच नामाभिमान धारण करणाऱ्या कितितरी जाति आज कित्येक शतकें हिंदुस्थानांत आहेत. परंतु त्यांच्यामध्यें गुणधर्मांच्या दृष्टीनें समानता उत्पन्न झालेली नाहीं, होणार नाहीं आणि होऊंही नये.

दुसरी पद्धति म्हणजे जननानें किंवा संस्कारानें एकरूप जाति बनविण्याची—या पद्धतीमध्यें किती अडचणींचा विचार करावा लागतो, त्याचें दिग्दर्शन आम्हीं पूर्वीं केलेंच आहे. प्रजा सुप्रजा व्हावयास पाहिजे असेल तर देशधर्म, जातिधर्म, कुलधर्म, संस्कार परंपरा, सर्वसाधारण आधुनिक धर्म वगैरे एकून एक गोष्टींचा विचार करावा लागतो. देशधर्मांचा विचार करावयाचा तर बंगाली ब्राह्मण, काश्मीरांतील ब्राह्मण, संयुक्तप्रांतांतील ब्राह्मण, मराठा ब्राह्मण आणि मद्रासी ब्राह्मण यांचें विवाहानें एकीकरण होणारही नाहीं आणि होणें इष्टही नाहीं. या मुद्याची चर्चा पूर्वीं येऊन गेलेलीच आहे. हे सर्व शब्दार्थानें सवर्ण असले तरी जात्यर्थानें सवर्ण नाहींत, आणि त्यांच्या संकरानें इष्ट हेतु सिद्ध होईल असें वाटत नाहीं. सुप्रजोत्पादन तर राहोच परंतु आज ज्याकरितां एवढा कंठशोष चालला आहे, तें स्वराज्य तरी अशा संकरानें मिळेल काय? म्हणून प्रथ-

### ६६ जातिसंस्था

१ श्री. भास्कर विठोबा जाधव यांनीं वरिष्ठ कायदेमंडळांत आणलेला कायदा.

मतः हिंदुस्थानाचे लोकसंख्येच्या दृष्टीनें विभाग करावयास पाहिजेत. ते मुख्य विभाग घेऊन मग त्यांतील जाति उपजातींचा विचार आला. जातींचा विचार करतां असें दिसून येते कीं, वेगळ्या थरांत रहाणाऱ्या एकवंशीय प्रजेनें अगर एकाच थरांत रहाणाऱ्या भिन्नवंशीय प्रजेनें संकर प्रजा उत्पन्न करणें, हें समाजाच्या आत्यंतिक हिताच्या दृष्टीनें विचार केला असतां अग्राह्य आहे. म्हणून आमचें म्हणणें असें कीं, आंतरश्रेणी विवाह जुने शास्त्रीलोक मानतात त्याप्रमाणेंच निषिद्ध मानावयास पाहिजेत. उपजातींच्या एकीकरणानें समाजाचें हित होईल असें मानण्याला शास्त्रीयदृष्ट्या तरी कांहीं कारण सांगतां येणार नाहीं.

पुढें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, धंद्यानें बांधून टाकिलेल्या या जातिसंस्थेमध्यें अवरवर्णीयानें कर्तृत्ववान असला, तरींही उच्च वर्णांत कधींच प्रवेश करूं नये काय? तुमच्या धर्मग्रंथांतून संकर आणि वर्णांतर या दोहोंचेही पुष्कळ दाखले सांपडतात, तेव्हां तुमचेच धर्मग्रंथ तुम्हांला मान्य नाहींत असें ठरतें. प्रतिलोम विवाह अग्राह्य कां, याची भेसूर चर्चा पूर्वी केलीच आहे. असवर्ण विवाह होत असत असें म्हणणारांना देखील प्रतिलोम विवाहाचीं उदाहरणें येवढ्या मोठ्या वाङ्मयावरून सांगतां आलीं नाहींत.

येथें वर्णजाति विचारासंबंधीं निश्चित मत सांगण्यापूर्वीं इतरांनीं जातिसंस्थेचा विचार कसा काय केला आहे, त्याचा विचार करूं. हिंदुस्थानांत जाति नांवाचा गट पडण्याला प्रकृति आणि संस्कार अशा दोहोंचीही यौगपद्यानें जरूर लागत असते. म्हणजे प्रजा प्राणिशास्त्राचे नियम पाळून उत्पन्न झाल्या पाहिजेत आणि त्या प्रजांच्या ज्या कांहीं गुणांचा उत्कर्ष करावयाचा असेल, त्या उत्कर्षाला लायक अशी परिस्थिति स्थिर रहाण्याकरितां त्या गटांच्या चालीरीति म्हणजे संस्कार यांचें स्थिरीकरण व्हावयाला पाहिजे. म्हणून मानवाच्या आयुष्यांतील एकूण एक हालचालींचें स्थिरीकरण करण्याकरितां त्याचे आचार धर्मबद्ध करावे लागतात. कोणत्याही तऱ्हेच्या प्रजेचे श्रेष्ठ गुण प्रतीत व्हावे अशी इच्छा असल्यास, हीच पद्धति स्वीकारावी लागते. प्रो. इस्ट म्हणतो, 'Social progress requires better breeding

---

१ बनारस येथील शास्त्रीपरिषद्.

in the first instance, in order to raise the racial potentiality for accomplishment, it requires *volunterily standardized population* in the second instance, in order to retain an environment in which these potentialities can be realized."[१] जातींच्या द्विविध हेतूंचें वर्णन यापेक्षां जास्त चांगल्या तऱ्हेनें कोणी कट्टर सनातनी देखील करील असें आम्हाला वाटत नाहीं. परंतु जाति या गटाचे पाश्चात्य विद्वान आणि त्यांचे अनुयायी पौर्वात्य विद्वान यांनीं केलेलें वर्णन पाहिल्यास त्यांमध्यें आनुवंशाच्या नियमांशीं या गटांचा कांहीं संबंध असेल अशी अंधुक कल्पना देखील त्यांना आलेली दिसत नाहीं. त्यांची – म्हणजे पाश्चात्यांची – संस्कृति ही पौर्वात्य संस्कृतीप्रमाणें प्राणिशास्त्रावर[२] उभारलेली नाहीं. त्यामुळें या पद्धतीमध्यें प्राणिशास्त्राचे कांहीं नियम असतील, ही कल्पनाच त्यांच्या डोक्यांत प्रवेश करूं शकत नाहीं. मग अन्नपानाबद्दल या लोकांत जे संस्कार आणि नियम आले, ते कोठून आले असा प्रश्न उत्पन्न झाल्याबरोबर त्यांचा मेंदू बोलून रहातो कीं, ते रानटी लोकांच्या जादूच्या कल्पनेमधून शिरले असावेत. अशा तऱ्हेनें सर्वच कल्पना आपल्या ठरीव ठशाच्या पद्धतीनें बसविण्याचे त्यांचे प्रयत्न बालिश आणि हास्यास्पद असतात. तीच स्थिति जातिसंस्थेच्या ज्या अनेक उपपत्ति त्यांनीं लाविल्या आहेत त्यांच्या बाबतींत झालेली दिसते. कांहीं कुटुंबें निवडून त्यांचा इतरांशीं विवाहसंबंध तोडून टाकून त्यांच्यामध्येंच एकातऱ्हेनें निवड होत गेल्यास त्यांची एक जाति ( breeding unit ) बनते, ही कल्पना या गृहस्थांच्या डोळ्यापुढेंच येऊं शकत नाहीं. जातींच्या उत्पत्तीसंबंधीं पुढील कांहीं कल्पना मांडल्या गेलेल्या दिसतात.

यांपैकीं बहुतेक कल्पनांमध्यें जातिव्यवस्थेचा विचार आनुवंशाच्या आधाराशिवाय केलेला दिसतो. हे सर्व विवेचक लोक समाजशास्त्रज्ञ आहेत असेंही सांगितलें जातें. परंतु या सर्व कल्पना सांगून देखील आजच्या जातिभेदाची उपपत्ति लागत नाहीं तें वेगळेंच. त्यामध्यें पाश्चात्य पद्धतीनें शिकलेला कां असेना लेखक हिंदू असला तर त्याच्या ग्रंथांत मात्र जाति-

---

१ Mankind at cross-roads by E. M. East.

२ Marriage and morals by Bertrand Russel.

भेदाच्या मुळाशीं, वांशिक गुणांचा कांहीं तरी संबंध असावा, असे उल्लेख सांपडतात. परंतु इतर प्रत्यक्षापेक्षां कल्पनांतच फार गुरफटलेले दिसतात. नेस्फील्ड, डाइलमन वगैरे मंडळी म्हणतात जाति ह्या धंद्यावरून पडल्या असल्या पाहिजेत. परंतु ज्या समाजामध्यें व्यक्तींचा अगर कुटुंबांचा गट ही एक जाति ठरून त्या गटाला वेगळा धंदा लावून दिला गेलेला असतो त्या समाजामध्यें जाति आणि धंदा हे समव्यातच रहाणार आणि कारण कोणतें आणि कार्य कोणतें याचा नेहमींच गोंधळ होणार. अशा दोनही तऱ्हांनीं जेथें अर्थ लागणें शक्य आहे, तेथें पूर्वपरंपरेनें चालत आलेला अर्थ लावणेंच इष्ट—जास्त इष्ट—होय! परंपरेनें चालत आलेल्या सर्वंच गोष्टी अविश्वसनीय आहेत असें कोणी म्हणतील असें वाटत नाहीं. सुतार हें जातीचें नांव पडलें, तें ती जाति सुताराचा धंदा करीत असे म्हणून नव्हे, तर प्रथमच एक व्यक्तिसंघ तयार झाला होता व त्या गटाला अर्थशास्त्रीय विभागणींत सुताराचा धंदा लावून दिला, असा या प्रक्रियेचा अर्थ आहे. जाति सृष्टींत उत्पन्न होते आणि तिची व्यवस्था समाजांत संस्कारानें करावयाची असते. त्यांतच अर्थशास्त्रीय विभागणी येते. परंतु पाश्चात्यपंडितांना आनुवंशाचे नियम, त्यामुळें सृष्टींत होणारे एक जातीय व्यक्तींचे गट, गुणांचे शुद्धाशुद्धत्व या गोष्टींबद्दल मेंडेलच्या उदयापूर्वीं फार झालें तर गाल्टनच्या उदयापूर्वीं कल्पनाच नसल्यामुळें ते अर्थातच वेगवेगळ्या कल्पनाच पुढें मांडणार. त्यांनीं अशी एक कल्पना मांडली आहे कीं, धातुमय उपकरणें न वापरणाऱ्या जाति सर्वांत हलक्या, त्यावर धातुमय उपकरणें वापरणाऱ्या जातींचा थर आणि सर्वांत श्रेष्ठ बौद्धिक कामें करणाऱ्या जाति. परंतु ही पद्धति कांहीं हिंदुसमाजांतील जातींच्या उत्पत्तीचें कारण सांगूं शकत नाहीं.

दुसरे गृहस्थ इबेटसन् असें सांगतात कीं, टोळी (tribes), धंदे आणि धार्मिक कल्पना या तीहींच्या समुच्चयानें जातिभेदाची उपपत्ति लावणें शक्य आहे. म्हणजे जंगली टोळ्या हिंदुलोक जसजशा आत्मसात करीत गेले, तसतशा त्या टोळ्या जाति बनत गेल्या, ही धर्मप्रसाराची पद्धति हिंदूंनीं निश्चित अवलंबिली होती. परंतु याचा अर्थ असाच होत नाहीं कां, कीं अशा तऱ्हेनें धर्मप्रसार करण्यापूर्वींच जाति हा गट सिद्ध झाला होता? आज इंग्रज

१ Indian Philosophy by Radhakrishna.

देखील हिंदुस्थानांत जाति म्हणून वावरत आहेत ही गोष्ट ते विसरतात. नाकानें कांदे सोलणारे आणि जातिभेदाला हंसणारे इंग्रज हिंदुस्थानांत जाति म्हणूनच राहिले आहेत. जे कोणते नवे गट येतील त्यांना हिंदुसमाजानें प्रवेश दिला, परंतु त्यांना पूर्वीच्या गटांत ढवळाढवळ करूं दिली नाहीं. त्यामुळें पुष्कळ राष्ट्रजातिपुढें हिंदु जाति झाल्या असतील. या सर्व कल्पनांचा समुच्चय गटांची संख्या वाढवूं शकेल, परंतु त्यामुळें विवाह आणि अन्न यांनीं बद्ध अशा जातिसंस्थेची उपपत्ति लागत नाहीं.

कांहीं लोक एका वंशांत उत्पन्न झालेली लोकसंख्या म्हणजे जाति असें सांगतात अशी कल्पना पुढें मानिली गेली. परंतु एकाच जातींत अनेक गोत्रें असतात, ही गोष्ट लक्षांत घेतल्यास ही कल्पनाही फारशी टिकत नाहीं. अनेकांनीं वर्ण आणि जाति या विभिन्न कल्पनांचा गोंधळ करून जातिसंस्थेची उपपत्ति लावण्याचे प्रयत्न केले. त्या प्रयत्नांमध्यें अर्थातच चार वर्ण वेगवेगळे कल्पून त्यापासून जातीचें जाळें विणून दाखविण्याचा प्रयत्न झाला. वर्ण हा वंशाचा फरक दाखवीत असेल, परंतु रंगदायक जे जीवन गोलक (genus) मानवपिंडांत दिसून येतात, त्यावरून कातडीचा रंग जातिनिदर्शक असेल असें नक्की सांगतां येईलच असें नाहीं. पुन्हां भिन्नवंशांचे लोक एकाच वसतिस्थानांत राहूं लागल्यास, त्यांच्या संकरानें शास्त्रीयदृष्ट्या मनुष्यप्राण्याची व्यवस्था लावण्याची माहिती नसल्यास, जातिसंस्थेसारखी संस्था उत्पन्न होणें शक्य नाहीं. आज अमेरिकेमध्यें पुष्कळ तऱ्हेचे संकर चालले आहेत, परंतु शास्त्रीय पद्धतीनें त्या गटांची कोणी व्यवस्था लावल्याचें प्रतीत होत नाहीं. अशा तऱ्हेचे गट तयार करण्याला आनुवंश पद्धतीची उत्तम माहिती पाहिजे म्हणजे आनुवंश आणि संस्कार या जोड गोळीनें वेगवेगळे मानवसंघ कसे उत्पन्न होतात, ही गोष्ट लक्षांत येईल. कांहीं लोक म्हणतात जाति आणि वंश हे शब्द समव्याप्त नाहींत, परंतु ते समव्याप्त आहेत असें विधान जातिभेदाच्या पुरस्कर्त्यांनीं कधींही केलेलें नाहीं.

या वंश शब्दासंबंधीं बरेच गैरसमज पसरलेले आहेत, असें मानवसमाजाच्या अभ्यासकांचीं मतें वाचून आम्हांला वाटतें. तौलनिक भाषाशास्त्र, मस्तिष्कमापनशास्त्र वगैरे शास्त्रांच्या आधारानें कल्पिलेले वंश आणि आनु-

वंशाच्या पद्धतीनें तयार होणाऱ्या जाति या कांहीं समव्याप्त नव्हेत. मानवशास्त्रज्ञांनीं कल्पिलेले मूळ वंश हे तर वेगळे आहेतच, परंतु जीवशास्त्रदृष्ट्या त्यापैकीं प्रत्येक एक जाति (breeding unit) आहेत किंवा नाहींत हें सांगणें सोपें नाहीं. प्राणिशास्त्रदृष्ट्या एक जाति आणि विजातीय कशाला म्हणावें, आनुवंशांत जातिगुण कशाला म्हणतात, ते जातिगुण एकमेकाकडे अदलाबदल होण्यासारखे आहेत किंवा नाहींत, वगैरे प्रश्नांचा निश्चय न झाल्यास त्यांचें एकजातीयत्व सिद्ध होणार नाहीं. आपण एक प्रत्यक्ष उदाहरण घेऊं. दुधाळ गाईम्हशींचा वंश आणि मांसलमांसोत्पादक गाईम्हशींचा वंश. गाई दुधाळ असोत अगर मांसोत्पादक असोत, तेथें गाई हा तर सामान्य वंशच आहे कीं नाहीं? परंतु आनुवंशशास्त्रज्ञांच्या मतानें हे वंश एक नाहींत, आणि त्यांचा संकर झाला तर त्यांपैकीं एक अगर दोन्हीही गुण नष्ट होण्याचा संभव आहे असें ते सांगतात. कोणीहि गाईम्हशींची वाढ करूं इच्छिणारी व्यक्ति त्यांचा संकर व्हावा असें म्हणणार नाहीं. डॉ. बेटसन् म्हणतो, 'आपणाला वनस्पतिवर्ग आणि प्राणिवर्ग यांची जी माहिती आहे त्यावरून असें दिसून येतें कीं, आनुवंशांमध्यें असे कांहीं गुण आहेत कीं, त्यांचें यौगपद्यानें एकाच व्यक्तीमध्यें अस्तित्व अशक्य आहे. उदाहरणार्थ, मांसोत्पादक जनावरांमध्यें दुधाळ जनावरें असत नाहींत. दूध आणि मांस हे विरोधी गुण आहेत आणि ते एक करण्याचा प्रयत्न केल्यास, एक अगर दोन्ही गुण नष्ट होण्याचा संभव आहे. पुन्हां असेंही दिसतें कीं, ही गुणविभागणी नैसर्गिक घटनेच्या पायावर अवलंबून आहे. अशा तऱ्हेनें कोणते गुण एका ठिकाणीं राहूं शकत नाहींत आणि कोणते गुण यौगपद्यानें वास करतात, याच्या मर्यादा बरोबर कळल्यास प्राणिशास्त्रीय जातींचें मूळ स्वरूप काय असेल त्याचा बोध होऊं शकेल. इतक्या खोलांत न शिरतां चार अगर पांच वंश मानणारे शास्त्रज्ञ देखील त्यांचे वंशधर्म शाश्वत आणि न बदलणारे आहेत असेंच मानतात.[२]

आनुवंशाच्या नियमानें जाति तयार होऊन ती सामाजिक नियमानें

---

१ Mendels principles of heredity.

२ Man's mental aptitude by Sir Arthur Keith; Rationalist annual 1929.

स्थिर केल्याकारणानें जातिसंस्था ही जगाला सुप्रजाशास्त्राचा प्रयोग म्हणून आदर्श घ्यावयासारखी आहे. मनु प्राणिशास्त्रीय नियम किती बरोबर सांगतो हें पाहिलें म्हणजे सुप्रजाशास्त्रावर बोलण्याचा त्याचा केवढा अधिकार आहे ही गोष्ट आपोआप दिसून येईल. ‘ शूद्रायां ब्राह्मणाज्जातः श्रेयसाचेत्प्रजायते । अश्रेयान् श्रेयसीं जातिं गच्छत्यासप्तमाद्युगात् ।। शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैतिशूद्रतां । क्षत्रियाज्जातमेवं तु विद्याद्वैश्यात्तथैवच ।। ’ मनु. त्यावरील भाष्यकार पुढीलप्रमाणें अर्थ सांगतात. शूद्र कन्येला ब्राह्मणापासून कन्या झाली, तिला पुन्हां ब्राह्मणापासून कन्या झाली असें सात पिढ्या चालल्यास सातव्या पिढींतील कन्या ब्राह्मण होते. याप्रमाणेंच ब्राह्मणाचा शूद्र आणि शूद्राचा ब्राह्मण होतो आणि त्याप्रमाणें क्षत्रिय आणि वैश्य समजावे. यावर आधुनिक पंडितांनीं केलेलीं भाष्यें वाचलीं म्हणजे अक्कल गुंग होऊन जाते. त्या अर्थशून्य बडबडीपैकीं कांहीं निवडक वाक्यें देतों. ‘ यावरून त्यावेळच्या वर्णव्यवस्थेच्या कल्पना किती अनैतिहासिक, अस्वाभाविक, एकांगी आणि डोईजड झाल्या होत्या हें उघड आहे. अशा रीतीनें चहूंकडे वर्णांचा संकर होऊन, वर्णबाह्य अस्पृश्य जातीशिवाय शुद्ध जाति कोठेंच उरली नाहीं, असा ह्या भयंकर तोडग्याचा खरा अर्थ आहे, हें या स्मृतिकारांच्या लक्षांत आलेलें नाहीं[1]. ’ स्मृतिकारांच्या पुष्कळच गोष्टी लक्षांत आल्या नव्हत्या, परंतु या लेखकाच्या लक्षांत कोणत्या गोष्टी आल्या आहेत तें समजणें बरेंच कठीण आहे. प्राणिशास्त्रांत शुद्ध जाति कशाला म्हणतात याचें गाढ अज्ञान या वाक्यांत दिसून येतें. मनूनें अत्यंत बरोबर अशी पद्धति दिलेली आहे. समजा दोन परस्पर विभिन्न गुण धारण करणाऱ्या दोन विभिन्न प्रजा आहेत. त्यांतील एक गुण ठेऊन दुसरा गुण नष्ट करावयाचा आहे, तर येथें कोणत्या पद्धतीचा अवलंब करावा ? एक बुद्धियुक्त वंश आहे आणि दुसरा निर्बुद्ध वंश आहे. त्या समाजामध्यें निर्बुद्धाचें प्रमाण शेकडेवारीनें कमी करावयाचें आहे अगर बुद्धिवंताचें प्रमाण कमी करावयाचें आहे, यांपैकीं एक प्रश्न समाजशास्त्रज्ञापुढें आहे. मेंडेलच्या आनुवंश पद्धतीनें पाहिलें तर संततीमध्यें पितरांच्या गुणांची वेगवेगळी मांडणी होईल, परंतु नवीन गुण कांहीं उत्पन्न होणार नाहींत.

१ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न, वि. रा. शिंदे.

येथें नियम काय सांगावा ? एक म्हणजे आम्हीं मागें सांगितल्याप्रमाणें धंद्यांची विभागणी करून आपणाला नको ती प्रजा हळूं हळूं नष्ट करावयाची अथवा सुप्रजाशास्त्राच्या नियमांचा उपयोग करावयाचा.

पाश्चात्य प्राणिशास्त्राच्या नियमानें कांहीं गुण प्रत्यक्ष प्रभावी आणि कांहीं गुण तिरोहित असतात. म्हणजे या दोन गुणांना धारण करणाऱ्या व्यक्तींचा संबंध झाल्यास संततीमध्यें पहिला गुण जास्त प्रमाणांत उतरतो. अशा तऱ्हेनें दुसरा गुण प्रजेंतून मुळींच नष्ट करावयाचा असल्यास, पिढ्यानुपिढ्या संततीचा पहिल्याच गुणांशीं संबंध आणावा लागतो. आणि अशा तऱ्हेनें करीत गेल्यास आठव्या पिढीला आपला उद्दिष्ट हेतु सिद्ध होतो. 'ज्या मेंडेलियन लोकसंख्येमध्यें प्रत्येक पिढीला संख्येची दुप्पट वाढ होते, आणि ज्यामध्यें प्रत्यक्ष गुण हा आपणांशीं समान अशा तिरोहित गुणापेक्षां दुप्पट झपाट्यानें वाढत जातो, त्या लोकसंख्येमध्यें प्रत्यक्ष गुण हा आठव्या पिढीला नष्ट होतो व तिरोहित गुण नष्ट होण्याला अकरा पिढ्या लागतात[1].' मग सारख्या सात पिढ्या, एका जातीच्या पुरुषांशीं अशा तऱ्हेनें उत्पन्न झालेल्या स्त्रियांचा संबंध होत गेल्यास, सातव्या पिढीला स्त्रीगुण नष्ट होईल असें सांगणाऱ्या मनूनें अस्वाभाविक तें काय केलें ? परंतु आधुनिक पंडितांचा स्वभाव शब्दाचा अर्थ, सृष्टींत दिसून येणारे नियम असा नसून, त्यांच्या मेंदूंतून निघालेल्या शकला असा आहे. इतक्या चिकाटीनें ते गुण कोणी उत्पन्न करील किंवा नाहीं, हा प्रश्न व्यवहाराचा आहे. परंतु ऐतिहासिक काळांत, मनूनें स्पष्ट नियम दिला असूनही, हे प्रयोग करून पाहिले नव्हतेच, अशा तऱ्हेचें विधान सर्वज्ञ इतिहासज्ञच करूं शकेल. ह्या समाजपद्धतीमध्यें, एकादे वेळीं कांहीं गुण उत्पन्न करण्याची जरूरी वाटल्यास, एकांगी व डोईजड तरी काय आहे ? परंतु अशीं विधानें सांपडतात खरीं ! ग्रंथकार पुढें खुलासा करतात, 'पुरुष म्हणजे बीज, स्त्री म्हणजे क्षेत्र. बीजालाच सर्व महत्त्व क्षेत्राला कांहींच नाहीं, अशी ही एकांगी उपपत्ति[2] आहे.' पुरुषप्रधान संतति मानण्याकडे स्मृतिकारांचा कल कां झाला

---

१ Heredity and Eugenics by Gate; Trend of the race by S. J. Holmes.

२ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न, वि. रा. शिंदे.

असावा याचें कारण आम्हीं मागें प्रयोग देऊन सांगितलेंच आहे. परंतु स्मृतिकार क्षेत्राला महत्त्व कांहींच नाहीं असें मानीत, हें आधुनिक पंडितांचें सत्य आहे, स्मृतिप्रणीत नव्हे.

'बीजमेके[1] प्रशंसन्ति क्षेत्रमन्ये मनीषिणः।
बीजक्षेत्रे तथैवान्ये तत्रैषा तु व्यवस्थितीः॥
अक्षेत्रे बीजमुत्पन्नं अन्तरैव विनश्यति।
अबीजकमपि क्षेत्रं केवलं स्थंडिलं भवेत्॥'

या श्लोकावरून मनु क्षेत्राला कांहींच महत्त्व देत नव्हता, असें दिसतें काय? मनूला सुबीज आणि सुक्षेत्र या दोहोंचीही जरूरी भासते मग आधुनिक पंडित कांहींही लिहोत!

'सुबीजं[2] चैव सुक्षेत्रे जातं संपद्यते यथा।
तथार्याज्जातमार्यायां सर्वं संस्कारमर्हति॥ मनु

परंतु 'समग्र ग्रंथ पाहिल्याविना' अर्थ लावण्याची पद्धत आधुनिकांनीं कां सोडावी?

जातिसंस्था सृष्टीच्या नियमांना धरून आहे असें दाखविलें, तरी ती समाजरचनाच श्रेष्ठ ठरते असें नाहीं, असें कांहीं आधुनिक पंडितांचें म्हणणें पडतें. त्यांचें म्हणणें असें कीं, सृष्टिनियमांत दिसून न येणाऱ्या कितीतरी गोष्टी आपण धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ कल्पून, त्यांच्या आधारानें आपल्या समाजव्यवस्थेमध्यें अंतर्भूत करून घेतल्या आहेतच. त्या बाबतींत जर मनुष्यप्राण्यानें आपलें कौशल्य लढवून समाजरचना केली, तर प्रजोत्पादनाच्या म्हणजे जातिभेदाच्या बाबतींत देखील मनुष्याला कौशल्यानें नियम बसविण्याची परवानगी असावी. हिंदूंच्या आचारांमध्यें जे कांहीं उपवास आणि सण सांगितलेले आहेत, ते कांहीं सृष्टिनियमांत दिसून येत नाहींत. उपवास म्हणजे मुळींच न खाणें, आणि सण म्हणजे जरूरीपेक्षां जास्त खाणें या दोनही स्थितीचें समर्थन, सृष्टीचे नियम दाखवून करतां येणार नाहीं. अशा तऱ्हेनें अनंत विषय धर्मांत रूढ झालेले

१ मनुस्मृति.
२ मनुस्मृति.

दिसतात, त्यांचा सृष्टिनियमांशीं संबंध दाखवितां येईल काय? हिंदुधर्मा-मध्यें मोक्ष म्हणून जी कल्पना आहे, ती सृष्टीच्या कोणत्याही नियमानें सिद्ध करून दाखविणें शक्य नाहीं. व्यक्ति मृत झाल्यानंतर पुनर्जन्म घेऊन, पुन्हां अवतीर्ण होते या बडबडीला विद्वानांनीं लिहिलेलीं पुस्तकें आणि त्यांतील परंपरागत बडबड या पलीकडे काडीचा देखील आधार[१] नाहीं. सद्गुणांचें फळ सत् आणि दुर्गुणांचें फळ असत् ही दंतकथा आहे. कारण सृष्टींत तसें घडलेलें दिसत नाहीं. ज्या सृष्टीमध्यें जातिसंस्था आहे असें आपण म्हणतां त्या सृष्टीमध्यें नैतिक हक्क कोणालाच नाहींत. सृष्टींत हक्क म्हणजे पशूंचे हक्क. सृष्टींत बळी तो कान पिळी. नीतिकल्पना म्हणून ज्यांना म्हणतात, त्या फक्त मानवी कल्पना असून प्रत्यक्ष सृष्टींत त्यांना अस्तित्व नाहीं. म्हणून सृष्टिनियमाविरुद्ध अस-लेलीं जीं तुमचीं नैतिक मूल्यें त्यांचा सृष्टिनियमाविरुद्ध विजय होणें शक्य नाहीं. म्हणून नैतिकमूल्याबद्दल बडबड करूं नका. या बाबतींत जहाल पाश्चात्यांचीं मतें काय आहेत, तीं आम्हीं पूर्वीं दिलींच आहेत[२].

अशा तऱ्हेचे आक्षेप येतात ही गोष्ट निश्चित असल्याकारणानेंच आम्हीं शास्त्रांची विभागणी, त्यांचे अधिकार आणि प्रामाण्यवाद याची पूर्वींच थोडीशी चर्चा करून ठेविली आहे. हें प्रत्यक्ष शास्त्र म्हणून जें कांहीं पंडित पुढें मांडतात, तें प्रत्यक्ष नसतें तर कांहीं अनुभवावरून त्यांनीं काढलेलीं अनुमानें असतात. त्यांना ज्या गोष्टी प्रत्यक्षानें सिद्ध करणें अशक्य आहे ही गोष्ट माहीत असते, त्या स्थिति ते गृहीत कृत्यांत दडपून देतात. मनुष्य ज्या शक्तींचा परिणाम आहे त्यांना त्या कोणीकडे जात आहेत, ही गोष्ट माहीत नाहीं हें कशावरून? मनुष्य तर राहूं द्याच अगदीं आद्य ज्या जीव-जाति (Phyla) त्या कोणत्या शक्तींचा परिणाम आहेत, ही गोष्ट मि. बरट्रॉंड रसेल आणि आधुनिक पंडित सांगू शकतील काय? परंतु असे मुख्य मुद्दे सोडून, बाकीची अघळपघळ व्याख्यानें देत सुटणें, हेंच तर बुद्धिप्रामाण्य-वादाचें आद्य लक्षण आहे. आम्हीं म्हणतों कीं, जीवजाति उत्क्रांत वगैरे

१ चार्वाकदर्शन- सर्वदर्शनसंग्रह.

२ A freeman's worship by Bertrand Russel; Romanes lecture by T. H. Huxley; हा सर्व उतारा आमच्या प्रस्तुत ग्रंथांत पान ५१ वर दिला आहे.

